२. प्रो नेवासे सरकार अमदानगर येथील गाव दोन — १. मोजे रघोली.

१. मोजे हेडगाव.

२

येथील बाबती सरदेशमुखी.

१४

येकुण चौदा गावपेकी बारा गाव मोगलाई अमलाचे सुदामत मोगलाई आमला चालत आला आहे त्याप्रमाणे व दोन गाव बाबती व सरदेशमुखीचे येणेप्रणाणे ईनाम करून दिल्हा असे. तरी तुम्ही व तुमचे पुत्रपोत्रादिवंशपरंपरेने ईनाम अनभउन सुखरूप राहाणे. जाणिजे छ * २५ रबिलावल अज्ञा प्रमाण. मोर्तब.

---

लेखांक [२७] श्री * संवत १८०९ माघ शुद्ध ३

११५] [६ फरवरी १७५३]

राजश्री जयाजी सिंदे गोसावी यासी

आसिर्वाद उपरी. कितेक बोलणे आहे त्यास तुम्ही भोजन करून लौकर येणें रा छ * २ रबिलखर. राजश्री रामाजी अनंत [दाभोलकर] यासी आधीं पुढें पाठउन देणे. मागाहून तुम्ही बहुत लौकरीच येणे. जाणिजे छ मार. (लेखन सीमा)

---

लेखांक [२८] श्री

[१४ जून १७५३] ?

पुा राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ [पेठे] स्वामी गोसावी यासी

विनंती उपरी. हेदरजगासी विरुध अम्हीं हूनये खाईखास मुदाये नाहीं यास्तव तिलमात्र दाखवोत नाही. ते हून करतील तर इलाज नाही. लक्षा प्रकारे ते हून करणार नाहीत. सर्व संशये वेशाखअखेर जाहला नाही तो कलेल. तुम्हास पूर्ण आरोग्यता जाहाली न जाहाली ते लिहिणे. रामाजीपंतानी तूर्त राजकारण महकूप केले किंवा अद्याप त्याच कर्तव्यतेत आहेत हे लिहिणे. सातारियाकडील तुकोजी सिंदे [?] याची पत्रे पाठविली त्यावरुन सर्व कलले.

साधारण पक्ष त्यानी आपले नवे लोकास निरोप द्यावा. शफतपूर्वक बाबजी जाधवानी करार करावा की मुलकात उपसर्ग न करावा.

सर्व फोज गाडदीसुधा ताकीद करुन चालून सुमेरगिरचे मठापावेतो जावे. माहर दरीयातील वेढा येतो त्याचे उतरतिरी

त्यांनी आपले लोकास निरोप द्यावा. आम्हीं तुकोजी सिंदे गोविंदराव मात्र सर्व फौज सातआठसे रखवालीस मुल्काचे पूर्ववत ठेवावी. आज तीनचार वर्षे चालते तसे चालवावे परंतु बाबजी जाधव गरुर पेका खावयास आहे याजमुळे नरम येऊन नीट चालणार नाही यास्तव दुसरा प्रकार कठिण. [पण] होईल तर करावा.

अम्हीं पुणियास दाखल होउ तोपावेतो देणेचे तिरी राहावे. तिलमात्र रजबदल करुन शहरा वाणी जिनस जाउ देउ नये. रात्रदिवस भोवते फिरावे. आम्हीं पुणियास आलियावर मुजफरखानास[१६] पाठउन. त्याने येथे कबूल केले आहे की शहरास तिलमात्र उपसर्ग न लाविता नीट रस्त्याने चालून जाउन बाबजीस धरुन आणितो. हा प्रकारही आमचे लसकरचे लोकात प्रगट होउन दहशत पड ते करावे.

जागा नाक्याची वाकी पाहून तेथे जाउन गाडदीहूगमसुधा बसावे. सर्व लसकर वणेचे तिरी असावे. प्रथम जावे त्याचे अदले दिसी सर्वांनी करार करावा की शहर जालू नये लुटु नये. बाबजी जाधवाचे पार पत्य करावे ऐशा गपा माराव्या. त्यास वातमी जाउन दहशत खाउन गडावर पलाले म्हणजे अती उतम जाहाले. आपण शहर घेउन राखून खाली हवेल्यात बसावें. हा उतम पक्ष. बाबजी जाधव नरम न येत तेव्हां ऐसे केले पाहिजे. उगीच दोनअडीच हजार फौज किती दिवस ठेवावी. सिबदी कोठून द्यावी. पावसाला जवल आला. उगेच का बसावे. विरोध तो आहेच. मर्यादा कोठे राहिली आहे. हा प्रकार तेथे आहेत त्याच्याने न होय तर.

शेषापंत आले आहे. त्याचे आमचे बनतच आहे. करवीरवासीच हे तिनी प्रकार तुकोजी सिंदे यास तुम्हीं लिहिणे अथवा हे पत्रच पाठवणे. त्याच्याने यातून होईसा असेल तो करतील. आमचे जाण वरुयास या मजकुरामुळे होणे नाहीं यानी काहीं बोलून पोकल दिसू नये. सिपाईगिरीचे दबावाने असावे. छ ॥ १२ हे विनंती.

पो छ १७ साबान.
[१९ जून १७५३]

---

(१६) मुजफरखा गाडदी कुकडी नदीची लढाई झाल्यानतर पेशवाईत आला असे राजवाडे ह्मणतात [ खड १ ले १६ टीप ७२ ] भालकीच्या लढाईनतर तो आला असावा असे पेशवेदप्तर बोलते. [ पेद २१ ले ४९ ] त्या अनुरोधाने ही मिती पत्राची दिली आहे

लेखांक [३९] श्री * संवत १८१० आषाढ शुद्ध १३
[१३ जुलै १७५३]
सिका [नकल]

राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान असिर्वाद. सुा आर्बा खमसेन मया व अल्फ. तुम्ही हुजूर कसबे पुण्याचे मुकामी येउन विनंती केली की आपण राज्यतील पुरातन सेवक श्रमसाहास बहुत प्रकारे करून येकनिस्टेने सेवा करीत आलो आहे तरी स्वामीनी कृपाळु होउन नूतन गांव मोकासे ईनाम देह वितपसील.

१ मोजे वालुज व दाखली विसापुर पा पाडिये पेडगांव.

१. मजरे सोनवडीवाडी मोजे अरणगांव पा नगर हवेली.

२

येकुण दोन गाव करार करून दिल्हे पाहिजेत त्याजवरून मनास आणिता तुम्ही राज्यातील पुरातन सेवक येकनिस्टेने सेवा करीत आलेत हे जाणून तुम्हावर कृपाळु होउन हरदु गाव पो मोजे वालुज दाखली विसापुर व मजरे सानवडीवाडी मोजे अरणगाव मोकासा ईनाम नूतन साल मजकुरापासून करार करून दिल्हा असे. तरी हरदु गावचा मोकासियाचा अंमल आपले दुमाला करून घेउन तुम्ही व तुमचे पुत्रपोत्रादिवशपरंपरेने ईनाम अनभउन सुखरूप राहाणे. जाणिजे छ * ११ रमजान बहुत काय लिहिणे. मोर्तब.

---

लेखांक [४०] श्री * संवत १८१० कार्तिक वद्य १४
[२३ नवंबर १७५३]

अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दाभोलकर] गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुहूरसन आर्बा खमसेन मया व अलफ. तपोनिधि गंगागिर गोसागोदु महंत हे का उजनीमध्ये राहातात. हुजूर पुण्यांस आले होते. बहुत थोर आहेत. यांचे चालवणे अगत्य जाणून राजश्री जयाजी सिंदे यांचे नावे सनद याचे चालवण्याविशी दिल्ही आहे. तरि तुम्ही मारनिलेस

सांगून सनदेप्रमाणें याचे चाले ते करणें. यास तेथे मठ पका बांधोन देणे. अतीत वैरागी यांचा कोण्हेविशीं उपसर्ग न लागतां सुखरूप राहात ते करणें. हरयेकविशी तुम्हीं यांचा- परामर्ष करीत जाणें. ॥ जाणिजे छ * २७ मोहरम. ॥ बहुत काये लिहिणे. (लेखन सीमा)

लेखांक [४१] श्री * संवत १८११ वैशाख शुद्ध १५

[६ मे १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत [दामोळकर] गोसावी यांस.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुा आर्बा खमसेन मया व अलफ तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. लिहिला मजकूर कळला. इकडील वर्तमान चिरंजीव राजश्री दादास लिहिले आहे ते सांगतील त्याजवरून कळल. ॥ हरयेक मनसबा आपा चिरंजिवाचे मर्जीनरुप[१७] करितात ऐसे चिरंजीवानी लिहिले त्यावरोन संतोष जाला. पुढेही कामें नीट होय तेच करावे. करतील आपा ऐसा भरवसा आहे. चंद्र * १२ रजब. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

पो छ ११ रमजान.

[३ जुलै १७५४]

लेखांक [४२] ॥ श्रीशंकर * संवत १८११ आषाढ शुद्ध २

[२२ जून १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरि. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. राजश्री जयाजी सिंदे यास पत्र पाठविले आहे त्याजवरून सविस्तर

(१७) दादासाहेब उत्तरेकडे आले त्या वेळी जयाजी शिंदे बरोबर नव्हते मागाहून ते आले. त्याचे धोरण दादासाहेबास रुचेल की काय याची त्यांना शंकाच होती [ पेद २ ले ३४ पेद २७ ले. ८२. खब ६ ले २९२ ] तस्मात कुंभेरीवर जाण्याची भानगड उपस्थित झालीच त्या वेळी दादासाहेबांनी शिंद्याचा पाठिंबा केला त्याला अनुलक्षून हे पत्र होय.

कळेल. सारांश रुपरामाचा हात मल्हारबाचे हातामध्यें दिल्हा परंतु अद्यापि आग्र्यात व कोलेत ठाणी बसली नाहींत याजमुळे रुपरामानें रुपया वसूल दिल्हा नाहीं. आग्र्यात रामाजी सखदेव आमचे आईकत नाहीं याजमुळे त्यास धरून आणावयास आमची फौज पांचसातसे व जाटाची हजार दोन हजार देवविली आहे. तो आणिला म्हणजे येईलसे दिसते. रोज येक कारभारास दिक्कत पडते. गांवातील रुपया तरी आणीक आठा दिवसा तिनेक वसूल येतील. श्रावणी पुर्णिमेपावेतो पाचेक वसूल होतीलसे दिसते. नवे कांहीं खुसपट केले तरी कांहीं आले तरी येईल. असो. जे होईल ते करीतच आहों. सारांश तुम्हीं आठा दिवसा आड सविस्तर आपलेकडील वर्तमान लिहित जाणे. माधासिंगाचा भाव काये आहे ते लिहिणे. कृणीराम गेला आहे त्याना काय मजकूर. काय बोलतो ते लिहिणे. हरगोविंदाची काय अवस्था [केली] ते लिहिणे. मारवाडचे कोणकोण रजपूत फुटले व कोणकोण फुटणार. कांहीं रामसिंगाकडे होत चालले किंवा नाहीं ते लिहिणे. मोहनलाल येथे वकील माधवसिंगाचा आहे. त्यास आम्हीं तुम्हांबराबर फौज द्यावयाविसी ताकीद केली आहे. कांहीं देईलसे दिसते. वरचेवरी वर्तमान लिहित जाणे. जाणिजे छ * ३० रमजान. बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा)

---

लेखांक [४३] श्री * संवत १८११ श्रावण शुद्ध ११

[२९ जुलै १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा खमस खमसेन मया व आलफ. तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें प्रविष्ट जाले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. याज उपरी जाले वर्तमान निरंतर पत्रीं लिहित जाणें. ॥ जाणिजे. छ * ९ शौवाल. ॥ बहुत काय लिहिणे येथून सविस्तर मजकूर आपास लिहिला आहे त्याजवरून कळेल. बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा)

पो छ २५ सवाल.

[१५ अगस्ट १७५४]

लेखांक [४४]

श्री * संवत १८११ श्रावण वद्य ६
[९ अगस्ट १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुहूरसन खमस खमसेन मया व अलफ. तुमचे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरि सविस्तर लिहिणे. वरकड वर्तमान राजश्री जयाजी सिंदे यांसि लिहिलें आहे त्याजवरून कळेल. ।' जाणिजे. छ * १९ सवाल ।' बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

लेखांक [४५]
१२३]

श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध १
[१९ अगस्ट १७५४]

(० श्री ० रा‍माजी सुत पतिद्वर्वनिधान बाळाजीबाजी रावप्रधान)

राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्रो॥ रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिजे विशेष सूरजमल जाठ याजकडील मामल्याचा रुपया पहिले हफ्तियाचा येणे त्याजपैकी रूपराम कटारा याणे येथे कांहीं वसूल दिल्हा. बाकी बहुत राहिली आहे. त्याचा तकादा करितों. त्यास जयापाकडे कांहीं रुपया आपण वसूल दिल्हा आहे येसे रूपराम [कटारा] सागतों. त्यास तुम्हीं जाटाचे मामलती पैकीं रुपया काये वसूल घेतला आहे हें लिहून पाठविणे. जाणिजे. छ * २९ शौवाल ।' बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

लेखांक [४६]

श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध २
[२० अगस्ट १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यांस.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा खमस खमसेन मया व अलफ. तुम्हीं

पत्र पाठविले प्रविष्ट जालें. कृष्णगड[18] फते केला. ठाणें बसविलें. जागांजागा जप्ती अमल ठेउन रुकियाचे वृत्त लिहिले ते कळलें. आशास कृष्णगडीहून पुढें कोठे गेलेत. हली कोठे आहां. पुढें कर्तव्यार्थ काये योजिला आहे. बिजेसिंगाचा इरादा कैसा आहे हे तपसीले वरिचेवरी लिहित जाणें. येथील वृत्त विस्तारें राजश्री जयापास लिहिले आहे त्याजवरून कलेल. जाणिजे. ॥ छ * १ जिल्काज.

लेखन सीमा

---

लेखांक [४७] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध २

१२४] [२० अगस्ट १७५४]

राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसि.

उपरी. तुम्हीं पत्रें कृष्णगड फते करून पाठविलें तें पावोन मविस्तर अर्थ कलला. त्याजउपरी तुम्हीं कोठे गेलां काये करितां. बिजेसिंगापासीं जमियेत काये आहे. पुढें झुंजावयाचा प्रकार कैसा. सफेजंगी बाहेर निघोन करणार किंवा मेडत्यात राहोन झुंजणार हा अर्थ तपसीले लिहिणें. ॥ जाणिजे. छ * १ जिल्काद ॥ बहुत काये लिहिणे.

लेखन सीमा

---

लेखांक [४८] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध ७

[२४ अगस्ट १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसी.

सेवक. रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा खमस खमसेन मया व अलफ पेशजीची मामलत उदेपुरची राजश्री गोविंद कृष्ण[19] यांजकडे आहे. त्यास याचा

---

(१८) बखरकार या कृष्णगडच्या लढाईचे वर्णन देत नाही. त्याचप्रमाणे मारवाडच्या स्वारीत ज्या अनेक लढाया झाल्या त्याचा इत्थभूत वृत्तातही तो देत नाही मेडता व नागोर या दोन मुख्य लढायाचाच केवळ उल्लेख करितो असे आता स्पष्ट दिसते

(१९) याचे आडनाव क्षीरसागर असे आहे हे घराणे हल्ली सादडी मेवाड येथें असून तेथें जाऊन आम्ही तपास केला पण त्याच्या वशजाजवळ कोणी जुनें कागदपत्र असल्याचे आढळले नाही

गुमास्ता रामाजी गोपाळ तेथे आहे त्यास तेथे रावहात नाहीं. दुसाला रुपयाचे मामलतीचा वसूल होणे त्याजपेकी येक रुपया दिल्हा नाहीं. वकिलीचे काम याचे हातोन घेत नाहीं. हवेली याजकडे आहे त्यात रावहात नाहीं. कुरण आहे त्यास उपद्रव करितात त्याजकडे चालो देत नाहीं म्हणून विदित जाले. त्यास मारनिले पदरिचे याचे सर्व प्रकारे अवशक याजकरिता येविसीची ताकीद उदेपुरकरास व विष्णु[२०] महादेव [गदरे] यासी करून पूर्ववतप्रमाणें सुदामत याजकडे चाले, वकिलीचे कामकाज याचे हातें घेत दुसाला रुपये रोजिन्यासुधा याचे वसुलांत येत हवेलीत याचे निस्वतीचे रावत कारकून याजकडे चाळत आल्याप्रमाणे चालें उपद्रव कोणी न लावीत येसे करणें. वारंवार याचा बोभाट नये ते करणे. जाणिजे छ * ५ जिलकाद. [*] बहुत काय लिहिणे




---

लेखांक [४९]
[१२५]

[*] श्री * संवत १८११ भाद्रपद वद्य २
[३ सितंबर १७५४]

पुा राजश्री जयाजी सिंदे गोसावी यासि.

आसिर्वाद उपरी. चिरंजीव राजश्री दादाजवळून तुम्ही निरोप घेउन मारवाड प्रांतीं गेला या वर्तमानाची पत्रे मात्र तुमची आली. त्या अलीकडे पुढे कोठ पावेतो गेला. तिकडील मेडतेवाले वगैरे रजपूत येउन तुम्हास सामिल किती जाहले. विजेसिंगाजवळ फौज तोफखाना किती जमा जाहाला. वरकड राजे रजपूत बहुत व चागले कोणीकडे शामिल जाहले व होणार. फौज दोहीकडील किती आहे. दाणा वैरण कसी मिळते. पर्जन्य कसा आहे. त्या प्रांतात फौजेस मजलीने पाणी मिळत नाहीं. सांप्रत पर्जन्यवृष्टीकरून तो वोढे तळी जाहली असतील. हा सर्व विस्तारे अर्थ निरंतर लिहित जाणे. मोठा मनसबा. मारवाडी रजपूत अद्याप गर्विष्ट. इकडील फौजाच्या गाठी सावकाश पडून संग्रामी श्रमग्रस्त न जाहाले. त्यासी प्रसंग एकाएकी तुम्हावर प्राप्त जाहला आहे. त्यास तजविजेने दमउन युक्तीने समय पाहून जरब देउन कार्यसिधी करावी. श्रीकृपेने सरदारी व सिपायेगिरी व दाव उपाये जाणते

---

(२०) याचे उपनाव 'गदरे' असे दिले आहे या वेळी तो नामांकित सावकारात मोडत असे हा पुढें मेवाडच्या वकिलीवरही होता

सर्व गुण तुम्हास आहे. तदनुरूप साध असाध विचार करून कार्य करणे. जर जोधपुर निमे[२१] राज्य द्यावेसे विचारे जाहलिया उतम आहे. दाटून अगदी घ्यावयासाठी कलहवृधी न करावी. हा थोराचा संप्रदाय आहे. [ज]र युध्यावाचून साम न होयेसेच असलिया सावधतेने आपले रीतीने त्यास आगास आणून नम्र करून कार्य संशादावे. सत्वर कार्यसिधीचे वर्तमानाचे पत्र पाठवणे व विलंबावर पडले तरी निरंतर सविस्तर अर्थ लिहित जाणे. रा छ ४ १५ जिलकाद. बहुत काये लिहिणे हे आसिर्वाद

लखन
सीमा

---

(२१) हे पत्र अत्यंत महत्वाचे आहे. अहदनाम्याप्रमाणे आगरा व अजमेर हे दोन सुभे मराठ्याकडे आले तेथील बदोबस्त ज्या तत्वावर करावयाचा ते यात स्पष्ट दिले आहे 'अजमेरचा सुभा मोठा तो वजीर समशेर शिंदे यानी सर केला आहे पहाता गनी माळव्याहून थोर परतु या सुभ्यात सिधे जमीदार राणा, राठोड व कछवाये. याशिवाय कोटा व बूदी वरकड लहान जमीदार आहेत' असे गोविंद तमाजी गलगलेकर वर्णन देतो [पेद २७ ले १०७,१०८] निमे राज्य सतोपाने तर कधीच येणे शक्य नव्हते अर्थात् शिंदे व राठोड यात परस्पर लढाई जुपली कृष्णगड व मेडता येथे दोन 'तुवल युध्य निसीम जाली ऐसे मराठे कजी कोणी हा कालवरी केले नाही ते करून यश सपादिले' तथापि राठोड निमे राज्य देण्यास सिद्ध नव्हता अर्थात स्वारी लावतच चालली याच सुमारास मनसूरअलीखा सफदरजग वारला तिकडे मोर्चा फिरविला असता विशेष फलप्राप्ती होईल असे समजून समेट करण्याविषयी शिंद्यास पेशव्याची व दादासाहेबाची पत्रे येऊ लागली शिंद्याशी सरळ सधी करण्यापेक्षा दादासाहेब व होळकर याच्या मध्यस्थीची अपेक्षा राठोडास विशेष वाटली त्याचे वकील दादासाहेबाकडे व होळकराकडे फिरू लागले तेव्हा उभयतानी मध्यस्थी करावी असा घाट घातला पण लढाईची जोखीम स्वत सोसून यशाचे वाटेकरी होण्यास होळकर मध्यस्थी करू पाहातात ती शिंद्यास मात्र मान्य नव्हती शिंदेहोळकराची चित्तशुद्धता झाल्याशिवाय ही गोष्ट केवळ अशक्य होती निदान ती तशी परस्परे करून देणे दादासाहेबाच्या स्वाधीन नव्हते कारण की 'येथील अविवेकीच कारभार आहे' अशी ख्याती तेव्हा छाप बसावयाची कशी. मारवाडसवधी शिंद्याच्या धोरणाआड न येता दुसरीकडे तळ हलवावा असे पेशव्याचे पत्र आले तेव्हा दादासाहेब व होळकर पुष्कराइतके समीप येऊन स्नान सपादूनच दुसरीकडे फिरले ही मोहीम पुढे एक वर्षपर्यंत चालली त्याचा दोष शिंद्याकडे मुळीच नाही जयाजी शिंद्यास दगा झाला तरी दत्ताजी शिंद्याने हिंमत धरून राठोडास अगदी जेरीस आणले तेव्हाच राठोडानी निमे राज्य देण्याचे मान्य करून तह केला [पेद २१ ले ८२, ८३] या स्वारीत राठोडाचा इतका रग उतरला होता की यापुढे ते कधी मराठ्याच्या विरुद्ध उठू शकले नाहीत किंवा त्याच्या प्रतिस्पर्ध्यांस उघड रीतीने मिळाले नाहीत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे

लेखांक [५०] श्री * संवत १८११ माद्रपद वद्य २
१२६] [३ सितंबर १७५४]




राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल ज.णून स्वकीये लिहिणे विशेष. सांप्रत पंधरा दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाही. एसे [नसावें.] निरंतर सविस्तर कुशलार्थ लिहित जाणे. येथील अर्थ तरी फौजेची तयारी होत आहे. विजया दशमीनंतर स्वारीसाठी बाहेर निघणे होईल. जिकडे कार्य विशेष दिसेल तिकडे श्रीकृपेनें जाणे होईल जाणिजे छ * १५ जिल्काद. बहुत काये लि.णे.




पो छ २५ जिल्हेज.
[१३ अक्टूबर १७५४]

---

लेखांक [५१] श्री * संवत १८११ माद्रपद वद्य २
१२७] [३ सितंबर १७५४]

पुा राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसी

आसिर्वाद उपरी. पुा तुम्ही निरोप घेऊन गेला. तेव्हां कर्ज वारावयाचा निश्चये होता. तुम्ही येवज दिल्हा तो कर्जदारास दिल्हा परंतु बाकी कर्ज बहुत होते. जाटाचा मनसबा भारी पडून सेवटी पैका न मिळाला. दिलीत मातबर येवज मिळावा ऐसे असता घराउ पेचापाचामुळे तेही नीट न जाहाले. मनात होते की हिंदुस्तानातून एकदाच चाळीस पनास लक्ष रुपये यावे. येताच कर्ज वारावे परंतु तो अर्थ न घडला. तुम्हीही अंगिकृत प्रतेज्ञात पक्षासाठी चिरंजिवाजवळून गेला. याउपर सत्वर मातबर येवज कर्जवारेसा बहुधा सत्वर तुमचे महतकार्यसिधी जाहलियावाचून येणार नाहीसे [दिसतें.] पुणेयातून रसदाचे येवजपैकी निमे कर्जदारास वावावयास व मुळदी सरदार माहालकरी आम्न सेवक लाहान मोठे याजवर पंचवीसा लक्षाची बेरीज करून सर्वांस सांगितले. सर्वांनी उछाहे खावदस

अवश्यक कार्य व हे दौलत कर्जरोगाने निरतर ग्रस्त येवढा क्षयेरोगासमान कर्जरोग दूर जाहलिया अनि उतमसेच सर्वांनी मानून जे ज्यास बेरीज सागितली ते सर्वांनी कबूल केली हिदुस्तानात जे मातबर आहेत त्याची याद[२२] बेरीज चिरंजिवास लिहून पाठविली आहे. जे सेवक स्वामीचे हिताने आपले हितसे मानीत असतील ते तो संतोषे कबूल करून येवज कर्जदाराचे वरातेप्रा प्रविष्ट करतील. एकदोन कोणी [ होल्कर ] या कार्यावर मन न घालीत तर त्याचा काये मजकूर आहे. बहुतानी अवलंबिले स्वामीकार्य सहजात सिधीस जाउन न करी तोच मात्र दोषस्थान होईल. तुम्ही कर्ज वारावयास रुपये दिल्हे. सर्वांचे आगोधर यास्तव हली काही तुम्हावर बेरीज चिरंजिवास लिहून पाठविली नाही. तूर्त हेच इछा आहे की तुम्ही सत्वर यश सपादावे तुम्हास यश ये समई आलि [या] त्यात सर्व दौलतेस यश. जेथे यश तेथे द्रव्यास काये वाण. सविस्तर अर्थ तुम्हास कलावा यास्तव लिहिला असे. येतवर्थी जे काही उपयोगी दिसेल ते करावे. विस्तार काये लिहिणे. छ * १५ जिल्काद. हे आसिर्वाद.

लेखन सीमा

---

लेखांक [ ५२ ] श्री * संवत १८११ भाद्रपद वद्य २
१२८] [४ सितबर १७५४]

पुा राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसि

उपरी. कासिद तीन जोडी पत्रे देउन तुम्हाकडे पाठविले असेत. तरी तुम्ही तिकडील मंनसुबियाचा अर्थ आठा रोजाच्या अतरे येकयेक जोडी कासिद सरकारच्या व आपल्या पाठवीत जाणे. ।' जाणिजे छ * १६ जिल्काद

लेखन सीमा

---

(२२) हा कर्जरोग कधीच गेला नाही कमी न होता नेहमी वाढतच गेला बिनफेडी कर्जाची ही प्रथा जी निघाली ती पुढे प्राय दुणावतच गेली अस्तु या वेळी जी फाळणी झाली तीस होळकराची समती नव्हतीच पण पेशव्याचे फडणीस जनार्दनपत भानु व त्याचा हस्तक गणेश कृष्ण पेंडशे यांचे मत काय होते ते स्पष्ट आहे ही कर्जपटी केवळ मराठ्यावरच नव्हे पण त्यांच्या माडलिकावर ही बसली तिचा सबध अबदालीशी मुळीच नसता पेशवेदफतराच्या सपादकाने तसा सदर्भ दाखविला आहे तो निराधार असून शुद्ध काल्पनिक होय ह्मणून तारीखही चुकली आहे [ पेद २ ले ७५ ].

लेखांक [५५] श्री * संवत १८११ आश्विन शुद्ध १२

[२७ सितंबर १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यासी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुहूरसन खमस खमसेन मया व अल्फ. बिजेसिंग बारापंधरा हजार फोजेनसी चालोन आला. तुम्ही त्याजवरी चालोन जाउन नीट घोडे घालोन मोडिलात. लुटिलात. पळविलात. मेडते फते केले. येश संपादिलेत. हे वर्तमान लोकानी लिहिले. तुम्हीं काही लिहिले नाहीं. अपूर्व आहे. हंती रणास आले. "दोन प्रहरपावेतों तुंबळ युध्य नि:सीम जालें. येसे मराठे कजी कोणी हा कालवरी केले नाहीं"[२३] ते तुम्हीं करुन येश संपादिले. सामान गोष्टी न जाली परंतु वर्तमान न लिहिलें. हे काये· याउपरी राजश्री जयाजी सिंदे यासी सांगोन जखमी कोण कसकसे. ठार किती. बिजेसिंगाकडे ठार किती हाती घोडे तोपखाना वगैरे काये आले हे सविस्तर लिहिणें. बिजेसिंगास परामविलें याजउपरी जोधपुरीं रामसिंगास राज्यावर बसउन पुढें बिजेसिंगाचे पारपत्य कर्तें तें करावें म्हणजे सर्व गोष्टी सहज घडोन येतील. तुम्हींच हेच अवलंबिलें असेल तरी योजिले नसेल तरीं योजोन करावें. पुढे मनसबाचा डौल कसकसा हे साधंत लिहिणें. [१] वरचेवरी आठा दिवसाआड सविस्तर लिहित जाणे. जाणिजे छ * ९ जिल्हेज.

लक्षुन सीमा

---

लेखांक [ ५६ ] श्री * संवत् १८११ आश्विन वद्य २

[३ अक्टुबर १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुहूरसन खमस खमसेन मया-व अल्फ. ईकडील कितेक अर्थ राजश्री जयाजी सिंदे यांसी लिहिला आहे याजवरून कळेल. मुखत्व हेच की फारच गुंतीत न पडावे. सामदाम करून शीघ्रतेने कारभार उरकावा

(२३) हे वर्णन मेडत्याच्या लढाईसबंधी होय. पेशवा किंवा सदाशिवरावभाऊ यांची पत्रें जी शिंद्याच्या नावें आली ती सांपडत नाहीत. तथापि बखरकाराचे वर्णन निराधार नाही हें लक्षांत असावें. तसेच बखरकारास पत्राचा परिचय होता हे आता स्पष्ट होते.

उतम आहे. जाणिजे छ * २५ जिल्हेज. । तिकडील कारभार आटोपत आला असिला तरी पुढे फाल्गुनमासी जयनगर प्रांते आलिया आम्हीही दि्ली व रोहिले व सवदरजग याजकडील रुपया वसूल करू. सांप्रत सवदरजग[२४] तर वारले. त्याचे पुत्र [शुजाउदौला] आहेत त्याजपासून वसूल करून घेउन. काही जाजती साधले तथापि घेउ. तुम्हास कलावे. जर चैत्रमासी तुमचे बु[गु]ते उरकोन जयनगराचे आजमासे आला तरी आम्हीही येउ. तेथेच भेटी होतील. ऐसाही विचार आहे. जरी तुमचे लांबणीवर पडले व आमचेही पडले तरी ग्वाल्हेरीवरून आम्हीं खेचीवरून ओंकारास येउ तेव्हा भेटी होतील. जसे बनेल तसे करावे लागेल. वर्तमान वरचेंवरी लिहित जाणे त्यासारिखे केले जाईल. जर तेथे लावणीखाली अवघडच किल्याचे जुझ पडले तरी मदतही होईल परंतु आता तुम्ही लांबणीखाली पाडाल असे दिसत नाहीं. बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा) पो॥ छ ८ मोहरम.
[२५ अक्टुबर १७५४]

---

लेखांक [ ५७ ] श्री * संवत १८११ कार्तिक शुद्ध १५
[३१ अक्टुबर १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यासी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुहुरसन खमस खमसेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले प्रविष्ट जाले. विजेसिंगाचे वकील आले आहेत परंतु बोलीचाली ठीक अद्यावरी जाली नाहीं. ठीक जालियावरी लेहून म्हणून लिहिले तें कळलें. अशास तुमचा याचा फडशा होउन निकाल जाला असेल ते वृत सविस्तर लिहिणें. जाणिजे छ * १४ मोहरम. । तेथे सांप्रत कसा विचार पडला आहे. निकाल विजेसिंग करितो किंवा लबाडी करितो ऐकत नाहीं ते लिहिणे व जयापानी तेथील व येथील मनसुबियाचे विचार मनन करून लिहित जावे त्याजप्रमाणे आम्ही व त्यानी करावे. सारांश वरचेवरी मनसुब्याच्या तोडीजोडी लिहिल्याने काम होत आहे. बहुत काय लिहिणे. जयापा स्वदस्तुरचं निराळे प [त्र] लिहिले आहे त्याजवरून येथील मजकूर कलेल. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

(२४) मनसूरअलीखा सफदरजंग हा अयोध्येचा नवाब होय

लेखांक [ ५८ ] ¹ श्री * संवत् १८११ कार्तिक शुद्ध १५

[३१ अक्टूबर १७५४]

राजश्री रामाजीपंत [दाभोलकर] यासी.

नमस्कार उपरि. जयापास मोठे येश आल्याचे विस्तारे पत्र तुम्हीं लिहिले ते अक्षरशाहा वाचता अति हर्षेकरून चित्त संतुष्ट जाहले. श्रीने मोठे इरेचे कामात लजा रक्षिली. दतबा तुकबा[२५] देखील जखमी जाहले. ऐसियास दतबा केवळ मीमच[२६] आहे. असो. ईश्वरे जखमा लागून खेर जाहाली. याउपर रामसिंगाची स्थापना करून स्वकार्य साधून मोकले होउन येणे. राणा भीमाचे पारपत्य जरूर करणे. तिकडेच भरी न राहाणे. चिरंजीव दादास लिहून ते जे कार्य आरंभितील त्यास अनकूल होणे. सविस्तर अर्थ आपाचे पत्री लिहिला आहे. छ * १४ मोहरम. बहुत काय लिहिणे. (केवल सीमा)

पोा छ २७ सफर.
[१२ दिसबर १७५४]

---

लेखांक [ ५९ ] श्री * संवत् १८११ मार्गशीर्ष शुद्ध १

[१५ नवंबर १७५४]

[ पहिला वंद गाहाळ ]

[या] ना दुसरे दैवत नाहीं ऐसे समजतात त्यास ऐसीच महत्येशे येतात मूळ सेवकलोकास निष्ठाच कारण आहे. त्याची फळे हे आहेत. प्रस्तुत सर्व प्रका भरोसा जयापाचाच असे. फार करून रामसिंगजीचे कार्य अभिमानपुरस्कर आपा करून दिल्हेच. अत:पर त्याच मनसुबियांचे भरी भरोन गुंतावे येसा अर्थ नाहीं च्यार रजपूत मातबरासी व रामसिंगासी गाठ घालून देउन आपण मोकले व्हावें. केवर विजेसिंगाची जड उखडून टाकीन म्हटले तर हा दीर्घ प्रेत्न यास फार 'दिवंस' पाहिजे व आपाकडें मनसुबे फार. मनसूरअलीखान वारले. तो मसलुबा मोठाच आहे व फौ

---

(२५) तुकोजी शिंदे हे मारवाडच्या स्वारीत होते हे नव्यानेच कळते. महादजी शिंदे या नाव कोठे आलें नाही पण ते या स्वारीत होते असा आधार आहे इतकेच नव्हे तर 'सन खमसेना म्हणजे १७४९ सात ते बुंदेलखडात आले होते असा लेख सापडतो. मात्र त्याची तत्कालीन प प्रत्यक्ष उपलब्ध नाहीत.

(२६) दत्ताजी शिंदे यास 'भीमबहादुर' असे बखरकार संबोधितो ते केवळ गौरवयुक्त पक्षपा वर्णन नसून त्यास पत्राचा पाठिंबा आहे ही गोष्ट मननीय होय.

चिरंजिवापासी थोडी. फौजेनिसी सर्व इमारत जयापावरच[२७] आहे हे येकउद्योगी नव्हेत. अनेक उद्योग यांस चिरंजिवासमीप राहून करणे लागतात यांस्तव याणी त्या कामाचा उलगडा करावा. पूर्वील वख्तसिंग व राजे अभेसिंग यांची वाटणी आहे त्याप्रों वख्तसिंगाचा वाटा विजेसिंगा द्यावा. अभेसिंगाचा वाटा रामसिंगास द्यावा. त्याचा त्याचा यकविचार परस्पर करून देउन विजेसिंगापासून आपले स्वकार्य होईल ते करून घ्यावे व रामसिंगापासून जे कार्य कराराप्रों करून घेणे ते घेउन मोकले व्हावें. गोहदकर राणा ग्वाल्हेरीस आपले तालुकियात बळावला आहे. त्याचे पारपत्य जरूर करावे. शत्रु लहान × × × [ वंक ओळ गहाळ ] आणि अविलंबे जाउन चिरंजिवास सामिल होउन उमदे मनसुबियाचा साहास करावा. [हें] शुक्र आहे. येविसी तुम्हीं आताच सागणे ते सागोन चिरंजिवाकडे जावयाची त्वरा करणे. वरकड वृत आपास लिहिले असे त्याजवरून कलैल. तिकडील कार्य उरकून सत्वर ज्या कार्यास चिरंजीव जातील तिकडे यावे. छ * २९ मोहरम. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

(२७) राणोजीच्या निधनानंतर लौकरच जयाजी शिद्यानी 'आपली फौज दुपटीने वाढविली' ती या सुमारास बरीच वाढलेली होती. मारवाडच्या मोहिमेतच 'तीस हजार' होती असे कळते. यामुळेंच शिंदे लढाईस कधी कोणाची कचरले नाहीत आणि सर्वच त्याच्या साहाय्याचीअपेक्षा करीत असत. पेशव्यांनी मात्र कर्जफेडीसाठी आपली फौज कमी करण्याचे धोरण धारण केलें असें बापुजी बलाल फडके सागतो हेंच धोरण पुढें बहुश. कायम राहिले आहे त्याचा मागीलपुढील राजकाणाशी बराच निकट सबंध येतो हे लक्षात असावें नागोरास जयाजीला दगा झाल्यानतर ' दसरा जालियावर चाळीसपनास हजार फौजेनिसी येणें होईल' असे अश्वासन मात्र पेशवा देतो पण पदरी फौजच नाही तेव्हा ती येणार कशी ? जीवाजी व यशवतराव पवार, अंताजी माणकेश्वर, समशेर बहादुर व नारो शकर याच्या उत्तरे कडील फौजेस केवळ हुकूम सुटले. [ पेद २७ ले. ११६, १२० ] त्यापैकी जीवाजी पवार व अंताजी माणकेश्वर मात्र पोचले. [ पेद २ ले ५२, ५४, ] समशेर बहादुर तहानतर पोचला [ पेद २ ले ६२ पेद २१ ले ८६ ] नारो शकर मागेच राहीला [ पेद २ ले ६१ पेद २७ ले १२७ ] ही स्थिति शिद्यास लोपली नव्हती ह्मणून ही सेना येण्यापूर्वीच आपली सर्व शक्ति एकवटून राठोड व कछवे यास पराजित केले पुढें निजामाशी साखरखेडल्यावर युद्ध झाले त्यात शिद्याची जी अपेक्षा होती ती यामुळेच [ पेद २१ ले १४० पेद २ ले ८०, ८२ ] अबदालीविरुद्ध दादासाहेब व होळकर जात असता शिद्याच्या मार्गप्रतिक्षेचे कारण हेच होय [ खड १ ले ५२, ५४, ७१] १७६०त अबदालीशी जी शिंदेहोळकराची युद्धे झाली त्यात पेशव्याकडील फौजेच्या अल्प प्रमाणाचे रहस्य यातच आहे. भाऊसाहेब उत्तरेस आल्यानतर निजामाशी सलगीचे कारण ही कमीच होय पानिपतोत्तरकालीन शिदेशाही पत्रव्यवहारात हे व्यग विशद केले आहे त्याचे प्रत्यक्ष प्रत्यतर मिळत असल्यामुळें विदित केले आहे या आक्षेपाची कसोटी पानिपतासबधी लावून पाहाण्यासारखी आहे केवळ

लेखांक [६०]
१३१]

श्री * संवत १८११ मार्गशीर्ष शुद्ध १
[१५ नवंबर १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसांवी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुमा खमस खमसेन मया व अलफ. बिजेसिंगाचा पराजय केल्याचे तुमचे पत्र आलें त्या आलीकडे तुमचे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर लिहून पाठवणें. विजेसिंग आदि करून मारवाडच्या रजपुताची तरवार महसूर. फार करून तिकडील मर्द मनुष्य शमशेरचे काम पडल्यास कोणेविसी चुकतील हे होणेच नाहीं. असें असतां राजे रामसिंग यांची स्थापना करून बिजेसिंगाचा पराजय करावाच करावा येतद्विशईचा उद्योग राजश्री जयापांनी करून गेले. मोठा अवघड मनसुबा होता. तथापि त्याचे सुकृतयोगे व धण्यांचे कृपेने त्यांणी येश संपादिले येणेकरून अतिशयेशी आनंद जाहला. जे धन्यासी परम एकनिष्ठेने वर्तताात धन्याचे चरण. × × [ अपूर्ण ] (लेखन सीमा)

---

लेखांक [६१]

श्रीशंकर * संवत १८११ मार्गशीर्ष शुद्ध ११
[२५ नवबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपर. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. साप्रत तुमचे पत्र येत नाही. तस्मात अटकलेने दिसोन येते कीं कारभार बखेड्यात फैदीखाली पडला आहे. ऐसियासि तुम्ही शाहाणे आहा तोडजोड

---

माळव्यासाठीच निजामाशी १७३७सात भोपाळावर जे युद्ध झाले त्यात 'ऐंशी हजार घोडा नर्मदा उतरला' होता. [ब्रह्मेंद्र ले. १३४] १७४३सात 'पटणे प्रांते जावे या उदेशे पाउणलाख फौजेनिसी' पेशवा उत्तरेस आला ह्मणूनच मराठ्याची गंगेस घोडी नहाली [पुरंदरे १ ले १५०] आणि वरील ह्मण प्रचारात आली. 'महाराष्ट्रमय करण्याची प्रचंड कल्पना मनात खेळत असून जे अवाढव्य कृत्य उरकावयाचे होतें' ते कृतीत कसे उतरले हे किंचित तुलनात्मक दृष्टीने चिंतनीय आहे. या बाबतीत खंड १ ले १५८, १६०, १६८, १६९ खंड ६ ले. ४०९ खरे १ ले १४, २१ पुरंदरे १ ले. ३८७ पेद २७ ले २५९ ही पत्रे मननीय होत 'पनास हजार फौजेनिसी मदत जाहाली पाहिजे' अशी गोविंदपंत बुंदेल्याची अपेक्षा होती त्याचे उत्तर संदिग्ध आहे. [खंड १ ले १७४] चिकित्साअंती संख्या ठरेल ती प्रमाण त्यात होळकरानी 'यदा वीस हजार फौज ठेविली' असें पेशवाच सांगतो ती संख्या लक्षात असावी. [लि ११२]

सर्वेही जाणता परंतु फार गुंत्यात पडिला आसिला तरी पुढे कसी मसलत करावी ते आपास पुसोन लिहिणे. येथेही राठोडीचे तरफेने बोल्त आहेत. तुमच्या विचारे त्यासी बोलावयाचे आसिले तरी बोलू. निदान कोठपावेतो बोलावे ते लिहिणे. आथवा आम्हीं शह त्या रोखे द्यावा येसा तुमचा विचार आसिला तरी लिहिणे. तसेही करू. सारांश तुम्हीं आम्हास लिहावयास आनमान न करणे. येथील मजकूर तरी पत्री लिहिता लाब आहे. सारोष बराचाईट गाझुदीखानापासून निकाल करून घेतला. पुढे रोहिल्याकडील रुपया वसूल होत आला आहे. ते बाकीपैकी पाचसाडेपांच तूर्त देणार. बाकी पुढील वरिसी ऐसे केले आहे व मनसुरअली मेला त्याचा पुत्र आहे त्याजपासून कासीचे काम ठीक करून घ्यावे आणीकही काही नजर वगैरे साधले तरी साधावे ऐसा आमचा मनोदय आहे परंतु त्या गोष्टीस [होलकर] बहुत खटे आहेत. आम्हीं गंगास्नाना जाणार आहो. जर सहजाखाली काही नजर साधली तरी घेउन येउ. ऐसाही विचार आहे परंतु तुम्हीं सविस्तर लिहिणे. सारोश तुमच्या पत्राचा मजकूर पाहून त्याअन्वय करू. हे मनसुबे रिकामपणीचे आहेत. दिवस गेले यास्तव आपास पुसोन लिहिणे त्यासारिखे मनसुबे करू. हाच कागद आपास दाखविणे आणि उतर सविस्तर पाठवणे. आम्हीं कुमक केल्याने काम होते येसे असल्यास खामखा बोलावणे. आम्हीं हजार कामें टाकून येउ. जर आपाचे विचारे नाहीं तरी तसेच लिहिणे. राठोडासी बोलावयाचे विचारास आले तरी बोलू व दत्ताजी सिंदे यासही रामराम सांगणे कीं तुमचा कागद येत नाहीं. हा रुसवा आहे. हे सांगणे. जाणिजे छ * १० सुफर. [२८] तुमचा तुम्हींच निकाल काढिला तरी उतमच जाहाले. आम्हीं हिकडे दोन महिने गंगतीरी राहून जेनगरास परत येउ.

(लेखन सीमा)

पो छ २६ सफर.
[११ डिसबर १७५४]

---

लेखांक [६२] श्री * सवत १८११ पौष शुद्ध ७
[२० डिसबर १७५४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यांसी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुहुरसन खमस खमसेन मया व अलफ.

(२८) या जागी व पत्राच्या शेवटी असे दोन वेळा मोर्तब पत्रात आहे राघोबाचेच पत्र ते।

॥ येथे विजेसिंगाचा वकील आहे तो कांहीं बोलणार आहे तथापि आम्ही बोलत नाही. तो काये बोलणार ते देखील आम्ही विचारिले नाही. ऐसियासि या गोष्टीचे तीनचार पर्याय आहेत. त्यात कोणचा करावा तो लिहिणे. त्याप्रो अमलात आणावे [ असें असल्यास ] करू.

येंक पर्याय येथे वकील बोल्तो त्यासी कोठपर्यंत बोलावे. निदान कोठपर्यंत करावे ते लिहिणे. कलम १

दुसरा पर्याय आम्ही जयनगरावर गंगास्नान करून सत्वर यावे. आम्ही व मल्हारबानी यावे व शह मात्र मारवाड प्रांती मजल दोन मजली द्यावा आणि जे होईल ते बोलून उरकावे. कलम १

तुम्हास सोपे पडले असिले तरी आम्ही गंगाकिनारे आरपार मुलकात सिरोन सवदरजंगाचे लेकावर शह द्यावा. जे साधेल ते साधावे. सांप्रत तेथील नव प्रसंग आहे. कलम

अथवा लौकर गंगास्नान करून मारवाडावर शह द्यावा. जयनगर मजल दोन मजली डावे टाकून तुम्हाकडे नीट दरमजल यावे. मग तेथील प्रसंग उरकोन तुम्ही आम्ही सारेच जयनगरावर येउन चार रुये घेउन फिरावे. हा येक विचार. येणे तरी येकले यावे किंवा मल्हारबास घेउन यावे ते लिहिणे. परंतु मल्हारबास सांप्रत आम्हास सोडिता येत नाहीं. ऐसे आहे.

ऐसे दोनचार विचार आहेत. तुम्हीं सविस्तर मनन करून लिहित जांणे त्यासारिखे ऊ विचार योजणे तो योजिला जाईल.॥ जाणिजे. छ ५ * रावल.

(लेखन सीमा)

पो छ २६ रावल.
[१० जनवरी १७५५]

लेखांक [६३]　　　　　　　　श्री　　　　* संवत १८११ माघ शुद्ध १

[१३ जनवरी १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनत गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सहुरसन खमस खमसेन मया व अलफ. रविसंक्रमणाचे तीळ सर्करायुक्त पो। आहेत. स्वीकार करून उतर पाठवणे. I' जाणिजे छ * २९ रबिलोवल. I' बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [६४]　　　　　　　　श्री　　　　* संवत १८११ माघ वद्य ५

[१ फरवरी १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. सांप्रत तुम्हाकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरी आपलेकडील सविस्तर वर्तमान लेहून पाठवणे. आम्ही मजलदरमजल कृष्णातीरास आलो. येथून मातबर फौजेनिसी राजश्री महादाजी आबाजी[२९] [पुरंदरे] यास कर्नाटक प्रांती रवाना केले. वरकड वर्तमान राजश्री जयाजी सिंदे यास लिहिले आहे त्यावरून कळेल. I' याउपर तिकडे गुतल्यास पाण्यामुळे बहुत देनागत होईल यास्तव जवळ बसउन मोकळे होउन चिरंजिवासमीप यावे. त्याचे विचारे राहाणे. येणे करणे ते करावे. उट चागले चारसे जरूर पाठवणे. छ * १९ रबिलाखर. बहुत काय लिहिणे.




पो। छ २१ जावल सन खमस खमसेन.

[१० मार्च १७५५]

---

(२९) रामचद्र मल्हार सुखटणकर याच्या मृत्युनतर कर्णाटकाच्या स्वारीचे पुढारपण याजकडे सहजच आले. त्याच्या मोहिमेचे वर्णन बऱ्याच पत्रात आलेले आहे

लेखांक [६५] श्रीशंकर * संवत १८११ फाल्गुन वद्य १
[२७ फरवरी १७५५]

राजेश्री रामाजी अनंत गोसावी यांसि.

उपरि. आमचा मुक्काम काल सामरेवर आला. उदईक कूच होणार. पुष्करास स्नानास येणार आहो. वरकड मारवाड प्रांतीचा कारभार तुमच्या लिहिल्यावरून आम्हीं कांही करीत नाहीं. तुम्हीं लिहिता जयनगरचे वगैरे स्वामी करितात तो आम्ही हे उरकोन सेवेसी येतो ऐशियाची आमची तरी कामें उरकत आली. तुम्हाकडे यावे तरी तुमच्या मनात आम्हीं यावयाचे नाहीं.[३०] देशी जावे तरी तीर्थरूप काये म्हणतील. ऐसे दोन्हीं पेच निर्माण जाहालें आहेत. आम्हीं अतःपर दरमजल गेलो [तर] तीर्थरूप आम्हास शब्द ठेवितील की तुम्हीं जयापास टाकून आलेस व तुम्हास टाकून जाताही नये. ऐसे आहे. याहीवर जसे लिहाल तसे केले जाईल. तूर्त पुष्करास स्नानास येणार. जाणिजे. छ * १५ जमादिलोवल. [1] बहुत काय लिहिणे.

(लेखन सीमा)

पोा छ २३ जमादिलोवल.
[७ मार्च १७५५]

---

(३०) एकटे दादासाहेब आले तर येवोत पण 'होळकराचा पाय नसावा. तो आणावयाचे चितात असेल तर श्रीमंतानीही जावे. आमचे आम्ही बिल्हेस लाउं' असा शिंद्यांचा अभिप्राय होता. या भागातील पत्रान्वये शिंद्यास मुळीच मदत न केल्याचा दोष दादासाहेबाकडे येत नाही. पण सर्वस्वी ते निर्दोषीही ठरत नाहीत. होळकरांना वगळून त्यास शिंद्याकडे जाता येत नव्हते हे खरें. पण होळकरासह जयपुरावर ते शह ठेवू शकत होते. [ले. ६२] तसे झाले असते तर मारवाडकर सहजच वठणीवर येते. पण तो शह सोडून मारवाडाकडे वळण्यात व तेथून ग्वाल्हेरीकडे येण्यांत व नंतर देशी जाण्यात त्यांची कुचराई दिसून येते. उत्तरेतील मराठ्यांच्या इतिहासांत हे पहिलेच उदाहरण होय. उभयता देशी गेल्यामुळे शिंदे एकटेच राहिले व त्याना राठोड व कछवे या दोघांचा शह पडला. राघोबा समीप असेपर्यंत कछवा स्तब्ध होता त्याचा मोहरा देशाकडे फिरताच तो कुभांडास प्रवर्तला. राठोडाशी सहमत झाला. बिकानेरकर, शाहापुरवाला, करोलीकर, बूंदीवाला व रूपनगरकर इत्यादि रजपूत त्यात मिळाले [पेद २१ ले. ७४] या सर्वांचे शिष्टकृत्य शिंद्यानी केले. तथापि 'या जिल्यांत छावनी जाल्यानें काये मालवा, काय गुजराथ व काये इकडील प्रांत सर्वा ठिकाणचा बंदोबस्त घडोन येणार व दक्षणी केल्यावाचून राहणार नाहीत ह्मणून रात्रदिवस सर्व चिंतामग्न आहेत' या विवचनेतून मोळ्या सावाने सर्वांस मुक्त केलें खरे. [पेद २७ ले १०६]

लेखांक [६६]

श्री * संवत १८११ फाल्गुन वद्य १४
[११ मार्च १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यासी.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार उपर. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. ॥ तुम्ही पत्र पाठविले ते पावले. सविस्तर मजकूर तेथील कळला. पुढेही लिहित जाणे. आम्ही सांप्रत कसे तरी जयापास उलगडून काढावे या तवासात आहों. जाणिजे. छ * २७ जमादिलावल. बहुत काय लिहिणे.

लेखन सीमा

पो छ ३ आखर.
[१४ मार्च १७५५]

---

लेखांक [६७]

श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ८
[१७ जून १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गो यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. तुमचे पत्र येहून वर्तमान अवगत होत नाहीं. तर तिकडील कारभार कोठपर्येंत आला. निर्गम कधी होणार. कितेक दिवस लागणार ते कुल वर्तमान लिहिणे. येथील मजकूर सविस्तर राजश्री जयाजी सिंदे यासी लिहिले असे त्याजवरून कळेल. जाणिजे. छ * २९ साबान. ॥ बहुत काय लिहिणे.

लेखन सीमा

पो छ ५ सवाल.
[१५ जुलै १७५५]

---

लेखांक [६८]
१३९]

श्री * संवत १८१२ श्रावण वद्य ८
[३० अगष्ट १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजीपंत गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणोन

स्वकीय लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र छ १५ सवालचे पाठविले ते छ १७[३१] जिलकादी पावले. राजश्री जयाजी सिंदे यास दगा होउन निधन पावलियाचा मजकूर लिहिला तो कळोन बहुतच × × × जाले. ईश्वरे मोठी अनुचित गोष्ट केली. ईश्वरीतत्रास उपाय नाही. जयापासारिखा उमदा सरदार यां दग्यांनी मृत्य पावावां येसे नव्हते. होणेरास उपाये नाहीं. असो. राजश्री दताजी सिंदे मर्द खबरदार आहेत. तुम्ही व सर्व सरदार शाबूत आहा दतबाचेच समाधान करून जयापानी उपस्थित मनसुबा केला तो सिधीस पाउन शत्रूचे पारपत्य होय तहरह उतम प्रकारे होये ते करणे. करणे. वरकड वृत दतबाच्या पत्री लिहिले असे त्याज वरून कळेल. ।' दतबाचा स्वभाव सिपायगिरीचा आहे यास्तव रागे करून असमई अस्थानी निकडीस प्रवर्ततील त्यास समजाउन गोडी बसूनच सागत जाणे. आपा असता बोलत होते त्याचप्रा जाहले तर तह करणे परंतु ते सांप्रत चढी लागले असतील यास्तव हरतजविजेने सभाळून राहाणे. दोनचार मिळोन पंचवीसचाळीस हजार जमा होउन आले तर गनिमी तरेनें तीन महिने सभाळणे फौजा तिकडे आलियावर श्रीकृपेने उतमच होईल. छ * २१ जिलकाद. तिळमात्र उदास नसता सर्व करणे. बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [९९] ।' श्री * संवत १८१२ भाद्रपद शुद्ध १२
१४१] [१८ सितबर १७५५]

पुा दताजी सिंदे गोसावी यांसि.

आसिर्वाद उपरी. विजेसिंगास उतम प्रकारे तंग केले आहे वरकड कोणाच्याने काही त्याची कुमक करवत नाही स्वामीनी त्याचे वकिलास साफ सागून निरोप द्यावा. कैलासवासी आपानी जो अभिमान धरिला होता तो सेवटास नेलियाने लौकिक व स्वामीकार्य सर्वास मये म्हणून लिहिले. त्यास आपानी जे अवलंबिल ते

(३१) पहा भाग १ ले १४० टीप १६५ '१५ सवाली शुक्रवारे दगा केला' त्याच दिवशी दाभोळकराने पत्र लिहिले ते '१७ जिलकादी' ह्मणजे २६ अगष्ट १७५५ रोजी पेशव्यास मिळाले असें असतां 'स्मरणार्थ यादीत' जयाजी शिंद्याची जी निधनतिथि दिली आहे ती खरी नव्हे [खंड ६ यादी १२३] अर्थात् यादीतील सर्वच टिप्पणे विश्वसनीय नाहीत. तपासाती कित्येक त्याज्य आहेत

आम्हास सर्व प्रकारे करणे परंतु हा राजकार्य प्रसंग आहे. आपासही येथून वुचीवाद आपा असता चार महिने पाच महिने मागे लिहित गेलो. ती पत्रे तुम्ही पाहिलीच असतील. दूर पथ. दो वर्षांनी हिंदुस्तानातून फौज आली. येकायेकी येउन तयार फौज कर्ता उसीर लागतो. हे लोकाची येथील रीत तुम्हास ठाउकच आहे. जर हंगाम सिध एसा असता तर येक खावद आज वीस हजारा फौजेनसी तुम्हाजवल प्रविष्ट जाहाला असता परंतु लाइलाज. गेरहंगाम व दूर पथ याजमुले विलंब लागला. श्रीकृपेने दीढा महिन्यात पाचसाहा हजार फौज येउन पावेल. मागाहून खासाही वीस हजार फौजेनसी येतच आहे. तुम्ही अवलंबिले कार्य ते अगत्य आम्हास करणे परंतु होणारानरूप आपानी वेतरे वोढिले. सिपायगिरीची रीत केली. सरदारगिरीचा प्रकार न केला. जेव्हां प्रथम मारती[३२] लढाई मारली त्याउपरी नव्या दबावात दट सोसून सलूख हर प्रकारे न केला. पुढील संकट दूरंदेशीने जाणून करून मोकले जाहाले असते तर आज प्रयाग अतरवेद व अलीकडील खेचीचा मुलुक सोडिवणे [व] गेर कामे सर्वही सरकार किफायतीची होउन गेली असती. परंतु होणारास इलाज नाही. तुम्हीही आज पावेतो सिपायेगिरी केली. आता सरदारीची रीत धरून तजवीजेनेच काही कामे करावी. जरूर संकट पडेल तेथेच नेटून सिपायगिरी करावी. तुमचा अभिमान ईश्वरास आहे व मजवर ईश्वरी कृपा आहे तो तुमचे साहित्यास कधी चुकणार नाही. ती[३३] *पिढ्याचे एकनिष्ट सेवक* कामाचे असता तुमचा अभिमान नसावा हे कधीही या

---

(३२) मारवाडातील शिंद्यांच्या युद्धाचे जें कौतुकास्पद वर्णन बखरकारानें केले आहे ते पक्षपाती नसून वस्तुस्थितीशी सुसगत आहे हे या वाक्यावरून स्पष्ट होते

(३३) हें पत्र अत्यत महत्वाचे असून शिंद्याच्या उत्कर्षपरपरेचे दर्शक होय याविषयी याच पेशव्याचे दुसरे पत्रही मननीय आहे [कार्स ले ९९] ही दोन्ही पत्रे प्रत्यक्ष पेशव्याने शिंद्यास लिहिली आहेत 'कैलासवासी यानी वाढविले ती पिढ्याचे एकनिष्ट सेवक' हे शब्द मुख्यत उत्कर्षपरपरेस अनुलक्षून आहेत 'कैलासवासी' ह्मणजे बाळाजी विश्वनाथ असे मानले तर परपराच प्रस्थापित होते. एरवी त्या जागी बाजीराव असे धरले तर 'ती पिढ्याचे सेवक' असे नानासाहेबास ह्मणता आले नसते. वरील उग्दार विसगत असतील असे वाटत नाही. कारण 'ती पिढ्याचे' असे स्पष्ट ह्मटले असून केवळ 'कैलासवासी' ह्मटले असता भावार्थ बदलत नाही बाकीची सगत पिढ्यार्शी लावावयाची असेल तर 'कैलासवासी' ह्मणजे बाळाजी विश्वनाथ असे ह्मणणेच अपरिहार्य होते इतिहासकार बहुश शिंद्याचा संबंध पहिल्या बाजीरावापासून दाखवितात हे चूक होय हा निष्कर्ष केवळ शब्दछल अथवा अनुमाना-वर विसबून नाही पेशवेदफ्तर प्रकाशित झाले त्यात 'राणोजी सिंदे कन्हेरखेडकर' याचा उदय पहिल्या पेशव्यांच्या वेळीच झाल्याचा निर्देश आहे 'तेरीज सेनापती सन खमस' ह्या यादीत 'राणोजी सिंदे' याचे

घरात घडणार नाही. सर्व प्रकारे समाधान चिताचे करून अस्टपेलुचे रीतीने जसा ज्ये समई प्रसंग पाहाल तसा मनसबा करीत जाणे. सत्वरच येथून फौजही येउन पोहोचत आहे. विजेसिंगाचा वकील पतांस लक्ष द्यावे रामसिंगास थोडीसी जागा पोटापुर्ती द्यावी असे बोलत होता. आम्ही ते गोष्ट मान्य केलीच नव्हती. साप्रत ह्या प्रसंग जाहला याजमुळे आम्ही साफच त्यास जाब दिल्हा की याउपर आम्हांस तह कर्ता अनकूल पडत नाही. तुम्ही जाणे. असे म्हणून निरोप दिल्हा. तेथे

---

नाव आहे. [पेद ७ ले २३] दिल्लीकडील पेशव्याच्या पहिल्या स्वारीत राणोजीचे नांव आलेले आहे. [पेद ३० ले ३०७] ही दोन पत्रें त्याचे पुष्टिकरण करितात अर्थात् राणोजी शिंद्याचा उत्कर्ष बाळाजीपत नाना हे सेनाकर्ते असताच झाला होता असे निष्पन्न होते तसे नसते तर 'तेरीज सन खमस' [अव्वार] या यादीत राणोजी शिंद्याचे नाव येणे शक्य नव्हते. पिलाजी जाधव, नारो शंकर ह्यांचा उदयकाळ हाच येतो. 'राणोजीबावास प्रथम खिदमतगारी व नतर पागा मिळाली' असे निश्चयात्मक कळते [भाग १ ले १ टीप २] तसेच बाळाजी भट पेशव्याच्या वेळीच ते 'राव लोकांत चाकरीस होते' असा लेखही सापडतो. [भाव २ अंक ४] तो पेशव्याच्या बखरकारास ग्राह्य आहे. ही सर्व सामुग्री उत्कर्षाची द्योतक, सयुक्तिक व विश्वसनीय वाटते तथापि या बाबतीत ऐतिहासिक टिपण भाग २ ले. ३५ वे पत्र स्वत राणोजी शिंद्याचे आहे ते निर्णयात्मक होय. त्यातील उतारा 'या सरदारीस एक योजून पाठवावा. आह्मी आपले पुरातन चाकरीस यावे असे तुमच्या चित्तात आहे तरी येउ' हे शब्द वाचनीय आहेत मात्र या पत्राची मिती निश्चित नाही किंवा तसे करण्यास अन्य साधनही नाही. 'मोगल पेडीगावास येई तोवरी ठाणे न सोडावे थोरातनिंबाळकराशी झुंजोन, मोगल येईल तोवरी ठाणे न टाकणे फौज आली तरी पाटस झुजवावा.' अशा संधीस लिहिलेले वरील पत्र आहे. प्रत्यतर पुरावा पुढें येऊन वर्ष ठरेल ते प्रमाण. तथापि 'सरदारी' सोडून 'पुरातन चाकरीस' जाण्यास ते तयार होते हे उघड आहे ही पुरातन चाकरी ह्मणजे शिलेदारी किंवा खिदमतगारी मानली तरी ती त्यास वंद्य असून 'पुरातन' होती हेंही निश्चयात्मक आहे. अलीकडे राणोजी याचे जनक जनकोजी शिंदे याची दोन पत्रे उपलब्ध झाली आहेत ती वाचनीय आहेत [पेद १३ ले ५३ पेद ३० ले १०१] त्यावरून असे स्पष्ट होते की ते पेशव्याशी पूर्ण परिचित होते. त्यास पेशव्याच्या 'कृपेने सर्व गोष्टीचे अनुकूल होते महाल मोकासे' सपादन केले असून ह्मातारपणामुळे घरी विश्राति घेऊन होते. त्याच्या जिवतपणीच राणोजीने पराक्रम करून माळव्याची वाटणी सपादन केली होती [पेद ३० ले ३८] अर्थात अशा पुरातन सेवकास मुद्दाम हुजरेगिरीवर नेमणूक करण्याची गरज काय? खिदमतगारीची कल्पना न उमगल्यामुळे आणि शिंद्याच्या उदयाशी सुखठणकराचा किंवा होळकराचा सबंध दाखविण्यासाठी भलतीच चित्रे इतिहासकारानी रंगविली आहेत. त्याची चिकित्सा पुढें केली आहे ऐटि २ ले ३५ चे पत्र ह्मणजे राणोजी शिंद्याचे जणू स्वभावचित्रच होय. तसेच पेद १७ ले १ हे मल्हारजी होळकरासबंधी आहे. ही दोनी पत्रें लेखक किंवा वाचक कोणी कधीच विसरूं शकणार नाहीत

ते आता चढी लागले असतील व मध्यस्त[३४] मारले. गेले यामुले मध्यस्तीसही कोणी सिरत नसेल. अद्याप त्यानी रामसिगास पंम्रावीसाची जागा दिली व तुमची सिबंदी खर्च मसलतखर्च फिटोन दाहा लाख ज्याजती दिल्हे तर घेउन सलुख करून त्या संकटातून सुटावे हे राज्यभार अस्टपेलुपणास उचित आहे. तेथील प्रसगानुरूप करणे. फौज तो तुमचे साहित्यास रवाना करीत असो छ * ११ जिल्हेज. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

लेखांक [७०] श्री * संवत १८१२ भाद्रपद वद्य ९

१४७] [२९ सितंबर १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यासि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुा सित खमसेन मया व अलफ. तुम्हीं रा जयाजी सिंदे निधन पावलियावर पत्रे पाठविली त्याची उतरे मुजरद कासिदाबा पाठविली तीं पावलीच असतील. जयाजी सिंदे यानी मारवाड च्या मनसुबियाचा अंगेज केला त्यास आयुश असते तरी काही चिंता नव्हती त्याचे तेच सिधीस नेते. तथापि त्याच्या मागे राजश्री दताजी सिंदे यांनी हिंमत धरून मन सुबियास आव घातला. तो प्रकार सिधिस पावावाच पावावा यापेक्षा दुसरे अधिक न जाणतां रा अताजी माणकेश्वर ग्वाल्हेरीहून रा करविले. चिरंजीव राजश्री शमशेर बहादर व राजश्री येशवंतराव पवार येसे दाहा हजार फौजेनसी रा केले.

---

(३४) मारवाडकराकडून 'रायसिंग व बिजेभारती' असे दोन मध्यस्त होते त्यापैकी, बिजे• भारती गोसावी हा ९ मार्च १७५५ पावेतो दादासाहेबाबरोबर होता [पेद २७ ले १०७] त्यास त्यानी मेजवानी दिली [१६ मार्च १७५५] तोच गोसावी मारेकरी झाला 'दगा व्हावयासी कारण हेच जाले की गोसावी विजेभारती राजसिंग चव्हाण व जगनेस्वर मध्यस्तीस आले होते नागोराहूनही येकदोन वेळा गोवर्धन खीची आला होता तो योग घडोन न आला मग या त्रिवर्गांनी रावत जैतसिंग राणावत घेउन येथे आल्यावरी काहीयेक दिवस सलुखाच्या गोष्टीत रदबदलीस लागलिया गोसावी व चव्हाण याच्या अगमूते मारेकरी मानसे होती त्यानी सधी पाहून दगा केला जैसिंग गोसावी व चव्हाण आपल्याला समुदाये नाश पावले' असे रामराव नारायण सागतो [पेद २७ ले ११६] जूनच्या अखेरीस राघोबा होळकरासह देशी जाताच केवळ एक महिन्यात हे कृत्य झाले तेव्हा बखरकाराचा कटाक्ष केवळ काल्पनिक ह्मणता येत नाही

अविलंबेच येउन पावतील. खासा स्वारीचीही तयारी होत आहे. दसरा जालियावर चालीसपंनास हजार फौजेनसी येणे होईल. येविसीचा विस्तार दताजी सिंदे यांस लिहिला असे त्याजवरून कलेल. " रजपुतामधे जाटासी राजकारण राखून एकासी स्नेह तर ऐकासी बिघाड एकदाच सर्वासी कजिया करू नये. तूर्त तोंडाने वरकडासी फारच गोड बोलून राजकारण राखावे. श्रीकृपेने फौजही येत नाही[३५]" मग जे समयोचित दिसेल ते करणे. छ २२ जिल्हेज. वरचेवर आठा दिवसा आड वर्तमान लिहित जाणें. छ * २२ जिलहेज. बहुत काये लिहिणे.

लेखन सीमा

पो छ २७ मोहरम.

[३ नवबर १७५५]

---

लेखांक [७१] श्री * संवत १८१२ आश्विन शुद्ध १५

[२० नवबर १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुभा सित खमसेन मया व अलफ राजश्री अंताजी माणकेश्वर यांस राजश्री दताजी सिंधे याचे कुमकेस रा केले त्यास मारनिलेनी लिहिले की दाहा हजार फौजेनसी आपणं मारवाडात कुमकेस गेलो. त्यास मानिले देसीहून गेले तेव्हां फौज गेली ती कललीच आहे. तस्मात हिंदुस्तानची फौज ठेविली असे. त्यास गणतीची मुरवत सहसा न करितां दोनच्यार गणत्या बहुत चोकसीने दक्षणची फौज किती व हिंदुस्तानची फौज किती त्यात उतम व मध्यम व कनिस्ट काय फौजेत माणोस किती हे तपसीलवार लिहून पाठवावे. सारांस मारनिले कुमकेस आले म्हणोन मुरवत धरून गणती भळमळीत घ्याल तर ते गोष्ट कामाची नाहीं. ही गणती बहुत चोकसीने घेणें. मारनिले सेवा निष्टापूर्वक करितात त्यांचे उर्जित पहिले करणे ते केले व हालीही सेवा करून दाखवतील तदनुरुप गोर होणें तो

---

(३५) 'फौज येत नाही' असेच असल पत्रात आहे हा हस्तदोष खराच पण मौज ही की मनी ते लेखणी असा प्रकार मात्र घडला 'चिरजीव दादाचे लग्न होउन होळकरासह रवानगी होणार' [ले. ७२] पण 'खासा फौजेसह कोणी आलाच नाही' [ले. ६९]

होईल. त्यास अंतर नाहीं परंतु गणती चांगली घेणें. या गोष्टीस अल्स न करणे. तुम्हाकडे शद्ब नये ते गोष्ट करणे. ॥ जाणिजे छ * १२ मोहरम. ॥ बहुत काय लिहिणे (इस्तन सीमा)

पो छ १५ सफर.
[२० नवबर १७५५]

---

लेखांक [७२] श्री * संवत १८१२ मार्गशीर्ष शुद्ध १०
[१३ दिसबर १७५५]

(० श्री ॥ राजाशाहूनरपतिहर्षनिधान बाळाजीबाजीराव प्रधान)

राजश्री जिवाजी पवार[३६] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद. सुहूर सन खमसैन मया व अलफ. खासा स्वारी पुण्याहून मजल दरमजल कृष्णातीरास गल्गल्यासमीप दाखल जाली. या मुकामी चिरंजीव राजश्री दादाचे लग्न होऊन यांची व राजश्री मल्हारजी होळकर यांची रवानगी आठादाहा दिवसा त्या प्रांते करून. तरी तुम्हीं राजश्री जनकोजी सिंदे व दत्ताजी सिंदे याच्या विचारे स्वामीसेवा निष्ठापूर्वक करून जंगनामोश सरकारचा होऊन येई ते गोष्ट करणे. ॥ छ * ९ रबिलावल. बहुत काय लिहिणे. (इस्तन सीमा)

---

लेखांक [७३] ॥श्री * संवत १८१२ मार्गशीर्ष शुद्ध १०
[१३ दिसबर १७५५]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरि. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहिणे विशेष. तुमचे पत्र येऊन वर्तमान अवगत होत नाही. तरि

---

(३६) रामसिंगाकडील जगु पुरोहित याजबरोबर जी मराठी फौज जोधपुरास वेढा देऊन होती त्यांत जीवाजी पवार होते असे वामोळकर सांगतो [१ अक्टूबर १७५५] अर्थात् त्रिंबक बापुजीप्रमाणेच ते शिंद्यांबरोबर पहिल्यापासूनच असावेत असे वाटते.

तिकडील वर्तमान काय कसे ते सविस्तर निरंतर लिहिणे. इकडील अर्थ [तरी खा] सा स्वारी दरमजल कृष्णातिरी गलगल्यानजीक जाहाली असे. येथे चिरंजीव राजश्री दादा याचे लग्न होउन आम्हीं कर्नाटक प्रांती जाउ. चिरंजीवाची व राजश्री मल्हारजी होळकर याची फौजसुधा हिंदुस्तानात रवाना करितो. लौकरीच त्या प्रांती येउन पोहोचतील. निरंतरचे तिकडील वर्तमान लिहित जाणे. समसेर बहादर पाच हजार फौजेनसी रवाना केले. नारो शंकरही रवाना केले आहेत. चिरंजिवाचे फोजेची समजाविसी जाहाली. याउपर अविलंबेच येतील. तुम्हीं मल्हारवासही वडीलपणयाचे नात्याने पत्र लिहित जाणे. व्यर्थ आटीने घर बुडाले. बरे मागे जाहाले ते जाहाले. पुढे विरोध वाढउ नये. पैठणचे गोविंदबावानी ब्राह्मणास फार सतले. ब्राह्मण जीव द्यावयास उभे राहातात. सर्वांपुढे बल चालते परंतु ब्राह्मणा [पुढे बल] चालत नाहीं व करू नये. ज्या ब्राह्मणाचे आसिर्वादे[३७] दिली काबिज केली त्या ब्राह्मणासी विरोध कामाचा नाहीं. सविस्तर आठा दिवसाआड वर्तमान लिहित जाणे. छ * ९ रविलावल. बहुत काये लिहिणे.




पो छ २२ राखर.
[२५ जनवरी १७५६]

---

लेखांक [७४] श्री * संवत १८१३ श्रावण वद्य ७
[१४४] [१७ अगष्ट १७५६]

पुरवणी राजश्री जनकोजी सिंदे गोसावी यासि.

आसिर्वाद[३८] उपरी. तुम्ही पत्र पाठविले तें पावले. लिहिला मजकूर

---

(३७) 'यमुनातीरपावेतो अमल होईल' असा नारायण दिक्षित कायगावकर याने आशिर्वाद दिला होता [पेद १० ले. ८१] 'त्याप्रो यमुनातीरपर्यंत आपला अमल चाला' अशी साक्ष पिलाजी जाधवाची आहे [पेद १३ ले ४५] दिल्लीविषयी हा आशिर्वाद कोणाचा होता? ब्रह्मेंद्रस्वामी केवळ 'दिलीस गेलेत' एवढेच ह्मणतो [पेद ९ ले २२] 'आमचे महत्तर कार्य स्वामीचे आशिर्वादावर व्हावे ही इच्छा आहे' असे वासुदेव दिक्षितास नानासाहेबाने विनविले होते [खंड ३ ले ३७३] पण ते कार्य दिल्लीचे नव्हते अस्तु 'ब्राह्मणाचे आसिर्वादे दिली काबिज केली' अशी नानासाहेब याची श्रद्धा व्यक्त होते आणि त्याच्या वेळी 'देकाराचे' ह्मणजे वार्षिक श्रावणमासी दक्षिणेचे महात्म अतिशय वाढले त्याचे मुख्य कारण हे होते याविषयी पुढे पत्र येणार आहे तेव्हा विवेचन करू. ब्राह्मणाचा छल हा वाह्यारोप असून अंतरंग वेगळेंच होते 'गोविंदबावा पैठणकर याजवर सरकारची इतराजी बहुत होती लाखोच रुपयाचे पेच असतां दत्ताजी शिंदे यानी सोडउन घेतले आणि मुक्त केले' असे महादजी सिंद्यानी ह्मटले आहे तो हाच प्रसंग असावा [पाप ३ ले ८८] याविषयी ही दोनच पत्रे सापडली.

(३८) हे पत्र सदाशिवरावभाऊचे आहे. बखरकारानें खडणीचा आकडा जो दिला आहे तो दामदुपटीचा होय हेच प्रमाण बहुश बखरीत इतर जागी आढळतें ते हेतुपुरस्सर दिसते. फौजेची संख्या मात्र वास्तविक तीच या वेळी आढळते. [बखर ११]

सविस्तर कलश. सां सां कोटे येथील चालीस लाख रुपये खंडणी केलियाचा मजकूर लिहिला. त्यापैकी सरकारचा नजरांणा पंधा लक्ष रुपये करार केले त्यापैकी साल मजकुरी दाहा लक्ष रुपये द्यावे. बाकी पाच लक्ष रुपये पेस्तर साली द्यावे या प्रमाणे करार केला आहे म्हणून लिहिलें तें कळले. येशांस प्रस्तुत सरकारांत येवजाची निकड बहुतच आहे यांजकरिता सदरहु नजराण्यापैकी दाहा लक्ष रुपये साल मजकुरी द्यावें. ते सत्वर तर्तूद करून पाठविल्यास फारच उपयोगास पडतील. यास्तव पत्र पावताच दाहा लक्ष रुपये सत्वर पाठउन देणें. वरकड मारवाड प्राते वगैरें येवज स्वारीमुळे जमा जाहाला असेल तो तुम्ही देशास याल ते समई समागमे घेउन यालच. यदा पैकियाची वोढ फारच जाहाली आहे याजकरितां निकड जाणून लिहिलें असे. रा छ * २० जिल्काद. सुा सबां खमसेन मयां व अलफ.

(लेखन सीमा)

---

लेखांक [७५] श्रीगजानन

[१७५६]

[नकल]

मा अनाम राजश्री मल्हारजी बिन खंडोजी [होळकर] देशमुख पा चादवड सरकार सगमनेर सु[भा खुद]स्ते बुनियाद यासी बाळाजी बाजीराव प्र[धा]न आसिर्वाद उपरी. सुहूरसंन सबा खमसेन मया व अलफ. तुम्ही हुजुर कसबे पुणे येथील मुकामी येउन विनंती केली की स्वामींनी पेशजी आपणास देशमुखीसमधे परगणे मजकूरपैकी गाव ईनाम मोगलाई अमल जाहागिरीचे करून देउन ईनामपत्रे पेशजी दिल्ही आहेत त्याप्रमाणे आपणाकडे ईनाम चालत आहे. येशास हाली स्वामींनी कृपाळु होउन त्या गावच्या बाबती सरदेशमुखीदेखील जकाती ईनाम करार करुन देउन दरोबस्त गाव आपणांकडे ईनाम चालवावे म्हणोन त्याजवरून मनास आणून तुम्हावर कृपाळु होउन तुम्हास पेशजी ईनाम गाव जाहागिरीचे ९ नउ दिल्हे आहेत त्यापैकी का वडनेर येथील बाबती व सरदेशमुखी राजश्री गोपाळराव चिटणीस याजकडे आहेत सबब तो गाव वजा करून बाकी गाव बितपसील.

१. कसबे वोझर.
१. मोजे नादुर मध्ये मख्रासे. [?]
१. मोजे सिवडी.
१. मोजे पिपलस.

१. मोजे तीसगाव. १. मोजे बावली भोई.
१. मोजे ङगाव. १. मोजे देरेडे.

---

८

येकुन आठ गाव येथील बावती व सरदेशमुखी देखील जकात हाली ईनाम करार करून दिल्ही असे. तरी तुम्ही सदरहु आठ गांवचे बावती व सरदेशमुखी देखील जकातीचा अंमल आपले दुमाला करुन घेउन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने सदरहु आठ गांवचे बावती व सरदेशमुखी देखील जकातीचा अमल ईनाम अनभउन [सुखरु] प राहणे.

[म्हणो] न मारनुले याचे नावे पत्र आपले आज्ञाप्रमाण याचे नावे 'पत्र
सरदेशमुख यास दिल्हे की आपले वि × ×
बावतीवाले यास
मोकासीवाले यास

---

लेखांक [७६] श्री[३९]
१५२] [१७५६] ?




राजश्री दत्ताजी सिंदे गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो रघुनाथ बाजीराव आसिर्वाद टपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. रो विष्णु महादेव [गद्रे] यांजकडील येवज तुम्हाकडे जमा करविला होता तो जमा जालाच अ[सेल.] त्यास तुम्हास आम्हाकडे यावयाचे नसेल तरी जो कोणी तुम्हां अगोदर आम्हाकडे येत असेल याजबराबरी मारनिलेबाबत पैका आधीं हुजूर पाठउन देणें. † ओझास उटे त्याबराबर तुम्हाजवळ

---

(३९) † या पत्रावरील सिक्का नवीन असून इकार सर्व ऱ्हस्व आहेत. आरंभीची अक्षरे फाटलेली असली तरी त्याचा शोध इतरत्र लागतो. स्वयम बाळाजी भट पेशव्याने असलाच सिक्का वापरला होता. [चंद्रचूड १ ले ४७] त्यावरून अक्षराची पूर्ति होते. त्या आधारेंच येथे तशी केली आहे.

सेवक श्रमसाहास करून येकनिस्टेने स्वामीसेवा[४०] केली आहे येशियांस स्वामीनी कृपालु होउन येक परगणा दरोबस्त ईनाम करून दिला पाहिजे म्हणोन त्याजवरून मनास आणिता तुम्ही पूर्वीपासून राज्यातील मातबर सरदार तुमच्या वडीलवडिलापासून तुम्ही श्रमसाहास करून स्वामीसेवा येकनिस्टेने उतम प्रकारे केली. कितेक महत्कार्ये संपादिली व हालीही सेवा करीत अहां व पुढेही करावयाची उमेद धरिता हे जाणून तुमचे चालवणे आवश्यक यास्तव तुम्हावर कृपालु होउन तुम्हास पा यावल सरकार अशेर प्रात खानदेश हा परगणा मोकासबाब खेरीज करून स्वराज्य व मोगलाईदेखील सरदेशमुखी जकात कुलबाब कुलकानु हलीपटी व पेस्तरपटी खेरीज हकदार व ईनामदार करून हाली नुतन ईनाम करार करून दिल्हा असे. तरी तुम्ही परगणे मार सदरहुप्रो आपले दुमाला करून घेउन तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेने ईनाम अनभउन येकनिस्टपणे स्वामीसेवा करून सुखरूप राहाणे. जाणिजे छ * २४ रबिलावल. बहुत काय लिहिणे तरी सुज्ञ असा. मोर्तब.

---

लेखांक [७९] श्री * संवत १८१३ मार्गशिर्ष वद्य ११

[१७ दिसबर १७५६]

[नकल]

चिरंजीव राजेश्री सदासिव चिमणाजी [भट] यांसी - बालाजी बाजीराव प्रधान असिर्वाद. सुा सबा खंमसेन मया व अलफ. राजेश्री जनकोजी सिंदे यांस खासा जातीस सरंजाम पा जुनरपैकी गाव दिल्हे. बितपसील.

मोजे होलस कोलगाव येथील मोकासा मोजे सिंदोडी येथील मोकास बाब व खेरीज करून मोगलाई जाहागीर ख- बाबती सावोत्रियाचा अंमल दिल्हा राज्य बाबती सरदेशमुखी देखील सावोत्रा असे १

---

(४०) अहदनाम्याप्रमाणे आग्रा व अजमेर या दोन सुभ्याचे स्वामित्व मराठ्याकडे आले त्यासबधी जयपुर येथील मराठ्याचा वकील गोविंद तमाजी गलगलेकर याची दोन पत्रे वाचनीय आहेत [पिद २७ ले. १०६, १०७] अजमेर सुभ्यातील मुख्य प्रतिस्पर्धी राठोड होता. त्याच्याशी 'भारतीय युद्ध करून त्यास पराजित केले. या असामान्य सेवेचा मोबदला ह्मणून मारवाडची सबंध खडणी 'मुडकटी' ह्मणोन शिंद्यास मिळाली. याशिवाय देखी 'खानदेशांत परगने यावल दरोबस्त व श्रीगोदे भोवते ४० गाव इनाम मिळाले श्रीमत प्रधान, भाउसाहेब व दादासाहेब येसे श्रीगोंद्यास येउ समाधान बहुता प्रकारे केले गौर केला' असे बळे सागतो त्याच्याच या सनदा होत. [ले ७९

कुलबाब कुलकानु दरोबस्त दिल्हा.
असे. १

येकुण दोन गाव सदरहुप्रमाणे मशारनिल्हेकडे दिल्हे असे. तरी तुम्हीं हरदु गावास ताकीद करून सदरहु अमल याकडे सुरळीत चाले ते करणे. जाणिजे. छ * २४ रविलावल. बहुत काय लिहिणे. मोर्तब.

---

लेखांक [८०] ॥श्री * संवत १८१३ फाल्गुन शुद्ध ९
[२७ फरवरी १७५७]

राजश्री रामाजी अनंत गोसावी यांसि.

उपरी.[४१] तुम्ही पत्र पाठविले ते पावले. ऐसियासि वर्तेच्या प्रसंग हरकसे ठीक राहे मटी उतरे ते करणे. पेस्तर तुम्हीं हुजूर आलियावरी उतमच होईल. तुर्त प्रसंगानुसार करणे. जाणिजे छ * ८ जमादिलाखर. ॥ बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [८१] श्री
[१७५७]

राजश्री रामाजीपतमाउ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो समसेर बहादर सलाम विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. राजश्री [दताजी शिंदे] पाटीलबावानी आम्हास लक्ष रुपयाची वरात दिल्ही आहे त्यास जरुर जाणून आपणावर वरात घेतली आहे. तरी स्वार पाठविले आहेत. याजसमागमे दर्शनी रुपये यावे. ॥ ये समई रुपये त्वकर येतांत तरी फौजेची स्तिथ राहाती. नारो शंकर वगेरे याच्याही वराताची गत कळलीच असेल. आम्ही तो आपल्या सांगितल्यावरून घेतल्या. पुढे आपल्यास कलेल तसे करावे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(४१) हें व पुढील दोन पत्रें भोसले प्रकरणाची आहेत. १७५६च्या अखेरीस भोसले पुण्यास यणार होते. [खरे १ ले १] दत्ताजी शिंद्याच्या मध्यस्थीनें जानोजी भोसल्याशी या वेळी राजकारण घाटत होतें असें पेशवेदप्तर बोलतें. [पेद २० ले ९०] पण त्याचें म्हण्य पुरतें उमजत नाही. त्या प्रसंगाचेंच हें पत्र असावे यांत शंका नाही. पुढील पत्रेंदेखील यात पर्याप्त

लेखांक [८२] श्री

[१७५७] ?

राजश्री रामाजीपंत रामराव.

नमस्कार. आठादहा दिवसा हंसपुरीची रामाजी नाईकाची निशा अकरा लाखाची करुन आणावी. गोसावी यासी समागमे आणावे. जानोजी भोसल्यास संशय नसला तर त्यासही आणावे. उसीर लाउ नये. सत्वर कार्यसिधी येथी[ल] मर्जीप्रमाणे सर्व बाजवी कलमाची वाट करावी. येस बाबुरायानी कबूल नीट केले असेल तर दूतत्रास घेउन तुम्ही येणे. त्यासही आणने. उगींच बारीकबारीक गाणी व लांबणी असली तर तुम्ही मात्र त्यास घेउन येणे. रात्री जागवत बसता अनकूल पडत नाहीं. सत्वर येणे. तुमचा साधा प्रामाणीक[४२] कारभार. त्याचे बोलण्यात लटके व बारीक पेच फार. याचा अनभव तीन वर्षे घेत आलो. दूर बसून वाट पहावी हे तो सहसा अनकूल पडत नाहीं. हे आठादहा दिवसाचे मुदतीने गेले तर आम्हीं घाटावरच आठ दिवस लाउ. केवळ सोळागांवावर बसून वाट पहाणे हे आमचे मनास सध्या येत नाहीं. सत्वर येणे [अपूर्ण]

---

लेखांक [८३] श्री

[१७५७] ?

राजश्री रामाजीपंत [दाभोळकर] यासी.

नमस्कार. व्यर्थ आग्रह करुन मुकाम करविलेंत. दोन बाबुरायाचा कारभाराची रीत येकेप्रकारची. काल तुम्हाजवळ दाहा दिवसात कारभार पका करुन जानोजी भोसल्यास आणितो ऐसी चिठी लिहून तुम्हास दिल्ही. सेवटी रात्री दाहा दिवसात कसे होईल ऐसे म्हणू लागले. सोळागांवावर बसून जाबसाल करु लागल्यास येक महिना व्यर्थ जाईल. घाटावर जावे. समीपता पडेल. सत्वर काम विल्हे लागेल. तुमचे भीडेस्तव मुकाम केला. उद्या कदापि मुकाम करणार नाहीं. रात्री जागणे अनकूल पडत नाहीं. दो प्रहरा येथे येउन काय तो निश्चये करणे. हे विंनती.

---

दिसतात तथापि त्याची मिती देता येत नाही. 'घाटानजीक सोलागावावर मुकाम' पेशव्याचा मानला तर मास अक्टुबरनतरचा धरावा लागले [ले ९०] किंवा किंचित पुढेही ढकलावा लागेल. [खेर १ के ११] एवच वर्ष सशयित समजावे

(४२) शिंद्याचा दरबार 'अकृत्रिम' असे मुरुठणकर व दाभोळकर हे दोन्ही दिवाण प्रतिपादन करीत असत. ती आत्मश्लाघा वाटत होती पण 'तुमचा साधा, सरल प्रामाणिक कारभार' असा पेशव्याने अनेकदा उल्लेख केला आहे. [लि १०२]

लेखांक [८४] श्री[४३] * संवत १८१४ वैशाख वद्य ५ [८ मे १७५७]




राजश्री दताजी[४४] सिंदे गोसावी यांसि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्हीं पत्रें पाठविलीं ती प्रविष्ट जाहाली. लिहिला मजकूर सविस्तर कळला एशास येविसीची उतरे अलाहिदा लिहिली आहेत त्याजवरून कलेल.॥ जाणिजे छ ॥ १९ साबान. बहुत लिहिणे तरी सूज्ञ आसा.

(लेखन सीमा)

---

लेखांक [८५] श्री * संवत १८१४ ज्येष्ठ वद्य १ [३ जून १७५७] [नकल]

मा अनाम चौधरी व कानगो पा शिवराजपुर प्रा अंतरवेद यासी रघुनाथ

---

(४३) '१५ मोहरमी स्वामीनी कैलासवास केला राजश्री राजारामसाहेब पानगावी होते २६ मोहरमी आले. समस्त लहानथोरी तसलीमात बज्या आणिली श्रीने राज्यपदारुढ केले ६ सफरी सिंहासनारुढ जाहाले. उमर बेवीसतेवीस वर्षांची' होती. [ऐटि १ पान ६५] त्याची मुद्रा केव्हां चालू झाली हा अद्याप वादग्रस्त आहे. 'बाळाजीने त्याचा सिक्का तीन वर्षे चालू केला नाही. तीन वर्षे तो धरसोड करीत होता' असे विधान राजवाड्याचे आहे [ऐप्र १ पान ४३, ४४] ते चुकीचे ठरते. कारण की २८ जून १७५० रोजी शिंदेहोलकरादिकास जी पत्रें पेशव्याने लिहिली त्यावरील मुद्रा राजारामाच्या नावाची आहे. [चंद्रचूड १ ले ८, ९, १०, १२] तेव्हा 'धरसोड' मुद्रा चालविण्यांसंबधी नसून ती बंद करण्याविषयी होती. अर्थात ती बंद कधी झाली हे पाहिले पाहिजे. या दृष्टीनें लेखांक १३ उपयुक्त असून मननीय आहे त्यानंतर पेशव्याने शाहूचीच मुद्रा शेवटपर्यंत वापरली असे दिसून येईल. [ले ५०, ५३, ७२, ७६, ८४ चंद्रचूड ले ४७, १३०, १३६]

(४४) पहा पेद २० ले ८७, ८९, ९०. तीन कामांपैकी निजामाविरुद्ध स्वारी करण्याचे शिंद्यानी स्वीकारले. पेशव्याचा पुत्र विश्वासराव हा या स्वारीत शिंद्यावरोबर होता त्याची ही पहिलीच स्वारी होय. ती यशस्वी होऊन २५ लक्षाचा मुलुख मराठ्याकडे आला त्यात शिंद्यास केवळ पन्नास सहस्राची जागीर शिंदखेड हा महाल मिळाला [ले ११२ पेद २५ ले १८०, १८४]

बाजीराव [भट] सुा सबा खमसेन मया व अलफ. पो मजकूरची मामलत राजश्री गोविंद बलाल [खेर] यांजकडे असतां गंगापुत्र ब्राह्मण यांसी जमीन बीघे

१ बेनीभट व माधव  १ खेमभट

---

२

सदरहु दोन बीघे जमीन ईनाम देहून चालविली त्याप्रमाणें हांली करार करुन सनद सादर केली आहे. तरी तुम्हीं सदरहु दोन बीघे जमीन बेनीभट व माधवभट व खेमभट याजकडे दरसाल इनाम चालत आल्याप्रमाणें चालवणें. या पत्राची नकल करुन घेउन हे असल पत्र ब्राह्मणाजवल मोगवटियास परतोन देणे. जाणिजे छ * १५ रमजान. ।ै आज्ञा प्रमाण. मोर्तब

---

लेखांक [८६]  श्री  * संवत १८१४ आषाढ वद्य ५
[६ जुलै १७५७]




राजश्री रामाजी अनंत भाउ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो समसेर बाहादर सलाम विनंती. येथील कुशल जाणोन स्वकुशल लिहीत आसिले पाहिजे विशेष. गुदस्तां आपणापासून कर्ज रुपये ५०,००० पनास हजार घेतले. त्यास आपण कदाचित सिंद्याकडील हिसेब विल्हेस लाविला तेव्हां सरकारातून मजुरी घेतले असिले तरी उतम. सरकारांतून मजुरा न घेतले असिले तरी सदरहु मुदल पंनास हजार व व्याजाचे हिसेबास मोबम दहा हजार रुपये येकुन साठ हजार रुपये विष्णु माहादेव गदरे कमाविशदार खीचीवाडा ।ै याजकडून तुम्हांकडे पाठविले आहेत. मारनिलेव्या गुमास्त्यास पत्र आलहिदा आहे त्याप्रमाणे ते देतील. आपण सरकारातून येवज घेतला असिला तरी सदरहु साठ हजार रुपये राजेश्री केशवभट करवे याचे दुकानी जमा करावे. सरकारातून घेतले नसिले तरी साठ हजार रुपये पाठविले आहेत [तें] पावलियाचें उतर सत्वर पाठवीजे. रा छ * १८ शौवाल. ।ै बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद

पो छ २० जिल्हेज सन समान.
[५ सितबर १७५७]

---

लेखांक [८७] श्री * संवत १८१४ श्रावण शुद्ध १

[१७ जुलै १७५७]

चिरंजीव राजश्री दादा यासि बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणे विशेष. राजश्री कृष्णाजी नाईक व रामाजी नाईक भिडे याचे कर्ज जावजी पाटील यांजकडे पंचवीस हजार होते त्याचा हवाला राजश्री रेणको[४५] अनाजी याणी घेतला आहे. तरी त्याचे नालबदी समजाविसीत उगउन घ्यावे म्हणोन नाईक मारनिलेनी विनती केली त्याजवरुन हे पत्र आपणांस लिहिले असे. तरी सहरहु पंचवीस हजार रा मारनिलेचे येवजी उगउन नाईक मारनिलेस द्यावे. त्याचे हरयेक ऐवजी उगउन द्यावे. रा बाळाजीराम व नारो कृष्ण आपल्यां जवल आहेत यांचे अवश्यक असे तरी उभयेताचे अगत्य धरुन उर्जित करावे. रा छ * २९ सवाल. ।' सर्व प्रकारे अगत्य धरुन याचे कार्य करावे. यास अगत्य समजून सागून पाठवणे. हे आसिर्वाद.

पोा छ १६ सफर.

[३० अक्टुबर १७५७]

---

लेखांक [८८] श्री * संवत १८१४ भाद्रपद शुद्ध ११

[२५ अगष्ट १७५७]

पुा राजश्री सखाराम भगवंत [वोकील] स्वामी गोसावी यासि.

विनंती उपरी. नवाब सलाबतजंग याजपासी शाहानवाजखान मुतलक वकिली करुन होते. ते आमच्या विचारे वर्तत होते हे निमित्य त्याजवर ठेउन त्याची खिजमत दूर करुन बसालतजंग धाकटे बंधु यास मुतलक वकिली सांगितली. पुढे आम्हांसी विरुद्ध वर्तावें असा त्याचा भाव अढलला त्याजवरुन राजश्री दत्ताजी सिंदे यास रा केले होते. प्रस्तुत चिरंजीव राजश्री विश्वासराव [भट] यासही फौजेनसी रा केले. दत्ताजी चिरंजिवास सामिल होउन पैठणास जातील. सलाबतजंग यानीही बोली लाविली आहे. येथील मर्जीनरुप वर्तोन सलूख केला तरी उत्तम. न वर्तत तरी चिरंजीव ठीक करितील. होईल वर्तमान ते मागाहून तुम्हांस लिहिले जाईल ।' छ* ९ जिल्हेज. ।' हे विनती.

---

(४५) रेणको अणाजी याविषयी पेशवेदप्तरात उल्लेख आला असून तो उत्तरेस दादासाहेबा बरोबर होता असे समजते. [पेद २१ ले १४४ पेद २७ ले १४५] पेद २७ ले १४५ हे पत्र १७५७ तील नसून १७६५ तील दिसते अर्थात तोपर्यंत हा जिवत होता असें ओघानेच दिसून येते

लेखांक [८९] श्री * संवत १८१४ भाद्रपद वद्य १
११२] [३० अगष्ट १७५७]

राजश्री दत्ताजी सिंदे गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्षीआलंकृत राजमान्य श्नो रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी. येथील कुशळ जाणून सकीये लिहीत असिले पाहिजे विशेष. अब्दाली[४६] पठाण याची आमद आमद गरम आहे. त्यास तो आला नांही तों आपण भारी होउन राहावें म्हणजे उतम. तरी तुम्हीं जलदीने येणे येसीं पत्रें पेसजी लिहिलीच आहेत त्याज वरुन तुम्हीं यावयाची तर्तूद केलीच असेल व हलीही लिहिले असे. तरी याजउपरी तुम्ही जलदी करून लाबलाब मजली करून बहुतच त्वरेने येणे. रा छ* १४ जिल्हेज.

पो॥ छ २९ रबिलोंवल रविवार.
[१२ दिसबर १७५७]

---

लेखांक [९०] श्री * १८१४ अधिक आश्विन वद्य १४
[१२ अक्टुबर १७५७]

चिरजीव राजमान्य राजश्री दादा यांसि बालाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन सकीये कुशल लिहिणे विशेष. राजेश्री बलवंतराव गंनपत [मेहदळे] याणी कडपेवाले अबदुलमजीदखांन याजकडे राजश्री शामराव मिवराव यांस पाठविले. ते कडपियास गेले. तो खासा तेथे नव्हते. सिघोटास गेले होते. कडपियास गनुमिया व सिलैमखान तेथ होते. लाख रुपयाहून जाजती जाबसाल न करीत. हे वर्तमान यास कलताच मारनिले कुळदूर कडपेवाले याचा तालुका तेथून सड्या फौजा आपण बुलगियात मागे दबावास राहून राजश्री इंद्रोजी कदम व सोनजी भापकर व हरबा बापु सखाजी विसाजी कृष्ण नरसिंगराव संभाजी घोरपडे खंडेराव दरेकर भगवंतराव कदम व हैबतराव जाधव यशवंतराव लक्षुमण वगैरे लोकसुधा रवाना केले. ते कडपियास न गेले. मध्येच होते. तो खबर आली की गनीमिया व सिलैमखान पळून

(४६) या पत्राची तारीख काव्येतिहासकार यास सापडली नाही पत्र १७५७ मधील आहे या वेळी दादासाहेब अबदालीमुळेच उत्तरेस आले होते.- १७५२ पावेतो त्याचा उत्तरेशी संबध काहीच नव्हता पेद २ ले ९३ या पत्राची मिती '३० अगस्ट १७५७' अशी पाहिजे. पेद २ ले. ८०, ८२ यासबधीच आहेत

कडपियातून गेले. कडपियात काही नाही त्याजवरून हे सारे कडपियांस जाउन लागले. मोर्चे वसविले. हे खबर अबदुलमजीदखान यास सिधोटास कळतांच तेथून आपले फौजेनसी दीड हजारपर्यंत तयार होउन जुमामर्दीने मारीत मारीत कडपियात सिरोन मग कडपे मांडवावे या उमेदीने निघाला. ही खबर सरदारांस अवगत होताच हे सारे जमा होउन विचार केला की तो येथे येउ न द्यावा. पुढे जाउन त्यांसि झुजावे त्याजवरून सारे चालून कडपियापासून तीन कोसावर गाठ घातली. ते पठांण चांगले. हत्यार फार तीरतरवार याचे जाहाले. लोकानी आपल्यानी निकड फार खागाखाशाने केली. उडया घातल्या. त्या समई खासा अबदुलमजीदखांन यास हतीवर गोळी लांगली. तो हती हरवानी पाडाव केला. सीर खासियाचे कापून आणले. सरकारचे लोक सदरहु मातवर नामी सरदार थोडथोड जखमी जाहाले परतु सारियाची खेर जाहाली. विसाजी कृष्ण [बीनीव ले] याचे घोडीस दोन तीर. बाजीपंत मारनिलेचा त्याचे थनसरीस गोळी थोडकी. संभाजी घोरपडे मात्र ठार पडले. वरकड जखमी घोडीमाणसे पडली त्याची खबर तपसीलवार लिहिली आली नाही. त्याजकडील दोनअडीचसे पठाण कापून काढिले. दोनतीनसे जखमी आहे. नव हती पाडाव जाहाले. तेथून कडपियास आले. येथील प्यादियाने कौल घेतला. सरकारचे निशाण चढूण ठाणे बसले. तेथे हाती सात सापडले. पैका नाहीं. तोफा मातबर तीनचार आहेत. गनीमिया व सिलीमखान करनाळाकडे गेले. हे फते बळवतराव यांणी फारच[४७] चांगली के[के]ली. करणाटकात याजबरोबर लढणार मातबर कोण्ही नाहीं. याजवर याप्रमाणे सलाबत पडून विसा लाखाचा मुलुक हाती लागला. यापरी दुसरा कोणी उजरून गोष्ट सागणार नाहीं. फारच दहशत पडली. हे कामें खाशे फौजेने करावीं ते बळवंतराव मागे राहून सरदाराजवळून काम करविले यामुळे तो फारच दांव लोकावर वाढला. पुढेही कामें राहिली ती चागलीच करितील. हे संतोषाचे वर्तमान कळावें याजकरिता लिहिले असे. दिल्लीचे गुल्यामुळे दप्त[हुजूर]तून निघावे.

---

(४७) बळवतराव मेहदळे याजविषयी बखरीत जो कटाक्ष आहे तो निराधार नाही या कडप्याच्या कृतीस 'दिग्विजय' असे म्हटले आहे [पेद २८ ले १९८, २००, २१९] 'मोठी कामे खाशा फौजेने करावी. कासी पटणे येथील सिकार येकहाती मारावीं' अशी नानासाहेबाची प्रवृत्ति होती असें स्पष्ट कळते. 'दिग्विजय' या शब्दाचा उच्चार बखरकारानें स्पष्ट केला आहे. भाऊसाहेब उत्तरेस आले त्याच्या समागमें 'बळवतराव गणपत [मेहदळे] नाना पुरदरे व महिपतराव चिटणीस हे तीन मुख्य कारभारी होते.' [खरे १ ले. १४ खड १ ले. १६९] 'सरदाराची फौज मोडली या मुळे' दिल्लीवर हा मोहरा दुजोऱ्याने वाढला. [खड १ ले. २२२] तोच प्रकार कुजपुऱ्याचा झाला. पानिपतावर तर इरेस पडून तो ठारच झाला. [ऐटी ३ क ३३]

फारच जरूर असेल तरी मल्हारबास[४८] त्याचे फौजेसुधा ठेवावे. जर विशेष पैका मिळत असिला तर मात्र राहावे परंतु उगेच [होळकराचे] गपाचे आशेत गुतू नये. याअन्वये पत्रे लिहिली त्याचे उतर येत नाहीं. तरी सविस्तर अर्थ लिहिणे. बसालतजगानी शाहानवाजखानास दंगा करुन मारिले यास्तव पचविसाची जहांगीर नगर देउ केले परंतु आता फौजा जमा करुन काहीसा चढ खात आहेत. दूतर्फा [व] चिरंजीव पंधरा हजार जमा जाहाले. आता दबउन काम करतील. आम्हींही सत्वरच बाहेर निघोन स्वारीस निघणार आहों. होईल ते लिहून पाठउ. आपण कासी पटणे येथील येथील सिकार येकहाती फौजेनें मारावी. उसीर करु नये. दिल्ली कवळ कंगाल होउन गेली आहे. आसपास वोस आहे. पैका आकारणार नाही. नावे मात्र माहालाची मोठी. वसूल होणे कठिण पडेल. दिलीची मांमलत तीस लाख जाहाली म्हणून गपा येतात. तुमचे पत्र आले नाहीं परंतु वसूल होणे यास विलंब लागेल सर्व वाटते. छ* २५ मोहरम. हे आसिरवांद.

पो छ ६ रोवल
[१९ नवबर १७५७]

---

(४८) 'श्रीमत देशास चाललियावर आपण मागे राहून काही कामे करावी' याप्रमाणे मल्हारजी होळकराचा विचार [पेद २१ ले ६०] १७५४ च्या स्वारीपासूनच होता. तो या वेळी देखील शक्य वाटतो. 'आमचे मते मल्हारबावर दिलीपासून लाहोरपावेतो कामाचा यखतियार देउन चिरंजीवास घेउन यावे' असे पेशव्याचे मत व्यक्त होते [ले ९२] तसे झाले असते तर पानिपतचा प्रकार बहुतेक वेगळाच घडला असता अस्तु हा प्रसग जुळून आला नाही एवढे खास. तो होळकराने टाळला की राघोबाचा लोढणा आडवा आला हे पाहाण्यासारखे आहे. 'फारच जरूर असेल तरी मल्हारबास त्याचे फौजेसुधा ठेवावे' हा पेशव्याचा प्रथम सकेत होताच तो लक्षात घेऊन राघोबानें लाहोरचा बदोबस्त केला ते पत्र वाचनीय आहे [ऐस्फुले ४ क्र ११] 'लाहोर प्राती रेणको आणाजी व रायाजी सखदेव ऐसे ठेविले गोपाळराव गणेश याचाही पैगाम आहे. तेही राहातील. याजसिवाय आणखी फिरकोली पथके ठेवितो तूर्त तातडीमुळे जे होईल ते करितो पुढील स्वारीस जे कोणी सरदार मातबर येईल तो बदोबस्त करील तूर्त माघारे फिरावयाचा डौल स्वामीच्या आज्ञेवरून धरिला आहे. तूर्त या प्राती अदिनावेग मोगल, मातबर व प्रामाणिक आहे त्याजवरच सारा यख्त्यार दिल्हा आहे' यावरून होळकरास 'यखतियार' देऊन ठेवण्याची इच्छा राघोबास नव्हती हे स्पष्ट आहे या स्वारीत आरभापासूनच होळकराविषयी दादासाहेबांचा ग्रह विपरीत होता [खड १ ले ६७ पेद २१ ले. १३८] तेव्हा त्यानीच होळकरास राहू दिले नसावें असे ओघानेच निष्पन्न होते. 'पृथ्वीवलयाकित येश सपादिले ते जतन करून सर्वांनी खावदाचे पाये पहावे म्हणिजे उत्तम गोष्टी आहे. सुभेदार साहेब स्वामीचे आज्ञेखेरीज नाहीत' हे गंगोबा चद्रचूडाचे पत्र वाचनीय होय. [पेद २७ ले २११]

लेखांक [०.१] श्री

[१६ फरवरी १७५८]

दिा [ जागा रिकामी आहे ]

रामनगर[४९] फते केल्याचे वर्तमान लिहिलें तें कळलें. उतम केले. राजा देवोंखास राणीखुश आहे. त्यासकडे सदासिवराव अवधूत गेले आहेत. तोही स्वामीच्या प्रतापे येउन भेटेल. त्यास वगैरे इत्यादिक मवास पदरी पडिले आहेत. या सर्वांस घेउन चरणापासीं येतों. जसी आज्ञा होईल तसी वर्तणून करु म्हणोन लिहिलें ते कळलें.।' ऐसियास रामनगरकर भेटीस आले असतील त्यास चिरंजीव नानाकडे घेउन जावे. याजपासून नजर गुन्हेगारी घ्यावयाची व कर्जपटीचा येवज दुर्जनसिंग याचे मारफतीने करार जाहाला त्याचा निकाल करुन घ्यावा. राजा पुढे हुजूर आणावा. गंभीरगड सरकारात आहेच. पुढे नीट वर्तावयास जामिन दुर्जनसिंग यास घ्यावे. बेउपसर्ग राहात कोठे लबाडी न करीत असे करणे. याची आज्ञा चिरंजिवास विस्तारे केली असे. ते सर्व साग तील. तसेच करणें. कोली जे भेटले त्यास कौल द्यावा. पुढे जव्हारकराचा कोण्ही असेल नसेल तो जव्हारेत ठेउन सरकारचा कच्छी माणूस १०० शंभर चागले नवानीक[?] हत्यारबद कामाकाजाचें बहुत वेश आम्हाजवळ आलें आहे हे करार करुन ठेवावयाची आज्ञा सरकारच्या कारकुनास केली पाहिजे म्हणोन लिहिलें ते कळलें. ।ऐसियास वर्त कामाचे दिस आहे तो महिना दोन महिने द्याा पथराचा सेरा करुन चांगले असतील तेच ठेवावे.

(४९) हे पत्र दामोळकरसंग्रहात सापडलें शिरोभागी नाव नाही शेवटी केवल 'हे कितावत' आहे. तेव्हा तें कोणी मुसलमानास लिहिलेलें दिसते तो बहुधा मुजफरखान गारदी असावा कारण या वेळी तो रामनगरजवारकडे असल्याचे समजते. [पेद ४० ले १०९, ११०] 'चिरंजीव नाना' हा पुरदरे असावा. एरवी शिवाकडील वावुखानदेखील समवनीय आहे

सारा बंदोबस्त करावा. राजा जव्हारकर
कोळी याची स्थापना करउ. सरकारचा
बातलामाथला असे करावे. जो आता
पळून गेला त्याचे पारपत्य करावे. जर
त्याणी कौल घेतला तर हुजूर त्याणी
चाकरी करावी. देवजी अवधुतराव वगैरे
लबाड परतु त्यास अभय देउन आणिलेत
तर अन्याये माफ करुन. पुढे हुजूर त्याणी
चाकरी करावी. तिकडे नसावे लबाडी करु
नये. असे जामिन पके घेउन करावे. ये
विसी चिरंजिवास विस्तारे लिहिले असे. ते
सागतील तसे करणें.

'येणेप्रो दोन कलमे. जाणीजे. छ * ७ जमादिलाखर. ज्यादा काय लिहिणे हे
कितावत

---

लेखांक [९२] ' श्री * संवत १८१५ चैत्र शुद्ध २
[१० अप्रेल १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
सखाराम भगवंत स्वामी गोसावी यास.

पौंप बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेप. सांप्रत तुम्हीं कोठे आहा. काय मनसुबा करिता ते सर्व लिहिणे. ईकडील सर्व सविस्तर चिरंजीव यास लिहिला असे त्यांजवरुन कळेल. आमचे मते मल्हारबावर दिलीपासून लाहोरपावेतो कामाचा यखतियार देउन चिरंजीवास घेउन भेटीस यावे. विशेष पैका मिळणे नसता खावंदगिरीचे तेज[५०] खराब करुन गुंतून पडावे हे सहसा न व्हावे. * छ १ साबान. हे विनंती.

पो छ ९ रमजान समान.
मुा व्यासनदीपूर्वतीर.
[१७ मे १७५८]

---

(५०) लाहोरकडे छावणी करण्याची इच्छा स्वत. दादासाहेबास नव्हती [पेद २७ ले. २१८] त्यात 'खावदगिरीचे तेज खराब सहसा न व्हावे' अशी पेशव्याची आज्ञा आली तेव्हां राघोबा

लेखांक [९३] श्री * संवत १८१५ वैशाख वद्य १४

[४ जून १७५८]

आसिर्वाद उपरी. लाहोरात ठाणे बसून तैमूरसुलतान व जहाबांजखांन खान यास धुडाविले, लोकाने पाठलाग केला. फोज घु[लु]टली. दोघे चेंद्रभागापार गेले. अटकेआलीकडे राहू पावत नाहीं. राहिले तरी त्याचा पिछा उतम होईल. हे येश स्वल्पात वरे मिलेल त्याचा विचार विस्तार लिहिला तो कलला. ऐशियास ईश्वरे उतम येश[51] दिल्हे. छ * २७ रमजान. हे आसिर्वाद.

पो छ २ जिल्काद.

[८ जुलै १७५८]

---

लेखांक [९४] श्री * संवत १८१५ वैशाख वद्य १४

[४ जून १७५८]

आसिर्वाद उपरी. विठल शिवदेव [विंचुरकर] मल्हारबा नजीबखानावर गेले. त्याणी फार दिवस लाविले त्याजमुले बंगालियाचा मनसुबा [राहीला.] आम्ही कुरुक्षेत्रास दाहापधरा लक्ष मिलविले म्हणोन आणिले तो काही नाहीं. तेव्हा विठलपंत मुधोजी भोसले यास बंगालियात रवानां केले आणि सरहद फते करुन अबदुलसमदखान व

---

मागे परतले. अर्थात् ही जबाबदारी पेशव्यावरच येऊन पडते असे असता या प्रसगाला अनुलक्षून पेशवेदफ्तरच्या सपादकाने राघोबास दोष दिला आहे तो अयोग्य आहे कारण ज्या पत्राच्या आधारावर हा आरोप आहे ती पत्रेच मुळी या वर्षांतील नव्हत ती सर्व १७६७च्या स्वारीसबधी आहेत पेद २ ले ४६ हा राघोबाचाच या प्रसगाचा खर्डा होय त्यात 'खेचीच्या आसपास मुकाम आहेत' असे ह्मटले आहे पण १७५८च्या स्वारीत खेचीवाड्यात राघोबा मुळीच आले नाहीत अजमेरकडूनच परस्पर देशी गेले १७५५ व १७६७ या दोन वर्षातच खेचीवाड्यात राघोबा आले होते पत्रातील प्रसग १७५५ चा नसून १७६७ चा आहे एवच कालक्रमच चुकला आहे [पेद २ ले ४६, ७४, ८८, ८९, पेद २१ ले १५६, १५७, १५८, १६१ पेद २७ ले १५०, २१२] पेद २७ ले १३३ ची 'पो सन सबा' [सितैन] अशी स्पष्ट आहे ती सबा खमसैन मानता असंबद्ध दिसते [खड ६ ले ४२६] अबदाली दिल्लीवर आला असता पेशवा श्रीरगपट्टणकडे का गेला त्याची चर्चा जशी निजामाकडून झाली [खड १ ले ६५] त्याच्चप्रमाणे राघोबाविषयी या वेळी दिल्लीत चालू होती. 'लहानमोठे सर्वत्र म्हणतात खासा छावणी न जाली तरी पठाण मागती लाहोर प्राती पावसाला येतील. उगेच लोक म्हणतात ते सेवेसी लिहिले' असे अताजी माणकेश्वराचे पत्र पुढें येणार आहे. ते मात्र लक्षात असावे. या वार्तेस खरा आधार तो होय

(५१) नानासाहेब पेशवा हा अत्यत कुशल लेखक होता त्याने उत्तेजनपर जी पत्रे सरदारास लिहिलेली आहेत त्याचा आविर्भाव या सहोदराच्या पत्रात आला नाही ही उदासीनता मननीय होय

गजबाजखान यास धरले लुटले. तसेच लाहोराकडे चालोन गेला. ते दु[मु]र सुलतानखान व ज्याहानखान अबदालीची पंचवीस हजार [फौज] होती ती पलोन गेली. लाहोर घेतले. अटकेपर्यंत मोकले आहे. दोनचार छावण्या केल्या तर वजीर पातशा खेरीज करुन आपलाच क्रोडीचा मलुक बक्कि दीडाचा सुटेल. त्या[स] वारंवार लिहिली येत गेली की माघारे यांवे याजकरिता रमारमी पाहातो. खर्चापक्षा दोनचार अधिक होतील असे पाहोन इकडील बंदोबस्त अदीनाबेग अंथवा हर कोण्हाचे हवाली करुन महिना दोन महिने अणखी कांही मिलेल तरी मिलउन येउ म्हणोन विस्तरे लिहिले ते कलले. ऐशियांस विठलपंतानी पातशाजाद्याचा पक्ष धरुन सेवटी त्यास सोडून कैद करविला म्हणून आईकतो. त्याचे पत्र येत नाहीं. आपलेही पत्री हा विशद अर्थ लिहिला नव्हता. साराश ईमान देउन सेवटी कैद होय मारला जाय येसे न व्हावे. आपण मल्हारबा इमानाचे वचनाचे बिरीद बालगितात परतु प[ये]दा ते प्राती यकादोघा मातबर आणून लुटविले हे गोष्ट अती अनुचित जाहली. आपण आम्हास कोठेकोठे लाहानसाहान शब्द ठेवीत असतात. आपला हा महाशब्द[५२] सर्वत्र दिलीपासून अटकपावेतो जाहाला असे. हे उतम न जाहाले. आपण न करविता लसकर बेबंद यामुले जाहले असेल परंतु निमित्य खावदावर असते. छ * २७ रमजान. हे असिर्वाद.

पो छ २ जिल्काद.
[८ जुलै १७५८]

---

लेखांक [९५] श्री * संवत १८१५ ज्येष्ट शुद्ध ३
[८ जून १७५८]

राजश्री दमाजी गायकवाड समसेर बहादर गा।

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी. यथील कुसल जाणून स्वकीये कुसल लिहीत जावे विसेष. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले.

---

(५२) अनेक प्रसगी नानासाहेब पेशव्यावर होळकरानी शब्द ठेविला. तसेच गायकवाडाने ही ठपका दिला होता त्याचप्रमाणे दादासाहेबही देत असत असे कळते. त्याचा हा टोला पेशव्यानें मारला आहे उदाहरणार्थ पानिपतसबधी राघोबाचें पत्र वाचनीय आहे. [पुरदरे १ ले ३९८] भाऊसाहेबाविरुद्ध बखरकाराचा आक्षेप याच मासल्याचा आहे. तो काल्पनीक वाटत नसून केवळ पत्राधाराचीच काय ती बाण आहे.

राजश्री सदासिव रामचंद्र[५३] [सुखटणकर] व राजश्री सयाजी गायेकवाड सोरठ प्रांती गेलि याचे वगैरे ते प्रांतीचे वर्तमान विस्तारे लिहिले ते अवगत जाले. ऐशास खासा स्वारी लाहोर मुल्तान कासमीर वगरे सुभे अटकेअलीकडील यथील बंदोबस्त करुन देशास यावयाकरिता माघारा फिरली. मजलदरमजल जयपुर प्राती येत असो. आमदाबादचे तहविसी सदासिव रामचंद्र यास पत्र पाठवावे म्हणोन लिहिलें त्यास आपले लिहिल्यावरुन मारनिलेस पत्र पाठविले आहे. [तें] पावेल. आपणांकडील निरंतर कुशलोत्तर लिहित जावे. रा छ * १ सवाल.

---

लेखांक [९६] श्री * संवत १८१५ श्रावण वद्य २

[२० अगस्ट १७५८]

आसिर्वाद उपरी. लाहोर येथे अदीनावेग वगैरे ठेऊन बंदोबस्त केला. वजिराने बरोबर असावे परतु न आले. तथापि वचनासाठी त्यास तिकडील निमे येवज सिबंदी अजी वजा करुन बाकी राहील त्यापैकी द्यावा. सरकारातून कमाविसदार दूर करार करणे तो करावा. येविसी येख्तियार सरकारचा. वजिरास समंध नाही. वजिरास हा निमे ऐवज द्यावयाचा करार ठहरला तेव्हा वजिराने बंगाळा व अयोध्या पेठणे प्रयाग कासी वगैर फौज जमा करुन बंगालियास जावे. अता[जी] माणकेश्वर यास बरोबर न्यावे. निमे वाटणी जेथील जी खडणी होईल तेथील सरकारात पुणियांत पोहचवावयास येवज द्यावा. निमेत पातशाहा वजीर सिबदी व अताजी माणकेश्वर यांजपासून मराठी फौज दाहा हजार ठेविजी असे तीस समजावावे. निमे येवज पुणियास द्यावा. अताजी माणकेश्वर याजबरोबर सरकारची पाच हजारच फौज त्यास ऐवज दरसालचे रुा बारा येक साल देविले व सरंजाम काही आहे. ज्याजती फौज जी ठेवितील ती वजिराकडे. पैका वजिरानी आपले निमेत द्यावा. याप्रमाणे अताजी मानकेश्वर याणी कबूल करुन ही चाकरी बजाउन आणली तर सरफराज होतील. लबाडी केली तर पारपत्य करावे म्हणोन लिहिले ते कलले. ऐशियास वजिरास दिल्ली सोडून जाता येत नाहीं. मनसूरअलीचे लेकासी वजिरासी चितशुध नाहीं. अताजीपंत लटकी

---

(५३) हा रामचंद्र मल्हार सुखठणकर याचा पुत्र होय याला गुजराथेत स्वतंत्र सरदारी होती ह्मणून तो या वेळी तिकडे होता. पानिपतानतर हा पेशव्याबरोबर उत्तरेस ग्वाल्हेरीपर्यंत आला होता. पुढे तो आजन्म राघोबाचाच पक्षपाती राहिला त्यामुळें त्याचे शिंद्याशी कधीच जुळले नाही. तथापि मृत्यूनंतर त्याच्या कुटुंबाचा परामर्श महादजी शिंद्याने घेतला असे समजते

आशा दाखउन हुजूर न यावे या भावे राहिले. हे उतम न केले. [ते] सहसा बंगाल्यास जात नाहींत. वाजबी बाकीचे रुपये मागील मामलतपैकी वसूल होतील ते पोटास खातील. [त्यांत] दूर पथ. समक्ष लबाडी चोरी करितात. दूर पडल्यावर सर्व फावेल. मनास येईल तैसील चाली चोऱ्या करुन खातील. अताजीपतास सहसा ठेउ नये. हुजूर फौजसुधां आणावे. त्याजकडे कामे असतील ती सर्व जनकोजी सिंदे याजकडे लावावी. येथून आज पाच महिने निरतर लिहितो कीं जे नुकसान होईल ते कबूल करुन कोणाची [सखारामबापुची] रजबदलीची मीड न धर्ता त्यास फौज [व] हिंसेबसुधा येथे पाठवावे. ते न जाहाले. सेवटी बंगाल्यास जाणार नाहीं. हरयेक निमित्य ठेउन राहांतील. यात संशये नाहीं यांस्तव त्यास पत्रदर्शनी बोलावणे पाठउन आणावे. छ * १५ जिल्हेज. हे आसिर्वाद.

पो छ १५ मोहरम.
[१९ अक्टूबर १७५८]

---

लेखांक [९७
१६५]

श्री * संवत १८१५ मार्गशीर्ष वद्य २
[१७ दिसंबर १७५८]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दाभोळकर] गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. राजश्री दताजी सिंदे व जनकोजी सिंदे कोठे आहेत. काये मनसुबा करितात ते वरच्यावर कळले पाहिजे याजकरितां निरंतर लिहित जाणे. वजिराचा अगत्यवाद चिरंजीव राजश्री दादास आहे. त्याचा पक्ष धरून नजीबखानाचे[५४] पारपत्य करावे लाहोरचा नवा मुलुक सोडविला तेथे अदिनाबेग ठेविला होता. तो मृत्य पावला यास्तव तेथील बंदोबस्त चांगला जाला पाहिजे. याजकरितां दताजी सिंदे यांणी तिकडे

---

(५४) 'गाजुदीखान होळकर याचा पुत्र व दादासाहेब याचा पगडीबद भाऊ होता. तसेच 'मल्हारराव यास [धर्म]पुत्र बहुत माधोसिंह बिजेसिंह व आणखी बहुत आहेत. त्यांत हा नजीबखानही पुत्र झाला' असे बखरीत ह्मटले आहे. ते पत्रव्यवहारात प्रत्यक्ष पहावयास मिळते. [खंड ६ ले २९१ पेद २ ले ७७ पेद २१ ले ९६, १००] शुजाउद्दौलादेखील 'मल्हारजीचे पुत्र आहेत' असे गोविंद बलाळ बुंदेला ह्मणतो अस्तु पेद २ ले ७७ हे पत्र पूर्वपानिपतीय नसून १७६४तील दिसते. ज्या उपकाराचें स्मरण देविले तो योगच १७५७ त घडला. अर्थात पत्र त्यानंतरचे होय. [खंड १ ले ४२१ चंद्रचूड १ ले १५५ पेद २९ ले ७२]

जाउन यथास्थित बंदोबस्त राहे ते अगत्य करावे. बंगाल्याकडीलही काम मातवर आहे. तेथे पैका मेळवावयाची जागा आहे. लाहोराकडील बंदोबस्त असिल्यास मनसूरअली-खानाचे लेकासारिखा मातबर सोबती करून भारी फौजेनसी जावें. जरब देऊन पैका मातबर मेळवावा. पटण्याकडील व बंगालियाचा मलुक सोडवावा. ठीक पडल्यास वजिरासही समागमें न्यावें परतु त्याचे येणे पेचपाचामुळे घडेल असे दिसत नांही. इतका चितावर धरितील तेच करितील. दुसरियाचे सोबतीचा[५५] भरोसा कशास पाहिजे. तसे मनसूरअलीचे लेकापासून कासीप्रयागची नजर व आणखी कितेक बाबती त्याजकडे लाउन पैका साधेल तरी साधावा. येक लाहोरचा बंदोबस्त असिल्यास हे करावे. सारांश सरकारच्या कर्जास ऐवज मातबर मिळे असा मनसुबा करून पैका मेळवणे. विस्तारे उभेयतास लिहिले त्याजवरून कळेल.॥ जाणिजे छ * १५ रबिलाखर. ॥ बहुत काय लिहिणे.

लेखन सीमा

---

लेखांक [९८] ॥ श्री * संवत १८१५ मार्गशीर्ष वद्य १२

[२७ दिसबर १७५८]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे. यानंतर तुमचे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तर कोठे आहा काय वर्तमान ते लिहिणे. मारवाडात मसलत न कराची. दबावाने पका तह करुन लाहोर प्रांत मातबर सोडला आहे त्याचा बंदोबस्त करावा. ते न करिता हिकडेच कालहरण करिता तरी हे मसलत नाहीं. लाहोरचा अदीनाबेग मेला. त्या प्रांती जावे. त्याचाच कोण्ही [आप्त] जो खबरदार असेल त्यास ते काम सांगावे. बंदोबस्त करावा म्हणजे पंचवीसतीस लाख रुपये हुजूर येतील असे आहे. हे काम करावे. वजिरास सर्व प्रकारे राखावा. नजीबखानाचे पारपत्य करुन बनेल तर वजीर आपण मिळोन बंगालियास जावे. जर वजीर न ये तरी इकडील खातरजमा करुन बंगालियास जाउन मातबर

---

(५५) हे वाक्य अर्थप्रचुर आहे बंगालच्या स्वारीस 'वजिराची सोबत पेचपाचामुळें घडेल असे दिसत नाहीं' असे तर स्पष्टच आहे पण सोबतीचा सांकेतिक अर्थ निराळा संभवतो सोबती म्हणजे होळकर असाही ध्वन्यार्थ निघतो

पैका मेळवावा. कर्ज वारावयास यैवज पाठवावा. इतके जागे व मातब्बर फौज जेथें श्रम फार फाळ नाहीं तेथे कामाचे दिवस गमवावे हे उचित नाहीं. याउपरी उमदे मनसुबियाची सुरत धरुन लिहिल्याप्रो करणे. वजिराचे जाणे बंगालियास न होय तर मनसूरअलीचे लेकास मेळउन घेउन कासी अयोध्या बंगाला हे काम करुन पनास लाखपर्यंत येवज कर्ज वारावयास पाठवावा. हे गोष्ट जरुर करणे. अंताजी माणकेश्वर यास हुजूर चिरंजिवानी बोलाविले आहे. त्यास वजिराकडील यैवज उगवला किती व रोहिल्याकडील वगैरे येवज किती उगवला याची रुजुवात करुन उरला यैवज आपण गरमनरम होउन उगवे ते जरुर करावे. अंताजीपंती मागील जप्तीत व फोजदारीत व शहरात फुरोईत मनास येईल तेसे अंतर केले असे म्हणून बहुताचे मुखे श्रवण जाहाले आहे. तस्मात असेल यात संशये नाहीं. तुम्हीं मुलाहिजा न करता दिलीचे वकील वगैरे माहीत असतील ते हाती घेउन जरुर कलमे तहकीक करावी. फौज वजिराकडे पाचसात हजार ठेवली त्याचा यैवज म्हणून मेरठ वगैरे माहाल त्या यैवजी पंचवीस लाखाचे अंताजीपंताकडे आहेत. त्यात वसूल काय फौजखर्चा किती याचे गणतीची चौकशी तुम्हाकडील सरदार गेला आहे त्यास लिहून जितकी होईल तितकी करावी. समक्ष गाठ पडलियावरी तिळमात्र मुलाहिजा न धरता जरुर करावी. यास अनमान मीड न धरणे. दोघे सरदार खावंदाचे जागा व तुम्हीं यखतियारी. जे नुकसान सरकारचे ते तुमचे यास्तव माहालची व फौजेची व वजिराचे दरबारची मिलकतीची सर्व चौकसी अंताजीपंताची रकडून करावी. जुने वकील[५६] वगैरे जो माहीत मिळेल तो हाती घेउन कलमवार चोकसी दस्ताऐवज रुजुवात सर्व ठीक मनास आणून लेहून पाठवणे. जाणिजे. बेमुलाहिजा तहकिकात होये ते जरुर करणें. लाहोरचा बंदोबस्त होउन येक काम नवे मादवर करुन यदाचे साली पंचवीसतीस लाख का कर्जदारास द्यावयास पाठवणे. सर्व भरवसा कर्ज वारावयाचा दृतव्राचा आहे. ते जे बोलून गेले ते खामखा करावे. छ २५ रबिलाखर. बहुत काये लिहिणे.

लेखन सीमा

(५६) जुने वकील ह्मणजे हिंगणे जुने ह्मणण्यात भावार्थ हा की ते या वेळी कामावरून दूर होते [पेद २ ले ९१] पुरुषोत्तमपत हिंगणे केवळ शिद्यासमागमे होता [खंड ६ ले ३८६ ३८६] हिंगण्याचे आणि अताजी पताचे परस्परे वाकडे होते. [पेद २१ ले ९५, ९६, १००, १०५ पेद २७ ले १२६, १२९ ऐटि २ क्र ३१]

लेखांक [९९] ॥ श्री * संवत १८१५ पौष वद्य १२

[२५ जनवरी १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी यादव गोसावी यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले परंतु आजी तागायेत कोठीछ काय काम केले पैका कोठे मेळविला पुढे काय करणार हे कांहीं लिहिले नाहीं. मारवारात न गुतावे. लाहोर प्रांती जाउन सत्वर तिकडील बंदोबस्त करावा आणि मनसूरअलीखान याचे लेकास सामिल करुन बंगालियाचे कासी वगैर मातबर काम करुन पैका मेळवावा. लाहोरचा हुजूर पाठवावा. येखादे मातबर काम करुन तीन्ही वाटणीपैकी कर्ज फेडावयास पैका मातबर पाठउन द्यावा इत्यादिक कितेक रुबरु राजश्री दत्ताजी सिंदे बोलोन गेले आहेत व सर्व प्रकारे या कामात ऐशी गोष्ट बोलोन सेवटास न्यावी हा भरवसाही याचाच असे. तुम्हीं त्यासी निश्च बोलोन लाहान कामास मातबर स्वारीचे दिवस न गुंतता जल्दीने मोठे कामाची सोई पाहून जावे. मातबर पैका मेळउन खामखा पाठउन द्यावा. हे गोष्ट करावणें. हे या सरदारास फार अगाध नाहीं. दिल्ली प्रातीचा बदोबस्त करुन कासी प्रयाग अयोध्या ही कामे मंसूरअलीखान याचे लेकांचे सामिलातपणे करुन बंगालियात जावे. तिकडे फार पैका मेळवायाची सोई आहे. जरुर करावी. लाहोर प्रांती फौज ठेउन तथील बंदोबस्त करुन तथीलही सरकारात येवज फौज फेडून दाहापंधरा लाखापर्यंत राहू द्यावा. या दिवसात फार पैका येणे येकदाच कर्ज वारणे हे काही तिकडील पैका आलिया करीत नाही. यास्तव जरुर कबजा व मेहनत करावी. पैका मेळवावा. आजितागायेत कोठी[छ] कायम खडणी केली पैका कोठे काये मेळविला हे कच वर्तमान वरचेवरी लिहावे ते काहीच लिहिले येत नाहीं. धरात तपसीलवार कच्चे निरंतर आठा दिवसाचे आतरे लिहावे. बाहेर जरुर ते लिहावे. फार थोडके लिहिता. यात काहीच कळत नाहीं. तरी येसे लांबचे लिहिणे लिहित न जाणे. लाब सविस्तर जनकोजी सिंदे याणी आपले हाती[५७] लिहित जावे म्हणजे फार संतोष आहे जाणिजे. छ * १४ जमादिलोवल. हर तजविजीने वीसपंचवीस लाख रुपये हुजूर कर्जासाठी प्रविष्ट करणे. बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा)

---

(५७) जनकोजी सिंद्यास लिहिता येत होते असे आता सप्रमाण सिद्ध होते.

लेखांक [१००] श्री * संवत १८१५ माघ शुद्ध १५
[११ फरवरी १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दाभोलकर] गोसावी यांसि.

सेवक सदाशिव चिमणाजी [भट] नमस्कार उपरी. कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे ॅ विशेष. सांप्रत तुम्हाकडून पत्र येउन वर्तमान कलत नाहीं. त्यास प्रस्तुत तुम्हीं कोठे आहा मनसुब्याचा डौल कसकसा धरिला आहे. मातंबर काम करुन सरकारचे कर्जास मातंबर येवज पाठउन द्यावा. सरकारचे कर्ज वारावे. हे तुम्हीं चितास आणिले असेल त्यास हे सविस्तर लेहून पाठविणे. राजश्री मल्हारबा येथे फाल्गुनचैत्रास येतील. त्याचे गुंतेवते उरकोन त्याची रवानगी सत्वरीच केली जाईल. लाहोराकडील वगैरे वर्तमान लेहून पाठवणे. लाहोराकडे फौज गेली होती त्यास सन मजकूरचा करार प्रो येवज आला न आला. गुा दि्लीचा करार साडे बारा[५८] घ्यावे. फौज पांच हजार [ठेवून] चाकरी घावी. येकुण सरजामच जाला. विशेष नाहीं. प्रस्तुत काही मंनसबा बंगाला सफ-दरजंग वगैरे येखादा करावा. विशेष कर्जाची मदत जाली आसे [झाल्यास] बेहतर उतम. आजपर्यंत मामलती करार कोठील जाल्या. आताजीपंताची फौज किती भारी व सांगायासी किती. हवाले घेतले तो येवज उगवला की नाहीं. यासिवाय अबदालीबाबत फौज वगैरे झ[जा]टाबाब्रत पंचवीस लाखाचे माहाल मेरट वगैरे दाखिले व फौजदारी वगैरे मिलोन काय यैवज घेतला आसे. हुजूर येणार की नाहीं. [ते] सर्व लिहिणे. वर्षभर जाउन आजून यैवज खारीचा न आला. आपूर्व आहे. सालाबाजचा यैवजही पाठवणे. सविस्तर मजकूर [दत्ताजी] पाटिलबाबास सांगून उतर पाठवणे. जांणिजे छ * १२ जमादिलाखर. ॥ बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा)

पो छ २७ साबान
[२५ अप्रेल १७५९]

---

*

(५८) सन १७५७तील अबदालीच्या स्वारीमुळे राघोबा उत्तरेस आले त्यानी दिल्लीत जो कारभार केला त्याचे वर्णन या पत्रात मार्मिकपणे आले आहे 'गुदस्त दिलीचा कारभार साडेबारा घ्यावे फौज पाच हजार [ठेवून] चाकरी द्यावी. एकुण सरजामच जाला'. हे वाचनीय आहे. [पहा पेद २१ ले १४८]

लेखांक [१०१] श्री * संवत १८१५ माघ वद्य १२
१६६] [२४ फरवरी १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दामोळकर] गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्हाकडून पत्र बहुत दिवस येउन वर्तमान कळत नाहीं. राजश्री दत्ताजी सिंदे यांचा मारवाडचा मातबर पैका उगवणे त्याचा उगवयाचा विचार कसा केला तो लिहिणे व लाहुर व बंगाल व पटणे हे तीन मनसुबे प्रस्तुत मारनिलेस मातबर आहेत. त्यास लाहोरास चिरंजीव राजश्री दादानी अदिनाबेग सुबेदार करून ठेविला होता तो मृत्यु पावला. त्याचा नायेब लाहोरास आहे. तो तुमचे उपयोगी असला तर कोणी सरदार फौज देउन तिकडे पाठउन बंदोबस्त करावा. बंगाला पटणें यास स्वारी करावी. मातबर पैका कर्जाबदल मेळवावा. बंगाल्यास क्रोड दोन क्रोड पैका मिळेल असी जागा आहे. भारी पैका मेळउन कर्जाचा परिहार करून फौज ताजी राखावी. असा विचार जाला पाहिजे. पटणे हस्तगत करावे. ते स्थळ घ्यावयाचेच आहे. खासा दत्तबा व जनकोबानी मातबर फौजेनसी तिकडे जाउन पटणे घ्यावे. तेथें छावणी करून राहावें. तेथून बंगाल्याचा मनसुबा करावा. ते चिरंजीव राजश्री दादा बादज बरसात हिंदुस्थानास[५९] येतील. तदोत्तर चिरंजीव व मारनिलेनी बंगाल्याची स्वारी करून मातबर पैका मेळवावा. गुदस्तांप्रो बंगाल्याची मामलत चुकवावयास वकील तुम्हाकडे आला तर चुकउ नये. बंगाल्याकडील मातबर पैका आल्याविना कर्जाचा परिहार होत नाहीं. भारी फौज जाउन क्रोड दोन क्रोडी पैका मेळविला पाहिजे. जर फौज न जाता पनाससाठ लक्षावर मामलत चुकवितील तरी चुकवावी. असे न होये तरी चिरंजीव तिकडे आल्यावर मनसुबा करावा. प्रस्तुत तुम्हीं पटण्याकडे जाउन पटणे काबिज करावें

(५९) 'दादा बादज बरसात हिंदुस्तानास येतील तदोत्तर चिरंजीव व मारनिलेनी [शिंद्यानें] बंगाल्याची स्वारी करून पैका मिळवावा चिरंजीव तिकडे आल्यावर मनसुबा करावा' असे या पत्रात म्हटले आहे आणि पुढील पत्रात 'इकडून चिरंजीव बुंदेलखंडाचे मार्गे प्रयागाजवळ येतील तुम्ही वजिरास घेउन अंतर्वेदीतून यावे चिरंजीव इकडून व तुम्ही तिकडून असा भारी शह पडताच काशी प्रयाग घ्यावी' [ले १०२] अशी योजना होती दोन्ही पत्राचा इत्यर्थ हा की राघोबा आल्यानंतर मसलतीस चालना मिळावयाची होती चातुर्मास संपताच राघोबा उत्तरेस आले नाहीत दक्षिणेत निजामाशी युद्ध चालू झाले तिकडेच गुतले अबदाली अकस्मात उत्तरेस आला म्हणून शिंदे दिल्ली समीपच राहिले आणि बंगालच्या स्वारीची कल्पना इत्युत्तर स्वप्नमयच राहिली.

व सुजाअतदौलाकडील दोनतीन कामे आहेत. कासी अयोध्या प्रयाग घ्यावे. चिरंजीवा जवळ कासी अयोध्या द्यावयाचा करार केला आहे. प्रयागची रदबदल आहे. तोही मनसुबा सोहलतीने होईल तरी करावा. सारांश उमदे मनसुबे करून पैका भारी मेळउन कर्जाची वोढ वारून फौज ताजी राखावी. मुख्यत्वे करून हेच मर्जी आहे. गुदस्तां अवकाश नव्हता यास्तव बारा[लक्षा]वर मामलत रा विठल सिवदेव [विंचुरकर] याणी चुकविली. यंदा मोठे काम फार येवजाचे तेच आहे. जर दिलीस पनास लक्षावर एक साला लागली तरीच विल्हे लावावी. ते सुधे बोले· देणार नाहींत परंतु जबरदस्तीने मारनिलेनी पटण्यापावेतो चालून जातील तेव्हां नरम होउन मातबर ऐवज देतील. दिल्ली प्रांती नारो शंकर अथवा आणखी कोणी दोनतीन हजार फौज ठेवावी. यंदा लाहोरा-कडील ऐवज आणून जरूर पावता करावा. अंताजी माणकेश्वर यास परिछिन्न हुजूर यावयाविसी लिहिले आहे. त्याचे हवाल्याबाबत [बाकी] राहिली असेल तरी सख्त ताकीद करून उगवेसे करावे. वजिराकडे त्याची फौज किती व चाकर किती महिने होती. मेरठ वगैरे माहालचा यवज त्यास वसूल किती जाहाला. हुजूरचे तैनातजाबत्याची फौज चारपांच हजार आहे येसे ते लिहित असतांत परंतु वजिराकडील फौज व हुजूरचे कराराची फौज दोन्ही मिळोन पांचसा हजार असेल. हे ते मिळोन वाल्मेळ करीत असतील. यात संशये नांही. याचा शोध ते आले तरी करावा यांत सरकारची मातबर किफायेत आहे. गणतीचे निकडीची संध पाहून महिनेमाहाल [?] फौज चाकर ठेउन गणतीची भरती करून दाखवावी मग दूर करावी हा प्रकार त्याचा आहे. येविसीचा शोध पुर्ता करणे. मीड न धरणे. जर मीड धरणे असेल तरी मोघम चौकसी करू नये. येथे येतील मग जसे बनेल तसे केले जाईल. जर चौकसी करणे तर फारच सख्तीने खावंदगिरीने करावी. सर्व माहित मेळउन चौकसी करावी. मागे जफ्तीत व फुरोइत त्यानी तफावत केली असेल तेही कलमवार ठिकाणी लावणे. सारांश मलमलीत कांही न करणे. येथील मुख्य वर्तमान ईतकेच कीं क्रोड रुपया कर्ज देणे. त्यास अवघी फौज घरी बसविली. वीस[६०] हजार जरूरानी कामाबदल ठेविली. त्यास पैका देणे आला. तीस लाख

*(६०) पहा ले ५९ टीप २७ पेशवाई फौज कमी झाल्याचा हा पुरावा प्रत्यक्ष पेशव्याचाच वाचणीय आहे 'सर्व फौज घरी बसविली वीस हजार मात्र ठेविली तीस एवज देणे लागेल या स्तव ३० लाख कर्जदारास देउन ७० लाख कर्ज देणे आहे त्यापैकी ५० लाख कर्ज दतवानी फेडावे ह्मणोन आज्ञापिले त्यास तेथील फौज कार्याकारण ठेविली ते पाहोनच ठेविली असेल कामच पडले तरी आणखी ठेवणार महाराज समर्थ आहेत फौजेची चिंता काय आहे' हे तिसरे पत्र रामराव नील-

कर्जदारास ऐवज पावला. बाकी सत्तर लाख देणे आहे. पनास लाख कर्ज तुम्हीं मत्रा फेडावें. एक दुसरे मातब्बर काम करावें वाटणी वगैरे अर्थ ध्यानात न आणिता खामखा कर्ज फेडावे. जाते समई दत्ता बोलोन गेले त्या गोष्टीवर भरोसा आहे. येविसी उ[य]भतासही पत्रे याच प्रकारे लिहिली आहेत. तरी उमदे काम होउन पैका भारी मिले ते गोष्ट करणे. ॥ जाणिजे छ * २५ जमादिलाखर. ॥ आठा दिवसाआड मागीलपुढील वर्तमान लिहित जाणे. यदा केदारास[?] जाणे जाहाले होते. इमारत बहुत उतम जाहाली. पाण्याचे तले बलकट रुंद चुनेगची जरूर बाधावे येवढे राहिले आहे. तेही फावलेयानी करावे. वरचेवर स्वारीचे वर्तमान लिहित जाणे. वजिराचा लगाम जरूर राखणे. बहुत काये लिहिणे

(केवल सीमा)

---

कठाचे पहावे [ऐटि २ क ४१] पेशवाई फौजेची सख्या 'पसतीसचालीस हजार' अशी राघोबाने दिली आहे [पुरदरे १ ले १५९] ती यथार्थ होय [ कास ले ९१] शिदेहोलकराचे सैन्य नियमित नव्हते तथापि प्रथम १५ व नतर २० हजार असे प्रमाण प्रत्येकी होते या मानानेच 'मराठे तो कमबेश लाख फौज' मोजले जात असत [पेद २ ले ४ पेद २१ ले ९६ कास ले १९२] याच पत्रात हिंगण्याने निजाम व सफदरजग याचेही सैन्यबल दाखविले आहे ते तुलनात्मक अभ्यासास उत्कट साधन होय तसेच इतराचेदेखील न्युन्याधिक सापडते [पेद २१ ले ५४] अस्तु ही सख्या पदरी होती तोवर पेशवा उत्तरेस येत राहिला १७४८ च्या आरभी शिद्यानी आपले बल 'दुपटीने' वाढविले ते ४० व होळकर २० एकूण ६० हजार झाले पण शाहुनतर पेशवाईचे प्रमाण कमी झाले ते या वेळपावेतो तसेच होते बारा वर्षे उत्तरेकडे न येण्याची जी अनेक कारणे घडली त्यात हे मुख्य होय 'सा सुभे दक्षिण मोडविण्याचा' राजकीय मत्रसिद्धीचा दीर्घकाल आणि गुजराथ कर्नाटक व बगाला इकडील महत्वाकाक्षेची अपूर्तता इत्यादिकाचे वर्म या दृष्टीने पाहाण्यासारखे आहे [पेद २१ ले ५८, १००] तसेच अबदालीने ज्या अनेक स्वाऱ्या केल्या त्यात त्याचे सैन्यबल ठराविकच का असावे याचे रहस्य कळते [पेद २ ले ८१, १०९ पेद २१ ले ७१, ९६, ११७ पेद २७ ले २४७] १७४८तील स्वारीत केवळ मोगलाचीच फौज पण ती एकसूत्री व एकतत्री असल्यामुळे आणि १७५२त मराठे वजिरासह सहायकारी झाल्यामुळे अबदालीचे पारिपत्य झाले किंवा तो माघारा गेला आणि पुढे त्याची १७५७ची स्वारी यशस्वी का झाली व पेशवा श्रीरगपट्टणकडे का निघाला याचे खरे मर्म उमजते तसेच १७५९त शिद्याशी सामना होताच अबदाली यमुनापार होऊन नतर बडाऊच्या घाटावर शिद्याचा पराजय कसा झाला हा विषय मीमासकाच्या चिकित्सेवर सोडणेच बरे ले २३ पेद २१ ले ५३, ५७ कास ले २२३ ही पत्रे तुलने-साठी उपयोगी होत

लेखांक [१०२]                श्री                * संवत १८१५ फाल्गुन वद्य ७
१६७]                                        [२१ मार्च १७५९]

पुा राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे गोसावी यासि

आसिर्वाद उपरी. वजिराचा विचार सुधा नाही यास्तव मनसूरअलीखानाचे लेकास वजिरी दिल्हियाने पंनास लक्ष रूये देतो परंतु येथील मर्जी कसी असेल ते कलेना यास्तव न केले. पुनरपि करावयाविसी आज्ञा आलिया लाहोराहून येउन कार्यसिधी करू सरकारचे कर्ज फेडू म्हणोन लिहिले ते अक्षरशाहा अवगत जाले. ऐसियास मातबर मनसबा करून कर्ज फेडावे हे आपणासच योग्य आहे परंतु गाजुदीखानास येथूनच स्थापिले त्यापासून हरयेक अंतर करारांत करावे [असें आढळेल तर] मग त्याचा मुलाहिजा काय आहे. कासी तो पूर्वी मनसूरअलीच्या लेकाने दिल्ही आहे चिरंजीव दादा दिलीजवल असता आपणहून द्यावयास कबूल होता. जर त्यास वजिरी देणे तरी कासी प्रयाग ही दोनी स्थले द्यावी पंनास लाख रूये दिलीची वजारत देणे [तर] हे काही फार नव्हे परंतु वेरीज मात्र बोलावी. रुये द्यावयास दोनतीन वर्षे लावावी याप्रा रुये देउ केले तरी काये कामाचे. येका वर्षात रुये रोख द्यावे. या तिही गोष्टी कबूल कराव्या. तुमची पकी निशा व्हावी. वजीर लवाडीस आला तरी शुजाउदवलानी गंगेआलीकडे सत्वर येउन तुम्हास नेउन आपले कार्य करून घ्यावे. तुम्ही त्याणी मिलून वजिरी करार करून द्यावी. रुये द्यावयास दोनतीन वर्षे लावावी. प्रयाग कासी न द्यावी. असे असलियास विशेष त्यास वजिरी द्यावी असे नाही. काकी ते पंकेकरी जबरदस्त. फौज तोफखाना मोठा. जाठासी त्यासी स्नेह. याजमुले सत्वरच भारी होतील. [हे] मोगले लोक आहेत. फावलेयानी आम्हासी वाकडे वर्तावयास अंतर करणार नाही[त.] यद्यपि इतके दोश आहेत तथापि पंनास लाख रोख हातास येतात कासी प्रयाग येती असे लाभ होत असले तरी करावे. काही न दिल्हिया येक प्रयाग व पंनास लाख रोख दिल्हे तरी वजिराकडे काही अंतर ठेउन करावे परंतु त्याची रीत संस्थानिकपणाची दिसते. गंगेपलीकडील समाळून असावे. दिलीचे खटपटीत जीव राहिला नाही. निरंतर तुमचे आज्ञेत चालावे. आब्दालीचाही शह हमेशा फावेल्यानी दिलीवर आहेच पहिला दिलीत ऐवज मातबर होता. मुलुकही फार होता. पातशाहाचा दबाव होता यास्तव मनसूरअलीखान वजिरीसाठी झटत होता. आता पातशाही वदबकीची. खजाना नाही. मुलूक नाही असी जाली. याची रीतही गर्भश्रीमंतपणाची आहे यास्तव हे राजकारण खरेलटके या गोष्टीचा पुर्ता शोध जाटाचे मारफातीने व गोविंद बलाल [बुंदेले] याचे मारफा-

तीनें पुर्ता करून आपणाकडील इतबारी शाहाणा सुजाउदोलापावेतो पाठउन सर्व रागरंग पाहून जर पंनास लाख रोख प्रयाग हातास येत असला तरी वजिरी द्यावी. नजीबखानास बक्षीगिरी दिल्हियास तीस लाख रूपे देतो म्हणून लिहिलें. ऐसियास नजीबखान पुरा हरामखोर बाट आहे. गुदस्ता चिरंजीव दादासी त्यासी काही मजा राहिली नाही. तो दिलींत प्रविष्ट जालिया आबदालीचेच दिलीस ठाणे बसलेसे जाणावे. बेमान हरामखोर आहे. त्यास वाढवणे [म्हणजे] सर्पास दूध पाजण्याप्रो। आहे. फावलेयानी त्याचे पारपत्यच करावे. मनसूरअलीचा लेक प्रयाग न देई वेरीज मात्र बोलावी रुये द्यावयास तीन वर्षे लावावी असे करू लागला तरी गाजदीखानासी जे जे करार चिरंजीवानी केले आहेत ते कायम करून ते आपण येक होउन असावे. बाजद बरसात वजीर पातशाहास घेउन नीट बंगाल्याच्या सुमारे गेलिया भारी वजन पडेल. रोहिले जमिदार बहुत करून सामिल होतील. वजिरी तुम्ही येकदिल होउन बंगाल्याचा रोख धरावा. इकडून चिरंजीव सत्वरच बुंदेलखंडाचे मार्गे प्रयागाजवल येतील. तुम्ही वजिरास घेउन अंतरवेदीतून यावे. भारी दबाव ठेउन प्रयाग हातास हर तरेने येईल आणि खामखा घ्यावा. चिरंजीव इकडून व तुम्ही वजीर मिळून तिकडून असा भारी शह पडल्यास मनसूरअलीखानाचे लेकासही मातबर नजर द्यावी लागेल. जर त्याणे येणेप्रो। शह पडताच तुम्हास कासी प्रयाग दिल्हा नजर भारी दिल्ही तरी पातशाहा वजिरास समजून हर प्रकारे सागून त्यास बकसीगिरी द्यावी. हा दुसरा प्रकार. तिसरा प्रकार वजीर बाहेर न येई तरी तुम्हीच जाउन सुजाउदाल्या मेलउन घेउन कासी प्रयाग मात्र त्याजवळून घ्यावी रुये न मागता त्यास दवणे बंगाला प्राती निमे देउ करून तो तुम्ही मिळून जाउन बंगाला सोडवावा व ऐवजही मातबर मेलवावा. या तिही मनसब्यात जो पका बनेल तो करावा. दिलीत लाहान वकील [पुरुषोत्तम हिंगणे] लबाड फार बोलत असतात. येकास पके पाचाचे राजकारण आणिले तरी येकाने दाहाचे आणावे उगीच गोष्ठ फुगउन राजकारण अडकाउन पाडावे. निशेस थाक नाही. तुमचा सरल कारभार यास्तव हरयेक राजकारण पके निशेस कोणते हा शोध आपला इतबारी ज्याकडील राजकारण येईल त्याकडे पाठउन पके करून तो मनसबा करावा. हर्ती तुम्ही लाहोर प्राती गेला तिकडेही काम फार आहे याजमुले उशीर लागेल. छावणीही तेच प्रांती होईल. तेव्हा हा मनसबा बाजद बरसातेवर जाईलसे वाटते. तथापि सत्वर लाहोराकडील बंदोबस्त होउन छावणीस तुम्ही दिली आसपास आला तरी ही राजकारणे रूबकार पडून येतील. तेव्हा नीट शोध करून

ज्यात मातबर पैका पनास लाख पाउण करोड कर्ज[६१] वारावयास हातास येतातसे दिसेल [तें] तिळमात्र संशय न धरता करावे. ।" छ * ११ रजब. बहुत काय लिहिणे हे आसिर्वाद.

पो छ २४ साबान. मुा सतलज नदी.

[२२ अप्रेल १७५९]

---

(६१) छत्रपतीच्या कर्जाची सख्या तरी सापडते परतु पेशव्यास कर्ज किती होते हे गूढच आहे. आकडा कोठेच आढळत नाही उपलब्ध साधनांची चिकित्सा करू जाता 'तीस लाख कर्ज जाहाले' असा लेख आहे [पुरंदरे १ ले २१३] तेव्हा १७५०च्या अती ऋण फारसे उरले नसावे असे अनुमान होते [कास ले ९९] आणि निजामाकडून 'खजिना' मिळविण्याची जी अपेक्षा होती ती 'कर्जपरिहारार्थ' मानली तर त्याची कल्पना वरीच निश्चित होऊ पहाते. [लि ७ खड ३ ले ३७२] ईश्वरसिंगाने विषप्राशन केल्यानतर राज्य माधवसिंगास मिळाले त्यासंबधी करार काय होता हे कोठे कळत नाही. 'रोहिले कापून काढिले तीन क्रोडी द्रव्य व पचवीस लक्षाचा मुलुक अनर्वेदीमधे देऊ केला' [खंड ३ ले ३८३] हा दिक्षिताचा कोटिक्रम कदाचित अतिशयोक्तीचा मानला तरी 'सफ्दरजगाचे साहित्य करून कोड रुपये सरकारात घातले' हे हिंगण्याचे वर्णन वास्तविक असावे [पेद २७ ले १२६ ले १३] अबदालीविरुद्ध सोबती गेले त्या वेळी बादशाहाने '३० लक्ष रुपयाचा करार केला होता [खंड १ ले १] त्याची निशा घेतलीच' होती फिरोजजगाच्या राजकारणात किती रकम पदरी पडली असावी हे सहज लक्षात येईल असे असता 'पनास लाख नवे कर्ज आहले'. [लि २६] 'तुम्ही एवज दिल्हा तो कर्जदारास दिल्हा परतु बाकी कर्ज बहुत होते एकदाच चालीसपनास लाख यावे. येताच कर्ज वारावें परतु तो अर्थ न घडला' यासाठी 'पचवीस लक्षाची बेरीज सर्वास सांगितली. हिंदुस्थानात जे मातबर आहेत त्याची यादी चिरंजीवास पाठविली' [लि ५१] त्याची बेरीज 'पाउणेसोळा लक्ष होती [पेद २ ले. ७५] एवच ४० लक्षाची कर्जपटी झाली 'मारवाडची मामलत ५० लक्ष करार जाहाली' [पेद २७ ले १२८] 'कोटियाची ४० लक्ष नजर केली' [पेद २ ले ६६] 'कर्ज वारावयास पनास पाउण करोड येई तो अर्थ करुन दाखवणे' अशी आज्ञा होळकरासह सखारामपत वकिलास होतीच त्याने 'जाटाचा फैसला ३० लाखावर केला' [पेद २१ ले ६०] नवीन बादशाहाशी 'साडेव्यासी लक्ष मुकरर केले ४० लक्ष येदा बाकी पुढे या प्रकारचा तह ठहरला'. [पेद २७ ले ९०] जयपुरचे 'साडेसोळा' जाले [पेद २७ ले १०८] शिंदेवकिलाकडील बेरीज करुन पहाता ७५ लक्ष पेशव्यास पोचले तरी 'फौज घरी बसविली वीस हजार मात्र ठेविली ७० लाख कर्ज देणे आहे ५० लाख कर्ज तुम्ही फेडावें' अशी सतत टुमणी मागे होतीच [लि १०१] कर्जपटी सबधी होळकराने ३० आणि शिंद्याने २० दिले ते वेगळेच [लि ५१ १०६, १०८] इतके झाले तरी 'सवा क्रोड दीड क्रोड कर्ज मागील दौलतीवरील' राहलेच [खरे १ ले ५५] पण हा निर्देश पानिपतोत्तर होय याच कर्जापायी 'चौथाई सरजाम सरकारात द्यावा असा करार होउन सरदारावर गडदु चढवून सरकार किफायत केली' [खड १३ ले ७९ खरे २ ले ३७४] तरी 'दौलतीस कर्ज आहे ते वारावयाचे' राहिलेच [इसं २१ पान १३६] हा कर्जरोग असाध्य होता कारण 'दक्षिणोतर सुवर्णनदी प्रवाह सगम सगरकूप समान पुण्यस्थली पूरयुक्त योग घडणे तेव्हां ऋणोद्धार

लेखांक [१०३]
१६८]

श्री

* संवत १८१५ फाल्गुन वद्य ७
[२१ मार्च १७५९]

पुा राजश्री दत्ताजी सिंदे व जनकोजी सिंदे गोसावी यांसी

आसिर्वाद उपरी. अंताजी माणकेश्वरास हुजूर परिछिन्न दादानी मनापासून येथील आज्ञेप्रो॥ बोलाविले असे असता हर प्रकारे उशीर लाउन राहातात. आम्हास लिहितात की दत्ताजीनी राहविले यास्तव महिनाभर राहिलो. वजिराची दत्ताजीची भेट होताच दरमजल येतो. साप्रत तुमच्या लिहिल्यावरून दिसून आले की लबाडी करून राहतात. हर प्रकारे ऐवज हाताखाली घालून हात उगवणार. आम्हचा प्रमाणिकतेचा स [द] रकार त्याणी टाकिलासे दिसते यास्तव पत्रदर्शनी तिलमात्र मुलाहिजा न धरिता हुजूर यावयाविषई सख्त ताकीद करावी. न ये तरी परिछिन्न बोलाउन आणून कैद करून त्यास हुजूर पाठवावे. तिलमात्र मुलाहिजा करू नये. मागे त्याणी जितक्या ऐवजाचे हवाले घेतले होते तो गात्र ऐवज ताकीद करून उगवावा. या सालचे वजिराकडील अथवा कोणीही ऐवज अंताजीपंताचे हाती न जाये ते करावे. तो ऐवज जमा करून हुजूर जरूर पाठवावा. अंताजीपंतास पत्रदर्शनी न येत तरी कैद करून पाठवावे. ॥ छ* २१ रजब. हे आसिर्वाद.

---

लेखांक [१०४]

श्री

* संवत १८१६ चैत्र वद्य ६
[१८ अप्रेल १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दामोळकर] गो॥

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशळ जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. राजश्री माधवराव प्रयाग दिा चिटणीस हे राजश्री जनकोजी सिंदे याचे चिटनिसीस[६२] आहे त्यास यांचे कामकाज यांचे हाती घेउन कैदकानु हुजूर-

---

श्रमसार्थक इहलोक परलोकी उत्तम होणार' अशी नीतीच होती [खंड ६ ले १६०] अफाट फौजेचा संसार कोणा एकासच चालवावयाचा नव्हता अपच इतर कसे चालवीत होते याचे निदान करावयास हवे आहे तसेच स्वामीच्या कर्जाचा काट स्वत.च्याची वाट आणि स्नेहाची अटाट चिंतनीय आहे कर्जाची कथा किंचित कौतुकास्पद असल्यामुळें दिग्दर्शन करावेसे वाटले

(६२) या वेळी हिंदुस्थानची 'मुखत्यारी' सिंद्याकडे होती ह्मणून चिटणिशीकडील हे कारकून त्याच्या स्वारीसमागमे आले होते पेशवाईतून फडणिशी व चिटणिशीकडून सिंद्याकडे नेहमीच कारकुनाची योजना केली जात होती असे जें विधान राजवाड्याने केले आहे ते अवास्तव होय [खंड ११

प्रो येथोचिन चालवीत तें करणे. यांचे सर्व प्रकारे सरकारांत जरुर यावस्तव हे पत्र तुम्हांस लिहिले असे व राजश्री श्रीपतराव यादव यांचे तर्फेने रा महादाजी रघुनाथ खासगीची चिटनिसी करीत आहेत. हाली उभयतांही सिंदे यांबराबर आहेत. त्यास उभयताचे पूर्वी पासून चालवीत आले त्याप्रो हालीही चालवीत ते करणे. त्यांत कोण्ही खटखट करील त्यास बरेवजेने ताकीद करीत जाणें की राजश्री महिपतराव चिटनीस परस्परे सांगणे ते स्वांरी स्वदेशीं आलियावरी सांगतील. धंदा मारनिळेचा असे. ।' जाणिजे * छ २० साबान. सुमा तिसा खमसैन मया व अलफ. ।' बहुत काय लिहिणे.

(केवल सीमा)

---

लेखांक [१०५] १७१]

श्री * संवत १८१६ वैशाख शुद्ध ६ [२ मे १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अंनत [दाभोलकर] गोसावो यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष. सुज्याअतदौलाजवळून पनास लाख रुपये घेउन

---

ले २ टीप २] या भागात या विषयावर अनेक पत्रें आली आहेत त्यावरून असे दिसून येईल की, शिंदेहोळकराकडे जी 'मुतालकी' होती त्यापुरताच याचा संबध पोहचे अंतस्थ कारभारात त्यांचा मुळीच संसर्ग येत नसे शिंद्याचे कारभारी मंडळ अगदी स्वतंत्र होते त्याची योजना फडणिशी किंवा चिटणिशीकडून होत नसे मुतालकीपुरतीच ही व्यवस्था होती रामाजी अनंत दाभोळकर हा फडणिशीकडील कारकून होता तो शिंद्याचा दिवाण झाला. त्याचा अर्थ असा नव्हे की दिवाणगिरीची योजना फडणिशीतून होत असे पानिपतावर दाभोळकर वारला. तेव्हा त्याच्या जागी फडणिशीतून दुसरी योजना झाली नाही फडणिशी हा मानाचा दरक असूनही तेथून योजना झाली नाही किंबहुना शिंद्याकडील फडणिशी चितो विठल रायरीकराकडे गेली आणि ती वोडगच्या लढाईपर्यंत राहिली त्यामुळेच रायरीकराची पत्रव्यवहार पहावयास मिळतो तो सधानरूपी नसून सांप्रदायपर होता इतराप्रमाणे शिंद्याच्या अंतस्थ कारभारातही ढवळाढवळ करून पैसे उकळावे अशी दादासाहेबाची इच्छा होती त्याचे प्राबल्य होतें तोवर हा प्रकार अल्प काल दिसतो. एरवी त्यापूर्वी तसा भाग मुळीच नव्हता आणि पुढे तो प्रघात पेशव्याने बदही पण केला. 'नवे दिवाणजी जाले. त्याणी भारुड घातले की तुमचे जुने फडनीस पोतनीस बक्षी व पागे यानी सरदारीचे डौल चालवावे नाही तर नवे मी करितो ते चालवितील. याप्रमाणे भारुड दाखवितात यजमानाचे चिती गोष्ट येत नाही की जर याप्रमाणे जाले तर आह्मी सरदार मात्र नावाचे राहू [दिवाणजीस] येथील कारभारी दवतात यैसा प्रकार नाही जाणोन स्तिमित राहिलें' ज्या कालाचा महिमा राजवाड्याने वाखाणिला त्याची वस्तुस्थिति संक्षेपत. दर्शविली आहे.

वजिरी द्यावी. अंताजी माणकेस्वर यास दिल्लीच्या कारभारातून काढावे हा मनसुबा. दुरा नजीबखानाजवळून तीस लाख घ्यावे. त्यातून तिरा आपणच पातशाहातेचा बंदोबस्त करावा. याचे सेवटवर कसे ते त्याहाते तोपर्यंत लाहोराहून घेउन म्हणोन [लाहो]राचे पत्री मजकूर. त्यास वजीर दादानी सर्व प्रकारे आपले करून ठेविले निर्बळ आहेत. याजपासून केल्या करारात अतरही काही नाही. असे असोन सुज्याअतदौलाचा मनसुबा करणे योग्य नाही. तत्रापि करणे तेव्हां जर पकी निशा पनास लाखाची सहा महिन्यात होती असे दिसल्यास वजिराजवळून केल्या कारभारात अतर मातबर पडल्यास वजिरावर जाटानी व सुजाअतदौलानी येक होउन यावे. तुम्ही सुजाअतदौलाचा पक्ष न करावा. जर सुजाअतदौलाचे पके राजकारण नाही तर वजीर पातशा बाहेर काढून सुजाअतदौलाचे पारपत्य करून मातबर पैका मेळवावा. जर हे गोष्ट वजिराजवळून न होये बाहेर न निघे तेव्हां दिलीतील कारभार वजिरावर सोपून सुजाअतदौला व आपण येक होउन कासी प्रयागचे काम करून घेउन पूर्वेस जावयास सुजाअतदौला सामिल करून घेउन त्यास निमे बंगाला देउ करून मातबर पैका मेळवावा. लाहोर प्रांतीचा बंदोबस्त उत्तम प्रकारे करावा. चिरंजीव दादानी अबदाली [अदीनाबेग] ठेविला होता त्याचाच कोण्ही मातबर इलवारी ठेउन तो कारभार नीट करून सारा पैका हुजूर येई ते करावे. इत [के] करून दिलीतील बंदोबस्त होउन पूर्वेस जावयास बादज बरसात ठीक पडेल. येदा छावणी दिलीची कराल तेव्हा सोई पडेलसे दिसते. अंताजी माणकेस्वर यास वारंवार हुजूर बोलाविले असता येत नाही. वजिराकडे पनास लाखाचे हिसेब काढून तेथेच गुतले. कितेक लबाड्या करितात. त्या तुमचे प्रस्थयास येउन त्यास ठेउ घेता. मेरठ वगैरे परगणे मधीच खातात वजिराजवळ हजिरी बारा हजार फौजेची लटकीच देतात. ही चाकरी करीत नाही. अपूर्व आहे. याउपरी त्यास पत्र पावताच हुजूर पाठवणे. सुप्रयुक्त आले तर बरे. न आले तर धरावे लुटावे. [मात्र] माल सर्व सरकारांत लावावा. मेरठ वगैरे सर्व माहाल सरकारात लावावे. वजिरावर पाच लाख रुपयाची वरात जिरंजीवानी दिली आहे ती सरकारात वसूल घ्यावी. त्यास याउपरी एक पैसा न द्यावा. जर ही गोष्ट जबरदस्तीने न करिता अंताजी हुजूर आला तर त्याचा येक लेक हजार राउतानसी ठेवावा. बाकी फौज वजिराजवळ चाकरीस पाहिजे [तरी] ते दुसरी नेमून द्यावी. परंतु अंताजीस ठेउ नये. याउपरी त्याचा काहीयेक मुलाहिजा न करिता कैद करून पाठवणे. तुम्ही कारभारी मिंडेस न पडणे जाणिजे. नजीबखान जाट अर्धा अबदाली. त्याचे राजकारण न करावे. सुजाअतदौला व जाट येक जाहल्या भारी. उपयोगी नाहीत. यापेक्षा आहेत वजीर ते फारच उपयोगी.

परतु सुजातदौला सह्या महिन्याने पनास लाख रुपये खरेखुरे देतात या वजिराजवळून एकदोन मातबर अंतरे याची तगिरी करवियाजोगी जाहाल्यास सुजाअतदौलाचे काम जरूर करावे. मातबर लाभ सोडू नये. यांचा विस्तार उभयता सरदारास लिहिला असे. तो मनात आणून उतम दुरंदेशीने सरकारात मातबर लाभ होउन येथील लक्षाने वर्ते असे प्रकारे जे तुमचे तेथील माहितगिरस बनेल ते करणे. वरचेवरी कचे वर्तमान लिहित जाणे. जाणिजे. ।' छ * ४ रमजान. बहुत काये लिहिणे. अंताजीपतास जरूर हुजूर पाठवणे. सहसा रजबदल आयकू न देणे. लक्षा प्रकारे वजिरासच राखावे. कदांचित तो कगरात वाकडा वर्तत असला तर मात्र मातबर लाभ पुर्ता दृष्टीस पडला तरच सुजाउदौलास हाती धरावे. परतु कासी प्रयाग हरतजवीजेने साधावा. विशेष काय लिहिणे. कर्जाची चिंता दृतवास असेलच. जाणिजे. (लेखन सीमा)

---

लेखांक [१०६] श्री * संवत १८१६ वैशाख वद्य १४

[२५ मे १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रामाजी अनंत [दाभोलकर] गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. दिलीचे काम उरकल्यावर कूच करुन कुरुक्षेत्रास आलो. लाहोराकडे फौज पाठविलीच आहे म्हणून विस्तारे लिहिले ते कलले. ऐशास येविसी राजश्री जनकोजी सिंदे व दताजी सिंदे यास लिहिले आहे त्याजवरुन कलेल. निरंतर तिकडील वर्तमान लिहित जाणे. ।' समयोचित दाहा लाखाच्या हुंडया पाठविल्या त्या पाउन बहुत संतोष भरवसा वाटला. फार पका मिलाला नसता वोढ सोसून सरकारचे कर्जाची चिंता मनात आणून ऐवज पाठवणे हे गोष्ट ईश्वरे यासच दिल्ही आहे. पुढे दसरियापावेतो दाहा लाख येउन पावल्यास बहुत सोय होईल. छ * २७ रमजान. बहुत काय लिहिणे. (लेखन सीमा)

---

लेखांक [१०७]

श्री

* संवत १८१६ ज्येष्ठ शुद्ध ४
[३० मे १७५९]

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दामोळकर] गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. जंजीरा व सुरत येथील पातशाही फरमान[६३] करून घ्यावे म्हणून विस्तारे राजश्री दत्ताजी सिंदे यांचे पत्री लिहिले आहे त्याजवरुन कलेल दोन्हीं स्थले सरकारांत जरुर घ्यावी लागतात यास्तव सनदा जरुर घेउन पाठवणे. ।"जाणिजे छ * २ शौवाल सुमा तिसा खमसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे.

(लेखन सीमा)

पो छ ६ जिल्हेज सन सितेन.
[११ जुलै १७५९]

---

लेखांक [१०८]

श्री

* संवत १८१६ ज्येष्ठ शुद्ध १५
[१० जून १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दामोळकर] गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. पत्रें पाठविलीं ती पावलीं. तिकडील कामकाज जाहाल्याचें वर्तमान विस्तारें लिहिलें तें कळलें. येसियास याउपरी उत्तम प्रकारें बंदोबस्त होउन पोख्त येवज हातास येई ते गोष्ट करणे. वारंवार तिकडील सविस्तर लिहित

---

(६३) 'पातशाही फरमान करोन घ्यावे' ह्मणून अताजी माणकेश्वर यास पेशव्याने पूर्वी लिहिले होतें [पेद २१ ले. १४३ पेद २७ ले २३०] ते अद्याप मिळाले नव्हते असे दिसते गुणदोषविवेचन करीत असता नानासाहेबाच्या चरित्रकाराने जाधव, पवार होळकर इत्यादि मराठ्यांविषयी जे उद्गार काढिले आहेत त्यास स्वत चरित्रनायकदेखील अपवाद ठरेल काय ? पेद १५ ले ८६ या बाबतीत चिंतनीय होय 'आनंदराव शाहुराजाकडून आहेत त्यांशी आम्हांसी नीट नाही सबब निरोप द्यावा हिंदुस्तानात जागा वतनी द्यावी सरदेशपांडगिरी दक्षिणची वतनी करून बंदोबस्त रावपंत याचे विद्यमाने करावा' इत्यादि अटी कशाच्या द्योतक आहेत हे इतकीर त्यायाने न्याहाळावयास पाहिजे

जाणें. ।" दाहा लाख ऐवज समयोचित पाठवला येणेकरुन प्रस्येयास आले की दृतग्रास येथील कर्जाची चिंता आहें. पुढे दसरियाआलीकडे दाहाबारा लाख ऐवजी पाठवीत ते करणे. अंताजीपंतास परिछिन फौजसुधा हुजूर पाठवणे छ * १४ सवाल. बहुत काये लिहिणे.




पो छ ७ जिल्हेज.
[१ अगस्ट १७५९]

---

लेखांक [१०९] श्री * १८१६ ज्येष्ट वद्य १३
[२२ जून १७५९]

पुा राजेश्री माहादाजी गोविंद[६४] [काकडे]
स्वामी गोसांवी यांसि

विनंती उपरी नारो शंकर याची मामलियेत सारी चोवीस लाख रुपयाची त्यांजवरी छतीस लाख रुपयेपर्येत आहेत व अकारतील यसे प्रकारे मजकूर होत होता तो सर्व तुम्हीं ममजलांच होतां. त्याजवरी मारनिलेची मामलियेत काढून तुम्हास चिरंजीव राजेश्री दादानी सांगून पाठविले तेव्हां तिसा लाखाचा अजमास करुन दिल्हा. तुम्हीं पुणियात पेशजी अठावीस लाख रुपयेपर्यंत कबूल करीत होता. त्यास तुम्ही मामलियावरी गेलियावरी मागील जमाबंदीची अजमास पाहोन पुढे मामलियेत बिल्हेस लाउन जमाबंदी आकारली असेल ती कसी आकारली. काय वेरीज जाहाली हे लेहून पाठवणें म्हणोन वारंवार पत्रें गेली. तत्रापि तुमचें काहीच लिहिलें आलें नाहीं. किती रुपया आकारेल हल कलू नये हुका मोघम मात्र लिहिली येतात की मागील जमाबंदीचा काही थाक नाहीं तत्रापि सरकारचा रुपया आकारेल तो आकारुन किफायेतच करुन दाखउ परंतु

---

(६४) याचे उपनाम काकडे होय. हा प्रथम गायकवाडाकडे राहून नंतर पवाराकडे होता. [पेद २७ ले १४९] तेथून या वेळी तो पेशवाईत कसा आला हे या पत्रावरून समजते. या पुरुषाचा पायगुणच असा की जिकडे जावे तिकडे भारुडच उभे राहावे. नारो शंकरास तो अकारण भोवला असे पत्रच सागते बुंदेलखडची कमाविस याजकडे गेली तेव्हां नारो शकर शिंद्याकडे आला तेव्हापासूनच त्याचा प्रत्यक्ष सबंध शिंदेशाहीशी घडला तो १७६६ पर्यंत राहिला. अस्तु. हा काकडे १७६४सात मानाजी शिंदे फाकडे याचा दिवाण झाला. फाकडयाची सरदारी राहो अथवा जावो पण याला दिवाणगिरी मात्र हवी होती. त्याच पायीं त्याचे शिंद्याशी वाकडे पडले. ते इतके की चकमकीपर्यंत पाळी येऊन त्यातच त्याचा अंत झाला. [खड १३ ले. १५]

यात काये आकार ते कळेना. मागील आकार नाही म्हणावा तरी मीरखाना[६५] [टोके] तेथं होते तेव्हां तुम्ही जमावंदी आकारली. ते नारो शंकर याचे मागील तीस बतीस चवतीस असे इस्तावियाने होते त्याच अजमासें आकारली असें याचेही सांगणीन आलें व पहिलेंही चालीस लाखपर्यंत गुजाइसीचा प्रकार हाही मासला आहे व हली येथें कितेक क्षेप निक्षेप निशा करुन मामलियेतही करु म्हणनात कीं यंदा सन सितेन छतीस लाख. पुढें दरसाल चढता चढतां येक लाखप्रमाणे पांच सालेंप्रो पाचवे साली येकेतालीस लाख घ्यावे. याजवरुन व मागील आजमासे पाहाता छतीस यंदा व्हावें पुढेंही अकार होईल असे वाटतें परंतु तुमचे काहीच लिहिले येईना. काय आकार नेंही कळेंना. यात तर सरकारचा रुपया फार दिसतो. हा कसा बुडवावा. तुमचे काय ते कळले पाहिजे याज करितां सविस्तर लिहिलें असे. तरी साल मजकुरापासून पुढे दरसाल चढतां चट लिहिल्याप्रो मामलियेत व्हावी असे असल्यास तुम्ही सरकार किफायेती इतबारी आहां रुपया साधालच परंतु तुम्हांस सेवटवरी कोठवर होतें न होते ते स्पष्ट कळलें पाहिजे. तरी पत्र पावताच सविस्तर उगउन लेहून पाठवणें. येथें उतर चालिसा रोजानी येउन पोहचलें म्हणजे काय तो विचार केला जाईल. जर दिवस अधिक लागले तर मामलियेत तटती कीं काये विल्हेस लाविली जाईल ऐसे पस्ट समजोन सत्वर जल्द उतर पाठवणे. यंदा छतीस लाख रुपये घावे. त्यात दहा लाख अजमासे सिबंदी वजा होउन बाकी सवीस लाख रुपये राहिलं. त्यात पधरा लाख रुपये रसद घावी. बाकी राहिले ते पुढे पावते करावें असे बोलतात. तरी तेही समजोन उतर पाठवणें. तुमचे अजतागायेत लिहिले आले त्यात तीस लाख अजमास बेरीज. यास पुढे तपसील रुपया सरकारात दिल्हा वराता जाहाल्या त्याचा इतकेच. परंतु तुम्हीं गेलियावरी जमाबंदी फलाणी ठरली असे काहीच लिहिले न आलें याजमुले काहीच क[ळ]त नाहीं. तर सविस्तर लिहिणें. तुम्हांकडे मामलियेत तुम्हीं गुजाईस राहू देणार नाहीं. वास्तव तुमचे पुर्ते लिहिले आलिया-वरी काय ते करावें लागते. सबब जल्दीनें उतर पाठवणे. साराश सिवाये सेवढे नारोपंताकडे चोवीस जाले. तेव्हांच माहितगार चालिसाचे अजमास म्हणत होतें. तुम्हींही अठवीस बोलत होता. सेवढे चारपाचाचे राज्य. निमे दोनअडीच येउ असें नारोपत म्हणत

(६५) या टोके घराण्याचा संबंध उत्तरेशी प्रथम १७४६पासून आढळतो [पेद २१ ले. १४] हे टोके बुंदेलखंडात नारो शंकर गोविंद बल्लाल बुंदेले व रघुनाथ हरी याजकडे तैनातीस होते पेद १९ ले. २५तील मीरखान डागरीवाला हा टोकेच होता [ले. १२१] नंतर जी फौज शिंद्याकडे तैनातीस राहिली त्यात हे नाव १७८०पर्यंत पहावयास मिळते

होतें. सवादोनअडीच जमाही येक साल त्याणी केलें. या अजमासें तीस पहिलेंच आहेत. लाखा दो लाखाची कसर. जुनें मामलेदारही म्हण[वी]त होतें. यात विशेष जालें नाहीं. तुम्हीं आमिरीनें काम करुन दाखविणार हाच भरोसा होता परंतु दोन वर्षे जालीं. मामला उगविला परंतु जमाखर्च अजमास मागील जमा हुजूर न लिहिली. मागील जमेवाचून पुढें काम कसें जाले असेल × × मात्र फार लिहितां. हे उतम नाहीं. हलीं साल मजकुरी छतीस पुढें चढने लाखप्रा पाचसाला हेलशात मागील जमाही पचतीसछतीस आहे. कर्जपटी व सेवढे नजर वगैरे कलमे आहेत. या अजमासें मागील येवज वराता वगैरे पात्रावा व पुढील करावयाचा अजमास व सन समान तिसाचा अजमास जमेचा व मागील जमेस नफा जाजती कसे काय जाले. पुढे मामला कसा पुरवतों हा साफ श्रावणशुधांत उतर येउन पोहोचसे करणें. ज्या कर्मासाठी पहिली चालमेल जाली तेसेच पुढे नीट समजेना असे जाले तेव्हां काये कामाचें. लिहिलेप्रा तुम्हीच करुन दाखवावें हे उतम. तुमच्यानें न होई तर साफ लिहिणें. तसी तजवीज करु.

छ * २६ माहे सवाल भृगुवासरे. दोन प्रहरीं.
र.न तिसा. चालिसा रोजाची मुदत जाबाची.
[२२ जून १७५९]

---

लखांक [११०] श्री * संवत १८१६ ज्येष्ठ वद्य ३०
[२४ जून १७५९]

राजेश्रियाविराजीत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत गोसावी यासी.

सेवक रघुनाथ बाजीराव [भट] नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. ईकडील वर्तमान सविस्तर राजश्री जनकोजी सिंदे व राजश्री दताजी सिंदे यासी लिहिले आहे त्याजवरून कलेल. जाणिजे छ* २८ सवाल. सविस्तर मजकूर केसो गोविंद [?] सागता कलो येईल. बहुत काय लिहिणे.

लेखन
सीमा

लेखांक [१११]　　　　श्री　　　* संवत १८१६ आषाढ शुद्ध ११
[८ जुलै १७५९]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
रामाजी अनंत [दाभोळकर] गोसावी यांसि.

सेवक 　　 रघुनाथ बाजीराव नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष. तुम्हीं विनतीपत्र पाठविले प्रविष्ट जाहाले. लिहिले वृत्त सविस्तर अवगत जालें. याजउपरी जाले वर्तमान वरचेवरी लिहित जाणें. येथील वर्तमान तीर्थरूपाचे पत्रावरून कळेल. जाणिजे छ * २२ जिल्काद. सुा सितेन मया व अल्फ. बहुत काये लिहिणे.




पो छ २५ मोहरम.
[१८ सितंबर १७५९]

---

लेखांक [११२]　　　　श्री　　　* संवत १८१६ आषाढ वद्य ११
[२० जुलै १७५९]

नमस्कार. सुा चिरंजीव दादाजवळ मल्हारबा नीट[६६] न वर्तले. नजीबखानाचे कामास गैरपेचपाच बहुत केले. हा सर्वत्र लौकिक जाहाला यास्तव संशय उत्पन्न

---

(६६) हे पत्र महत्त्वाचे आहे मल्हारजी होळकरासंबंधी पेशव्याचे मन किती विटलें होते हे स्पष्टच आहे. शिंदेहोळकरांचा समेट यापूर्वीच परस्परे झाला होता अशा प्रसंगी पेशव्याशी वितुष्ट यावावे हे नवल होय. पेशव्याची समदृष्टी नव्हती असा आक्षेप होळकराचा होता तो या पत्रास मान्य आहे कर्जाची फाळणीदेखील याच दृष्टीने झाली 'शेवटी निखालस सर्व प्रकारे जाले' तरी होळकराच्या मनातून अढी गेली नाही मालकीच्या तहापासून जो किंतु पडला तो १७६३ च्या साली दहा लक्षाची जागीर घेतल्याशिवाय गेला नाही. [चंद्रचूड १ ले ५४] असतु स्वारस्य होऊन होळकर चादवडाहून उत्तरेस निघाले ते जयपुरास कधी पावले हे पहाणे अवश्य आहे याविषयी प्रकाश पाडणारी पत्र दुर्दैवाने अद्याप उपलब्ध होत नाहीत कार्तिकापूर्वी इंदुरीहून महत्पुरास होळकर पावल्याचा केवळ उल्लेख सापडतो. [चंद्रचूड १ ले ४९, १३७] या पत्रामुळें भाग २ ले ६१चा काल चुकीचा ठरतो. सदर पत्राची तारीख २५ जून १७४८ अशी आता धरावी लागेल

लाहोरच्या स्वारीनतर पेशवेहोळकराच्या भेटीचा जो प्रकार कैफियतीत वर्णिला आहे तो आजवर 'चमत्कारिक' वाटत होता पण आतां त्याची खरीच निश्चाती होते. सुखठणकराविषयी होळकराचे मन मलीन होतेच त्यात तो पेशव्याचा दिवाण झाला मालकीच्या वाट्यात त्यानें मेख मारली तेव्हा 'रामचंद्रबाबा दरबारी नसावें' ऐसा किंत जो पडला तो काही निघाला नाही' [पेद २१ ले ४९]

होताच चांदवडाहून पुढे न येता तेथे जाहिराना माधवसिंगाचे निमित्य ठेउन फौज ठेउ लागले × × × कारभारी येथे पाठविले. दरबारचा रागरंग पाहावा वचनप्राण घेउन या [या] प्रकारे केले. गंगोबानी सखारामपंतानी समजाउन सांगितल्यावर येथे आले. तीनचार हजार फौज समागमें. भेट वसवसानेच घेतली. प्रथम येकदोनदा दरबारात येता सेदोनसे खाशानसी यावे ऐसे करीत होते. मग चिरंजीव भाउनी त्याचे डेरियास जाउन बहुत प्रकारे फजीत केले. मग साधेपणे पूर्ववत येउजाउ लागले. ईतक्याचखाली येक महिना गेला. मग निवल्यावर आम्ही कर्जपटीचा मजकूर केला तेव्हां बहुतच उड्या मारून मतलब घातला की सुल्तानपुर दरोबस्त घ्यावे. गुा हतबास सिंदखेड दिल्हे. आम्हासही सुलतानपूर घावें. ऐसी रदबदल पडल्यावर आम्हीं म्हटले की कर्ज सारे तुम्हीं फेडावे म्हणजे परगणा देउ. ऐसी रदबदल बहुत प्रकारची गरमनरम महिना भर होउन सेवटी मुकासा खेरीज करून मोगलाई बाबती मिलोन सुलतानपुर सरजाम दिल्हा. गुा सिंदखेड[६७] घेतले यास्तव हे यास देणे पडले. प्रथम चालीस लाख कर्जपटी दूतबा व ते मिलोन करार केली होती. हा परगणा आम्हीं देत नव्हतो परंतु गुा तुम्हास दिल्हा आणि त्यास न दिला म्हणजे ठीक दिसत नाहीं. कष्टी होउन जातात वीस लाख कबूल केले तरी सुधे देणार नाहींत व आपले तर्फेने थोर सरदार आहेत त्याजवर कृपा त्यात करावयास अंतर न करावे हे उचित जाणून सुल्तानपुर मुकासा

---

त्यात कर्जपटीचें मूळ माजले त्यामुळे पारा विशेषच वाढला. कर्जनिवारणार्थ कोटघावधि द्रव्यप्राप्ती करुन दिली असता असले चाळे होलकरास खपावयाचे कसे एवढ्च सहा वर्षे तिकडे दुर्लक्षच केले. शेवटी उत्तरेकडील स्वारींमुळें दौलतीस कर्ज वाढले अशी कागाळी उठली ती पर्यायें होलकराविरुद्धच होती अर्थात तिचा घटस्फोट करणे अपरिहार्य झाले. तोच हा प्रसग होय 'जडभरताचे' हे जाडेभरडे उत्तर मननीय होय होलकराच्या स्पष्टोक्तीची अनेक उदाहरणे मिळतात. [पेद १२ ले. ४० पेद १३ ले. ५५, ५६] त्याचे हे प्रत्यंतर असून बखरकाराने या गुणाचे वर्णन दिले ते वृथा नव्हे. 'पाउण कोट देणे आहे' ही सख्या साधार आहे [ले १०१] '३० लक्षाची' फाळणी मान्य केली ती खरीच होय शिंद्याची मात्र सदिग्ध वाटते मागें ऐवज दिला होता तो अंक धरला असल्यास न कळे. पण १० लक्ष कर्जाप्रीत्यर्थ निराळेच आले ह्मणून रकम शिंद्यांनी परभारे फेडली असे मानले पाहिजे. [ले १०६, १०८] फेडीची आकांक्षा आणि झडत्याची प्रतीक्षा ही खऱ्या मनोवृत्तीचीं चित्रें होत. [कास ले १४८]

(६७) पहा ले ६ टीप ६ व ले ८४ टीप ४२ सांखरखेडल्याच्या लढाईत निजामाकडून २५ लक्षाचा मुलुख सोडविला त्याप्रीत्यर्थ केवळ सिंदखेड हा महाल शिंद्यास मिळाला तो यशाचा वाटा किंवा योग्य पारितोषक होतें असे कधी ह्मणतां येणार नाही 'तुम्ही सिंदखेड घेतले यास्तव हे यास देणे पडले' यावरून ही देणगीदेखील पेशव्याच्या जिवावर आली होती असे स्पष्ट आहे.

खेरीज करून दिल्हे. गवत जाजनी दाहा लाख येकूण तीस लाख त्यानीं घावे ऐसे करार केल्या केले. तुम्हाकडे वीस साकडे तीस करार केले याजमुळे बहुत रदवदल पडली सेवटी कबूल करून पंचगर्चा लिगा तुर्तच केली. उर्ल पंचग ते पंधरा महिन्याअलीकडे घावे ऐसे ठहरले. सरकारचे काम कर्जाचे मोठे ते त्यानीं कबूल केले. त्याचा अर्ज मुल्तानपुरचा कबूल केला. सेवटी निरवालस सर्व प्रकारे होउन तुळजापुरास जाउन मात्रत चाढवडास दाखल जाहले. सत्वरच इंदुरास जातील. यदा फौज वीस हजार टेविली आहे. याउपरी रजपुतान्यात तुम्ही गुतावेसे नाहीं. बाजत बरसात प्रयाग साधणे हर तजवीजेने व पुढे बंगाल्याकडील काम मातबर करणे. ही कामें आहेत. त्याचे नरतूदेत आहेतच. लिहिणे लागत नाहीं. दाहा लाख कर्जामाठी पाठविले ते पावले बाकी दहा सत्वर पाठवितील हा भरवसा आहेच. हा सविस्तर अर्थ दूतवास येकांती सांगणे. चिरंजीव दादा सत्वरच प्रयागचे सुमारे बुंदेलखंडातून येणार आहे. कदाचित निजामअलीसी विघाड जाला तर मात्र मातबरच गुता पडेल. तो बु[गु]ता न पडला तरी सत्वरी येतील. यदा दूतवानी हिंदुस्थानात सलावत उत्तम राखली सर्वही यश ईश्वर त्याची निष्ठा उतम त्यास देत आहे. छ॰ २४ जिल्काद. बहुत काय लिहिणे.

लेखन सीमा

पो छ २५ मोहरम. सन सितेन.
[१८ सितंबर १७५९]

---

लेखांक [११३] श्री * संवत १८१६ माघ शुद्ध २
१८०] [२० जनवरी १७६०]

चिरंजीव राजमान्य राजश्री भाउ यांप्रति बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जावे विशेष. रा बापुजी बल्लाळ दफ्तरदार यांचे गुजारतीने काही काम होते त्यांचे कांहीं कागदपत्र शहरीहून आणावयाचे होते ते आणिले. त्यातील दोनतीन आसाम्या सुगमनेरी होत्या त्यास आणावयाबदल हुजूरून बुधा चोपदार व दाहा राउत नागोराम[६८] [भागवत] याचे देउन जेजोरीच्या मुकामीहून रवाना केला होता. त्यास चोपदार मजकूर आपणाकडे आला आहे म्हणोन आइकिले. अगास ते

(६८) याचे उपनाम भागवत असे असून तो पेशव्याचा वतीने निजामाकडे वकिलीवर होता [पेद २५ ले १०, २९४]

कोण्ही घेउन आपणाकडे गेला काय मजकूर तो लेहून पाठवणे. तेथे कोणी आले असले तर त्याची चौकसी करून त्याचा काय प्रकार तो लेहून पाठवावे. ॥ रा * २ जमादिलाखर. सुहुरसन सितेन मयां व अलफ. ॥ हे आसिर्वाद.

पो छ ९ जमादिलाखर सोमवार.
[२८ जनवरी १७६०]

---

लेखांक [११४] श्री * संवत १८१६ फाल्गुन शुद्ध ६
१८२] [२२ फरवरी १७६०]

चिरंजीव राजश्री भाउ यासि बाळाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. उदेरीचे काम राजश्री रामाजी माहादेव [विवलकर] व नारो त्रिंबक यांनी जेवतेव करून केलें उदेरीच्या कार्यामुळे दोघात कुरूशता लटकीच वाढली. पाहाल्या अर्थे त्यात कांहीच जीव नाहीं. प्रस्तुत काश्यास गेलें ते कार्य येकरूपतेने करावे तो अर्थ होत नाहीं. कोणी मातबर पाठउन उभेयतासच ठीक हमवार करून कार्यावर पडत ते करावें. असा कोणी योजला नाही. उभयता पुण्यांत असतां पेच वाढला होता तो रा रामाजी विस्वनाथ बरवे याचे मध्यस्तीने बोलोन चालोन दोघेही निखालस होउन येकरुपतेने कार्य करून दाखउन म्हणोन दोघानी करार करून पायावर हात ठेउन गेलें. असे असतां फिरोन कुरूशता वाढविली यास्तव मध्यस्त रामाजी बरवे यांसच राजपुरीस उभयताकडे पाठविले आंहेत. उभयतासही बरे रीतीने कडकाउन हमवार करावे. काशाचे कार्य येकमते खामखा करावेच करावें या विचारें पाठविलेत आहेत. पहावे काये करून येतात. ॥ छ * ४ रजब. हे आसिर्वाद.

पो छ १२ रजब. माघ. सितेन
[१ मार्च १७६०]

---

लेखांक [११५] श्री * संवत १८१६ फाल्गुन वद्य २
[३ मार्च १७६३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
शंकराजी केशव गोसावी यांसि.

सेवक माधवराव बल्लाल प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लिहीत जाणे विशेष. रा नारो केशव व गणेश विश्वनाथ भट याणी हुजूर

विदित केले की मोजे सिरगाव कथरियात नेवरें येथील खातीचे वतन पुरातन आपले असतां रामाजी व [बा]जी करमरकर याणें तिगस्ता सरकारात गैरवाका समजाउन खाती अमानत करविली. त्यास साल गुदस्ता सन इसनेंत राजश्री नारो त्रिंबक देशमुख याणी मनास आणून मोकेली केली. आणि आपणाकडे दोनचार महिनें चालिली. हाली करमरकरानी वगैरे याणी वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामशास्त्री याचे पत्र आणून खलेल केली आहे. तरी येविसीची ताकीद जाहाली पाहिजे म्हणोन त्यावरून पत्र सादर केले असे. तरी मोजे मजकूरची खाती नारो त्रिंबक याणी मशाकडेस चालती केली त्याप्रो चालवणें. हरदुजणान्ने वर्तमान मनास आणून निल्हेस लावणे. जाणिजे. छ * १७ साबन." सुमा सन्नास सितेन मया व अलफ. |" बहुत काय लिहिणे.

---

लेखांक [११६] श्री * संवत १८२३ ज्येष्ठ शुद्ध ६

[१३ जून १७६६]

[नकल]

गंगाजलनिर्मल भागिर्थीबाई [६९] सिंदे यासि

स्नो रघुनाथ बाजीराव [भट] असिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. सकुबाई सिंदे यांस संसारखर्चास गांव नेमून देउन पेशजी तुम्हास पत्र सादर केले असतां तुम्ही यांचे गावास खलेल करिता. वसूल घेता म्हणून हुजूर विदित जाहाले. येसियास त्याजकडे सरंजाम देउन तुम्हास पत्र लिहिले असता तुम्ही खलेल करून वसूल घ्यावयास दरकार काय. हाली हे पत्र सादर केले असे तरी तुम्ही यांचे गांवचा वसूल येकंदर न घेणे. येविसी फिरोन बोभाट येउ न देणे. यांचे अमलास खलेल न करणे. रवा[ना] छ * ५ मोहरम. सुमा सबा सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे असिर्वाद.

---

(६९) ही दत्ताजी शिंदे याची पत्नी होय अबदालीची युद्ध होऊन दत्ताजी बडाउच्या घाटावर पडले तेव्हा भागिर्थीबाई गरोदर होती वाटेत कष्ट होऊन सवलगडच्या मुकामी 'फाल्गुन वद्य ३ रविवारी' म्हणजे ३ फरवरी १७६० रोजी पुत्र झाला. [खंड १ ले १६२] त्याचे नाव कळत नाही. तो जनकोजी शिवापूर्वीच वारला असावा जिवत राहता तर गादीचा तोच वारस होता अस्तु. बाई १७८४पर्यंत जिवत असल्याचे समजते [साइस १ ले. ७७, ८६]

लेखांक [११७] श्री * संवत १८२५ आश्विन शुद्ध १

[११ अक्टबर १७६८]

राजमान्य राजश्री बाळाजी मल्हार हवलदार व कारकून तो। नागोठणे यासी सदाशिव चिमणाजी सचीव नमस्कार. सुां तिसा सितेन मयां व अलफ. साल मजकुरी तो। मचकूरीपो। तुम्हापासून घेतली रसद रुये

३,८३२ फाजिल साल गुा व सन सत्रा सितैन दुसाला व्याज सुा.

६,५५५ विा राजश्री आपाजीराव दामोळकर मिति जेष्ट सुध प्रतिपदेस घेतले.

६,१६९ मुदल रुपये

३८५ व्याज ईा मिती मार सा आस्वीन सुध प्रतिपदा.

६,५५५

१५५ किता विा राजश्री महादजी शंकर

१०,५४२॥।≡॥

येकुण दहा हजार पाचसे साडे बेताळीस रुपये साडे तीन आणे पोता जमा विा राजश्री आत्माराम रघुनाथ पावले असे. सदरहु रुये व याचे व्याज दरमाहा दरसदे रुा १ सवेत्राप्रा। व्याज बोली मुदल ता। मजकूरचे ऐवजी उगउन घेणे. शके १६९० सर्वधारीनाम संवंत्सरे आश्विन सुध प्रतिपदा.




लेखांक [११८] श्री * संवत १८२७ कार्तिक वद्य ९

[११ नवबर १७७०]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

रघुनाथ हरी [नेवाळकर] [७०] गोसावी यासी

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष. जोत्याजी [७१] सिंदे पेशजी सरकार कामास अले सबब

(७०) याचे उपनाम नेवाळकर असे आहे सुप्रसिद्ध झाशीवाली लक्ष्मीबाई ही याच घराण्यातील शेवटची व्यक्ति होय

(७१) हे राणोजी सिंद्याचे द्वितीय पुत्र असून ते बरवासागर येथे कामास आले. तेथें त्यांची छत्री असून तत्प्रीत्यर्थ ही नेमणूक होय त्याची पत्नी सगुनाबाई १७८४ सांत मृत्यु पावली. [साडसं १ ले. ७७]

कसबे सागर ता। झासी हा गांव ईनाम अहे तेथील ऐवजी इनलाख दाहा हजार रुपये नेमणूक पेशजीपासून सिंधाकडे अहे. प्रो। तालुके मजकूरचे वेहेड्यात नेमिले अहेत. त्यास जोत्याजी सिंदे यांची स्त्री सगुणाबाई यास रुपये १०,००० दाह हजार खर्च देविले असेत. तरी सदरहू ऐवज वेहेड्यात नेमणूक अहे त्याप्रो। पावते करून कबज घेत जाणे. जाणिजे छ * २२ रजब. सुमा ईहिदे सबेन मया व आलफ. बहुत काय लिहो.

---

लेखांक [११९] श्री * संवत १८३४ मार्गशीर्ष शुद्ध १४
[१३ दिसंबर १७७७]

राजश्री माहादजी सिंदे गोसावी यासी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेो। माधवराव नारायण प्रधान असिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. देसी तुम्हास मुलेमाणसे ठेवावयास जागा नाहीं हे जणुन असेर[७२] किल्ला नामी परंतु तुमचे बंदलखातर साल मजकुरी तुमचे निसबतीस दिल्हा असे. तरी जंगी सामान किल्याचे उपयोगी असेल ते ठेवावे. जाजती सामान तोफा वगैरे असेल ते सरकारात प्रयोजन लागल्यास आणविले जाईल. येविसी दिकत करू नये. किलेयाचे सरंजामास वगैरे असेर परगना नेमून देविला असे. सनदप्रो। अंमल करावा. जाणिजे छ * १२ जिल्काद. सुफमा समान सबेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे ? हे असिर्वाद.

---

लेखांक [१२०] श्री * संवत १८३४ मार्गशिर्ष शुद्ध १४
[१३ दिसंबर १७७७]




मा। अनाम देशमुख व देशपांडे
पा। असेर सरकार मजकूर प्रांत खांनदेश यासी

माधवराव नारायण प्रधान सुहूरसन समान सबेन मया व अलफ. पो मजकूर जागीर बाबती व सरदेशमुखी खेरीज मुकासा करून साल मजकुरी राजश्री माहादजी

(७२) करवीरच्या कामगिरीप्रीत्यर्थ हा किल्ला या वेळी मिळाला पण तो शिंद्याच्या स्वाधीन होण्यास पाच वर्षे लागली हा किल्ला शिंद्याकडे जाऊ नये असा नाना फडणिसाचा अंतस्थ हेतु होता ह्मणूनच इतका अवधी लागला नाना आणि महादजी यांत परस्परे ज्या अनेक अढी होत्या त्यांपैकी ही एक होय महादजी शिंद्यानंतरही हा किल्ला परत घेण्याचा घाट नानाने घातला तो त्यास साधला नाही. तो वृत्तांत पुढे यालेत पहावयास मिळेल

सिंदे याजकडे किले मारचे व फौजचे सरंजामास नेमून दिल्हा असे. तरी मशारनिलेसी रुजु होउन जागीर व बाबती सरदेशमुखीचा अंमल सुरळीत देणे. जाणिजे छ * १२ जिल्काद. अज्ञा प्रमाण.

लेखन सिमा

बार

---

लेखांक [१२१] श्री

[१७७८]
[नकल]

साहेबखान वल्द शाबाजखान टोंके
खुशवख्त बाशंद

तह्यर व जलादत दस्तगांहा

सुमा तिसा सबेन मया व अलंफ. मीरखान वल्द हमीदखान टोंके याजकडे सरदारी व जाती व फौजेचे बेगमीस सरंजास चालत होता तो त्याजकडून दूर करुन साल मजकुरी तुम्हाकडे सरदारी सांगून जातीस व फौजेचे बेगमीस सरंजाम करार करुन दिल्हा आहे. त्यास साल गिरस्तां सन सबा सबेनात हमीदखान मृत्य पावले सबब मीरखानाचे नावे सरदारी करार केली. तेव्हां पाउण लक्ष रुये नजर द्यावयाचा करार करुन रामकृष्णराव गोविंद याजपासून मोर [रुये] वो रा वासुदेवभट खरे याचे गुजारतीने सरकारात घेतले. तो ऐवज व दरबारखर्चाबाबत ऐवज याजसुधा मशारनिलेस पावला पाहिजे. याजकरिता सदरहु ऐवज फिटे तोपर्यंत पो डोंगरी वगैरे गांव याजकडे कमाविसीने आहेत त्याप्रमाणे त्याजकडे राखणे. तुमचे अडमष्ट स्वार हुजूर चाकरीस असतांत त्याचा खर्च वगैरे नेमणुकी ऐवज कार्याकारण घेउन बाकी ऐवज महालचा वसूल येईल तो हिसरसीद सावकारास द्यावा. नजरेबा वगैरे रदकर्जात मारनिलेकडे देत जाणे. ऐवज फिटे तोपावेतो घालमेल करु नये. करणे जाहाली तरी मारनिलेकडे वसूल पडिला असेल तो वजा करुन बाकी ऐवजाची व्याजसुधा सावकारी निशा करुन देउन मग घालमेल करावी. सदरहु पाउण लक्ष रुये नजरेच्या भरण्यातील देणे तरी सावकार आलाहिदा असतील त्याचा बोभाट वासुदेवभट खरे याणी हुजूर येउ देउ नये. त्यांची सावकारी निशा करावी. याप्रमाणे करार करुन हे सनद सादर केली असे तरी सदरहु लिहिल्याप्रो वर्तणूक करीत जाणे.

---

लेखांक [१२२] श्री * संवत १८४० पौष वद्य ९

[१६ जनवरी १७८४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

आपाजीराम [दाभोळकर] गोसावी यासि.

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुा अर्बा समानीन मया व अलफ. तुम्हाकरिता मकरसंक्रमणाचे तीळ सक्करायुक्त पाठविले असेत. घेणे. ॥ जाणिजे छ * २२ सफर. ॥आज्ञाप्रमाणे. (लेखन सिमा)

पो॥ छ २० माहे रबिलोवल

माघ वद्य ७ भृगुवार. त्रितीय प्रहर

[१२ फरवरी १७८४]

---

लेखांक [१२३] श्री * संवत १८४० माघ वद्य ५

[११ फरवरी १७८४]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

आपाजीराम [दाभोळकर] गोसावी यासि.

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुा आर्बा समानीन मया व अलफ. श्री कासिक्षेत्र येथील ब्राह्मणास वर्षासनाचा ऐवज वाटावयास सरकारातून रा राघो अनंत कारकून पाठविले आहेत. तरी तुम्हीं राजश्री माहादजी सिंदे यास मागोन मशारनिलेसमागमे स्वार व प्यादे देवउन काल्पी पोहचाउन द्यणे व तेथून पुढे प्रयागास जायाची सोई चांगली करुन देवणे व इंग्रजाकडील वकील इंद्रसेन [Anderson] तेथे आहे त्यांची पत्रे प्रयाग व कासी व गया येथील कारभारी यास देवउन मार्गी जातायेतां चौक्याचा हासिल वगैरे येकंदर न घेणे व प्रयागवळ व गंगापुत्र गयावळ यास ताकीद करुन कोणेविसीं उपद्रव न होतां ऐवजाची वाटणी व यात्रा करुन देसी येतील तेव्हा बरोबर प्यादे देउन आपली हद्द पार करुन देणे याप्रो पत्रे लागतील ती देवउन याचा बदोबस्त यथास्थित करुन देवणे ॥जाणिजे. छ ९ १९ रबिलावल. ॥आज्ञा प्रमाण. (लेखन सिमा)

पो॥ छ २९ जमादिलावल.

वैशाख शुध १ भामवार.

[२० अप्रेल १७८४]

लेखांक [१२४] श्री * संवत १८४७ आश्विन वद्य ८

[३१ अक्टुबर १७९०]




राजश्री आपाजीराव [दामोळकर] गोसावी यासी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री अलीबहादुर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. इकडे आल्यावर तुम्हांकडील वृत्त काही कळत नाही. त्यास वरचेवर आपले संतोषाचे वर्तमान लिहित असावे. ग्वाल्हेरीस आम्ही गोळे खरदी केले त्याचे पदरी पैका घाळून आज महिना दीड महिना जाहला त्यास हाली ते गोळे येत होते ते तेथील अमलदारानी अटकाविले व गला रस्त भरून वणजारे आम्हाकडे येतात त्यांस माहालकरी हासिल मागतात की त्या लस्करात[न] जाल तर हासिल देउन जाणे व मथुरेचे कादाराने सरकारचा कासिद रस्त घेउन येत असता त्याजला मार देउन हाकून दिल्हा व रस्तही अटकाउन ठेविली आहे त्यास ऐसे पर्याये आपल्याआपल्यात नसावे याकरिता लिहिले आहे. बंदोबस्त जाहाल्या करावा व पत्राचे उत्तर पाठवावे. रा छ* २२ सफर. बहुत काय लिहिणे. हे विनंती.




पो॥ छ २७ सफर. सन इहदे तिसेन.

कार्तिक. मु॥ नजीक होळल.

[५ नवबर १७९०]

---

लेखांक [१२५] श्री * संवत १८५० ज्येष्ट शुद्ध ७

[१५ जून १७९३]

राजश्री तुकोजी होळकर गोसावी यांसि.

सकलगुणलंकरण अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्यं श्री माधवराव नारायेण प्रधान आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष.

मोजे नवगाव पो अंबड येथील दरोबस्त अमल आपाजीराव दामोळकर याजकडे इनाम चालत आहे त्यास ते मृत पावले सा त्यांचे [दत्त]पुत्र राजश्री रामराव आपाजी यांजकडे मोजे मजकूरचा सदरहु अमल ,नाम पेसजीप्रो करार करून दिल्हा असे. तरी तुम्हीं प्रो मजकूरचे जमिदारांस व मोजे मजकुरास तागीद करून सदरहू अमल मा।रनिलेकडे सुदामतप्रों सुरलीत चालवण. जाणिजे. छ* ५ जिल्काद. सुा आर्बा तिसेन मया व अलफ.

---

लेखांक [१२६] श्री *संवत १८५९ भाद्रपद शुद्ध १३
[१० सितबर १८०२]




अखंडितलक्ष्मीआलकृत राजमान्य राजश्री गोपाळराव रघुनाथ[७३] गोसावी यासि

सेवक बाजीराव र नाथ [भट] नमस्कार. सुमा सलास मयातेन व अलफ. तुम्हास सरकारातून फै ज नवीन ठेवा[वयास सागित]ले त्याच्या खर्चास करणेल जोरस

---

(७३) उपनाम चिटणीस ही सनद पेशव्याच्या नावाने असली तरी ती 'वकीलमुतलकीच्या दप्तरातील' होय ते दप्तर १७८४त निर्माण होऊन १८०३पावेतो शिंद्याच्या स्वाधीन होते त्याची फडणिशी अनेकाकडे राहिली रामचद्र वासदेव हा याच दप्तरचा फडणीस होता [दिमरा १ ले १९६] महादजी शिंद्यास देवाज्ञा होताच ती शिंद्याचा अकित बनून बाळाजी जनार्दन भानूने आपल्याकडे करून घेतली [ऐटि ६ क्र १] 'वकीलमुतलकीचे फडणिसीची वस्त्रे आम्ही घ्यावी अशी श्रीमताची मर्जी व दौलतरावाचे ह्मणणे पडले त्यावरून घेतली' असे भानूने फडक्यास दर्शविले होते ते खरे नव्हे हे पुढें समजेलच अस्तु हे काम नाना स्वत करीत नसे दामोलकराचा हस्तक जनार्दन लक्ष्मण वैद्य हा भानूच्या वतीने काम चालवीत होता ते त्याजकडे थोडेच दिवस टिकले कारण विरोधाचे ते मूळच

बाहादर याजकडील जाईदादपैकी माहाल दूर करून तुम्हाकडे लाउन दिल्हे येणेप्रो॥ माहाल

९ सूमे आगरेपैकी माहाल

| | |
|---|---|
| १ पो कऱ्हारा | १ पो किरावली |
| १ पो सरहदी | १ पो फतेपुरसीकरी |
| १ पो जगनेर | १ पो ईरादतनगर |
| १ पो खेरागड | १ पो समसाबाद |
| १ पो मलपुरा | |
| ५ | ४ |

माहाल ९

१२ सूमे साहारणपुरपैकी माहाल

| | |
|---|---|
| १ पो गंगो | १ पो समालका जोप्यासीसुधा |
| १ पो ताडागंगेरु | १ पो सिकारपुरखुंडी |
| १ पो पुरछपार | १ पो खातोली |
| १ पो लखनोती तासुधा | १ पो काधला |
| १ पो गंनोर | १ पो सोनपत |
| १ पो चौ[सव]खेडी | १ पो गुहाणा |
| ६ | ६ |

माहाल १२

येकुण येणेप्रो गेकविस माहाल सरकार आमली साल मजकुरापासोन तुमच्या निसबतीस सरकारातून करार करून दिल्हे असेंत. तरी सदरहु माहाली कुलबाब कुलकानुसुधा

होतें या वैद्य घराण्याचा शोध लागून काही कागदपत्रही सापडले पण ते याविषयी नव्हत. त्याचा समावेश दाभोलकरसंग्रहांत केला असून ते तेथें पहावयास मिळतील. फारसी व मराठी भाषेंत अशा सनदांचे लिखाण सापडते. तोच प्रकार या सनदेचाही आहे. येथें निवळ शेवटचा उतारा मराठीचाच दिला आहे. सिक्का फारसीचाच आहे. अंतर्वेदीत प्रवेश होऊन मराठ्यांचे प्रस्तान बसल्यावेळी सनदापत्रें मराठीतच होत असत. पुढें ह्या प्रघात मात्र नवीन पडून सिक्के दोन भाषेंत वनू लागले शिंदेशाहीत कांही सरदाराचे सिक्के दोन भाषेंत आढळतात त्याचें कारण हे होय.

सरकार आमलाची दरोबस्त वहिवाट करून माहालचा ऐवज फौजेचे खर्चाबदल तुम्ही घेत जाणें. माहाली गावगंनावार लावणीसंचणी उत्तम प्रकारें करुन उस्तवारी करीत जाणें. माहाल आबाद राहात ते करणें. सदरहु माहालची वहिवाट कमाविसीची सरकारात समजाउन देणे. पुढें माहालचा मस्ला ठराउन दिल्हा जाईल. ॥ जाणिजे. छ * १२ माहे जावल. ॥ आज्ञा प्रमाण.




तेहरीर फितारीख दवाज दहम जगादिलअवल सन ४५ जलुसे वाला. [फारसी] बेश.

—— — ☙ ————



# रामचंद्र मल्हार सुखठणकर

## याचा असल पत्रव्यवहार.

## १७९९–१८०७ विक्रमी.

लेखांक [१२७] ॥श्री * संवत १७९९ फाल्गुन वद्य १

[२८ फरवरी १७४३]

राजश्री बाळोबा [गुळगुळे] स्वामी गोसावी यांसि.

पोष्य रामचंद्र मल्हार[७४] [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. राजश्री मल्हारबा [होळकर]कडील कमाविसदार पैका मागतात म्हणोन लिहिले. तरी नव हजार त्याचे

---

(७४) हे सबंध पत्र सुखठणकराच्या हातचे असून अक्षर फार सुरेख आहे. प्रसिद्ध रामचंद्र बाबा शेणवी हाच तो सारस्वत गौड ब्राह्मण असून कोकणातील अरवली गावचा रहिवासी होता. [सामा १९३] तेथील कुलकर्ण त्याजकडे होते. शिंद्यांशी त्याचा संबंध प्रथम कसा व केव्हा आला याविषयी मतभेद आहे. शिंदेशाही उभी करण्यास तोच कारण झाला असाही ग्रह प्रचलित आहे. [जीकेच २५] याविषयी चिकित्सा करीत असता पेशवेदप्तर प्रकाशित झाले. त्याचे मनन करितां जो बोध झाला त्याचा निष्कर्ष देणे इष्ट आहे. 'रामचंद्र करोल' असे एक नाव १७१८च्या दिल्लीच्या स्वारीत येते. [पेद ३० ले ३०८] ते या सुखठणकराचे मानले तर तो या सुमारास पेशव्याच्या पदरी पागेंत होता असे दिसते याच वर्षी कानोजी भोसले याजकडील 'दफ्तरदारीवर' गेल्याचा स्पष्टच उल्लेख आहे. [पेद ३० ले. ३४१] भोसल्याशी त्याचे पटले नसावें ह्मणून तो पुन्हा पेशव्याकडे आला असावा. या वेळी त्याचे नाव पेशव्याच्या पथक्यात आढळते [९ अप्रेल १७२३] यानंतर प्रांत जुन्नर येथील 'मुजुमदारी' त्यास मिळाली. [७ अगस्ट १७२५] पुढे १० अक्टूबर १७२६ रोजी प्रांत माळवा येथील सरदेशमुखीची मुजुमदारी प्राप्त झाली आणि २७सितंबर१७२७च्या सुमारास 'दिा शिंदे' असा दाखला सापडतो [पेद ३० ले ३१०, ३१२, ३१३] अर्थात सुखठणकराचा सुगावा १७१८च्या सुमारास लागतो. यापूर्वींच राणोजी शिंदे पेशव्याच्या 'तावीन' होते. अर्थात सुखठणकराचा परिचय असणे साहजिक होतें. प्रत्यक्ष निकट

तुम्हाकडे निघतात सदरहु नव हजार [स्वांस] देणे.[७१] बहुत काय लिहिणे मिती फाल्गुण * वद्य प्रतिपदा हे विनंती.

पैवस्ता छ २७ माहे सफर.
चैत्र वद्य चतुर्दसी.
बदस्त माणसे दिा रा कृष्णाजींपत
[१२ अप्रेल १७४३]

---

संबध आला माळव्यातील सरदेशमुखीच्या मुजूमदारीवर आल्यानंतर. हीच संधी शिंदे व सुखठणकर यांच्या सांगडीची होय. ते वर्ष १७२६ हे होय यापूर्वीच 'राज्याभिषेक शके ५२ अधिक आषाढ शुद्ध १ बुधवासरी' जी सनद शाहु छत्रपतीची प्रधान व प्रतिनिधी यांच्या शिक्यानिशी सिसोदे पिंपळगावकर यांच्या नावे झाली आहे ती मननीय होय. 'उत्तरदेशाधिकारी मालवदेश येथील [मुख्य] प्रधान शिंदे व होळकर' असा जो निर्देश आहे त्यावरून शिंदेशाही उभी करण्याचे श्रेय सुखठणकरास पोचत नाही [पेद ३० ले ३८] किंबहुना शिंद्याच्या उत्कर्षास कारणीभूत होण्यासाठी हुजरेगिरीची कथा व तदनुषंगिक वर्णन केवळ कल्पनामय ठरते. होळकराच्या संकेतावरून शिंद्यास 'जरीपटका मुतालकी व शिकेकटार' मिळाली असेही मुळीच संभवत नाही. होलकर 'बहुत दिवस कदम बांडयाकडे होते त्यांच्याशी बिघाड पडला.' त्या वेळचे पत्र स्वयम मल्हारजी होळकराचे आहे [पेद १७ ले १] 'कदमाकडील होलकर वगैरे लोक न ठेवावे' अशाविषयी दाभाडयाचे दुसरे पत्र आहे [पेद १२ ले १५] ही दोन्ही पत्रे एकाच वर्षातील असता त्यांच्या तारखा मात्र संपादकाने भिन्न दिल्या आहेत. त्या पत्रांचा काल अनुमाने असा निघू शकेल की, नारो शंकर होळकराच्या पदरी १७२६सात गेल्याचे दर्शवितो [पेद २१ ले. १ पेद २३ ले ५] तेव्हा होळकराचा संबध पेशव्याशी त्यापूर्वी असला पाहिजे आणि वस्तुत तो तसा होताच [पेद ३० ले ३८] किंबहुना कालानुक्रम पहाता होळकराचा संदिग्ध पण पहिला उल्लेख १७१६त येतो 'फलटण जाउन होलकर घेउन येणे' याचा संदर्भ होळकराशी जोडला तर तो या वेळेपासून धरता येईल [पेद ३० ले. २०७] बांडयाकडून येण्याचा काल हाच की काय असा प्रश्न साहजिक उद्भवतो. त्याचे उत्तर सप्रमाण देता येत नाही. पण एवढी गोष्ट खरी की १७२५ त 'उत्तरदेशाधिकारी प्रधान सिंदे व होलकर' असे म्हणविण्यास काही काल लोटला पाहिजे. याचे समर्थन करणे अनावश्यक होय तथापि एका पत्राची साक्ष देणे इष्ट वाटते. 'कैलासवासी उभयतापासून त्यांची एकनिष्टता अकृत्रिम' हे शब्द नानासाहेब पेशव्याचे असून होळकरांनी आपल्या पत्रात उच्चारिले आहेत. [पुरदरे १ ले. १६०] ते त्यांच्या उदयाचे द्योतक होत. 'कैलासवासी उभयता' म्हणजे बाजीराव व चिमणाजी भट किंवा बाळाजीपत नाना यांचा उमज होत नाही पेद १२ ले. १५चे पत्र बाजीरावाच्या नावे स्पष्ट आहे. अर्थात त्यांच्या वेळी होळकर बांडयाकडून आले असे निष्पन्न होतें. आणि तो काल १७२०च्या सुमाराचा दिसतो. होळकराच्या उदयाचा जो वृत्तांत कैफियतीत दिला आहे तो वरील मानाने सरळ व शुद्ध उतरतो होळकराच्या उदयाचा जो वृत्तांत कैफियतीत दिला आहे तो वरील मानाने सरळ व शुद्ध उतरतो बाळाजी विश्वनाथ भट यांच्या समोरच ते काम करीत असून दिल्लीच्या पहिल्या स्वारीत होते आणि

लेखांक [१२८] श्री

[१७४६]?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुळगुले] गोसावी यांसि.

सेवक •रामचंद्र मल्हार नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करणे. यानंतर राजश्री विठोबा गोसावी [?] हे दूर देशाहून या प्रांते[७६] आले आहेत. त्यास इकडे प्रांतात दोनच्यार ग्रंहस्त याची दर्शने घेउन तुमच्या दर्शनास आले आहेत. तरी तुम्ही याचे स्वहस्ते परहस्ते साहित्य केले पाहिजे. हे आमचेही आप्तविषई आहेत. तरी याचे साहित्य केले पाहिजे. बहुत काय लिहिणे. हे या प्रांते अनभग्न आहेत. प्रांत पाहिला नाही याजकरिता तुम्हास लिहिले आहे. ।" हे विनंती.

---

लेखांक [१२९] श्री * संवत १८०६ अश्विन शुद्ध २

[२ अक्टुबर १७४९]?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुळगुले] स्वामी गोसावी यांजसि.

पो रामचंद्र मल्हार सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। आश्विन * शुद्ध २ मुकाम सातारा जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लाखा रुपयाचा वायेदा भाद्रपद पोर्णिमेचा केला होता. यैसियासी राजश्री माहारावजीच्या शरीरी अस्वस्थता जाहली तन्मुळे विलंब जाहला. हाली समाधान आहे. स्नान केल्यानंतर लाखा रुपयाची निशा करून देतील म्हणोन लिहिले तर उत्तम गोष्ट आसे. सदरहु रुपयाची निशा घेउन यैवज सत्वर सरकारांत पावता करणे. कराराप्रमाणे कोटेकर चालले तर त्यातच त्यांचे बरे आहे. नाही तर सर्वही तुम्ही जाणतच आहां. त्यांस हेच वर्तमान सांगोन यैवज सत्वर पावता करणे. त्यांचा आमचा स्नेह अकृत्रिम आहे. तेथे विस्तार काय लिहिणे हे विनंती.

---

तेथून आल्यानतरच त्याच्या पेशवाईत प्रवेश झाला ही गोष्ट सप्रमाण सिद्ध होते. या दृष्टीने काळ ठरविला तरी शिंद्याच्या उत्कर्षाचें श्रेय होळकराकडे न जाता ते स्वतंत्रपणेच सिद्ध होईल आणि कैफियतकाराचे वर्णन विपर्यासपर ठरेल यात शकाच नाही.

(७५) पहा भाग २ ले. ३१ टीप २५.

लेखांक [१२०] श्रीराम

[१७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुल्गुले] स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. जासुदाबारा पत्र पाठविले [ते] पावोन वर्तमान कळो आले. ऐसेच पत्र पाठउन संतोषवीत जाणे. ।' वरकड वर्तमान[76] मेघशामजीनी लिहिले आहे त्यावरून कळेल. लोभ असो देणे हे विनंती.

---

लेखांक [१२१] श्रीराम

[१७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुल्गुले] स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कळो आले. ।' येथील वर्तमान तुम्हास कळलेच आहे. मेघशामजीनीही लिहिले. मुख्य गोष्ट तुमचा त्यांचा स्नेहच आहे. तुमचे चालवावया[स] कांही [ते] चुकणार नाहीत. यास्तव जैसे होईल तैसे राहणे. विशेष काय लिहिणे हे विनंती.

---

(७६) या पत्रात मितिमास अथवा वर्षही दिले नाही तथापि हे १७४९च्या पूर्वीचे असले पाहिजे. कारण उत्तरेस असता ते लिहिलेले आहे इतके निश्चित असून रामचंद्रबाबा १७४९त जो देशी आला तो पुन्हा कधी उत्तरेस गेलाच नाही

(७७) शिंद्याशी सबंध असता सुखठणकराचे हे शेवटचे पत्र समजले पाहिजे छत्रपती शाहुच्या निधनापर्यंत तो शिंदेशाहीत होता कोणत्या मितीस तो विभक्त झाला हे सांगवत नाही त्याचे होळकराशी विनसायची कारणे अनेक होती पहिले बुंदेलखंड. दुसरे माधवसिंग जयपुरकर [ पेद २७ ले १८, १९] तिसरे दतिया आणि चौथें जाट व सफदरजंग [पुरंदरे १ ले १५७] मात्र शिंद्याशी विरोधाचे कारण अद्याप अज्ञातच आहे 'दुखणेकरी काय कार्याचा आपा आलिया घेउन सेवेसी येतो' या वाक्यावरून १७४७च्या अंती तो शिंद्यास वचकू लागला होता एवढे खास [पेद २१ ले २३] अस्तु. उभयता सोबत्याशी तेढ पडली तेव्हा पेशव्याने त्यास आपल्या पदरी घेतले. त्याच्यासारख्या धुरंधर राजकारणी व्यक्तीची आवश्यकता असल्यामुळें पेशव्यास तो हवा होताच. जागाही दिवाणगिरीची प्राप्त झाली

लेखांक [१३२] श्रीराम * संवत १८०७ ज्येष्ट वद्य २

[१० जून १७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुलगुले] स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम जेष्ट * वद्य द्वितीया मुकाम पुणे जाणून स्वकीय कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन सविस्तर वृत कळले. वृतारकाची पोथी व चित्रे पाठविली म्हणोन लिहिले ते कांही येथे पोहचली नाहीत. तुमच्या जासुदास पुसिले [तरी] त्याणे सांगितले की मागून राजश्री भगवंतराउ येणार ते [बरोबर] घेउन येणार आहेत. ते आलियावर येउन पोहचेल. इकडील वर्तमान तर यथास्थित असे. तिकडील समाचार येणार वार्तिकाबराबर लिहीत जाणे. ।' आम्ही श्रीमंता[७८] पासी यथास्थित असो. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१३३] श्रीराम

[अगस्ट १७५०]

श्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुलगुले] स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कळो आले. ।' आपला विचार काय करावा म्हणून लिहिला तरी दोन महिने पदाचे त्याकडे आहांत. जरी तुमच्या चित्तानरूप चालवितील तरी चाकरी कराल. नाही तर कोण कोणाजवळी राहतो. यात ल्याहावेसे काये आहे. आपले वर्तमान वरचेवरी लिहित जाणे. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

(७८) श्रीमंत ह्मणजे शिंदे की पेशवे हे सागणे कठिण होय. मिती खरी मानल्यास पेशवाच समजतो.

लेखांक [१३४]

श्रीराम * सवत १८०७ श्रावण शुद्ध १३
[४ अगस्ट १७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बालोबा [गुळगुळे] स्वामी गोसावी यासि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम श्रावण * शुद्ध त्रयोदसी मुकाम पुणे जाणून स्वकीय कुशळ लिहित गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वर्तमान कळो आले. ऐसेच सदैव पत्र पाठउन संतोषवीत जाणे. |" बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१३५]

श्रीराम * संवत १८०७ कार्तिक शुद्ध २
[२१ अक्टुबर १७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बालोबा [गुळगुळे] स्वामी गोसावी यांसि.

पो रामचंद्र मल्हार नमस्कार विनंती उतरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले [तें] पावोन सविस्तर वर्तमान कळो आले. |" जैसा प्रसंग पडेल तैसे वर्तावे. तुम्ही रोजगारी आहा. त्याहवसे काये आहे. जेणेकडून त्याची मेहरवानी होय ते करुन घेणे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१३६]

श्री * संवत १८०७ कार्तिक शुद्ध २
[२१ अक्टुबर १७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बालोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार नमस्कार विनती उपर. येथील कुशल कार्तिक * सुध द्वितिया जाणून स्वकीयें कुशल लेखन केले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लिहिले वर्तमान कळले. |" रोजगारात ताळ नाही म्हणोन लिहिले तरी येथे काय आहे.

आम्हां तेथें बरे[७९] आहां. दोहीकडे चुकाल. बहुत खबरदार. मग लिहिले नाही म्हणाल. तेकडा गेणड्याचा ढाल करावयास पाठविला आहे [तो] बहुतच पातळ वोझे हलके अमीरपसंद बहुतच अनवा करुन सत्वर पाठविणे. बहुत काय लिा लोभ असो दीजे कार्तिक सुद २ हे विनंती.

---

लेखांक [१२७] [८०]श्री

[१७५०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बालोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामचंद्र मल्हार [सुखठणकर] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन सविस्तर

---

(७९) सुखठणकर हा गुलगुल्याचा स्वजातीय असून शिंदेशाहीत मुख्य सूत्रधार होता. परस्परे हितसवंध निगडित होते तेव्हा सामोपचारार्थ सहानुभूति दाखविणे गुलगुल्यास प्राप्त झाले. 'आपला विचार काय करावा' अशी पृच्छा केली असता 'त्याचा स्नेहच आहे तुमचे चालवावयास चुकणार नाहीत' असे सुखठणकराने दर्शविले आहे अर्थात तो त्याचा पक्षपाती नसावा. एरवी गुलगुल्याची कृतज्ञता सहानुभूतीपलीकडे दिसून यावयास पाहिजे. अस्तु पेशवाईत आल्यानतर तुलनात्मक दृष्टीने 'येथे काय आहे. आहा तेथें बरे आहा' असे जे उद्गार काढले आहेत ते शिंदास भूषणास्पद होत यांत शंका नाही

(८०) शिंदेशाही ही राणोजी शिंद्याची पुण्याई होय. ती स्थापन करण्याचे श्रेय सुखठणकरास नसले तरी तिला सतेज, सबळ व चिरस्थाई केल्याचे यश मात्र लाभते. ते नम्यानेच दिले पाहिजे असे नाही पूर्वजानीच देऊन ठेविले आहे. शिंदेशाही पत्रव्यवहारात ज्या अनेक व्यक्तींचा उल्लेख प्रामुख्यानें येतो त्यात 'रामचंद्रबाबा बाळाराव गोविंद गलगलेकर व लालाजी बलाल गुलगुले' या तिघासबंधी उद्गार मोठ्या भक्तीचे व आदराचे आहेत सुखठणकर हा असामान्य पुरुष होता राजकारण खेळून ते यशस्वी करणे हा त्याचा अप्रतीम गुण होता आणि त्याच बळावर अल्प काळात तो पुढें आला. आणि अवाजीपंत पुरंदऱ्यासारखे मागे सरले १७३०पासून १७४९पर्यंत उत्तरेकडील राजकारणी सूत्रें तो खेळवीत होता 'वडिल.चा मनसवा सर्व तुम्हावर आहे. तुम्ही जो करणे तो दूरदेशी पाहून केला पाहिजे. यामधे तुम्ही सर्व माहीत आहा त्याहूनेसे काय आहे. सारांष सकलही अवावसाल राणोजी सिंदे व रामचंद्र सेणवई याच्याच मारफतीने आहे सारांष याचा समयानसार सकलही हतरहित जाले. मुख्य पातशाहा आरजूमद जाहला'. [पेद १४ ले. ४९, ५०] 'हजरत जिलसुभानी सर्व लहानथोर यास देखता बोलिले की मी आपल्यास रामचंद्रपंतास सोपिले आहे बरे करोत अथवा वाईट करोत. हा येखतियार त्याचा आहे त्यावरुन निजाम बोलिले जे हजरतनी आपल्यास ज्याचे हवाला केले त्याचे हकांत आम्ही

अर्थ कळो आला. येसैच सदैव पत्र पाठउन संतोषवीत जाणे.[1] बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

अरकानाही त्यामी किवलेकावे जाणावे मग वजीर व अमिरुलउमराव याणीही बहुतसी तारीफ केली'. [पेद १५ ले. ८३] रामचद्रपंत म्हणजे हा सुखठणकर होय. 'इग्रजाचा मजकूर परवा दृष्टीस पडला की रामचद्रजी वगैरे कारभारी याचे मते तो हूर तजविजेने तह करावा मग चितास येईल तेव्हा गोवे घ्यावे असे आहे.' [पुरदरे १ ले १३५] 'सर्व तुम्ही करून म्हातारे जाला दौलतीचे उचित कार्यास अटकाव न पडे ती योजना करून समजाउन घेउन यावे तुम्हीही निखालस जन्माचे सोबती आहात विस्तारे काये लिहिणे मल्हारबाच्या चितातील किल्मीष दूर करून घेउन यावे' [नाना-पेशवे ५८] 'पूर्वी महादबा व रामचद्रबावा यांचा मान राखण्यात येत असे त्याप्रमाणेच मान राखून विश्वास ठेउन कारभार घ्यावा' [खरे १ ले ६१] त्याच्या प्रतिमेचे चित्र वरील उताऱ्यात उतरले आहे आणि हीच या पुरुषाची प्रतिष्ठा होय इतका अलौकिक राजकारणी विरळाच निपजला 'अस्विन वद्य ४' म्हणजे ५ अक्टुबर १७५४ रोजी सुखठणकर ज्वराने मरण पावला [ले १५६]



# रामाजी अनंत दाभोळकर

## याचा असल पत्रव्यवहार

१८०८–१८१८ विक्रमी.

लेखांक [१३८] श्री * सवत १८०५ आषाढ शुद्ध ६

[२१ जून १७४८]

स्वस्ति श्रीनृप शालिवाहन शके १६७० विभव संवत्सरे उदगयने ग्रीष्मर्तौ आषाढे मासे* शुक्ले शष्टयां भौमे घटि १० पळ ५८ सहसप्तमी उत्तरा नक्षत्रे घ. ४६ प. २६ वर्यान योगे घटि २९ सहपरिघःगर करणं येवं पंचांग शुद्धोतद्दिने श्रीसूर्योदयात गत घटि ३१ पळे ५७ समये धन लग्ने सिंहांशे वहमाने श्रीमंत राजश्री दाभोळकर इत्युपनामक रामाजी पतस्य भार्या सौभाग्यवती जानकी नाम्नि प्रथम पुत्ररत्न[८१] प्रासुति.

अथ जन्म लग्न कुंडलिका चक्रमिदं लिख्यते.




(८१) ही कुडली रामाजीपत दाभोळकर याचा प्रथम पुत्र आपाजीराम याची होय. १७६८ पासून ह्मणजे वयाच्या एकविसाव्या वर्षी तो प्रत्यक्ष काम पाहू लागला. [लें ११७] १७७८च्या आरंभी

लेखांक [१२९] श्री * संवत १८०८ वैशाख वद्य ११

[१० मे १७५१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

धाडाजीबाबा [गुरुगुले] स्वामी गोसावी यासि.

पो॰ रामाजी[82] अनंत [दामोळकर] सां नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता॰ वैशाख * बहुल ११ मुकाम कालीनदीतीर नां फरोकाबाद प्रांत अंतरवेद जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे. यानंतर पत्र पाठविले ते उत्तम समई प्रविष्ट होऊन लेखनार्थ कळो आला. आम्हाकडील वर्तमानाविसी लिहिले त्यास तपसीलवार इकडील वृत्तांत यजमानाच्या पत्री लेहून बखेरच[83] पाठविली असे. त्यावरून कळेल परंतु तुम्ही आपल्या मामल्याचा विचारआचार कितेक आखेराम बकसी व तुम्ही बोलोन गेलेस त्याउपरी कां त्यांचा जाबसाल कांहींच लिहिलात नाही. अगर सरकारचा ऐवज फलांणा आला बाकी फलाणा राहिला त्याची वाट फलाणी हे कांहीच लिहिले नसे. अपूर्व आहे. याउपरी तर्‍हीं तथ्येच वर्तमान तावार सिध्दांतपुरसर लेहून मुजरत कासिदा बा॥ अम्हांकडे पाठवणे. ढील सहसा न कीजे. ॥ तुम्हांस जाते समई राजश्री [जयाजी] आपा

---

नाना फडणिसाच्या बतीने तो मुतालकीच्या फडणिशीवर महादजी शिंद्याकडे करवीरच्या स्वारीत प्रथम आला तो १७९१पर्यंत सतत शिंद्याकडेच होता याचा पत्रव्यवहार जो आम्हास लाभला तो पुढें स्वतंत्र भागात पहावयास मिळेलच धर्मिकेत महादजी दाखविली त्यातच याचा अंत झाला

(८२) याचे मूळ आडनाव काळे पण ते क्वचितच प्रचारात असून दामोळकर या नांवानेच विशेषत. विख्यात होते. [लि १३७, १४७] '२४ जून १७५० रोजी जयापास श्रीमतानी वस्त्रे दिली. बा॥ रामाजी अनंत फडनिसीकडील कारकून होते तेच दिल्हे आहेत' [खंड ६ यादी ५४] अशी नोंद आहे तिचा अर्थ या वेळीच दिले असा नसून पूर्वी होते तेच दिले असा होय दाभोळकर संग्रहात १७४५च्या सुमारास शिंद्याकडून जी पत्रें पेशव्यास गेली आहेत त्याच्या नकलाचे अक्षर रामाजी पंताच्या वळणाचे दिसते संभवत तो शिंद्याकडे असावा असे वाटते या घराण्याचा संक्षिप्त इतिहास दप्तरइश्रजीत छापला आहे त्यात म्हटले आहे की याचा आजा नारो कृष्ण हा राणोजी शिंद्याजवळ दप्तरदारीवर होता यामुळेंच शिंदेशाहीत याची संभावना सुलभ झाली 'चाळीस वर्षपर्यंत पेशव्याचे पदरी होतो' असा निर्देश आपाजीरामाने एका जागी केला आहे त्यावरून वरील विधान विश्वसनीय वाटतें आणि १७४२ पासून तर सनदाच पहावयास मिळतात हा रामाजीपंत पानिपतावर कामास आला.

(८३) रोहिलखंडच्या स्वारीसंबंधी 'बखेरच लेहून पाठविली असे' ते पत्र संग्रहात सापडत नाही. असो बखर लिहिण्याची प्रथा या वेळी प्रचलित होती हे उघड आहे भाऊसाहेबाच्या नावावर मोडणारी बखर हे त्याचे प्रत्यंतर होय.

साहेबी काही काम सांगितले होते त्याचे उत्तरच पाठविले नाहीं. हे कोण गोस्ट आहे. सविस्तर जे लिहिणे आसेल ते लिहित जाणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१४०] श्री * संवत १८०८ आषाढ शुद्ध ७

[१९ जून १७५१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामी गोसावि यांसि.

पो। रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशळ ता। आषाढ * शुध ७ मुा। को। मउसमसाबाद प्रात अंतरवेद जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत आसवे. यानंतर पत्र पाठविले ते पावले. लेखनार्थ कळला. या प्रकारे सदैव सानंदवीत असिले पा।. वरकड आपले मामलतीचा मार लिहिला तो कळला. हिंदुस्थानी लोक विना जीवनपुत्रच पारपत्याखेरीज देहावरी येत नसे त[अ]से लि। त्याप्रोच समयानुसार होणे ते होईल. चिंता काये असे. तुम्हास जेथवरी मेहनत होईल तेथवरी करणे. साहेब चाकरी[त] ढील सहसा न करणे. ।' काम येकाचे खावंदानी[८४] सांगितले त्याचे उत्तर आज सहा महिन्यानी आले. ते रुक्षच आले. तरी तुम्ही काये कराल. जसे देखिले तसे लिहिले. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१४१] श्री * संवत १८०८ कार्तिक वद्य १०

[१ नवबर १७५१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुलगुले] गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत नमस्कार विनती उपरी. येथील कुशळ ता। छ * २३ जिल्हेज मुा। गंगातीर जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. प्रात कोटे येथील वर्तमान लि। ते सविस्तर कळो आले. तुम्ही व आखेरामजी वायदे करून गेलेस ते सर्वही टळून गेले. अयःपर तम्ही करारप्रमाणे वसूल करून येवज उजनीस पावता करणे. यातच तुमचा मजरा असे. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(८४) पहा भाग १ ले. १९ टीप ३५. 'धणी खावद यजमान' या नावाने शिद्यांस दाभोळकर संबोधितो हे मननीय आहे [ले. १३९ १४६, १५२, १५८, १५९, १८१ खंड १ ले. ३३]

लेखांक [१४२] ॥श्री * संवत १८०९ आश्विन शुद्ध १०

[१७ अक्टबर १७५२]

तीर्थरुप राजश्री हरीपतदादा[८५] वडिलांचे सेवेसी.

अपत्य रामाने चरणावरी मस्तक ठेउन सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। आश्विन* शुध दशमीपावेतो मुकाम नजीक राक्षेसभुवन श्री गंगातीर वडिलाचे आसिर्वादें करुन सुखरुप असो विशेप. आपण राजेश्री गणेशपंतासमागमे आसिर्वादपत्र पाठविले ते पावोन समाधान जाहाले. मातुश्री बाईच्या वर्षश्राधाकारणे वरात आवकाश करुन येणे कदाचित येणे न होय तरी तसेच तपसीलवार वर्तमान लेहून पाठवणे म्हणोन आज्ञा तरी आम्हीं वगैस यावें मातुश्रीच्या श्राधास स्वामीजवळी आसावे हा हेत बहुत आहे परंतु प्रस्तुत श्रीमंताच्या व सरदाराच्या भेटी मात्र जाहाल्या. अद्याप काहा बोलीचाली जाहाली नाहीं. आष्टमी रविवारी भेटी गंगातिरी याच मुकामी जाहाल्या. दोन दिवस दसऱ्याचे गडबडीतच गेले. तेव्हां निरोप मागता येत नाहीं तशाहीमध्ये निरोप मागितला तरी देणार नाहीत या-करितां येणे होत नाहीं. आपण वडील आहेत. सर्व प्रकारे मातुश्री[चे] पुत्रत्व वडिलासच घडले. आपण उत्तम प्रकारे वर्षश्राध करावे. आम्हीं येथे गंगातिरी च्यार ब्राह्मण सांगाव-याचे तें सागो. वडिलास कळावे म्हणोन लिहिलें आहे. आम्हाविसी कोणे गोष्टीची चिंता न करावी. येथील गुता उरकला म्हणजे आज्ञा घेउन भेटीस येउ. भेटीनंतर सविस्तर कलेल. खर्चावेचास नसिले तरी लेहून पाठवणे म्हणजे पाठउन देउ. बहुत विस्तारे काये लिहावा. बहुत काये लिहिणे लोभ असो दिला पाहिजे हे विनंती.

समस्तास आसिर्वाद सागावे व अनुक्रमे नमस्कार.

---

लेखांक [१४३] ॥श्री

[फरवरी १७५३]

वडिलाचे सेवेसी. सा। नमस्कार विनंती. श्रीमंत राजश्री नानासाहेबी कृपा करुन इनामपत्रं करुन दिल्ही.

मौजे नगवगा येथील इनाम.

१ मोकासा

का। आंकुळनेर येथील

१ बावती

---

(८५) रामाजीपंत दाभोळकराचा वडील बंधु हरीपंत होता त्याच्या नावे हे पत्र होय हरीपंताची थोडी पत्रे या भागात पहावयास मिळतील तो १७६१ पर्यंत जिवंत होता [लि १९५] पुढें त्याचा पत्ता लागत नाही.

| | |
|---|---|
| १ बाबती | १ नीम चौथाई |
| १ सरदेशमुखी | ० सरदेशमुखी देत होते परंतु प्रतिनिधी यास इनाम आहे म्हणोन राहिले. राजश्री आणाच येतील. |
| १ पेशजी जागीर आहे | |
| —— | —— |
| ४ | २ |

दरोबस्त गाव दिल्हा असे.

येणेप्रमाणे इनाम[८६] करून दिल्हे असे. तुम्हांकारणे गंगाजलाच्या कावडी २ दोन पाठविल्या आहे व शालग्राम २ कावडी पाठविल्या आहेत म्हणून घेउन जतन ठेवणे. पोटारीतील तरी मौजून जतन ठेवणे. वरकड पिसवीतील आहेत त्यातील कोणास देणार तरी काही देणे. वरकड ठेवावे. घर कसे जाहले. काम कसे. चांदण्या पुढल्यामागल्या केल्या की काये ते तपसीलवार लेहून पाठवावे. कावडी श्रीरामेश्वरास पंनास गेल्या कळले पाहिजे. हे विनंती.

---

लेखांक [१४४] श्री * संवत १८१० ज्येष्ठ वद्य ५

[२१ जून १७५३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

नारोपत [गोपाळ] स्वामीचे सेवेसी.

पो राभाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १९ साबान मुक्काम अवंतिकापुरी जाणोन स्वकीय कुशल वर्तमान लिहित असिलें पाहिजे विशेष. तुम्हीं पत्र पाठविले तें पावलें. त्यांत मजकूर की राजश्री बाळाजीबावा [गुलगुले] श्रीमाहायात्रेस गेले ते त्रिस्थली यात्रा करून फिरोन श्री कासीस आले. तेथून सत्वरीच येतील म्हणोन लिहिले. त्यास उतम गोष्ट असे. दुसरे पा। कोठ्याच्या येवजी हुंडी आठ्यासी हजारा रुपयाची श्री माहारावजीनी सोंजीसहासमागमे देउन पाठविली म्हणोन लिहिले. येशास हुंडी आम्हांकडे आली नाहीं. परभारे श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबाकडे श्रीगोंधास गेली असेल त्याचे प्रतिउत्तरही तुम्हांस आले असेल. तदनंतर श्रीमाहारावजीस

---

(८६) सलाबतजंगाचा मोड केला त्या प्रसंगी ही दोन गावें पेशव्याकडून मिळाली ती अद्याप या घराण्याकडे चालू आहेत

रुपयाविसी ताकीदपत्र पाठविले आहे. ते त्यास देउन सरकारचा रुपया सत्वर वसूल करून घेणे. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री आपासाहेब अद्यापि आले नाहीत. मागाहून लौकरीच येणार आहेत. कळले पाहिजे ।"तुम्ही रुपयाची निकड लाउन यवज सारा कराराप्रमाणे वसूल करून घेणे. अ:तपर येक घडीचा विलंब न लावणे. आखेरसाल तो होउन गेले. अद्याप रुपये येत नाही. तस्मात त्याच्या मनात सरकारचा रुपया द्यावयाचा आहे की नाही. ते राजश्री माहारावजीस पुसोन तपसीलवार पत्र पाठविणे. तसासारिखा विचार करणे तो केला जाईल. जो आम्ही काही बोलत नाहीं तो ते रुपयाचे नावच घेत नाही. हे उतम नाहीं. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१४५] श्री * संवत १८१० आश्विन शुद्ध ३

[२९ सितबर १७५३]

राजश्रियाविराजित राजश्री

नारो गोपाळ स्वामी गोसावी यांसि.

सो रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत जाणे विशेष. पत्र पा। तें पावले. लिहिलें वर्तमान कळलें. कोटेंकर यांणी सरकारचे रुपये सिध केले आहेत सत्वरीच पाठवणार म्हणून लि।. तरी येवजाची रवानगी लौकर करून पाठवणे. आम्हाकडील लोक पांच हजार फोज राजश्री सदाशिव गोपाळ याजबा। देउन रवाना जाल. जलदीनेच येत असेत. [सटवाजी] राजाल्याबा। आपले कोण्ही नाहींत. कळले पाहिजे. राजश्री बाळोबा [गुलगुले] कोट्यांस आले म्हणजे त्यास लौकर हुजूर उजेनीस पाठउंन देणे. ढील यावयासि न करणे म्हणून त्यास सांगणे. रा। छ* १ जिल्हेज. ।" बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१४६] श्री * संवत १८१० आश्विन शुद्ध ११

[७ अक्टूबर १७५३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा स्वामी गोसावी यासि.

सो रामाजी अनत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। आश्विन * शुद्ध ११ जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावलें. लिहिलें वर्तमान अवगत जाहले. त्याप्रमाणें राजश्री [दत्ताजी] पाटीलबावास

श्रवंण केले. त्यांचे प्रत्योत्तर पाठविले असे. तेथे सविस्तर अर्थ लिहिला आहे त्यावरून कळेल. मुख्येअर्थ राजश्री माहारावजी याजकडून सरकारचा येवज मातबर हुजूर येईल ते करणे म्हणजे तुमच्या सेवेचा मजुरा धण्याजवळ असे. आपण श्रीची यात्रा करून आला उत्तम गोष्ट जाहली. जन्माचे सार्थक हेच आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती. येथून वकील[८७] पाठविला आहे. त्याचे उतम रीतीने विदा करवाल ते समई रवानगी राज्याकडून करवणे. हे विनंती.

---

लेखांक [१४७] श्रीगजानन * संवत १८११ चैत्र वद्य ४
[११ मार्च १७५४]

श्रियासहस्रायु चिरंजीव विजईभव राजेश्री रामाजीपंत यां प्रति हरि अनंत दाभोलकर अनेक असिर्वाद उपरी. येथील क्षेम ता। चैत्र वद्य चतुर्थीपावेतो समस्त सुखरुप असो विशेष. तुम्हाकडील पत्र माघ वद्य पंचमीचे व फाल्गुण शुा पंचमीचे पाठविलें ते चैत्र वद्य १ प्रतिपदेस दोन्हीं पत्रें पावली. तेथे लिहिलें कीं आपल्याकडील सविस्तर वर्तमान लिहून पा। म्हणोन लिहिले व श्रीमंत कोठे कोणे ठिकाणी आहेत तें लिहून पाठवणें. त्यासी फाल्गुण वद्य पंचमी मुा तुंगभद्रा येथील मुकामींची राजश्री बाबुरावजी व राजश्री विसाजीपंतदादा यांची पत्रे आली होती. समस्त सुखरुप आहेत. मोगला कडील वर्तमान तरी यांचा त्याचा तह आहे तोच आहे. प्रस्तुत मोगल वराडांत फौज सुधां गेला. नवगावापासून दोहो कोशावरी सात मुकाम होते. त्याजमुले वैरणीस उपद्रव लागला. आणखी काही उपसर्ग लागला नाहीं. सातारियाकडील वर्तमान तरी ताराबाई व यांचे अद्यावत सरवस नाहीं. सातारियाभोवती मुल्काची जप्ती यांणी केली आहे. वसंतगड राजश्री येमाजीपंती घेतला व परलीस वेढा बसविला आहे. श्रीमंताचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करितात व फाल्गुण शुा चतुर्दसीस राजेश्री अंताजीपंताच्या घरासंनिध दोन प्रहरां अग्नि[८८] लागली. तेणेकरुन अंताजीपंताचा वाडा व श्रीमंताचा वाडा व राजेश्री महादोबाचा वाडा ऐसे दग्ध जाहाले. काही राहिलें नाहीं. फिरोन वाडा बांधावयासी काम लाविलें आहे. कोकणचे वर्तमान तरी महिपतगढ याणी घेतला. राजेश्री खंडोजी माणकर देवरुखांत तळ देऊन बसले आहेत. बा। हशम च्यार हजार व राउत सातसे

---

(८७) कोट्याची वकिली नेहमी गुलगुल्याकडेच होती. पण प्रसंगविशेषी दुसरा वकीलही पाठविण्याचा प्रघात होता असे दिसते

(८८) पहा मद ६ यादी १०३ यादींतील या अग्निप्रकोपाची मितीदेखील चुकीची ठरते.

आहेत. मुलखास उपद्रव काडीमात्र नाहीं. सिगेश्वरापासून पावसपावतो ठाणी माहाली माहाली बसविली. रत्नागिरीसंनिध राजवाड्याजवळ मीठ बंदरची जखात घ्यावयासीं चवकी बसविली. त्यांचा यांचा अध्यावत काही कलहो नाहीं त्याणे आपले किल्याचा बंदोबस्त करितो व त्याजकडील सरदार तुळाजी साळेकर दोनसे माणसानसीं यांजकडे पलोन आला. वगैरे लोक आणखी येतच आहेत. राजकी वर्तमान तर ये प्रकारिचे आहे. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिले आहे.

---

लेखांक [१४८] श्री * सवत १८११ चैत्र वद्य १०

[१७ अप्रेल १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुळगुळे] स्वामी गो यासि.

सो रामाजी अनत नमस्कार विनंती. येथील कुशल ता चैत्र * वद्य १० मुा ठांणे कुंमेर प्रांत जाटवाडा जांणोन स्वकीयं लेखन करीत जाणे विशेष. पत्र पाा ते पावलें. तेथें लिाां कीं राा माहांरावजी नाथद्वाराहून आपले स्थळास आले. सरकारच्या येवजाच्या तलाशांत असेत. करारप्रोा देउ येसें बोलत आहेत. ताकीदपत्राविसीं लिहिले त्यास ताकीदपत्र तरी पूर्वीच पाां असें तें त्यास देणे आणि करारप्रोंं येवज वसुलांत येई तें करणे. इकडील वृत्तांत तरी जाटांस जेर केलें आहे. सांप्रत सलुखावरी आला असे. लौकरच मामलेत विल्हेस लागोन जांटाकडील फैसला होईल. चिंता नसे. ईश्वर इच्छेने आपला बोलबाला उतमच आहे. ॥ बहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१४९] [मे १७५४]

[पहिला वद गहाळ]

× ज्वराची दूर जाहली. आता कुशलरूप आसे. चिंता नसे परंतु शेरीर अस्तीगत राहिले. दोहींकडून दोघांनी धरून उठवावे धरून चालवावे येसें सांप्रत आहे. कुवत येईल तेव्हां खरें. ठांणे कुंमेर व जाटाचा मांर तरी जो आहे तो प्रथमच दिवस असे. [जयाजी] आपासाहेबीं श्रीमंताच्या विच्यारे करून येथून उठंत्री हरयेके मते सेउगांव

देउगांव करून उठावें पुढें छांवणीची जागा नेमावी अगर हरयेक मनसबा करावा या विच्यारे दूर्त रुपराम कटारा विप्र जाटाचा वकील तयास कुंमेरीतून बोलाविला आहे. मांजगढ काली धरून करीत असेत. करारमदार ठराव होईल त्याप्रा सेवेसी लेहून पाां देउं. कोटेकर माहांरावजी यास ताकीदपत्र त्याच्याच कागदाच्या जाब्रात अम्हीच होउन मार लिा आहे जे कराराप्रो येवज येणे त्यात वसूल आला आहे तो वजा करून बाकीचा येवज जलदीने रा बाळाजीबाबाजवल देणे आणि त्याचे कबज हुजुर [अपूर्ण]

---

लेखांक [१५०] श्री

[जून १७५४]

जमा खासगत राजश्री रामाजी अनंत दभोलकर सुहूरसन् आर्बा समसेन मया व अलफ. जमा रूये

तेरीज

| | |
|---|---|
| १३७४ सिहक साल गुा. | १,३९१ हा कमाविस पथके पागा |
| १२५६ नक्त. | २४ माहे साबान छ ७. |
| ० मोहराद् श्रीहरसिदीचे[८९] जगास खर्च जाल्या दाखल बाज. | विठोजी गव्हाणे. |
| | ५७५ माहे रमजान. |
| | ७५ येमाजी गूजर. |
| ११८ सिलक चामारगोंदे | ७५ हरजी टिलेकर. |
| | ७५ राघोबा पागा.[९०] |
| १,३७४ | २०० हैबतराउ गुंजाल. |
| १०९७८ जमा साल मार. | १५० रतोजी सिंदे. |
| ३९०० रोजमरा सरकार | |
| १३९१ पथके पागा. | ५७५ |

---

(८९) श्रीक्षेत्र अवंतिका येथील हरसिद्धीचे स्थान प्रख्यात आहे देवालयाची डागडुजी व धर्मशालेचे काम दामोळकराने केले होते हे पहिल्यानेच समजते. मथुरेसही त्याने बराच पैसा खर्च करून यमुनातिरी घाट बांधला ते पत्र पुढे पहावयास मिळेल कोकणात जेवरे व वसणी येथील देवालयाचे दगडी कामदेखील यानेच करविले असे कळते [ले. १८०]

(९०) हा राघोराम पागे मौजे वागणी नजीक इस्लामपुर येथील राहणारा असून या वेळी तो शिद्याचा आश्रित होता १७६८च्या शेवटी तो 'महादजी शिद्यावर फौज घेउन चालोन आला. लढाई होउन मारला गेला [वाड ७ ले. ५८६] तो वृत्तात पुढे येईलच बखरीतील राघोबा शेणवई पागनीस तो हाच असावा [पान ८१]

२२०० माहलकरी.
३२५ जमिदार.
३२५ कर्ज अमदन.
१९३७ कमाविस.
३०० गुा जावजी.

---

१०,६५२

---

११६५२
यासी तपसील.
३,९०० बा सरकार राजश्री आपा
सो रोजमरा रूपये
माहे रमजान ता साबान
[मास १२ दरमाह ३००]
२,२०० बा कमाविसदार.
६५० माहे रमजान.
२०० बलवंतराउ नरहर पा म्हसोदे
निंबमो [चो]र
१०० तुलाजीपंत पा नेमावर.
५० त्रिंबकपंत वागवोर.
३०० बाबुराउ भास्कर गागली.

---

६५०
१००० माहे सवाल भास्कर बलाल
शाहाजापुर.
५०० माहे सफर छ १२. राघो शकर
सोपार.

---

२२००
१९३७ कमाविस किता.
१३५० माहे सवाल.
३५० माहे सवाल.
२०० त्र्यंबक बापु.
१५० वेंकाजी दुलभ.

---

३५०
५० माहे जिल्काद फिरंगोजी पिसे.
१४२ माहे जिल्हेज.
१०० बाबुराउ राजाराम.
४२ बाबुराव परसु ता नागो
जी.

---

१४२
१५० माहे रोवल छ ३०
१०० माहे जाखर जोत्याजी भोसले.

---

१३९१
३२५ जमिदार.
२५० माहे सवाल.
२५० भोवरासेकर जमिदार.
५० तुलजाजी देसाई दाहोद.

---

२५०
७५ माहे जिल्हेज.
५० गणेश देसाई दाहोदकर.
२५ तुलजाजी देसाई दाहोद.

---

७५

---

३२५
२२५ कर्ज अमदन. माहे जाखर
नागोपत दिा कोल्हे.
३०० गुा जावजी.

२५० भिकाजीपत दिा त्रिंबक
हरी लेले.
६०० मोची.
५०० गणेशराम कानाड भाजी
कादर.

१२५०

५२५ माहे आखिर.
५०० गोपालसिंग करोलीकर.
२५ मेवाती मांडी चोरोन नेली
सबब घेतले.

५२५

१८७५

खासगत राजश्री रामाजी अनत [दाभोलकर] खर्च रुये सुा आर्वा [खमसैन]

मेजवानी खर्च.

माहे जिलकाद.
आपाजी कृष्ण पुनासेकर.
गणेशपत भावे.
पाटील नवगावकर.
त्रिंबकपंत.
माहे जिल्हेज छ १५ रोज लट निा.
रामराउ निल्कंठ.
छ १८ जिल्हेज गणेशपंत पेंडसे.
४९ माहे राखर छ १७. बरे वाटत नवते सा अंतो ब्रांम्हण मथुरेस गेला तेथे खर्चास.

ईनाम खर्च.

५ माहे सवाल छ २. मल्हार माणूस दिा तुकोजी पवार घोडी घेउन आला सा.
२ माहे जिल्हेज छ २९ रोज. कासिद पुणियाहुन पुत्र[९१] जालियाची पत्रे घेउन आला त्यास.
२ माहे मोहरम छ १ रोज बाबु भाल्दार दिा श्रीमंत रो पंत.
१ माहे जोवल छ १२ रोज. मोतद्दार दिा माधवसिंग राजे घोडा घेउन आला त्यास.

(९१) कोणास 'पुत्र झाल्याची पत्रे पुण्याहून आली' हे समजण्यास मार्ग नाही. कदाचित दाभोळकराच्या दुसऱ्या पुत्राचा हा जन्मकाळ असावा. कारण तिसऱ्याचा उल्लेख पुढे आला आहे.

१ माहे जोवल्द छ २२. गुा बापुराउ. नारायण मथुरेस दिल्हे अंनोत्रास.

माहे जाखर छ १२ रोज. गंगाजल गोपाळराउ बासुदेव नौ या जकडून घेउन आला त्यास. माहे साबान छ ८. खंडोजी कोल्हे विन बना [जा] जी कोल्हे. माहे साबान छ. २४ रामचंद्र वैद्य शाहाजापुरकर.

१८०० श्रीहरसिदीप्रित्यर्थ धर्मशाला.

---

५४

११६ बापुराउ नारायण याम मथुरेस जाते सगई खर्चास छ २ जोवल

५ गिरमाजी खंडेराउ ब्राम्हण मथुरेस गेला सा छ ४ जाखर

८१ माहादाजांरास दानार छ २३ जाखर मारनिले मृत्य पावले त्याचे क्रियेस गुा सदासिवपत मालसे.

---

लेखांक [१२१]    श्री    सवन ११८११ आषाढ शुद्ध ७ [२७ जून १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळोबा [गुरुगुळे] स्वामींचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता छ * ५ रमजान जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लिहित जावें. येथीळ तपसीले वर्तमान श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबाचे पत्रीं लिहिला आहे त्याजवरून कळेल. सारांश गोष्टी कीं माहारावजीचा व श्रीनंताचा स्नेह तगी हा समई फौजसुवा खासा आले म्हणजे मोठी गोष्ट जाहली. जन्मपर्यंत स्नेह विशेष चालेल. असे करिना खासास कदाचित आनकूल न पडेल तरी आखेरामजीत्रा फौज सारी घेउन तुम्ही यावे. आसे आमचे विचारे आहे. तुम्ही कार्यकरते आहा. सर्व तुम्ही जाणता. आम्हीं त्याहावेसे. काये आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

लेखांक [१५२] श्री * संवत १८११ आषाढ वद्य २
[६ जुलै १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्यं राजश्री
बाळोबा [गुळगुळे] स्वामी गोंं यांसि.

पोो रामजी अनंत नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ताा आषाढ * वद्य २ मुकाम रेवाडी जाणोन स्वकीये कुशल लेखंन करीत गेलें पाहिजे विशेष. पत्र पाां तें पावलें. तेथे श्रीमाहांरावजी सरकारचा पैका द्यावयासि ढील करून देउंदिलाउं करितात म्हणून तपसिलें लिहिलें तें कळलें. येशास त्याचा करार केल्यात त्याचे वायदे तरी चुकोंन गेले. अद्यांपि तपसीलच लिहितां. अपूर्व असे. याउपरी करारप्रमाणें ऐवज साराच त्यांजपासून घेउंन तुम्ही त्याच्या फौजेबाा याल तेव्हां घेउंन येणे. आपली फौज तीस हजार आणि श्रीमंताची फौज दाहाबारा[९२] हजार येसी चाळीस हजार फौज मातबर जमली असे. त्यांस खर्चास पैका जरूर पाहिजे. तरीं ऐवजी बेमुरवत होउन मागोन वाां आंणणे म्हणजे धणी तुम्हांवरीं खुश आहेत दुसरें फौज त्यांची येणारसें लिहिलेंत तरी बहुत उतंम असे. हजार फोजेने त्याणी यावेसें काये आहे. च्यारपांच हजार फौज व जेजाला व बांण येसे सांमान मातबर सिवसिंगजी [राठोड] वाा व आखेरामजी वाां घेउन तुम्हीं पत्र पावतांच स्वार होउंन आढवे सांभरच्या मुकामांस येउंन सांमिल होणें. याउपरी अवकाश नसे. दर मजलीने बिजेसिंगासीं गाठ घालोंन त्यास तंबी करितात. संमयासी आल्यानें उतम आहे. ऐसेच त्यांसी भाषण करून फौज घेउंन सत्वर येउंन पोहोचणें. [बिजेसिंग] राठोड मार याचे सिस्तकस्य तरीं [काय] खांमखां आपल्याच फौजेने करितात. यास संदेह नाहीं परंतु त्यांची फौज संमयास आल्याने स्नेहांची वृधी होणार. येणेप्रों त्यांज बोध करून जलदीने येणे. वरकड तावार वृतांत श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबांच्या पत्रीं लिाां असे त्यावरून कळेल. ।' बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

(९२) या पत्रात 'दहाबारा हजार फोज हुजूरची दिल्ही' असे दामोलकर दर्शवीत आहे आणि पुढील पत्रातदेखील हाच आकडा दिला आहे [लि १५३] ते पत्र २५ जुलैचें असून सांबर येथील मुकामाचे आहे 'सरकारची फौज चार हजार बराबर दिली' असे गणेश कृष्ण पेंडसे सांगतो [कास ले १२२] दोघेही फडणिसीचे कारकून तेव्हा खरी संख्या कोणाची मानावयाची ?

लेखांक [१५३]     श्री     * संवत १८११ श्रावण शुद्ध ६

[२५ जुलै १७५४]

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री

बाळो[बा] स्वामी गो यांसि.

पों रामाजी अनंत सां नमस्कार विनती. यथील कुशल ता श्रांवण शुध * ६ मुा सांबर[९३] जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पां तें पावलें लिहिलें वृत कळलें. दिल्लीस श्रीमंत दादासाहेब व राजश्री मल्हारावजी [होळकर] सुमेदार येसे राहिले. श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबांना दाहाबारा हजार फौज हुजुरचीं पथके श्रीमंतानी देउंन मारवाड प्राते जावयासि आज्ञा दिल्ही. ते मुां मांरपर्यंत आलो. विजेसिंग राठोड मेंडत्यांसच राहून ठाणे बळावीत असे. त्यांजवरी दरमजलीने जात असो. कोटेंकरांनीं व तुम्हीं मातबर फौज घेउंन येतोसा करार केळात त्याप्रो फौज च्यारपांच सहस्र निदानी घेउन या संमयास आलेस म्हणजे स्नेहाची वृधी दिवसेंदिवस होत जाईल. येणेप्रांच त्यांस सांगोन सिवसिंगजी राठोड व आखेरामजी यांसि मातबर फौजेसह घेउन जलदीने येणे व पैकाही खर्चास पाहिजे. तरी येवज पोख्त श्रीमाहारायासी स्नेहें करून बलोंन पैका घा घेउन येणें. हेंगे सहसा न करणें. ॥ बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

(९३) मिठाचे प्रसिद्ध सरोवर सावर ते हेच होय मराठ्यांच्या पदरी ते प्रथम कसे पडले याचा इतिहास चित्ताकर्षक आहे म्हणून सक्षेपात देणे इष्ट वाटते १७४८त प्रथमत. अबदाली 'सरहिंदेवर आला त्या वेळी स्वामीच्या फौजा नेवाईवर आल्या वजिरानी तानखा सामरावर केली फौजदार बरोबर दिघला. आम्ही विचारिले की हे गोष्ट बहुत कामाची आहे अनायासे तनखाचे बाहाण्याने सामरेत पाय पडिला म्हणजे अजमेरच्या सुभ्यात दखल जाला बल्कि सामरेत वी खल्यावर होत होत सर्व बदोवस्त होईल येसे ध्यानात आणून हे कबूल केली [खड ६ ले १९३] तेच भविष्य पुढे अहदनाम्यात खरे ठरले आगरे व अजमेर हे दोन्ही सुभे घेण्याची इच्छा बाजीराव भट पेशव्याची होती असा स्पष्ट सकेत नाही तथापि नादिरशाहाविरुद्ध मोगलाची मदत करून महत्कार्य सपादावें असा हेतू होता 'स्वामीचे वचन पूर्वी औरगजेब पातशाहा होते त्यासी गुतले आहे की कोन्ही परचक्र आले तर आम्ही कुमक करावी सर्वस्वे साहित्य करावे' [पेद ३० ले २२२] पाछाहाची कुमक या समई केलियाने राज्याचा लौकिक आहे माळव्यातील फौजा शिंदे होळकर पवार पाठविणे [खड ६ ले १३०] 'परराज्य राहिले तरी सर्वांवर आहे त्यास फार विचार मनात न आणिता इकडील कार्याची पेरवी कर्तव्य ते करावी.' [पेद १५ ले ७२] 'नादिरशाहाने दिली घेतली तेव्हा पातशाहाची कुमक न जाहाली फौजा वसईत गुतल्या यास्तव राउसाहेब वैकुंटवासी बहुत दिलगीर जाहाले होते काकी पातशाहावर उपकार करावयाचा तैसा प्रसग बनोन येणार नाही' [पेद २१ ले २०] याचा खरा अर्थ करावा लागले आणि त्या दृष्टीने सोवत्याची सेवा व अहदनाम्याचे महत्व ठरवावे लागेल

लेखांक [१५५] ।'श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध १२
[२९ अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळोबा [गुळगुळे] स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। भाद्रपद * शुध द्वादशी मु॥ नजीक मेंढते जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावे. कोव्याची फौज अखेरामसुधा आलो म्हणोन लिहिले. तरी उतम गोष्ट केली. समये हाच आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१५५] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध १३
[३० अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा गोसावी यांसि॰

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। * ११ जिल्काद मुक्काम मौजे वडगांव नजीक मेंढते जाणोन स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पुष्करच्या मुकामीहून पाठविले ते पावले. आज्ञा होईल त्या मार्गे येउ म्हणोन लि॥. तर येथून राजश्री त्रिंबक बापुजी व केरोजी सिंदे [?] हे दोन्ही पथके तुम्हांकडे [सामोरा] पाठविली आहेत. ते तुम्हीं येके ठिकाणी होउन मेंढते उजवे हाते टाकून लस्करांत येणे. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१५६] श्री * संवत १८११ आश्विन वद्य ७
[८ अक्टुबर १७५४]

चिरंजीव विजईभव राजश्री रामाजीपंत यासी प्रति हरी अंनत अनेक असिर्वाद उपरी .येथील कुशल तागाईत अश्विन * वद्य सप्तमीपावेतो समस्त सुखरूप असो विशेष. तुम्हीं पत्रे आषाढ वद्य दशमीचे व येक भाद्रपद प्रतिपदा ऐसी दोन पत्रे पाठविली ती पावोन परम समाधान जाहाले. तरी यैसे निरंतर पत्र पाठउन सविस्तर वर्तमान लिहिले पाहिजे. मारवाड प्रांत गेलो राजे रामसिंह यासी राज्यावर बसवावे हे अगत्य बहुत आहे म्हणून लिहिले ते कळले. प्रस्तुत विजेसिंह मडत्यांत बसला आहे तो

बाहेर निघतो तेव्हां दुःख्य होते म्हणून लिहिले ते कळले. सर्व रक्षिणार ईश्वर आहे. गावी काजकामे करावयाविसी लिहिले तरी येदा कांही काम नवे करीत नाहीं. जी मागे केली ती तयार जाहाली. तशामध्ये नवी कामें काही करावी तरी श्रीमंताचा व तुलाजी अगरे याचा तह होत नाहीं याजकरिता धामधूम होईल यास्तव नवे काम करवीत नाहीं. वरकड लिहिले होते की शुकराजी नाई[क] भिडे याजकडून खर्चास मागोन घेणे म्हणून लिहिले होते. त्यास त्याजकडे दोनचार वेळा गेलो. त्याणी सांगितले की तुम्हाजवळ काही हिसेब आहे की काये. त्यास आम्हीं त्यास उत्तर दिले की हिसेब नाही. त्यास हिसेबी काही निघाले तरी देउ येसे बोलिले व बाकी आखेरीस आली म्हणून सागितले याजकरिता याचा तपसील काये तो सविस्तर लिहिणे व हिसेब पाठवावयाचा असिला तरी पाठउन देणे. येथे श्रीमंत आपल्या स्वमुखे बोलिले की तुम्हीं व राजश्री गंगोबातात्या [चंद्रचूड] येसे उभयेता आज दोनतीन वरसे जाहागीर मुलुक दोन लक्षाचा खातात. येसी कोणी चुकली श्रीमंतापासी सागितली त्यावरुन श्रीमतानी चरचा केली. ते समई आमचा गंहस्त जवळ होता. त्याणे आम्हापासी सागितले त्याजवरुन तुम्हास सुचना लिहिली आहे. ही बोली जाहाली ते समई राजेश्री अंताजी[९४] माणकेश्वर [गंधे] जवळ होते व त्यास दसरियाचे दिवसी साहेबनौबत श्रीमतानी दिल्ही. वरकड तुम्ही आपणाकडील सविस्तर लिहिणे. राजश्री राघोपंत राजवाडे याचे घरची समस्त सुखरुप आहेत व तीर्थस्वरुप राजेश्री नारोबादादा समस्त सुखरुप आहेत. वरकड वर्तमान होईल ते मागाहून सविस्तरर लिहून पाठउ. कसबे आकुलनेर व नवगाव येथे परजन्य पडिला. पिके प्रस्तुत चागलीच

---

(९४) पहा भाग २ ले २ टीप ३ याचे उपनाम गधे [त्रैमासिक ८ अक ३ पान १३५] 'सलासीन' ह्मणजे १७२९ पासून 'अताजी माणकेश्वर यासी ह्मालोजी मुढे याजकडील पागेच्या लिहिण्याचा धदा होता' असा लेख आहे. [पिद २२ ले ८३] अर्थात सलास सलासीन नतरच निराळें ,पथक मिळून तो उत्तरेस आला असावा त्याला सरदारी प्राप्त झाली तुव्हा 'हिवरेकर वोकील' दिवाण होते 'गिरमाजी मल्हार वोकील हिवरेकर श्रीमत. सखाराम बापुचे सखे भाउ' असे वर्णन येते ते या वोकीलाचें होय. [पिद ३६ ले ३९७] या भागातील लेखाक ३९७, ३९९ चा काल चुकला आहे पत्रे १७७५ तील असून गिरमाजीपत वोकील त्या वेळी शिंदेशाहीत होता [चिचसा ३ ले ४१०] अशी अहदनाम्यान्वयें दिल्लीत जी फौज सोवत्यानी ठेविली त्याची सरदारी अताजीपतास दिली. तो कामावर गेला तेव्हा 'पातशाहानी साहेबनौबत दिली'. [पिद २१ ले ५५] 'मनसब हप्तहजारी व नालकीची सनद वगजाकडे निघालीच पाहिजे. हाच मान पेशव्याने मान्य केला नालकीचे कोडे अशा रीतीने उलगडू पहाते मात्र ते पाहिजे तसे अद्याप स्पष्ट नाही

आहेत. कोणाचा कजियाही नाहीं. राजश्री रामचंदबाबा [सुखठणकर] यासी अस्विन वध ४ देवज्ञा जाहाली. दोनचार ताप आले. रामचंद्रबाबाची बइको बरोबर सयागमन केली. श्रीमतही बहुत श्रमी बाबाकरिता जाहाले. वासुदेव जोसी यासही आस्विन सुध सप्तमीस देवज्ञा जाहाली. बहुत काय हे आसिर्वाद.

वो राजश्री गणेश भट अगासे यान्चे वेदोक्त आसिर्वाद. प्रस्तुत आम्ही येथे आलो आहों. राजश्री घोडोबाआपायासी पुराण सांगत आहों. लोभ असो दीजे हे आसिर्वाद.

सोभाग्यवती गोखली बयाचे आसिर्वाद. आम्ही उभयेता निघोन वाराणसीस आस्विन वद्य दसमीस गेले. बरोबर येक चिरजीवही नउ. कळले पाहिजे. लोभ असो दीजे हे असिर्वाद. तुम्हावर श्रीमहालक्ष्मीची कृपा पूर्ण आहे. काही चिता न करणे. हे आसिर्वाद.

आपत्ये महादेवाने" सिरसाा नमस्कार. निरंतर पत्री संतोषवीत असावे तेणेकरुन सतोष होईल. तुमचे आज्ञाप्रमाणे वर्तणूक करीत आहों. फलदाता ईश्वर आहे. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

---

लेखांक [१५७] श्री * संवत १८११ पौष वद्य २

[३१ दिसबर १७५४]

राजश्रियावीराजीत राजमान्यं राजश्री

बाळोबा स्वामी गों यांसि.

पो रामाजी अनंत नमस्कार विनंती उपरी. येथील कुशळ ताा पौष्ये*वद्य २ जाणून स्वकीये कुशळ लेखन करीत गेले पाहिजें. यानंतर पत्र पाा तें पावले. लिाा वर्तमान कळले. राा माहारावजी यांचे वृत लिाा कीं श्री नाथद्वारास गेले आहेत सत्वरीच येणार असेत. सरकारच्या पैक्याची कांहीं निशा जाली कांहीं तदबीर करणार म्हणून लिाा. तरी मोघमच लिहितां. अपूर्व आहे. केल्या कराराप्रमाणे सरकारचा यैवज वसुलांत येईल ते गोष्ट करणे म्हणजे तुमचाही मजुरा हाजूर असे. वरकड जें लिाा तें श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबाच्या पत्रीं लिाा असे त्यावरून कळेल. ।" बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

(९५) हा हरीपत दाभोलकराचा मुलगा होय. 'आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीत आहो फलदाता ईश्वर आहे' या वाक्यावरून तो ससारात पडला होता असे निष्पन्न होते पण कोठे कसा हे काहीच कळत नाही त्याच्या लग्नाचा प्रश्न समोर असून वधुही थोर हवी होती [ले १८०, १८२]

लेखांक [१६०] श्री * संवत १८१२ चैत्र शुद्ध ७
[२० मार्च १७५५]

चिरंजीव विजईभव राजमान्य राजश्री रामाजीपंत यासी प्रति हरी अनंत अनेक आसिर्वाद उपरी. येथील कुशल तागाईत चैत्र * सुध सप्तमीपावेतो सुखरूप असो विसेस. तुम्ही पत्र माघ शुध त्रयोदसी मुकाम नागोर येथून श्रीगोंदे येथे जासुदाबरोबर पाठविले ते पावोन संतोष जाहाला. लिहिले वर्तमान कलो आले. तरी येसेच पत्र वरचेवर पाठउन सविस्तर वर्तमान लिहित असावे. वरकड राजकी वर्तमान तरी राजश्री रामाजी माहादेव याची रवानगी कोंकणात तुळाजी आंग्रे याजवर जाहाली. साष्टीस गेले. तो सुरतेहून हपसी चार हजार आला. येउन मानाजी आंग्रे याचे किल्लियास येउन वेढा घातला त्याजवरून मानाजी आंग्रे याचे व हबसी याचे युध्ये जाहाले. त्याजउपरी रामाजी माहादेव यास मनाजी आंग्रे याचे पत्र आले त्याजवरून हे आरमारसुधा बरोबर इंग्रज घेउन गेले. त्याजनंतर याचे व शामलाचे युध्ये फारच जाहाले. शामलाकडील हजार दीडे हजार माणूस ठार जाहाले व येकदोन सरदारही मातबर पडिले व शामलाची तारडीही दोनचार घेतली. शामल मोडून देउन उदेरीत घातला. याजकडीलही दोनतीनसे माणूस जाया जाहाले. शामलाकडील बंदोबस्त जाहाला म्हणजे तुळाजी आंग्रे याजवर आपले सारे आरमार व इंग्रज घेउन जाणार. इकडून फौजा राजश्री दिनकर माहादेव समसेरबहादर येसे चारपाच हजार फौज घेउन गेले. विजयदुर्गास सारियानी जावे येसा करार करुन गेले आहेत काय होईल ते वर्तमान लिहून पाठउ. प्रस्तुत श्रीमताचा मुकाम गंगातिरी आहे. वरकड राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] व राजश्री बाबुराव [लिमये] याचे घरची समस्त सुखरूप आहेत. हरी फडका[९६] व अंतोबा ताम्रनकर व केशव दातार समस्त मंडलीचे घरची मुलेमाणसे सुखरुप आहेत. नागोजीची बायको सुखरुप आहे म्हणून नागोजीस सांगणे. राजश्री रघोपंत राजवाड्याचे घरची मुलेमाणसे सुखरुप आहेत. कलले पाहिजे. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विन आसिर्वाद.

---

(९६) याचे पूर्ण नाव हरी बल्लाळ फडके इतिहासप्रसिद्ध हरीपंत तात्या फडके तो हाच पुणे येथील सावकार दिक्षित पटवर्धन याजकडील जमाखर्ची वह्यावरून या पुरुषाची कौटुंबिक माहिती नुकतीच प्रकाशित झाली आहे त्यात शके १६८३पर्यंत हा पटवर्धनाकडे होता असे दर्शविले आहे [त्रैमासिक १६ अंक १ पान २६] वरील पेढीच्या पोतद्याचे प्रमाण या भागात येणाऱ्या पत्रास मात्र पटत नाही हरीपंत व त्याचा बंधु बापुजी याची अनेक पत्रे या भागात आली असून उभयता भानूच्या पदरी राहून पेशव्याच्या स्वारीशिकारीत काम करीत होते असे स्पष्ट होते. भानूच्या पत्रात पहिला

हसे घेतले म्हणाल तरी गौवकरी चारसे माणूस मेदले याजमुले किला फाते लवकर जाहाला. तेथील बदोबस्ती करुन विजयदुर्गास जाणार. जी सुवर्णदुर्गाची गत केली विजयदुर्गाची गत आहे. जेथे खासा [ तुलाजी आंगरे ] आहे तेही लोक सारे मेदले आहेत. तेही काम लवकरच फत्ते होईल. मुख्य गोष्टी किलेकरी व लोकाचे साऱ्या किल्याचे मेद आले आहेत याजमुले कामकाज लवकर होते. जजिरे रत्नागिरी खंडोजी माणकर याणे घेतली म्हणून वर्तमान आहे. ही गोष्ट खरी होईल. सुवर्णदुर्ग घेताच बाणकोट व पालगड रसाळगड याजवर निशाने गेली. आठा दिवसामध्ये आ [ ठ ] किले घेतले. किलेकरी यानी येकदर हात्यार धरिले नाहीं. मेदाने काम जाहाले. आगरे याचे किले येकायेकी येतील हा भरवसा कोणासही नव्हता परंतु धरमेद्यानी त्याचे राज्य बुडविले. येदा काही बाकी राहत्ये ऐसा मजकूर दिसत नाहीं. मुख्य गोष्टी की त्याचा विनासकाल आला. कोणी येक किला जुझत नाहीं. विजयदुर्ग आला म्हणजे आगरे याचे राज्य[१७] बुडाला. मग काही बाकी राहिली नाहीं. इंग्रज बरोबर आहे व सारे याचे आरमार आहे. हिकडून फौजाही गेल्या आहेत यास्तव आठापंधरा दिवसानी सारा बदोबस्त होउन येईल. मुख्या गोष्टी की श्रीमताचा पुण्यप्रताप थोर आहे याजमुले जी कामे हावयाची नाही ती होउन येतात. रयेतीचे वाटे कोणी येकदर जात नाहीं. रयेतीस कौल दिल्हा. कोणी लुटीत नाहीं. याजउपरी होईल वर्तमान ते सविस्तर लिहून पाठउ. तुम्ही आपणाकडील सविस्तर लिहिणे. लोभ असो दीजे हे आसिर्वाद.

समस्तास सा॥ नमस्कार सांगणे.

---

(१७) 'आगरे याचे राज्य बुडाले' हे उदगार वाचणीय होत महाराष्ट्रात त्याची प्रतिष्ठा काय होती हे स्पष्ट होते. आगऱ्याविषयी जी पत्रे या भागात आली आहेत ती अल्प असली तरी मार्मिक आहेत. 'आगऱ्याचे सामान ह्मणावे तर १० हजार प्यादे दीड हजार राउत खेरीज आरमार सामान जबरदस्त [पेद २४ लें ९९] मराठ्याचें आरमार ह्मटले ह्मणजे हीं आगऱ्याचीच शक्ती मुख्य. समुद्रकाठीं वास करणाऱ्या परकियास वचक या कोदंडाचा होता हे शस्त्र आगऱ्याच्या हाती राहिले तोंवर त्याने चांगलाच टणत्कार केला यामुळे बहुतेकाचे दात त्याजवर होते. शाहु महाराजानंतर 'राज्याचा प्रकार आणखीच झाला त्यात परकियाचें सहाय घेऊन स्वकियास नामशेष करण्याची नीति स्वतःस 'शिवाजीचा शिष्य ह्मणविणाऱ्या व 'शुक्रनीतीने' चालणाऱ्या पेशव्याच्या वेळीच निघाली. तिचे इष्टानिष्ट परिणाम याच स्वारीत प्रत्ययास आले आणि 'हिंदुस्थानचे पातशाहा' होऊ पहाणाऱ्या पेशव्याने मराठी आरमारावर प्रत्यक्ष आणि वगाऱ्याच्या वांट्यावर अप्रत्यक्ष उदक सोडले असे ह्मणावें लागते. 'रावसाहेबी सर्वदा काळे माणसांवरीच मोहीम करितात परंतु गोरे माणसाची तंत्री

लेखांक [१६३] श्री * सवत १८१२ वैशाख शुद्ध १४

[२५ अप्रेल १७५५]

राजश्रियांविराजित राजमान्यं राजश्री

ब्राळाजीबावा स्वामीचे शेवेसी.

सेवक रामाजी अनत सां नमस्कार विनती उपर. येथील कुशल ता छ* १२ रजब मु।। नागोर जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे. विशेष. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले. ।' लिहिले वर्तमान सविस्तर कळले. येथून सविस्तर श्रीमंत [जयाजी] आपासाहेबाच्या लिहिल्यावरून सर्व कळो येईल. बहुत काये लि।। हे विनंती.

---

लेखांक [१६४] श्री

[जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्यं राजश्री

बाळोबा स्वामी गोसावी यासि.

सां रामाजी अनत नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. पत्र पां ते पावले. तेथें लिहिलें वृत कळलें. गववार वाटणी आपली हिसे माफक मागतात म्हणून लिहिले तरी हिसेप्रां वाटणींचा पैका ज्याचा त्यांस देणे. ।' बहुत काये लिहिणे. येथील मजकूर तर येथील सलुखाची बोली लागली आहे आठाचौ दिवसानी फैसला होईलसा दिसतो. माहाराव पैका देत नाहीं म्हणोन लिहिले तरी जसे कर्म करतील तसे फळ पावतील. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१६५] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ८

[१७ जून १७५५]

राजश्रियांविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा स्वामीचे सेवेसी.

सा।। रामाजी अनंत सा।। नमस्कार विनंणी उपरी. येथील कुशल ता।। छ* ६ माहे रमजान जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें पावलें.

---

करून त्याकडून येवज घेत नाहीत' हे शब्द एका परकीय गवरनराचे आहेत. त्याची मीमांसा करण्याने परिश्रम वाचकास करावे लागतील [पेद २८ ले ८७] त्यावाचून या वातीचे रहस्य उमगणार नाही. यासबंधी विवेचन मालेत येईल.

तेथें लिहिलें वर्तमान तपसीलवार कळले. त्याचा आत्रसाल श्रीमंत राजश्री [जयाजी] आपा-साहेबांचें पत्रीं लिहिला असे त्यावरून कळेल. वरकड वर्तमान तरी अद्यापि प्रयंमच दिवस असे. पुढे होईल वृतांत त्याप्रों मागांहून लेहून पां जाईल. ।' नागोराहून किसनसिंग भाटी 'वगैरे आले होते. बोलीचाली सलुखाची ठीक जाहली. फिरोन रांगड्यानी लबाडी करून गावात गेले. आठाचो दिवसात झक मारून येउन पाया पडतील. कोणे गोष्टीची चिंता न करावी. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१६६] श्री * संवत १८१२ आषाढ शुद्ध ६

[१५ जुलै १७५५]

राजश्रियांविराजित राजमान्यं राजश्री

बाळोबा [गुळगुळे] स्वांमीचे सेवेसी

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। आषाढ * शुध ६ मुकांम नागोर प्रांत मारवाड जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वृत अवगत जाहले व राजश्री दादासाहेब व राजश्री सुभेदार [होळकर] देशास जावयासि दरकूच ग्वाल्हेर प्रांताकडून गेले. त्यांचे तपसीलवार वर्तमान लिहिलें त्याप्रमाणें कळलें. येणेंप्रमाणेंच सदैव स्वकीय कुशलार्थ लेखन करीत जाउन सानंदवीत असावें. सविस्तर अर्थ श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबांचें पत्री लिहिला असें त्यावरून कळेल. ।' हुंड्याचा मजकूर लिहिला तोही कळला. इकडील वर्तमान तरी जोधपुर नागोरास फौजा आहेत त्याप्रमाणेच आहेत. सलूख जाहालियावरी तपसीलवार लेहून पाठउ. पाटणचे कारेगर आसिले तरी लेहून पाठवणे म्हणजे आम्हास काही जिनस करवावयाचा आहे तो लेहुन पाठउ त्याप्रमाणें तयार करवावा. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१६७] ।'श्री

[१७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुळगुळे] स्वामीचे सेवेसी.

सो रामजी अनंत [दामोळकर] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पां ते पावले. लिहिले वर्तमान कळले. येथून जे लिहिणे ते श्रीमंत राजश्री [जयाजी] आपासाहेबाच्या पत्रीं लि॥ असे त्यावरून कळेल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१६८] श्री *संवत १८१२ भाद्रपद शुद्ध १
[७ सितंबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ *२९ जिल्कादपर्यंत मुकाम नागोर यथास्थित जाणून स्वकीये लिहिणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट होउन सविस्तर अर्थ कळला. राजश्री माहारावजी यानी एक लक्ष रुा। द्यावयाचा करार केला आहे देतील म्हणोन लिा. पा। पाटणचे यैवजी कर्जवाम करून यैवज पाठवावा तरी हुंडी होत नाहीं म्हणोन लिा। ते कळले. यैसियासी सदरहु दोनी यैवजाच्या हुंड्या करून यैवज सत्वर पाठवणे. येथे यैवजाची वोढ कसी आहे ही तुम्हांस ठावकीच आहे. तरी हर तरतूद करून यैवज पाठवणे. राजे माधोसिंगजीचे प्रंपचाचा मजकूर लिा। तो सविस्तर कळला. त्याची बुध त्यास सत्वरीच कार्यास येईल बहुत दिवस लागणार नाहीत. सदैव सविस्तर वर्तमान लेहून पाठवीत जाणे. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१६९] श्री * संवत १८१२ भाद्रपद शुद्ध ७
[१२ सितंबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्यं राजश्री
बाळोबा स्वामी गोसांवी यांसि.

सेवक रामाजी अंनत सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * ५ जिल्हेज जाणून स्वकीयं कुशल लेखंन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पाठविले ते पावलें. लेखनार्थ कळों आला परंतु जो हिसेब लिहिता तो वरचेवरीच उडवाउडव करून लिहितां यावरून काये म्हंणावें. पांचा लांखाचा तपसील लिहित तोही सुधा न लिहिलात व आषाढमासी पोर्णमेपावेतो सात लाख रुपये द्यावे तेहीं कांहीच लिहिलें नसा. अपूर्व आहे. याउपरी तन्ही सर्वही तपसीलवार लेहून पाठवणे. ।' दोन लाख बतीस हजार बाकी येणे आहेत. त्याज बावना हजाराचा तगादा लाविला आहे म्हणोन लिहिले तरी वरकड रुपये कोणी मागावे. पवारास अद्याप येक पैसा पावला नाही. श्रीमंताच्या ताकिदी वरचेवर येतात. पांचा लाखाची पधरा दिवसाची मुदत होती. त्यास तीन मास होउन गेले. सात लक्ष उन्हाळाअखर द्यावे त्याची तजवीज काय केली आहे हे काहीच लिहिले नाही. तरी अखेरामजीस पुसोन उत्तर ल्याहावे. वांयदा मुतलियासी अखेरामजीनी लिहिले आहे त्याप्रमाणे करावे लागेल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१७०] श्री * संवत १८१२ भाद्रपद वद्य ११
[१ अक्टुबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळोबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * २४ जिल्हेज मु॥ नागोर जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. तुम्हीं पत्र पाठविले ते पावले. प्रांत कोटे व पाठणच्या येवजी सत्तावीस हजार दोन रुपयाच्या हुंड्या जेपुरच्या करून पाठविल्या आहेत रुपये पावल्याचे उत्तर पाठवणे म्हणोन लिहिले. तर हुंडीपत्रे जैपुरास पाठविली आहेत. सही होउन येवज येईल तेव्हां जाब पाठउन देउ. राजे माधोसिंग याच्या फौजेसी व आपल्या फौजेसी युध्य जाले. कछव्याची फौज मोडली म्हणून लेखन केले तर पुढे राणोजी भोइटे[९८] वगैरे फौज पाठविलीच होती. मागून राजश्री

(९८) राणोजी भोइटे हे नाव पेशवेदप्तरात अनेक जागी आढळते. त्यापैकी भाग २, २१, २५ व २७सातील भोइटे हाच राणोजी होय असे नि सशय कळते राणोजी शिंद्याची मुलगी जानकीबाई ही भोइट्यास दिली होती ते घराणे बहुधा हेच असावे. पण पत्राभावी हे शुद्ध अनुमानच आहे अस्तु. १७५०पासून शिंद्याच्या सर्व स्वारीत हा भोइटे असून त्याचा प्रामुख्याने उल्लेख येतो. १७५२नांत तर त्याने स्वतन्त्र स्वारीच मारवाडात केली होती [भाग १ ले ९८] तेव्हापासून तो तिकडेच होता [पेद २ ले ३५] १७५७नात देखी निजामाच्या लढाईंतही होता [पेद २५ ले १७४] तेथून उत्तरेस आल्यानतर शाहापुरच्या वेढयात गोळीने ठार झाला शिंद्याचा तो 'सरनोबत' होता असे बखर ह्मणते. त्याच्या पश्चात् कोण झाला हे समजत नाही 'जनकोजी सिंदे याचा बक्षी सिवबा सेनवाई हा हिंदुस्थानचे लढाईत मयत जाला' असा मात्र निर्देश आहे [पेद २९ ले ४] पण बक्षी ह्मणजे सरनोबत नव्हे शिंदेशाहीत ही पदे भिन्न होती. आमच्या मते सावाजी शिंदे हा सेनापती असावा कारण रोहिलखडाच्या स्वारीसंबधी पेशव्याचें स्वतत्र पत्र याच्या नावे सापडतें. [कार्स ले ८२] भोइट्याच्या समागमे मारवाडच्या स्वारीत असून पानिपतानंतर उत्तरेकडील व्यवस्था तोच लावीत होता आणि तो दक्षिणेस गेल्यानतरच मागें खानाजी जाधव 'सेनापती' या नात्याने वागू लागला. [भाग १ ले ९८, २२८, २६३, २६५, २६६, २७१, २७३ भाग २ ले ७४] होळकराच्या वतीने जसा सटवाजी राजोले हा मुतालकी सिक्कामोर्तब वापरीत होता [चद्रचूड १ ले ४६] तसेच सावाजी शिंदे व खानाजी जाधव हे दोघे शिंद्याची मुतालकी चालवीत होते. याकूबअलीखान वकील याच्या मारफतीने अवदालीशी जो तह मराठ्याचा मथुरेस झाला त्यात हा जाधव व चितो कृष्ण वळे हे दोन प्रतिनिधी शिंद्याकडून होते. याच जाधवाला 'सरनोबत' असेंही ह्मटले आहे. १७७० पर्यंत तो या पदावर होता पुढें महादजी शिंदे याचा भाचा वहीरजी ताकपीर या जागेवर आला राघोबाने संधान साधून त्याला आपल्याकडे वळविले तेव्हा त्याचे पारपत्य होऊन 'शखलाबंधन' पावला. ही घटना १७७६ची आहे याच सुमारास होळकरशाहीतून मवाजी इगळे शिंद्याकडे आला त्याला हें पद मिळाले. सिवबा सेनवाईनंतर राघोबा पागे

नरसिंगराव[९९] सिंदे व खानाजी जाधव याजवरा फौज व सवाईराम यास देउन पाठविले आहे. बहुतेक सला होईल. सला न जाला तर लुटून घेतील. चिंता नाहीं. नागोर जोधपुर येथील बंदोबस्त पूर्ववतप्रमाणेच आहे. कांहीं व्यंग पडो न दिल्हे. कळले पाहिजे. जोधपुरी राजश्री संताजी वाबळे व जिवाजी पवार व हाडे व रामो हरी व अबदुलरसूल व बाबाजी कोळ पांचसहा हजार फौज आमची आहे व जगु पुरोहित व सारे मारवाडी रागडे तेथेच आहेत. बंदोबस्त पहिल्याप्रमाणेच आहे. नागोरास तो खासाच आहेत. नागोराभवताले गांव होते ते तमाम सारे मारले याजमुळें रसदही [मारवाडकराकडे] येउ पावत नाही. ॥ बहु काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [१७१] श्री * संवत १८१२ आश्विन शुद्ध ४
[९ अक्टूबर १७५५]

राजश्रियाविराजित राजश्री
वाळोबा स्वामी गो। यांसि.

पो। रामाजी अनंत नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। आश्विन * सुध ४ जांणून स्वकीयं लेखंन करीत असणे. यानंतर पत्र पा। तें पावले. लि। छ्त कळले. याप्रोंच सदैव वर्तमान ता।वर लिहित जाणें. ॥ बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

'बक्षी' होता १७६९त शिंद्याशी विरोध वाढवून पतन पावला तेव्हा सदाशिव मल्हार शेणवी बक्षिगिरीवर आला प्रथम इग्रजाकडे आणि नतर बादशाहाकडे तो वकिलीवर गेला तेव्हा जिवबा केरकर हा बक्षी झाला ही गोष्ट १७८२ नतरची होय यापूर्वी केरकर कधीच सेनापती सरनोबत किंवा बक्षी नव्हता पानिपतानतरच केरकर मेवाडात 'कमाविस' करु लागले प्रथमत १७७४त शिंद्याच्या पदरी पथकदार या नात्याने जिवबा राहिला अशी वस्तुस्थिति असता चरित्रकाराने बराच पाल्हाळ केला आहे. तो अवास्तव होय हे सप्रमाण पुढें सविस्तर समजेलच सिवबा शेणव्याची मुलगी होती तिचा सबध कदाचित केरकराशी जुळून आला असेल तर गोष्ट वेगळी आहे मात्र तसा सदर्भ कोठे सापडत नाही

(९९) पहा भाग १ ले ५, ५० टीप १०, ६२ 'चिरजीव साबाजी सिदे नालशास पोहोचत नाहीं' असे राणोजी शिंद्यानी सबोधिले असून [पेद २७ ले ६३] 'आमचे अकारीक साबाजी सिदे हिंदुस्थान प्राते चाकरीस आहेत' असे निंबाबाईनेही म्हटले आहे. [पेद २९ ले ११] अर्थात साबाजी हा कन्हेरखेडकर शिंदे होता असे नि सशय होय. पेद २७ ले ३३चे वर्ष चुकलें असून ते १७५४च्या पूर्वी गेले पाहिजे अस्तु हा नरसिंगराव याचा पुत्र होता प्रसिद्ध मानाजी फाकडे याचाच मुलगा होय.

लेखांक [१७२] श्री * संवत १८१२ आश्विन वद्य ३

[२३ अक्टुबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * १६ मोहरम मु।। नागोर जाणोन स्वकीये कुशल लखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावलें. सविस्तर वर्तमान कलो आले. यजमाना[स] श्रुत करून प्रतिउतर पाठविले आहे त्यावरून कलो येईल. येथील वृत राजश्री नारो विठल लिहितील त्यावरून कलेल. प्रस्तुत माधोसिंग [कछवा] यानी आनरुद्दसिंगास आम्हावर पाठविले. त्याची दुमदारी[१००] राजश्री राणोजी भोईटे यानी छ । ९ मोहरमी मारुन हजारबारासे घोडे घेतले व तोपखाना घेतला. सातआठसे माणूस रजपुत कापून काढिले. हे वर्तमान तुम्हास कललेच आसेल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१७३] श्री * संवत १८१२ कार्तिक शुद्ध ७

[१० नवबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * ५ सफर मु।। नागोर जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. सविस्तर वर्तमान यजमानास श्रुत करुन प्रतिउतर पाठविले आहे त्याजवरुन कळो येईल. वरकड राजश्री नारबानानाचे पत्री लिहिले आहे त्याजवरुन कळेल म्हणोन लिहिले. त्यास नानानी आम्हास सांगितले की कांही जिनस करवणे आहे त्याची याद लेहून घावी परंतु आम्हीं याद लेहून दिल्ही नाहीं. का म्हणाल तरी आम्ही याद लेहून पाठविलियाने काम होणार नाही आणि आपणास श्रम घावे हे उतम नाही. याजकरिता याद लेहून पाठविली नाही. तुम्ही याल तेव्हां जे सांगणे ते सांगो. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

(१००) दुमदारी ह्मणजे चडोल सैन्याची पिछाडी. अताजी माणकेश्वर 'कार्तिक शुध प्रतिपदेस' म्हणजे ५ नवबर १७५५ रोजी मारवाडात पोचला. [पेद २ ले ५४] त्यापूर्वीच जयपुरकराचा सेनापती अनिरुद्धसिंग याचा समाचार शिंद्याकडील भोइट्याने दोन वेळा घेतला होता. पहिला ९ व दुसरा १४ मोहरमी. [ले १७२ पेद २ ले ५०] अर्थात अताजीपंताचे स्वकृतीमंडन अतिशयोक्तीचे भासते. [पेद २ ले ५४]

लेखांक [१७४] श्री * संवत १८१२ कार्तिक वद्य १२
[३० नवबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळोबा [गुळगुळे] स्वामीचे शेवेशी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. टीका घेउन येतो म्हणून लिहिले. तर उतम गोष्ट आसे. घोडे व हती चांगला पाहून बा। घेउन येणे. यादी पाठविली नाहीं म्हणोन लिहिले तरी आपण येथे आलियावरी जे सांगणे ते सांगो. सरकारात राजश्री गोविंदराव कृष्ण याजकडून श्रीमंतानी दोनसे उंट खा। करुन आणविले होते त्याजवरुन [त्यानें] पाटणास माणसे पाठविली. त्यास आपण उंट खा। करु दिल्हे नाही. जकातीचा तगादा लाविला. त्यास जासुदास बरेवाईट कमाविसदार बोलले म्हणोन येथे ये[उन] नानाप्रकारे सांगितले. तरी आपण प्रसंगी होता. श्रीमंताचे दस्तक होवे. येथील होते. ते [न] मानिले तरी काय चिंता आहे. हा आपला घरचा कारभार आहे परंतु श्रीमंताचे दस्तक न मानावे हे उतम नाहीं. बरे जे जाहले ते जाले. जासुदास ताकीदपत्रे देउन पाठविले आहेत. हे तुम्हाजवळी येतील. त्याजबा। आपली माणसे देउन उंट जे खा। केले असतील ते मुकुंदद्वारी पार करुन देवणे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१७५] श्री * संवत १८१२ पौष शुद्ध ६
[७ जनवरी १७५६]

राजश्रियांविराजित राजमान्यं राजश्री
बाळोबा [गुळगुळे] स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * ४ राखर जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. तेथें लिहिलें वर्तमान अवगत जाहलें. जेनगरचे वर्तमान तरी अनुरुदसिंग येथे आला आहे. सलुखाचा विचार बोलत असे. जेनगरास कासिद व सांड जातात व येतात. सिधांत ठरेल त्याप्रमाणें मागाहून लेहून पाठउंन देउं. कोटेंकरांकडील टीका घेउन येतो म्हणून लिं। तरी फार रोज येसेच लिहितां. अपूर्व आहे. लौकरीच टीका सामान व हाती

चांगलाच यसे घेउन येणे. दिरंग न लावणे. येतांना या समयांत च्यारपांच लाख रुपये येथे खर्चाकरितां तुम्ही आंणलेत म्हंणजे मोठासा तुमचा मजुरा धंण्याजवळ होईल. येविसीं हैगै सर्वथा न करणे. ॥ येथील वर्तमान तरी अनुरुद्धसिंग येथे आले आहेत. बोलीचाली होत आहेत. जोधपुर खाली करून द्यावयाचा करार जाला आहे. लौकरच येथील निर्गम होईल. वरकड माहागाई तरी फारच आहे. च्यारपांच सेर दाणे आहेत. तुमच्या मुलकात ताकीद करुन रस्त पाठवणे म्हणजे येथेच पैका सरकारात भरितील. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१७६] ॥श्री

[जून १७५६] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. यथील वर्तमानाचेविसी लि। तर नागोरवाल्यासी सलूख करुन कूच केले. याउपर जयेनगरच्या मुलकात जात आसो. कळले पाहिजे. ॥सविस्तर वर्तमान श्रीमंत राजेश्री [जनकोजी] बाबासाहेबाच्या पत्रावरून कळेल. कोटेकराचा तुम्ही आखेराम याचे गुजारतीने स्नेह सपादून आम्हास राणाजीच्या मुलकातून काढले त्याजमुळे खावंदाची इतराजी[१०१] कैलासवासी [जयाजी] आपासाहेब याजवरी जाली व च्यारपांचसे घोडी डोंगरात मेली. इतके केले कशास की आमचा कराराप्रा। पैका देतील. त्यास आज तीनच्यार वर्षे जाहली. अद्याप एका वर्षाचादेखील पैका वसुलात आला नाही. आम्ही मारवाडात गुंतलो होतो याजकरिता इतके दिवस वाट पाहिली. आता वाट पाहवत नाहीं. आमचा पैका बहुत येणे त्याची वाट होत आसिली तरी उत्तम आहे. नाहीं तरी माहारावजीच्या मुलकात यावे लागेल. महिना पंधरा दिवस त्या मुलकात राहोन पैका घेणे लागेल. ये गोष्टीची काये ते तरतूद करावयाची असेल ते माहारावजीस पुसोन करावी आणि उत्तर सत्वर पाठवावे. बाळोबा [जयाजी] आपास कैलासवास होउन नवदहा महिने जाहले. अद्याप टीका पाठवावयासि अनकूल पडले नाहीं. राजे माधोसिंग व राणाजी वगैरे यांचे टीके आले आणि कोटेकरास टीकादेखील पाठवावयासी

---

(१०१) पहा भाग १ ले ९८ १७५२तील भोइटे व साबाजी शिंदे यांच्या स्वारीचा हा हवाला दिसतो.

आनकूल पडले नाहीं. असा कसा हो भाउपणा[१०२] तुम्ही व आखेरामाने केला. वरे जे तुम्ही करिता ते उत्तम करिता. पाटणचा यैवज लौकर पाठउन देणे. बहुत काये लिहिणे हे विनती.

---

लेखांक [१७७] श्री * संवत १८१४ चैत्र वद्य ३
[७ अप्रेल १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळोबा [गुल्गुले] स्वामीचे सो.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * १७ रजब जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. पत्र पा। ते पावलें. लिहिलें वर्तमान तपसीलवार कळों आले. त्याचा जावसाल यजमानाचे पत्रीं लि। असे त्यावरून कळेल. तिकडील वर्तमान पठाणाचे [अब्दाली] देखील तत्वता आणवीत जाउन वरचेवरी लेहून पाठवीत असावें. येथेंहीं फौजेची तयारी जाली. याउपरी जलदीनेच निघोन तिकडे येणार आहेत. कळले पाहिजे. ।' आम्हीं पुण्यास गेलो होतो ते काली संध्याकाली श्रीगोंदास आलो. लौकरच समजाविसी नालबंदी होउन लस्करासहवर्त[मान] श्रीमंत त्या प्रांते येत आहेत. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

---

लेखांक [१७८] श्री * संवत १८१४ आश्विन शुद्ध १२
[२५ अक्टुबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * ११ माहे सफर मु॥ लस्कर येथास्थित जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान कळले. इकडील वृत सविस्तर श्रीमंत राजश्री [जनकोजी] बाबासाहेबाच्या पत्रावरुन सविस्तर कळल. ।' प्रस्तुत औरंगाबादेजवळ मुकाम आहे मोगलाचा बिगाड जाहाला आहे. येक झुंझ चांगले जाहले. मोगला कडील हणमतराव [निंबालकर] याचा मेहुणा [माने] कामास आला. कळले पाहिजे. आम्हाकडील कोणी मातबर जायाच जाहाला नाही. बहुत काय लिहिणे हे विनती.

पो छ ५ राखर
[१७ दिसंबर १७५७]

---

(१०२) कोटेकरांशीं शिंद्याचा 'भाउपणा' होता आणि तो अखेरामाच्या विद्यमाने वढून आला असे स्पष्ट होते मात्र त्याचा काळ कळत नाही

लेखांक [१७९] श्री * संवत १८१४ आश्विन वद ३
[ ३० अक्टुबर १७५७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १६ माहे सफरपर्यंत यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. वरकडे इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजेश्री [जनकोजी] बाबासाहेबाच्या पत्रावरुन कळो येईल. ।' इकडील वर्तमान तरी मोगलाचा आमचा बिगाड जाहला. येक जुंझ जाहले. मोगलास मोडून गोठात घातले. राजश्री हुनमंतराव निंबाळकर याचे मेहुणे नागोजी माने ठार पडले. वरकडही कितेक लोक त्याचे मारले गेले. आपणास कळावे म्हणून लिहिले आहे. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१८०] श्री * संवत १८१४ मार्गशीर्ष वद ११
[५ जनवरी १७५८]

चिरजीव विजईभव राजमान्य राजश्री रामाजीपंत यासी प्रति हरी अन[त] असिर्वाद उपरी. येथील कुशल तागाईत मार्गसीर्ष * वा। येकादसीपावेतो समस्त सुखरूप असो विशेष. तुम्हीं पत्र मार्गशीर्ष वा। पंचमीचे पाठविले ते पावोन सविस्तंर वर्तमान कळो आले. मोगलाचा सलूख जाहाला पंचवीस लक्षाची जाहागीर व किला बावा याप्रमाणे करार जाहाला म्हणून लिहिले तरी उत्तम गोष्ट जाहली. श्रीमत राजश्री विस्वासराव [भट] याची प्रथम स्वारी फते जाहाली तेणेकरुन बहुतच गोष्ट उतम जाहाली. तुम्हीं पत्री लिहिले की अलीकडे पत्र येउन वर्तमान कळो येत नाहीं. त्यास मार्गसीर्ष शुध्र पक्षी येक व येक शु॥ १४ येसी दोन पत्रे नवगावीहून माणसे कागद राजश्री गणेशपंत याजकडून घेउन आली होती त्याजबरोबर सविस्तर वर्तमान लिहून पाठविले होते. ती पत्रे गणेशपंतानी तुम्हाकडे पाठविलीच असतील. त्याजवरुन सविस्तर वृत कळो येईल. सौभाग्यवती जानकी मार्गशीर्ष शु॥ प्रतिपदा प्रसूत जाहली. पुत्र[१०३] जाहला.

(१०३) ही जानकीबाई रामाजीपंत दाभोलकराची पत्नी होय. तिला हा तिसरा मुलगा झाला. त्याचें नाव मोरोबा असे होते.

हे वर्तमान लिहिले आहे. ती पत्र पावलीच असतील. त्याजअलीकडे सौभाग्यवती रखमीण तीर्थस्वरुप राजश्री कृष्णाजीपंत दामोळकर याची स्त्री मार्गसीर्ष वा प्रतिपदेस प्रसूत जाहाली. पुत्र जाहाला. कळावे म्हणून लिहिले आहे. वरकड घराचे काम तरी खोली व मजला होउन वरील मजले याच्या तुल्या माजघरच्या घातल्या. वरकड राहिल्या आहेत त्याही येकादोहो रोजानी घालितो कोकणचे काम तरी जेवरे याचे देवाल्ये दगडी काम जाहाले लाकडी कामास गणेशभट याजकडून लाकडे तोडविली होती. त्याणी दोन घेपा सोटेयाच्या गलबत भरून ठिकाणी पोहचउन आले. वसणीचे काम आहे तैसेच आहे. घोड जोसी चालो देत नाहीं. या प्रकारचे वर्तमान आहे. चिरंजिवाचे लग्न करावे येदा येसे आमच्या चितात आहे. त्यास राजश्री मोरो नारायण याची थोर मुली होती तिचे लग्न मार्गसीर्ष मासी जाहाले. लहान मूल आहे तिचे नावनक्षत्र पाहिले व त्याणीही आमच्या मुलाचे नांवनक्षत्र पाहिले. ते उत्तम आले. त्यास प्रस्तुत मोरो नारायण याची स्त्री कोनी निघावयास जाहाली आहे. आठपधरा दिवसानी प्रसूत होईल. उपरात माघ शुध त्रतियेस कार्ये सागणे ते सागो ऐसे बोलिले. त्यास मोगलाचा सलुख जाहाला. वरकड तुमचे कामकाजाची व मोगलाने जाहागीर श्रीमतास दिल्हे आहे त्याचा बदोवस्त जाहा[ला] म्हणजे श्रीमताची आज्ञा घेउन घरास यावे. माघमासी अथवा फाल्गुनमासी लग्नकार्य करुन घ्यावे ऐसा आमच्या चितात आहे. मोरो नारायण याचे चितामध्ये आहे की तुम्हासी शरीरसमध करावा. प्रस्तुत ते मलठणास गेले आहेत. तुम्ही पत्राचे उतर पाठउन देणे. राजश्री राघोपंत राजवाडे व चिरंजीव येथे बरीच आहेत. राजश्री राघोपंत देशमुख खाली [कोकणांत] गेले आहेत ते बोलिले की वसणीचे का[म] अम्हास पावले. तुम्हीं कांही चिता न करणे. त्यास त्याचे उतर आले म्हणजे लिहून पाठउ हे असिर्वाद.

आपत्ये माहादेव देवाने [?] सिरसां नमस्कार. लोभ करीत जावा.

---

लेखांक [१८१] श्री * संवत १८१४ पौष वद्य ११
[४ फरवरी १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता पौषे * वद्ये ११ मुकाम पडतूर जाणून स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले

ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. इकडील अर्थ सविस्तर श्रीमंत राजश्री [जनकोजी] बाबासाहेबांच्या पत्रावरुन कळो येईल. श्रीमंताचा व मोगलाचा सलुख जाला. पंचविसा लक्षाची जागीर व नळदुर्गचा किला श्रीमंतास दिल्हा. मोगल व मुसा बुसी औरंगाबादेस गेले. याउपरी आम्हांस आज्ञा लौकरीच होणार. गुजराथ प्रांते आमच्या येजमानास येदा स्वारी नेमिली असे. तिकडील कार्य जालियानंतरी तुम्हांकडेही लकरीच येणे होईल. आलियानंतरी सर्व बंदोबस्त करुन दिल्हा जाईल. चिंता न करावी. बहुत काय लिहिणे ॥ लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१८२] ॥ श्री * संवत १८१४ माघ वद्य ५

[२८ फरवरी १७५८]

तीर्थरुप राजश्री [हरीपत]दादा वडिलाचे सेवेसी

अपत्यें गमाने चरणावरी मस्तक ठेउन सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता माघ * वद्य पंचमीपावेतो सुखरुप आसो विशेष. आपण दोनचार पत्रे पाठविली ती पावली त्याजवरुन सविस्तर अर्थ कळला. ऐसियास आमचे येणे ये समई होत नाहीं. गुजराथ प्राते जावे लागते. घर तयार जाहाले म्हणोन लिहिले उत्तम गोष्ट केली. सोपेही लागलेच होत आसिले तरी करावे. यातच उत्तम आहे परंतु सामान तयार नसिले तरी उगीच जिवाची वोढ न करणे. पुढे होतील. तुमच्या समाधानानें येंदाच करावे असे आसिले तरी येदाच करो. आपला मनोदये असेल तसे करावे. आमचा आग्रह नाहीं. मुलाचे लग्न वैशाखमासी खामखा करावे. आम्हीं आलो नाहीं म्हणोन काही चिंता नाहीं. येक मूल व सोयरा चागला ग्रहस्त पाहोन शरीरसमध करावा. कोकणात जाणे आसेल तरी जावे आगर काम नसेल तरी न जावे. बहुत काये लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१८३] श्री * संवत १८१४ फाल्गुन शुद्ध २

[११ मार्च १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्यं राजश्री

बाळोबा [गुल्गुले] स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल ता छ* १ माहे रजबपर्यंत मुकाम मोजे सिवोद मा हासलपूर येयास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. तपसी वर्तमान लिहिले त्यांप्रमाणे संविस्तर कळले. यानंतर इकडील वर्तमान तरी मोगलांचा व श्रीमंतांचा सला जाला. उपरांत

अमदाबाद प्रांते जावयाची आज्ञा केली त्यावरुंन दरमजलीनेच करवतवारीचा घाट उतरुन आलो. हे वृत आमदाबादेच्या मोगलास कळताच दहशेद खाउन राजश्री सदासिव रामचंद्र [सुखटणकर] यांसी सलूख केला. खंबायेत दरोबस्त व नगद रुपये लक्ष आमदाबादेच्या मोगलास दिल्हे तेव्हां ठांणे खाली करुंन दिल्हे. तदोतरी मजलदरमजल तुम्हाकडे येतो. तुम्हीही पुढे सामोरे येणे. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीची पत्रे करवंदवारीचे मुकामी आली की तुमची रवानगी जाहली हे वर्तमान आमदाबादेस गेलियावरी [मोगलानें] सलूख करुन आमदाबाद खाली करुन दिल्ही. राजश्री सदासिव रामचंद्र याचे ठाणे बसले. आता तुमचे जावयाचे प्रयोजन नाही. तुम्ही उजनीस जाणे. मागून राजश्री दताजीपाटील [शिंदे] आलियावरी पुढे जाणे म्हणोन पत्रे आली. त्याजवरुन कुच करुन माळव्यात आलो. प्रस्तुत च्यार दिवस राजश्री पाटीलबावा मागून येत तोपावेतो कोट्याच्या मुलकात राहोन पैका घ्यावा लागतो. तरी तुम्ही पुढे येणे. तुमच्या विचार जो मनसबा करणे तो करावा लागेल. ॥ याज-करिता सत्वर येणे. आम्ही उजेनीस गुतत नाहीं. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

पो छ ८ शाबान [ रमजान खोडून ]
[१७ अप्रेल १७५८]

---

लेखांक [१८४] श्री * संवत १८१४ फाल्गुन वद्य ११
[४ अप्रेल १७५८]

राजश्रियांविराजित राजमान्यं राजश्री
बाळोबा स्वांमी गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २५ माहे रजेब मुंा उजेन जाणोन स्वकीयं कुशल लेखंन करीत गेलें पाहिजे विशेष. पत्र पाठविलें तें फाल्गुण बहुल ११ येकादसीस सोमवारे मुकाम मजकुरीच पावले. वर्तमानाविसी लिहिले येशास येकादो रोजांत येथून कुच होउन मुकुदवरीने कोटें प्रांते मजलदरमजल येत असो. तुम्हाकडील पैका सर्वेही तयार असो देणे. वसुलास हैगै न कीजे. श्रीमंत श्रीपाटीलबावा मुलीच्या लग्नाकारणे श्रीगोंधास गेले. फाल्गुण सुध २ द्वितीयेचे लग्नकार्य[१०४] जाले. सवंतसर प्रतिपदेस श्रीगोंधाहूंन स्वार होउन लौकरीच तेही येणारसी त्यांची पत्रें आलीं आहेत. तुम्हांस कळावें यास्तव लिहिले असे. ॥ बहुत कायें लिहिणे हे विनंती.

---

(१०४) बाळाबाई या नावाची एकच मुलगी दत्ताजी शिंद्यास होती [भाग १ वंशावळी] तिचे लग्न या वेळी झाले. पुढें १७६४च्या सुमारास 'कैलासवासी पाटिलसाहेबांचे लेकीचे लग्न करणे आहे' असा लेख आला आहे तेव्हां दोन मुली होत्या की काय किंवा दुसरी लग्नापूर्वीच वारली ?

लेखांक [१८५] श्री * संवत १८१५ आषाढ शुद्ध २

[८ जुलै १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २ माहे जिल्काद जाणोन स्वकीयं कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. राघो केशव यांसि कोठ्यांत देवज्ञा जाली. तुम्हीं काहींच वर्तमान लिहिलेत नसा [तरी] अपूर्व आहे. असो. श्रीमंताकडील यैवजा सुटावयाचा नसे हें तुम्हींहीं जाणतच आहां. त्यांस आजी पावेतो पावले काये व पुढे त्याचा यैवज कितिक होणार त्याची पैरवी कैसी काये आहे हे तापशील लेहून पाठवणे ।" राघो केशव यासि देवज्ञा जाहली आणि आपण काहीच लिहिले नाहीं. हे आपूर्व आहे. श्रीमंताच्या सरकाचा यैवज पावता केला पाहिजे याजकरिता सविस्तर वर्तमान लिहिले पाहिजे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१८६] श्री

[अक्टूबर १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामी गोसावी यासि.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणे विशेष. वेदशास्त्रसंपन राजश्री व्यंकटाचारी सामवेदी याचे कर्ज मोहनराम तिवारी याजकडे आहे. मुदल रुपये ११६ त्यास वर्षे अकरा जाली परंतु भटजीचा निर्गम करुन दिल्हा नाहीं. वैदिक ब्राम्हण कुटुंबवत्सल श्रम करुन रु। मेळविले हे तिवारी मा।र याने बुडवावे हे उत्तम नाहीं. याजकरिता आपणास लि। असे. तरी मोहनराम तिवारी कोटयात राहतो यैवजदार आहे त्यास उत्तम प्रकारे ताकीद करुन आचारीबावाचे रु। व्याजसुधा देवणे. या ब्राम्हणाचा अगत्यवाद आम्हास आहे त्याप्रमाणे आंपण अगत्यवाद धरुन तिवारी मा।र यास व्रेवर्जन माकूल करुन व्याजसुधा सदरहु रुपये देवउन आम्हास उत्तर लेहून पाठवावे. तुम्हींही ब्राह्मणभक्त आहा विस्तर ल्याहावासा नाहीं. राजद्वारी साहित्य करुन गोदान देवविले पाहिजे. ।" बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१८७] श्री * संवत १८१५ माघ शुद्ध १३

[९ फरवरी १७५९]

राजश्रियांविराजित राजमान्यं राजश्री

बाळोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती. येथील कुशल तागायेतछ * १० जांखर मुां दरकूच लाहुरकडे जाणून स्वकीय कुशल लेखंन करीत गेले पाहिजें विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला अर्थ कळो आला. त्याचा जाबसाल यजमानसाहेबाचे पत्रीं लिहिला असे त्यावरुन कळेल. सरकारचा पैका कराराप्रमाणे लौकरीच वसुलात येई ते गोष्ट करणें. वरचेवरी वर्तमान लिहित जाणे. ।" बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखाक [१८८] श्री संवत १८१६ ज्येष्ट शुद्ध ५

[३१ मे १७५९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

कृष्णाजीपंत स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता जेष्ट * शुध पंचमी मुक्काम बागपत[१०५] सुखरुप असों विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले लिहिले की राजश्री गोविंदपंताजवल सात हजार रुपये दिल्हे तरी तो यैवज परभारा राजश्री नानाजी नाईकाचा आहे आमचे रुपये नव्हात याजकरिता राजश्री गोविंदपंतास सागोन त्याजपासून रुपये घेउन राजश्री अंताजी कासी उन्हेळकर याजवळ पावते करुन पावलियाचे उतर घेउन पाठउन देणे म्हणजे नानाजी नाईकांचे दुकानी जमाखर्च करउ. नाही तरी त्याचे आम्हावर व्याज चढेल याजकरिता लिहिलें आहे. आम्ही राजश्री गोविंदपंतास परभारे पत्र लिहिलेच आहे. तुम्हीं त्याजकडे माणूस पांठउन रुपये अंताजी कासी याजवळी पावते करुन पावलियाचे कबज पाठवावे. बहुत काये लिहिणे कृपालोभ आसो दोजे हे विनंती.

।"आपत्यें रामचद्राने चरणावर मस्तक ठेउन सिरसां नमस्कार विज्ञापना. सविस्तर श्रीमंत राजश्री भाउसाहेबाचे पत्रावरुन मजकूर ध्यानास येईल. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पा छ २५ जिल्काद

[२१ जुलै १७५९]

---

(१०५) हे स्थल यमुनेच्या तिरी दिल्लीच्या उत्तरेस १२ कोसावर आहे मराठे कुंजपुऱ्यास बाठले तेव्हा याच घाटावर अबदाली उतरला होता [खंड १ ले २६० पेद २१ ले १९७]

लेखांक [१८९] श्री * संवत १८१६ आषाढ वद्य १०
[१९ जुलै १७५९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
वाळोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रामाजी अनंत सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ * २३ माहे जिल्काद जाणोन स्वकीयं कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पत्र पाठविले ते पावले. तेथें लिहिला मजकूर त्याप्रमाणें अवगत जाहला. त्याचा जाबसाल जो लिहिला तो श्रीमंत राजश्री रावासाहेबांचे पत्री लिहिला असे त्यावरून कळेल ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती

---

लेखांक [१९०] ॥श्री * संवत १८१६ कार्तिक वद्य ११
[१५ नवंबर १७५९]

तीर्थरुप राजश्री हरीपंतदादा वडिलांचे सेवेसी.

अपत्यें रामाने चरणावरी मस्तक ठेउन सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता कार्तिक * वद्य ऐकादसीपावेतो मुकाम शुक्रताल गंगातीर[१०६] वडिलांचे आसिर्वादें करुन सुखरुप असों विशेष. आपणाकडून दोनचार पत्रें आलीं ती पावोन बहुत समाधान जाहाले. ऐसेच सदैव पत्र पाठउन सांभाल करीत असावें. आपण देवळांच्या कामासाठी गावास जाणार होतां त्यास जाणे जाहालें की नाहीं ते सविस्तर लिहिलें पाहिजे. इकडील वर्तमान तरी नजीबखान रोहिले यासी युध्यप्रसंग होत आहे. आमच्या फौजा श्रीगंगापार गेल्या होत्या त्या[स] त्यांनी गंगापारचा मुलुक जाळून राख केली. येकदोन युध्यें मोंगलाचे [रोहिले] फौजेसी जाहाली. पुलावर येउन पुल तोडावा इतकियात सादुलाखान रोहिला व दुदेखान व ह्याफिजरहिमतखान रोहिला पांचसात हजार फौज आली. त्यासी युध्य थोडेसे जाहले. तेव्हा ते जलालाबाद म्हणोन नजीबखानाचे कबिले राहात होते तेथे जमा होउन सारे राहिले. त्याजमोवते आमचे लोक दोन चार दिवस राहिले. येक हती व बाणाच्या गाडया व जेजालाचे उट व घोडी लस्करात मोंगलाची आणिली. सारा मुलुक वोस होउन पाहाडात गेला व नजीबखानाचेही

(१०६) रामाजीपंत दाभोळकराची अनेक पत्रे पेशवेदप्तरांत प्रकाशित झाली असून त्याचें अक्षरही देण्यात आले आहे मग पेद २ ले ११४अ हे पत्र सशयित का रहावे आणि फेरविचार करणाराची शंका निवारण होण्यास आधार कोणता असा प्रश्न साहजिक उभ्दवतो [पाफे पान४०] पानिपतसंबधी विचारात घेण्यासारखी अशी अनेक महत्वाची पत्रें आहेत त्यात याचा समावेश करिता येईल पण ती दाभोळकराचें पत्र ह्मणून कदाचित्‌च होऊ शकेल असे निदान आम्हास वाटते.

लोक शुक्रतालाहून गंगापार बहुत गेले. नजी[ब]खानाजवळ लोक थोडे राहिले याजमुळे येकादो रोजी नजीबखान पळोन जाणार होता परंतु सुज्यातदौला आयोध्येचा सुभा रोहिल्यास कुमकेस दाहा हजार फौजेनसी आला त्याजमुळे आपल्या फौजा गंगापार होत्या त्या आलीकडे उतरोन आल्या. सुज्यातदौला पुलापलीकडे येउन राहिला. छ १२ रबिलोवली नजीबखानाच्या त्याच्या भेटी जाहाल्या. तेच दिवसी त्याची फोज गोसावी वगैरे हजारपाचसे पुलावरु[न] आलीकडे आली. युद्धप्रसंग करावा हे चितात आणून खंदकाबाहेर थोडेसे दूर आले तो इंकडून आमचे लोक उठले व तोफाचा मार दिल्हा तेव्हां ते पळोन लागलेच पुलापलीकडे गेले. ते फिरोन माघारे आले नाहीं. रोहिल्याच्या चिनाम व सुजातदोल्याच्या चितास सलूख करावयाचे आहे. पुढे होईल ते लिहून पाठउ. कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१९१] श्रीकृष्णजी * संवत १८१६ माघ वद ४

[५ फरवरी १७६०]

[नकल]

सिधश्री राजश्री लाला प्राणनाथ बनसीधर जोग राजश्री रामाजी पडितां को नमस्कार बांचजोजी. आठा को समाचार भलो छे उठा को सर्वदा भला चाहिजें. आप्रंच. पत्र तुम्हारो आयो सो पायो. हकीकत बिगतवार लिखी सो जाणी. सो परंतु मने जेते साहित्य पत्र मंगायो सो भेजे हैं सो लेणा. अर आपणों काम करणा. हरि हमेसा खतपत्र लिषत रहियो मीति माह * बद ४ समत १८१६ और वर्तमान पंडत गोविंदजी कहेंगे उस माफक करणा. मिती मजकुर.

---

लेखांक [१९२] श्री * सवत १८१६ माघ वद ४

[५ फरवरी १७६०]

नकल हस्ताक्षर लक्ष्मण केशव वैद्य

पुा राजश्री गोविंद भगवंत स्वामीस

विनंती. प्राणनाथ बसीधर सावकार याजकडे आमचा ऐवज जमा आहे त्यास तों येवज राजश्री नानाजी नो येवलेकर[१०७] याचा गुमस्ता राजश्री रामाजी नाईक उजनींस आहे त्याचे पंदरी घालून आम्हास लेहून पाठवणें. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(१०७) हा येवलेकर शिंदेशाहीत सावकार असून तो अवंतिकेत रहात असे त्याची दाभोळकराची देवघेव होती याची पत्रें पुढे पहावयास मिळतील याच सुमाराचे तिसरे पत्र इतिहाससंग्रहात प्रसिद्ध झाले आहे [ऐति १ क्र १४]

लेखांक [१९३] श्री * संवत १८१७ कार्तिक शुद्ध १

[८ नवंबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १९ माहे रावल मु॥ पाणिपत जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले तें पावले. लिहिलें वर्तमान कळले. आज्ञेप्रमाणें राजश्री रामचंद्र कृष्ण याचे वरातीचें रुपये पावते केलें म्हणून लिहिलें [तरी] बहुत उत्तम गोष्ट केली. इकडील वर्तमान तपसीलवार श्रीमंत राजश्री [जनकोजी] बाबासाहेबांच्या पत्रावरून कळेल. हमेशा पत्री आनदवीत जावे. ।" बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [१९४] ।"श्री * संवत १८१७ मार्गशीर्ष वद्य १३

[४ जनवरी १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालजीबावा [गुळगुले] स्वामीचे सेवेसी.

सेवक रामाजी अनंत[१०८] [दामोलकर] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २६ माहे जमादिलौवल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. कोटेंकराचे व पा। पाटण येथील वर्तमान लिहिलें तें सविस्तर कळलें. त्यास अमित्राचें पारपत्य जाल्यानंतर सर्व पादाक्रांत होतील. चिंता नसे. पा। पाटण येथील मजकूर लिहिला त्याचे प्रत्योतर श्रीमंत राजश्री [जनकोजी] बाबासाहेबांच्या पत्री लिहिलें आहे त्यावरुन कळेल. सदैव पत्रद्वारे आनंदवीत जाणे. तुम्हीं वारंवार तोटयाचा मजकूर लिहितां परंतु खावंद मसलतसीर सारी इमारत त्याच प्रांतीच्या येत्रजात्री आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

(१०८) दामोलकर पानिपताहून निभावला पण मागे येत असता मार्गात त्याचा घात झाला असे बखर ह्मणते त्यास 'वाट दाखवावयापुरते रामाजीपंत उभे होते. अलमी होउन पडलें' अ शी नानाफडणीसाची साक्ष आहे. [कास ले १९२] ले २९७ हे पत्र- आत्मचरित्रापूर्वीचें होय.

लेखांक [१९५] श्री * संवत १८१८ कार्तिक वद्य १०
[२१ नवबर १७६१]

सेवेसी हरी अनंत कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. ता कार्तिक * वद्य १० पावेतों स्वामीच्या कृपाकटाक्षेकरून येथास्थित असो विशेष. स्वामीनी कृपा करुन आज्ञा पत्र पाठविलें ते पावोन सिरसा वंदिले. सनाथ जाहालों. पत्रीं आज्ञा की या दिवसात सरकारांत पैक्याची निकड. मोगलासी [१०९] विवाड जाहाला. फाजेच्या पोटास पाहिजे यास्तव तरतूद करुन कांही ऐवज पाठवणं म्हणोन आज्ञा. ऐसीयास स्वामीस आज मसलत आहे. या दिवसांत पैका भारी पाहिजे यास्तव स्वामींनी आज्ञा केली त्याच आज्ञेप्रमाणे तरतूद करावी संदेह नाहीं परंतु सेवकाचा प्रकार आहे तो धण्यास विदिनच आहे. चिरंजीव राजश्री रामाजीपंत सिंवाकडील कारभार सरकारसेवा करीत होते. त्यापूर्वी धण्यानी आज्ञा चिरंजीवास केली तेव्हा चिरंजीवाने यथास्थित रीतीकडून सरकारांत याद सुद यावयाची दिल्हीं. धण्यानीही कृपेकरुन आज्ञा केली त्याप्रो वर्तणूक केली. प्रस्तुत चिरंजीवचा प्रकार असा जाहाला. मजला कांहीं चिरंजीवाचे हरएकविषई ठावके नाहीं व ठावके त्याणे करावे तरी या गोष्टीची मजला गरजच नाहीं. सेवक स्नानसंध्या करुन स्वामीस अभिष्ट चितून सुखरुप आहें. दुसरे जाणत नाहीं. कांहीं कामाकाजाची माहित-गिरी चिरंजीवाच्या संवसाराची मजला नाहीं. हे वर्तमान जगजाहिर सर्वांस विदित आहे. मजकडे तिळप्राय कांही गुंता नाहीं तथापि या प्रसंगी धण्यास निकड आहे जाणोन कोठ कर्जवाम करुन दहापांच हजार रुपये घेउन दूर्त सरकरात भरणा करावा तरी साहुकारीत आजी मोठी अडचण. येक पैसा कोण्हाकडून निघणे नाहीं. असा प्रकार घडला. लाजवाब. काही इलाजच चालेना यास्तव शेवेसी लिहिणें लागलें. कृपा करणार स्वाम धणी आहेत. सारांश मी रामाजीपंत याचा भाउ मागनं वडील यावरुन मजला स्वामीनी आज्ञा करावी [हें] विहित. सेवकानेही सरबरा या गोष्टीची करावी परंतु याचा भाउ इतका मात्र सेवक बदनाम. बरकड तिळमात्र त्यांच्या संसारास मी वाकफ नाहीं. सेवेसी श्रुत व्हावे कृपा केली पाहिजे हे विज्ञापी.

---

(१०९) 'देशात दक्षणचा मोगल उपद्राप करील' असे सटवाजी जाधवाचे भाकित होते [खंड ६ ले ४०९] त्याप्रमाणे पानिपतानतर निजामाने दक्षिणेत उचल घेतलीच त्या वेळी खर्चाची टचाई ह्मणून राघोबाने 'सग्रही गृहस्थास लुटिले. अकरा आसाम्या नेमल्या तीन गृहस्थाकडूनच ३९ लक्ष घेतले' त्यांत दाभोळकरही होता याविषयी नारो कृष्ण वळे याचे पत्र वाचनीय आहे भरारीच्या कारभारास आरंभ असा झाला.



# चिंतो कृष्ण वळे

### याचा अस्सल पत्रव्यवहार.

---

१८०२–१८३५ विक्रमी.

---

लेखांक [१९६] श्री * संवत १८०२' माघ वद्य १३

[७ फरवरी १७४६]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

व.ळोबा स्वामीचे शेवेसी.

पो कुसाजी[११०] कोनेर [वळे] कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २६ मोहरम मुकाम वराड[१११] प्रांत जाणून स्वकीय लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. तुम्ही श्रीमंतास पत्र लिहिले होते ते त्यास अक्षरशः वाचून दाखउन त्याचे प्रतिउत्तर पाठविले आहे त्याजवरून कळो येईल.

---

(११०) याचे उपनाम वळे हा श्रीगोंद्याचा रहिवासी असून राणोजी शिंद्यांचा लेखक होता. त्याची केवळ बारा पत्रें उपलब्ध होतात. याला चार मुले होती पहिला महादाजी दुसरा चिंतोपंत तिसरा घोडोपंत व चौथा नारोपंत ते सर्व शिंद्यांचे आश्रित होते. त्यांची पत्रें व्यक्तिशः पहावयास मिळतील त्यांपैकी चिंतोपंत हा चतुर असून वडिलांदेखतच वावरू लागला होता आणि विशेषतः प्रसिद्धि पावला जयाजी, जनकोजी, दत्ताजी व महादजी शिंदे याचा तो लेखक होता. यांचे वंशज ग्वाल्हेरीस असून एक शाखा श्रीगोंद्यास आहे त्या सर्वांकडे जाऊन प्रत्यक्ष तपास केला. पण कोठेंही पूर्वपानिपतीय कागद सापडले नाहीत.

(१११) वऱ्हाडच्या मार्गे शिंदे बुंदेलखंडात आले एवढेच पत्र सांगते. तारीखवार मुकाम कोठेच मिळत नाहीत.

राजकीय वर्तमान तर दर्त बुंदेलखंड प्रांते जावयासि वराडात आले आहेत. पुढे दर मजल जात आहेत. श्रीमंत राजश्री [रामचंद्र]बाबा यात्रेस कोंकणात गेले आहेत. ते मागून सत्वरीच येतील. तुम्ही भेटीस येतो म्हणून लिा तर बुंदेलखंडाआलीकडे रा [जयाजी] आपाची गाठ पडता दिसत नाही. रा [रामचंद्र] बाबाची खातमी राखणे. कदाचित तुमची त्यांची बऱ्हाणपुरानजीक गाठ पडली तर पडो. वरकड तुम्ही मागील हुंडियाचे वर्तमान लिहिले तर जमाखर्चात तुम्ही पूर्वी वसुलीजमा लेहून दिल्ही आहे यास्तव वारंवार लिहिणे लागते. कदाचित वसूल लेहून दिल्हा परंतु बाकी राहिली तर मागती थाट करून घेणार तुम्हीच यास्तव सूचना लिहिली असे. सदैव येणारासमागमे पत्र पाठउन संतोषवीत असिले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [१९७] श्री * संवत १८०४ पौष शुद्ध १
[२१ डिसेंबर १७४७] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो कुसाजी कोनेर [वळे] साा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ * ३० जिल्हेज मुा चांभारगोंदे जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावें. या नंतर आपण कृपा करून पत्र पाठविलें तें प्रा जाले. लिा वृत कळले. या प्रकारें सदैव आल्या वार्तिकासमागमें पत्रद्वारा सांभाळित असिलें पाहिजे. वरकड अर्थ यजमानसाहेबाच्या पत्रावरून श्रुत होईल. येंदा फौजा कुली त्या प्रांतेच येत असेत. पुण्याहून श्रीमत स्वामी तो मार्गेश्वर शुध ५ पंचमीस स्वार होउन जमाव होतहोत कैंदूरपावला[११२] कडे आले आहेत आपले यजमान [मागील] वर्षापेक्षा दुपटीने फौज ठेउन तयारी करीत असेत. वरकडही सरदार जलदीने तयारी करीत आहेत. सत्वरीच त्या प्रांते येतात विशेष काय लिा लोभ असो दीजे हे विनंती.

---

(११२) केंदुरपावलाकडे नानासाहेब कोणत्या साली गेले याचा शोध कोठेंही लागत नाही अर्थात पत्रसंकेतावरूनच मिती ठरविणे भाग आले ती निश्चित ह्मणता येत नाही तथापि १७४६ किंवा १७४७ खेरीज इतर कोणत्याही वर्षी जुळत नाही शिवाचा मुकाम याच सुमारास श्रीगोंद्यास शक्य होता दुसरे १७४६सातील बुंदेलखंडच्या स्वारीत शिवावस्तु एकट्याने काम सावरता आले नाही असा बोध होळकराने केला होता [पेद २१ ले. १५] तो कितपत योग्य होता हे सांगण्याचे

सेवेसी चिंतो[११३] कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती. उपर. यथील वर्तमान तीर्थरूपानी लिहिले आहे त्यावरून कलो येईल. सदैव पत्र पाठउन परामृष करीत जाणे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

हो विनंती पोष्यांकित माहादाजी रघुनाथ [१] सा। दडवत विनंती यैसिजे. तपसीलवार वृतांत लिहिले असे त्यावरून श्रुत होईल. लोभाभिवृधी कीजे हे विनंती.

---

लेखांक [१९८] श्री * संवत १८०५ वैशाख शुद्ध ९

[२६ अप्रेल १७४८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पोष्यांतरगत चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * ८ जमादिलौवल मुकाम बनास नदी जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण कृपा करूंन पत्र पाठविले ते पावले. श्रीमंताचे व सवाईजीचे सौरसाचे वर्तमानाविसी लिहिले. तर राजश्री माधोसिंग याचा करार पूर्वी ब्यार प्रगणे दहून समजावीस[११४] करावी यैसा करार केला होता. त्या

---

प्रयोजन नाही तथापि इत्युत्तर कोणाची अपेक्षा नसावी असा सकल्प करून सैन्य वाढविण्याचे धोरण शिद्यानी स्वीकारले ते यानतरच असले पाहिजे त्या मानाने वरील मिती दिली आहे.

(११३) कोनेर हे नाव कृष्णाचे आहे असे राजवाडे सागतात [खड १ ले ६५ टीप १४६] त्याचप्रमाणे कुसाजी हे देखील कृष्णाचेच नाव आहे असे हे पत्र बोलते कारण कुसाजीपताचा मुलगा स्वत स चितो कृष्ण असे स्पष्ट लिहीत आहे ते शास्त्रोक्त होते की नव्हते हे सागण्याचा अधिकार नाही. केवळ धारण करणाराची धारणा काय होती इतकेच दर्शविणे इष्ट आहे आणि हाच प्रकार 'माधव' ह्मणजे 'महादजी' या नावासबधी होय [खड ६ ले ४२० टीप]

(११४) कुसाजी वळे याचे असल पत्र उपलब्ध नाही. 'पौषातरगत' चितोपताचे हे पत्र होय. ते नवाईच्या स्वारीसबधी असून मुकाम अगदी स्पष्ट आहे हा प्रसग ईस्वरसिंग व माधोसिंग या बधूच्या 'समजाविसीचा' आहे या वेळी पेशवा प्रत्यक्ष प्रसगी होता. त्याच्याच विद्यमाने ही 'समजावीस' झाली सवाई जयसिंगास दोन मुले होती वडील ईस्वरसिंग व धाकटा माधवसिंग. त्या दोघात गादीविषयी वाद पडला त्याचे मुख्य कारण एवढेच की धाकटा मेवाडच्या मुलीचा मुलगा होता आणि मेवाडच्या मुलीचा वश गादीचा मालक होईल असा करार राजपुताचा मेवाडकरांशी झाला होता [Tod Rajasthan vol 1 page 334] त्याला मोगल किंवा मराठे याची समती नव्हती म्हणून जयसिगाच्या पश्चात् ईस्वरसिंग वडील मुलगा या नात्याने गादीवर आला त्या वेळी

प्रमाणे टोंक तोडा माल्पुर हे तीन प्रगणे नवाईच्या मुबादला आणखी गाव देऊन समजावीस केली. बूंदीचे राज त्याजकडेच ठेविले. दो रूपयाची जागा मात्र उमेदसिंगास द्यावी आण सरकारची चाथाई द्यावी. यासिवाय मागील बाकी राहिली आहे ते द्यावी. दुसरे हाली मेजवानीदाखल काही करार करून सारस जाला. ये गोष्टीस तीन

---

मेवाडकराने माधवसिंगाच्या वतीने मोठें आमिष दाखविले पण ते मोगलास पचनी पडू शकले नाही. मुख्य नड मराठ्याची होती त्यानी वडील मुलाचाच सतपक्ष उचलला [खड ६ ले ३५७] आपसातील करार निकामें 'मराठे बोलतील ते करतील' या दृष्टीने मेवाडकराने मग मराठ्यास मथविले होळकराच्या मध्यस्थीने सधान चालविले 'राणाजीनी कनीराम आपणापासी पाठविला होता माधोसिगाचे राजकारण आपण नेमस्त केले की चौविसाची जागीर त्यासी द्यावी पधरा त्याजपासून घ्यावें येविसी रामचद्रबाबास आपण लिहिले होते त्यासी तर आपल्या केलियाची ममता आपला अभिमान सिधीस न्यावा. स्वामीकार्यें बुडिले तरी बुडो यामुळे कितेक परियाये करून पत्रे लिहिली आहेत तरी राणाजीनी आम्हासी करार केला आहे की २५ लक्षाचा माधोसिगास पटा द्यावा २० नजर घ्यावी. येविसी तिलतुल्य असत्य नाही बूदीचे कार्य आपले हातून विल्हे लावलियाने कार्यसिधी चागलीच होउन सर्व राजकारण बाव खात्यात बाबाचा कारभार येकबोळी मूल [शिंदे] तर अज्ञान न आयकेत [पेद २७ ले १८] अवघे राजे पदरी पडून दुव्यसाध्य होउन लौकिक उत्तम होतो येवटी आपल्याआपल्या मधे समजोन राजकारण विल्हे लागतील परतु आपले कार्य ये गोस्टीने साधत नाही यास्तव आपले हाते स्थापित केलिया कार्यसिधी होउन सर्व राजे अकित होतात काडीमात्र नाश होउ देत नाही हेही प्रतिज्ञापूर्वक सेवेसी लिहितो परतु इतके होउन येक रामचद्रबाबाच्या मात्र अभिमानास अतर पडते त्यामुळे ते तडफड करून अन्योन उपाये करून खरेलटके दर्शउन लिहितील त्यावर न जावें' [पेद २७ ले १९] ईस्वरसिंग माधोसिंग याचे मजकुराचे उत्तर उदासीनता दाखउन निराली टाकून लिहिले एथियास तुम्ही या प्रकारे लिहावे येसे नाही ज्यात अति दुर्निमित्य नाही वर घरकलह वृथ न होय येसे प्रकारे करणे तुम्हासच पडेल राणाजीही तुमचे व तेही तुमचे विचार करून तोड दबावाने केलियाने होईल येसे दिसते ' [पेद २७ ले २६] पेशव्याच्या वरील पत्रासिवाय अमृतराव शकर याच कामासाठी सोबत्याकडे गेला होता 'बावदाचे आज्ञाप्रमाणे सरदारास सागतले त्यास माधवसिंग व ईस्वरसिंग याजकडील मनसबियाचा घोर मोठासा पडला होता तिकडील कार्यानिमित्य रामचद्रबाबाचे व राजश्री मल्हारबाबाचे मनोधारण करणे लागले बहुता प्रकारे स्तव करून मरजी ठिकाणास आलियावरी येथेच सिधात होणे तो जाहला' [पेद २७ ले २८]

'साप्रत सरदारानी स्वामीच्या आज्ञाप्रमाणे माधोसिंगास टोक तोडा मालपुरा व नेवाई हे चान्ही परगणे अठरा लाखाची जागा मुकरर करून बूदी हाडयास द्यावी हाडयानी ईस्वरसिंगाची रफाकत करावी सरकारचे पैसे द्यावे व नेणवे व समिधी व करवर हे तिन्ही परगने रावराजा व प्रतापसिंग याने खावे एसा तह करून राजश्री खडेराव होळकर यास हजार स्वारानसी राणाजीकडे पाठविले राणाजीची फौज सरदेवर आली. ईस्वरसिंगानीही आपली मुकाबल्यावर पाठविली या दोही फौजचे झुज होउ न द्यावे आणि गोविंद तमाजी यासी सरदारानी लिहिले की रा निवाजी खटके व रामराव मुनसी

वार न्नवाईच्या तलावर लागले. करार जाला. उपर कूच करून माघारे वनास नदीवर इसरदेच्यासंनिध येउन मुकाम केला असे. येकादो रोजा सर्वत्र ल्हानमोठे सरदार येकत्र होउन जो मनसबा करतील त्या रोखे कूच करणार. कळले पाहिजे. सदैव पत्र पाठउन परामृष करीत आसिले पाहिजे. पूर्व स्नेहास आतराये न कीजे. विशेष काय

---

मार्गस्थ केले आहे. ते सागतील त्याप्रमाणे ईश्वरसिगास चार गोष्टी उत्तम प्रकारे सागून तह्याप्रमाणे फैसल करुन परस्परे सोरख्य करुन देणे खावदाची मरजी याप्रो ठराव जाला. फौजाचे परस्परे कोसाचे अंतर राहिले. नारायणदास सडे जयपुरास आले. मसलती उदड जाल्या रायजीने उदड सागितले की मल्हारबाचा लेक येउन मधें पडला आहे. झुज करू नका म्हणतो झुज केलियाने राणाजीची तो काय कथा परतु मराठयासी विरुध वाढते यासी विरुध करणे सलाह नाही'. [पिद २ ले १, २] 'राणाजी तो केवल स्वामीचे आश्रयावर या कार्यास प्रवर्तले आहेत एसा आबालवृधीपर्यंत लौकिक जाला आहे'. [पिद २ ले ३] याचे उत्तर ईश्वरसिंगाने दिले ते मात्र वाचणीय आहे 'महाराज वैकुटवासीनी काय काय कामे श्रीमताची केली हे बालाजीरायाच्या ध्यानात नाही येसे नाही आताही आम्ही सर्व प्रकारे त्यांच्या वचनावेगळे नव्हतो परतु हा दायादाचा विचार वशपरपरेने चालत आले असेल तेच केले पाहिजे चाकरीच्या नात्याने जे सरदारानी पूर्वी देविले ते दिघले. अधिक द्या म्हटल्यास विनायुध कसे अनुकूल पडते असो श्रीमताचा व सरदाराचा हाच हेत. त्यास पहिल्यापेक्षा विशेष द्यावयाचे आहे हे तो घडणे नाही ज्यास ईश्वर देईल तोच घेईल परंतु पगडी बदलली त्याची फलश्रुत इतकियातच दाखविली असो जे त्याणी केले असेल तेच उत्तम जाणूनच केले असेल [पिद २ ले. ११]

कोणाचेही नायकर्ता आपले फौजेत शामिल आले. राणाजीचे फौजेस जक दिधलीच आहे. यद्यपि खंडेराव होळकर याजपासी समुदाय थोडा तथापि तितक्यानिसीच त्यानी आडतासास आणिले. [पिद २ ले ४] 'राणाजीचे फौजेसी व श्रीजीचे फौजेसी युध्य जाहले श्रीजीची फते जाहली माधोसिंगाकडील निशाण हत्ती तोफखाना वगैरे लूट श्रीजीकडे आली राणाजीकडील फौज पळाली. रा खंडेराव होळकर व भोपतराम चारण बूदीवाला हे उभयता येकीकडे उभे होते त्यासी युधाचे समई येकत्र होउन श्रीजी कडील बुनगियावरी घातले. सेखावताची फौज संरक्षणास्तव ठेविली होती. त्यानी याजला मारुन काढिले'. [पिद २१ ले. २४] हा वृतात १७४७चा होय.

'निमेनिम राज्य माधोसिंगास वाटून द्यावे असा बोली लागली आहे हे पनास मागतात. ते पचवीस कबूल करितात. पाहावे कार्यभागाचा निकाल कसा होईल. ईश्वरसिगास गत वर्षी गर्व विशिष्ट जाहला होता तसाच यंदा त्याच्या शतगुणें परिहार जाला'. [पिद २७ ले. ३०] 'माधवसिंगास १२ लाखाचा मुलुख देविला सवाई ईश्वरसिगाची बोली होत आहे. '[पुरंदरे १ ले. १६८]' मल्हारबा तीर्थरुपाचा निरोप घेउन ईश्वरसिगाकडे गेले की च्यार परगणे माधोसिंगासदेविले ते निभउन न्यावे. यासाठी गेले. मल्हारबाची पत्रे आली आहेत की कराराप्रमाणे ईश्वरसिंग निभवीत नाही गोविंद तमाजी वकील बापुजी महादेवाचे निस्वतीचा रामचंद्रबाबाचे पक्षाचा आहे त्याणे लिहिले की हे तीर्थरुपाचे कराराप्रो निभाउ म्हणतात. मल्हारबा आईकत नाही- '[पुरदरे १ ले. १८५]' झुज होईल. जाहालियास फजित पडतील. असे वाटते. त्यास आपण तह केला तो मोडला यासाठी सवाईसही लिहिता नये' हे भाऊसाहेबाचें विवरण १७४८तील राजकारणाचे होय. [पुरंदरे १ ले. १९९].

जाणून स्वकीये लखन करणे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. येथील सर्व अर्थ श्रीमंतानी लिहिले आहे त्यावरून कळो येईल. सदैव येणारबा पत्र पाठउन परामृष करीत गेले पाहिजे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

ह्या राजश्री त्रिंबकजीस सा॥ नमस्कार विनंती उपरी. लि॥ परिसोन कृपालोभ असो दीजे हे विनंती.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा॥ नमस्कार विनंती. कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२००] श्री

[सितंबर १७४९] ?

सा॥ कुसाजी कोनेर [वळे] कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपर. स्वामीनी कृपापत्र पा॥ ते पावले. वरकड वर्तमान रा॥ येजमानाचे पत्री लि॥ आहे त्यावरून कळेल. श्रीमंत रा॥ नाना [पेशवे] सातारा आहेत. राजश्री [रामचंद्र] बाबाही तेथेच गेले आहेत. दरबारचे वर्तमान तर आपल्याच यजमानाचा उत्कर्ष[११७] आहे. काही चिंता न करणे. वडीवडी वर्तमान लिहित जाणे. चिरजीवाकडे पत्र पाठविले असले ते पावले. विशेष काय लि॥ लोभ असो दीजे हे विनंती.

पो॥ माहादाजी रघुनाथ सा॥ दंडवत विनंती. लिप्रा॥ सर्वदा अशिर्वादपत्री सांभा[ळ] करीत जावा हे विनंती.

---

लेखांक [२०१] श्री * संवत १८०६ आश्विन शुद्ध २

[२ अक्टुबर १७४९]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ * १ जिल्काद मुकाम सप्तरुषी[११८] जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे

---

(११७) हे पत्र सातारच्या मुकामाचें आहे. 'आपल्याच येजमानाचा उत्कर्ष आहे' हे शब्द कोणत्या प्रसगास उद्देशून आहेत हे कळत नाही. रामचद्रबावा १७४९त होता असे गृहित धरून ही तारीख दिली आहे 'महादोबासी आम्हासी विमनस्कता तीन वर्षे आहे. सातारियापासून विशेष वृधि पावली. तुमचे पक्षपातामुळे अति कष्टी होतें' असे पेशव्याने म्हटले आहे [ले ७] तो तर हा प्रसंग नसेल ?

(११८) सप्तऋषी म्हणजे सातारा.

विशेष. कृपा करून पत्र पाठविले ते पावले. ऐसेच सदैव पत्र पाठउन परामृष करीत गेले पाहिजे. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी श्रीमहाराजे छत्रपतीच्या शरीरास समाधान नाही म्हणोन सातारियास आले होते. पुणियास येथे आल्यानंतर श्रीमंताचे भाऊ बंधु जनार्दनपंतबावा[११९] यांच्या शरीरास ज्वरज्वराची वेथा जाली तेणे करून भाद्रपद वद्य ६ देवाज्ञा जाली. तेणेकरून श्रीमंत बहुत श्रमी आहेत. त्यासमयी श्रीमंताच्या शरीरासही शीतज्वराची बंधु गेल्यानंतर जाली आहे. अद्याप उतार नाही. महाराज छत्रपतीसी वेथा जे आहे तेच आहे. काही उतार नाही. आनंदरावपाये व देवीडपाये बहुत होत आहेत. ईश्वरकृपेकरून उभयंतासही उतार पडेल. चिंता नाही. श्रीमंत रा [रामचंद्र]बाबा सुखरूप आहेत. संपूर्ण आश्विनमास जाल्यानंतर निरोप होईल. बरकड वर्तमान यथास्थित आहे. कळले पाहिजे. विशेष काये लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती. तुमचे जावई गोपाळराव नित्य भेटीस येत असतात. सुखरूप आहेत. कळले हे विनंती.

---

लेखांक [२०२] श्री • संवत १८०८ श्रावण वद्य ९

(४ अगस्ट १७५१)

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पोष्य विनो कृष्णा [फडके] साा नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ताा छ • २२ रमजान मुक्काम कस्बे मह नजीक गंगातीर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र पाठउन परामृष करीत नाही. तर ऐसे न करावे. सदैव पत्र पाठउन सांभाळ करीत असावा. येथील वर्तमान श्रीमंत राजश्री यजमानानी लिहिले आहे त्यावरून कळो येईल. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास नमस्कार.

• हो पोष्यांकित महादजी प्रभूने साा दंडवत विज्ञाप्ती. लोभाची वृधी करीत आसावे. सेवक पदरचे असोत हे विज्ञाप्ती.

श्रीशंकर.

राजश्री आबाजीपंतास [निगडीकर] नमस्कार दंडवत विनंती.

---

(११९) हा जनार्दनपंत भट नानासाहेब पेशव्याचा सखा बंधु होता त्याची ही मृत्युतिथी आता स्पष्ट मिळते.

लेखांक [२०३]　　　　श्री　　　* संवत १८०९ वैशाख वद्य ६
[२३ मे १७५२]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो　चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * १९ रजब मुकाम नजीक दिल्ली जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविले ते पावले. यथील वर्तमानाचेविसी लिहिले तर छ १४ रजबी दिल्लीहून कूच केले. ते तुकलाबादेनजीक मुकाम केला. किरकोली कामाकाजाचा गुंता होता तो उरकून घेतला. याउपर कूच करावे ऐसे आहे. उभयेता सरदार वजीर दिल्लीस आल्याचे वर्तमान आबदालीने[१२०] ऐकोन माघारा गेला. यास्तव यासी पातशाहजीनी निरोप दिल्हा. यानी मोठे काम करून घेतले.

---

(१२०) पहा भाग १ ले ८६ टीप १११. राजवाडे खंड १ ले. १ या अहमदनाम्याचें वर्ष निश्चित करण्याच्या कामी जो आधार घेतला ती हीच पत्रें होत ही इसने खमसैनच्या आरंभी न धरिता शेवटी टाकली पाहिजेत असा एक आक्षेप आहे [पाफे ८४] जे हवाले वरील सूचनेत दिले आहेत ते साहित्य आम्हास पहिला भाग प्रकाशित करते वेळी मुळीच प्राप्त नव्हतें. [भाग १ भालेराई ८] तेव्हा तुलनेचा प्रश्नच नव्हता. दृष्टी केवल पत्रांवरच होती आणि जो काळ पत्रान्वये विहित वाटला तो विदित केला. त्याजविषयी आग्रह नाही वर्ष वाढत असले तर त्यास विरोध नाही मात्र कारण-मीमांसा पटण्यासारखी नीट व सरळ पाहिजे आक्षेपाविषयी विचार करितां सूचना गमतीची व अपूर्व आहे खंड ६ यादी ८२ ची नोंद सूचक होऊन विचार करावयास लावते हे खरें पण त्याचें उत्तर संक्षेपात असे सरळ आहे की १७५१ हे वर्ष अबदालीच्या दुसऱ्या स्वारीचें राजवाड्याने ठरविले आहे [ऐप्र १ पान ५६] ते पेशवेदप्तर प्रकाशित झाल्यानंतरदेखील फेरविचारात फिरले नाही. [पान ८, १७, ५२] मग ही सूचना कां उद्‌भवावी हे लक्षात येत नाही. कारण नोंद प्राधान्य मानली तर अबदालीची स्वारी व अहदनामा या दोन्ही गोष्टी एकाच वर्षांतील होत. हा विसंगतपणाचा दृष्टीकोन साम्प्रदायिक की कालनिर्णयाच्या अपेक्षेचा आहे! पुरंदरे १ ले. २२८ हे पत्र होळकराचे खरे पण अहदनाम्याच्या कालनिर्णयार्थ ते निरोपयोगी आहे. 'सा सुभे दक्षण सोडवावी' यासाठी गाजुद्दीनखानाची उभारणी होती. [ले. ६, ७] ते राजकारण सोवती खेळले तेव्हां 'गाजदीखान यांस दक्षणेस यावयाचा हुकूम जाला. तयारी होणे ते होत आहे.' [ले १४] हा परिस्फोट रजब १७५१चा होता पण 'कारेगरीने मनसबा' करण्यातच सबंध वर्ष गेले [ले. १५, १६, १८, १९, २७] आणि गाजुदीखानास ताटकळत ठेवण्याचा प्रसंग कसा व कोठें उत्पन्न झाला हें लक्षांत येईल. त्यात विलक्षण असें काहीच नव्हतें. वस्तुस्थितीच तशी होती. अस्तु अहदनाम्याविषयी प्रकाश पाडणारी पत्रें जी आमच्या संग्रही सांपडली ती प्राय. रजब महिन्याचीच आहेत [भाग १ ले. ८६, ८७, ८८, ८९, ९८] आणि हा मास इसने व सलास खमसैनात सधीचा होता. त्याला मार्गेपुढें पाहिजे तसें घेतां येईल. मात्र त्याला साधन सबळ पाहिजे. ते आतां अन्यत्र आढळते.

सुभे दरोबस्त करून घेतला. सिवाये पातशाही खालशा.

१ आगरे.

१ आजमेर.

---

२

नवाब गाजुद्दीखान यासी दक्षणच्या सुभेदारीची वस्त्रे दउ समागमें घेउन देशास जातात. १.

चौथाई सर्व मुल्कात करून घेतली कलम १.

रूपयाचा करार केला होता त्याची निशा करून घेतली. कलम १.

श्रीकासी व वृंदावन[११] येथील सनद पातशाहाची करून घेतली. १.

---

वाद वाढविणारे अनेक गुते असले तरी त्या भरीस न पडता मे १७५२ हाच काळ अहृदनाम्याचा असला पाहिजे असा बोध होतो मात्र त्याची कारणे निराळी आहेत. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे १७५१च्या आरंभी सफदरजंगाच्या सहायास सोवती निघाले त्यांनी 'जाखर' नाळात रोहिल्याचें पारिपत्य केले. [लि. २३] '२४ जाखरला ते कालीनदी नजीक फरोकाबादेस होते आणि २९ जाखरी ते कसबे कनवज थोगगातीरीं' पावले. [खंड ३ ले १५८, १५९] "५ साबानला ते मव समसाबादेस' होते. [भाग १ ले. ९०] 'रजब' महिन्याचे मुकाम निळत नाहीत तथापि या अवधीत दिल्लीकडे जाणे शक्य नाही अवकाश थोडा. त्यांना ज्या अवदालीसाठी जावें त्याचा उल्लेख कोठेंच नाही आणि त्याची स्वारी इतक्या उशिरा संभवत नाही जनवरी १७५२त रोहिले शरण आले त्यांचा सलूख होऊन उभयतां अंतर्वेदींत आले [भाग १ ले. ९५, ९६] याच सुमारास 'दिलीकडे गडबड पडली'. [लि २३] ती अवदालीमुळें [खंड ६ ले ५४५] तेव्हां त्याच्या दुसऱ्या स्वारीचे वर्ष १७५२ ओघानेच येते. अंताजी माणकेश्वराची दोन पत्रें या कालाची द्योतक आहेत. [पेद २१ ले ५३, ५५] 'साल गुदस्त पठाण आटक उतरला होता. तें समई पनास लाख देउन समजाउन मागती अटकपार करुन दिल्हा जे समई सरदार दिलीस आले त्या समयातील गोष्टी हे आहे. याजमुळे सरदाराचाही उपर उत्तमच जाला. आता पठाण मागती आटक उतरुन हदेवरी येउन मुकाम करुन येलची येथे पाठविला. त्याचा यांचा जाबसाल जाला. सर्वांनी येकच उत्तर दिल्हे की अजमेर अकबराबाद दोन सुभे बावीस सुभियाची चौथ व पंका देउन सर्व मेखतार मराठियाचा ठेविला. हे मतलब मराठियासी पुसावी'. अर्थात अहमदनाम्याचें आणि अवदालीच्या दुसऱ्या स्वारीचें वर्ष १७५२ ठरते या दृष्टीनें भाग १ ले ८६ चा अर्थ आक्षेपकानें दर्शविला आहे तो उचित असून वरील पत्राची खरी तारीख आता '२३ मे १७५२' समजली पाहिजे. तसेच १७५३ची तिसरी १७५७ची चौथी आणि १७५९तील पांचवी स्वारी अवदालीची मानावी लागेल. असाच घोटाळा त्याच्या पानिपतोत्तर स्वाऱ्यासंबंधीं दिसतो त्याचा विचार कर्तव्य आहे असु आक्षेपकाचे अत्यंत आभारी आहोत.

(१२१) १७५०त रोहिल्यानी सफदरजंगाचा मोड केला तेव्हा त्याने लीन होऊन सोवत्याची मदत मागितली. त्या वेळी 'अंतरवेदीमध्यें पचवीस लक्षाचा मुलुक व क्षेत्र काशी देउ केली' त्याप्रमाणें 'पठाणावावन तालुका व क्षेत्र काशी दरोबस्त जाहगीर दिल्ही फर्मान जालें'. [भाग १ ले ९०] 'रोहिल्याचे पारपत्य होउन अमल होत आला'. काशीतदेखील व्हावयाचा पण याच समयीं अवदाली

येणेप्रमाणे कामे करून घेउन निरोप घेतळा. मोठे यश सरदारास आले. जे आज ता कोणाच्याने[१२२] न जाले ते करून घेतले. कळले पाहिजे. सदैव पत्र पाठउन सांभाळ करीत जावा. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

अटक उतरला ह्मणून पातशाहाने उभयतास पाचाखल अहदनामा केला. त्यात 'कासी वृंदावन' ही दोनच क्षेत्रे केवल होती. वृंदावन वाटेत असल्यामुळे त्वरित पदरात पडले. श्रीचे वचन सफदरजंगाचे होते. त्याची सनदही बादशाहाने दिली. केवल स्वाधीन व्हावयाचीच राहिली ते काम त्वष्ट लाऊन मन दुखवून करावयाचे नव्हते त्यात फिरोजजंगास दक्षिणची सुभेदारी देवविण्याची घाई त्यासाठी सोबती देशी आले मागे बादशाहाशी सफदरजंगाचे वाकडे पडले तेव्हा 'सरदाराही आपलें काम करून वाराणसी घ्यावी' अशी अट त्याने घातली [खंड ६ ले ५४५] १७५४त हे काम उरकावयाचें पण कुंभेरीवर स्नेहात तेढ पडली शिंदे मारवाडात गेले राघोबा दिल्लीत गुंतले सफदरजंग वारला. शुजास पत्रे गेली 'चिरंजीव दिलीजवल असता कासी अयोध्या द्यावयाचा करार केला. प्रयागची रदबदल होती' असा जो उल्लेख आहे तो हाच प्रसंग होय [लि. १०१, १०२] कागदी घोडे बरेच नाचले परंतु जिवत घोडे नव्हाल्याशिवाय श्री थोडीच लाभणार होती पानिपतामुळे पारडेच फिरले तेव्हां 'दहावीस लक्षाची जाहगीर मुबादला देउन ही दोन स्थले हस्तगत करावी प्रयत्न करावा' असा संकल्प माधवराव पेशव्याचा होता [इसं २१ पान १३७] तो कधी सिद्धीस पावला नाही हे निराळें सांगावयास नको.

(१२२) 'जे आजताा कोणाच्याने न जाले ते करून घेतले' या एका वाक्यात अहमदनाम्याचे व सोबत्याच्या सेवेचे सार बळवंताने दिले आहे ते यथार्थ होय. '५० लक्ष रुपये आगरा अजमेर हे दोन सुभे. सुभे मुलतान, पंजाब, ठठा व भकर व फौजदारी सवल मुरादाबाद व बदाउ मथुरा नारनोल व सावर आणि बावीस सुभ्याची चौथ इत्यादि प्रचंड प्रदेश मराठ्याच्या कक्षेत प्रत्यक्ष आला ही शिंदे-होलकराच्या श्रमाची फलश्रुती व छत्रपती राजारामाच्या आकांक्षेची परिपूर्ति होय. सर्वपरीने पहाता पूर्वपानिपतीय इतिहासात या स्वारीला जोडच नाही. याकरणीच्या कर्त्यांचे कौतुक दूर राहून इतिहासात Shadowy figures म्हणून त्याची कीर्ति गाजावी यापेक्षा दैवदुर्विलास तो कोणता म्हणावयाचा. या स्वारीत स्नेह्याच्या संघटनेचा कळस होऊन त्यातूनच पानिपतचे पतन व साम्राज्याचा न्हास उद्भुत झाला उभयता देशी आल्यानंतर झालेल्या भेटीचा प्रकार [लि २५, ३३, १४२] सलाबतजंगास बुडविल्यानंतर वाटणीत उद्भवलेला विकार [पेद २१ ले ४९, ५१, ५४, ५५, ५६ पेद २५ ले १४९, १५१ पेद २७ ले ७१ चंद्रचूड १ ले ९, १५, १६, १९, १२८] 'राव उभयता बधूचे स्वारस्य होउन जिकडे जावयाचा निश्चय ठहरेल तेणेप्रमाणे लिहून' हा होलकराचा उच्चार [खंड ६ ले ५६१] 'तीर्थरूप स्वारीस जाणार आम्हास इकडे ठेवावे. सातारियाचा गुंता उरकलाच तर दाहापाच हजार फौजेने दिलीकडे जाउन पोट भरावे असे करून पाहिले परंतु पेच विशेषच वाढले' हे भाऊ-साहेबाचे उद्गार [पुरंदरे १ ले २७२, २८७, २८९, २९३, ३१०, ३३४, ३५२, ३६७] आणि या मिषानें सहमत होऊन शिंदेहोलकर कदाचित 'डोईवरचा पदर काढतील' असा कितुमय भीतीचा संचार इत्यादिनेक गोष्टीचे मनन केल्याशिवाय सदाशिवरावास स्वतंत्र स्वारी न लाभता राघोबाचीच योजना उतरेस का झाली आणि सोबत्याची विलक्षण संभावना होऊन महाराष्ट्रमय करण्याचा प्रयत्न अशा अद्भुत पायावर का उभारला गेला या नीतीचे रहस्य उमगणार नाही किंवा 'विजेच्या चंदाप्रमाणें चढते कळे राज्य करीत असता गृहकलह लागण्यास कारण झाले की दादासाहेब प्रथमच स्वारी मोहिमेस पाठविले' ही बखरीची मीमांसा पूर्णपणें पटणार नाही. ही शुक्रनीतीच महाराष्ट्र-धर्मास पानिपतावर अडवी येऊन स्वराज्य व साम्राज्य ही तिला बळी पडली.

लेखांक [२०४]                श्री                * संवत १८०९ ज्येष्ट वद्य ३०

[१ जून १७५२]

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पो चिंतो कृष्ण व धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * २८ रजब मु॥ आगरे जाणोन स्वकीयें कुशल लेखन करणे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. यथील वतमानाविसी लि॥ तर उभयेताच्या फौजा व वजीर येसे दि्लीस आल्याचे वर्तमान आवदालीने यैकोन कूच [करुन] माघारे गेला. तेव्हा पातशाह उभयेतावर कृपावंत होउन आजमेर व आगरे दोनी सुभे दरोबस्त दिल्हे. बावीस सुम्यात चौथाई यावी यैसी सनद करून दिल्ही. या सिवाये नारनोळ व मथुरा व संभल मुरादाबाद व सामेर यथील फौजदारीची सनद करून देउन निरोप दिल्हा. निरोप समई बहूत मानवस्त्रे व हती व घोडे व माही मरातब[१२३] व झालरदार पाल्खी यैसी दिल्ही. तेच समई पातशाहजीस आर्ज करून

(१२३) शिंदेहोळकराच्या पूर्वपानिपतीय परपरेचे वखर हें जणू बाळच आहे त्यात उभयतास 'राजे' असे म्हटले आहे. ते गौरवपर वर्णन नसून केवल वस्तुस्थितीचे दिग्दर्शन होय असे आता पुराव्यासह सप्रमाण सिद्ध होते सोवत्याची श्रेणी ठरविण्यापूर्वी इतराच्या स्थितीचे सिंहावलोकन करणे मनोरजक आहे केशवराव सिवदेव वकील दि॥ शुजा यास 'राजा' अशी पदवी होती [पेद २ ले. ६९, १०७ पेद २१ ले ११७, १६३, १७६, १८६, १८८ पेद २७ ले २१९, २४०] पेशव्याकडून हिंगणे दिल्लीस वादशाहाजवळ वकिलीवर होते ते प्रथम 'राव, महाराव' व नतर 'राजा' म्हणवीत असत. [खड ६ ले ३६०, ४६७, ५१०, ५३७ पेद २८ ले. १८] अहदनाम्यानतर मराठी फौज बादशाहाजवळ राहू लागली तेव्हा सोवत्यानी प्रथम अताजी माणकेश्वरास सिरोजेहून पाठविले त्याला 'साहेबनौबत' मिळून तो 'राजा' झाला. [पेद २१ ले ५५, ९६] याच जागेवर पुढे नारो शकर येऊन ते 'राजेबहादर' झाले [ऐटि २ क ४१] तेव्हा शिंदेहोळकराची महती काय होती हे निराळें सागावयास नकोच तथापि स्वयम पेशव्याने शिंद्यास 'राव' असे स्पष्ट म्हटले आहे [पुरदरे १ ले ११६] तसेच निजाम सफदरजग कमरुद्दीनखा वजीर व खास बादशाहा हे सर्व १७४४च्या सुमारे फरमानादि कागदोपत्रीं राणोजी व जयाजी शिंद्यास याच सज्ञेने सबोधीत होते असा पुरावा भरपूर आहे त्यापूर्वी बाजीराव भट पेशव्याच्या विद्यमाने 'महमदशा बातशाने जाहागीर मनसब महाल व वतन हमराई लोकासहित दिल्हे' होते असा शोध॰ लागतो [पेद १५ ले ८६] 'यादीदास्तीचे कुली फर्मान घेउन येणे. सिरपाउ इनामत देतात ते अवघ्या सरदारासही इजतलायख घेणे' हा सकेत राणोजी शिंद्याचा समर्पक असून उल्लेखनीय आहे [खड ६ ले ९७] अर्थात या वेळी बादशाहाकडून उभयताचा मानसन्मान राजेमहाराजास शोभेल अशा रीतीचाच होता याची साक्ष हे पत्रच देतें ते योग्यच होय त्याची 'सरदारी' म्हणजे 'दौलत' होती. तिचे न्यायनिवाडे विराळे होत असून कारभारीमडळ विभक्त होतें.

गाजुद्दीखान यासी दक्षणच्या सुमेदारीची वस्त्रे देउन समागमे घेतले. छ २० रजबी दिलीहून कूच केले. रा साबाजी पा [शिंदे] व राणोजी मोईटे मारवाडात रवाना केले. पांच हजार फौज आपली व येक हजार फौज सुमेदाराची [होलकर] यैसी आहे. आम्ही मजलदरमजल देशास जातो. सिरोजवरून हंडयाच्या घाटेस जातो. कोठेही गुतत नाही. मोठे यश यजमानास आले. आताही महदत कार्य चितावर घरले आहे. ईश्वर याही कार्यास यशच देईल. आम्ही सर्व प्रकारे स्वामीचे आसो. दुसरा अर्थ किमपि चित्तात न आणावा. विशेष काये लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा नमस्कार.

---

लेखांक [२०५] श्री * संवत १८११ चैत्र वद्य ११
[१८ अप्रेल १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेशी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २४ जाखार मुा कुंमेर जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे

---

[भाग १ ले. १०७] नवाब सफदरजंग, महावतजंग, निजाम, जयपुर कोटा इत्यादि रजवाड्याकडे वकील शिंद्याचे होते [खंड १ ले. ६१, २०५ पेद २० ले. २९, ४९ पेद २५ ले ८ पुरदरे १ ले १८५ भाग १ ले. २] तसेच या सर्वांचे वकील शिंद्याकडे असत राजकारणे लहरह स्वतन्त्रतेने चालत होते प्रसंगोपात पेशवादेखील त्यांचा उपयोग करीत होता 'श्रीमत महाराज जयाजीबावा शिंदे गोसावी' हे शब्द एका वकीलवचाचे असून ते अर्थप्रचुर आहेत जयाजी शिंदे वारले तेव्हा 'दुकाने बंद जाली.' [भाग १ले १४३] 'व्दाही जयापाचे पुत्राची फिरली' [पेद २ ले ४८] 'माधवसिंग व राणाजी वगैर याचे टीके आले.' [भाग १ले १४६ ले १७४, १७५, १७६] दत्ताजीने दौलतीचे 'युवराज्य चालविले'.

केवल शिंद्याचेच सैन्य पाहिले तर ते कोणत्याही राजेमहाराजापेक्षा कमी नव्हते. सख्या पेशव्याच्या समान होती त्याचे सेनापती, सरनौबत, बक्षी, पागे मोदी' वेगळे असून ते मागे राहून त्याच्या वतीने हिंदुस्थानात राज्यभार चालवीत होते. [चंद्रचूड १ ले. ४६] थोडक्यात बोलावयाचें म्हणजे ते खरे 'उत्तरदेशाधिकारी' होते 'पादशाहासारखे लहान करून आपले पदरचे त्यास त्यापेक्षां मातवर केले' हे गोपाळराव पटवर्धनाचे शब्द कोणास उद्देशून होते आणि त्याचे सार काय निघते याची कल्पना वाचकानीच करावी [खरे १ ले. २४] साराश स्वराज्याचे स्वरूप साम्राज्यात करण्याचे श्रेय या स्नेहास असून ते दौलतीचे 'भागीदार वाटेकरी गवदार व मुख्य आधारस्तभ होते'. मराठेशाही म्हटली की तिचे अर्धाधिक स्वामित्व उभयताकडे होते अशा साम्राज्य सेवकाची गणना 'मामलतदार व नोकर' या सदरात करणे शास्त्रोक्ती नसून एकपक्षीय भक्ती होय. ही भाषा आधुनिक असून तत्कालीन पत्रात परिप्लुत नाही मराठेशाहीच्या मीमांसेचे मर्म यातच होते ते यथावकाश पुढे येईलच.

विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. येथील वर्तमान तर कुंभेर किल्यास मोर्चे लाविले असे. नित्य लडाई होत आहे. अद्याप सलूख जाहला नाही. मानगड लागली आहे. सलूक व्हावासा आहे. जाल्यावर लेहून पाठउ. फाल्गुण वद्य ११ येकादशीस राजश्री खंडेराव[124] होल्कर यास गोळी मानेस लागोन मृत्य पावले. समागमे तिघी स्त्रिया व कलवांतिणी २ व राखी ५ येकुण दहा जनी सती निघाल्या. मोठे दुख सुभेदारास म्हातारपणी जाले. राजश्री रंगराव[125] सिवदेव [ओढेकर] श्रीमंताचा [राघोबाचा] निरोप घेउन चैत्र शुध १४ चतुर्दसी कूच केले. लष्करापासून आठा कोसावर जाउन राहिले. जाटानी बातमी राखिलीच होती. त्याजवर रात्री छापा घातला. खासा रंगरावजी मारले गेले. लष्कर लुटले. काही पळोन माघारे लस्करात आले. याप्रमाणे वर्तमान आसे. प्रस्तुत मानगड विशेष लागली आसे. पुढे जे वर्तमान होईल ते लेहून पाठउ. तुम्ही जाते समई राजश्री रामराव नीलकंठ याजकडील हवाला दिल्हा ते अद्याप पावला नाही. तर बोलल्या प्रमाणे चिरंजीव राजश्री नारायेणास [वळे] उजनीस पावते केले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकबावास नमस्कार विनंती उपर. लिा परिसोन लोभ असो दीजे हे विनंती.

---

(१२४) खंडेराव होल्कर याची मृत्युतिथी आता स्पष्ट होते. एका पुरुषासाठी इतक्या स्त्रिया सती गेल्याचे हे उदाहरण मराठेशाहीत अद्वितीय होय. हे दृश्य पाहून मल्हारजी होळकराचा शोक अनिवार झाला असल्यास नवल नाही आणि त्या दुःखातिरेकात प्रतिज्ञा करणे संभवनीय आहे 'रूपरामाचा हात मल्हारबाचे हातामध्ये दिला' असे राघोबाने म्हटले आहे [ले ४२] अस्तु या वेळी अहिल्याबाईसुद्धा सती जाण्यास सिद्ध झाली होती पण म्हाताऱ्याने मनधरणी केल्यामुळें त्या साध्वीने आपला संकल्प सोडला असे कैफियत सांगते. तेव्हापासून तिला पुत्रवत लेखून १७६१त गौतमाबाई मरण पावल्यावर राज्यभार तिच्या स्वाधीन केला असे अनुमान निघू पाहते [चंद्रचूड १ ले. १६५]

(१२५) रंगराव ओढेकर हा केव्हा व कसा कामास आला हे पत्र सांगते धारकर पवाराचा कारभारी या नात्याने तो काम करीत असे. पुढें त्रिंबकराव शिवदेव ओढेकर हा राघोबासमागमे राहू लागला [पेद २७, ले १८३, २२७] १७४८ पासून आगरा अजमेर लाहोर इत्यादि सुभे मराठ्याकडे आले त्यात पवाराची वाटणी नव्हती. [खंड १ ले. ६१] यामुळेंच बारा वर्षे त्यानी उत्तरेकडे पाहिले नाही. 'तैसाच यशवंतराव पवार याचाही गौरव केला सरंजाम जाहगीर जप्त केल्या होत्या त्यासही वचन दिले की तुमचे तुम्हास मोकळ्या करून देउ' हे बखरीचे वर्णन अगदी यथार्थ आहे [पान १०९] पानिपतानंतर १७६८ साली 'हिंदुस्थानचे खंडणीचा हिसा दरसदे २३प्रमाणे पेशजी पावत होता तो अलीकडे पावत नाही असी पवार यांणी विनंती केली त्यावरून अंतरवेदीची वाटणी देउ नये याप्रमाणे करार करून दरसदे १२ म्हणजे केवळ निमी वाटणी' मिळाली [इस. २३ यादी १३] एवंच लेखांक ५चे रहस्य या प्रकारचे आहे

लेखांक [२०६] श्री * संवत १८११ वैशाख वद्य ८

[१४ मे १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २० रजब मुक्काम कुंभेर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे वेशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. यथील वर्तमानाचेविसी लिहिल. तर जाटाकडील रूपराम कटारा गावात गेला होता तो पुन्हा सलुखाच्या रदबदलीस्तव आला आहे. ठराव जाला नाही. ठराव जाल्यावर मागाहून लेहून पाठउ. श्रीमंत यजमान यासी ज्वराची वेथा येक मासपर्यंत जाली होती. ते ईश्वरकृपेकरून आरोगता जाली. सुखरूप आहेत. चिंता न करावी. येदाचे स्वारीस हाच मोठा लाभ जाला की यजमानास आरोग्य जाल. यथील कार्य जाल्यावर छावणीचा निश्चय होईल. तुम्ही जाते समई राजश्री रामरावजीचा हवाला दिल्हा होता. तो आद्याप चिरंजीव राजश्री नारोबास पावला नाही. तर पावता करुन जाब आणविला पाहिजे. विषशे काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजेश्री संभाजीबावा सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लोभ करीत जाणे. विशेष काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२०७] श्री * संवत १८११ श्रावण शुद्ध ७

[२६ जुलै १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * ५ सवाल मु॥ सावर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. यथील वर्तमान पूर्वी यथून सरकारच्या कासिदजोडिया दोन तुम्हास बोलाउ पाठविल्या त्याजा लेहून पाठविलेत त्यावरून कळो आले आसे[ल.] प्रस्तुत आम्ही मु॥ मारपावेतो आलो. यथून पुढे दरमजलीने मेंडत्यास जात आसो. बिजैसिंग मेंडत्यातच आहे. बाहेर निघोन झुंजावयाची हिमत दिसत नाही. गांव धरून राहिला असे. त्याचे काम [तोफा] खो होणार नाही. तर तुम्ही फौज घेउन

यालच. काही तोफा[१२६] अगत्यरूप आणिल्या पाहिजे. ये समई जे साहित्य कराल तेणे करून यजमान तुम्हावर कृपावंत होतील. कळले पाहिजे विशेष. कायें लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपर. लि। परिसोन लोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२०८] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध ११

[२८ अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * ९ जिल्काद मुक्काम मेंडते जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष. यजमानास

---

(१२६) 'दक्षिणची फौज ह्मणजे मउ लागले ह्मणजे वेजरब वेणार कठिण लागले ह्मणजे फिरोन मार्गे पहाणें नाही. एशी पूर्वापार या राज्यातील तऱ्हा' हे वर्णन चिमणाजी भटाचे आहे [काय ले. ३१] 'खानदेशी फौज बेहिमती' असे लेख मालेत वाचावयास मिळतील अर्थात रजपुताच्या शौर्याची प्रशंसा करीत असता मराठ्याविषयी जे उद्गार बखरीत आहेत ते यथोचित असून तिचे कौतुक करावें तेवढें थोडें तोफेची उणीव त्याचाच मासला होय. बाजीराव पेशव्याच्या वेळी १७३३त 'फिरंगी गोलंदाज नवे चाकर' राहू लागले [पेद २२ ले ७७] 'स्वामीनी आज्ञा केली की मोडाविसी बरोबर सागतो परंतु मोड येत नाही. मग तोफेचा कारखाना चालणार नाही आम्ही जे कर्म अवलंबिले ते अवघ्या सरकारकुनाच्या मते सिधीस न जावें' यावरून शाहू महाराजास तोफांचा नाद होता असे कळतें [पेद १७ ले. ३२, ४५] निजामदेखील 'तीसपसतीस हजार याखेरीज तोफखाना तोही कोणे प्रकारचा हे तुम्ही जाणतच आहा' हे वर्णन भोपालच्या लढाईसबंधी बाजीराव पेशव्याचे होय [ब्रह्मेंद्र ३५] अर्थात मराठ्याचा तोफखाना निजामाच्या मानाने हीन होता हे निर्विवाद होय १७५१च्या आरंभी पेशवे व होलकर तोफखान्याच्या तयारीस लागले. 'दरमहा दीड लक्ष द्यावे आणि मुजफरखान याने चाकरी करावी' असे वाटत होते. [पेद २१ ले. ४९] पण 'मुजफरखान यास तीनसे राउत दीड हजार माणूस दाहा तोफानिसी ५५ हजार दरमाहा करून पेशव्याने ठेविले' [पुरंदरे १ ले. २९३] तेव्हा होलकरानेही 'येथे दोनसे गारदी दाहाबीस फिरंगी ठेविले. तोफाचे सामान बहुत उत्तम करितात दररोज तोफापासी जाउन बसावे आणि तेथेच कारभार करावा येसा हवस तोफेचा फार लागला आहे' [पेद २१ ले ५४] तेव्हाच १७५९त 'थोर तोफखाना वा। होता तो रामपुरियास लाउन सडे होउन' होलकर शिंद्याकडे वळले [पेद २ ले ११५, ११७] यासबंधी शिंद्याची प्रगति काय होती हे समजत नाही 'तोफखाना सिंदियाकडील तिकडे गेला अबदाली व रोहिल्याकडे तोफखाना फार' असे राजा केशवराव सागतो खरे [पेद २ ले ११८] पण मारवाडच्या स्वारीत तोफांचा अभाव बखरीत दर्शविला आहे तो मात्र खरा ठरतो.

पत्र पाठविले ते पावले. बुंदीस आलो. पुढेही दरमजलीने येतो म्हणोन लिहिले त्यावरून यजमान बहुत समाधान पावले. तोफा तुम्हासमागमे नाहीत. यथे तर तोफाचे काम जरूर आहे. तर तोफा अगत्य घेउन आले पाहिजे. येथील वर्तमान तर विजैसिंग मेंडत्यातच आहे. बाहेर निघणार आहे परंतु कधी निघेल हे न कळे. कदाचित निघाला तर चिंता काये आहे. आम्हाबा तोफ नाही. यथे तर तोफखा [कार्य] होता दिसत नाही यास्तव तोफा आगत्य आणणे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिबकबावास सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२०९] श्री * संवत १८११ माघ वद्य १२
[८ फरवरी १७५५]

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २६ राखर मु॥ तावसर[१२७] [नजीक नागोर] जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. यजमानास श्रुत करून प्रतिउतर पाठविले आहे त्यावरोन कळो येईल. यथील वर्तमान तर जे तुम्ही पाहून गेला तेच आसे. विशेष काय लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

राजश्री मेघशामजीस सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२१०] श्री * संवत १८११ फाल्गुन शुद्ध ६
[१८ फरवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * ६ जमादिलौवल मु॥ नागोर जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले

---

(१२७) नागोर समीप तावसर या नावाचें गाव असून तेथेंच जयाजी शिंद्यास दगा झाला. दहनसस्कारानतर छत्री त्याची तेथेंच बांधली. 'नागोरे समीप ताउसर म्हणून सजलस्थान' असा जो उल्लेख आहे ते हेंच गाव होय [पेद २७ ले. १०६] सदर पत्रात वाचणाची म्हणण्यापेक्षा मुद्रणाचीच चूक आहे.

पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. सर्व वर्तमान यजमानास श्रुत करून प्रति उत्तर पाठविले आहे त्यावरून कळो येईल. यथील वर्तमान तर नागोरची रसद बंद जाली तेणेकरून गडबडले आहेत. सत्वरीच कार्य होईल. आजमेरची मानगड लागली आसेत. पांचसा रोजामधे किला खाली होईल. वरकड वर्तमान राजश्री नारबानानी आपणास लिहिले आहे त्यावरून कळो येईल. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२११] श्री * संवत १८१२ चैत्र शुद्ध १
[१३ मार्च १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २९ जमादिलौवल मुकाम नागोर जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपली पत्रे आली ते यजमानास अक्षरशः वाचून दाखून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून सविस्तर कळो येईल. राजश्री रामाजी जगंनाथ याचेविसी विस्तरपूर्वक लिहिले ते सविस्तर कळो आले परंतु खावंदाचे काम करणे आहे यास्तव यजमानाचे आज्ञेप्रमाणे त्याच्या अंगी रुपये लाउन वसूल हिसेबाप्रा। करून घेणे. ये विसी न चुकणे. तुम्हीही जाते समई तुम्हीही कबूल केले आहे त्या बोलण्यावर खावंद उगेच आहेत. आखेर साली तुम्हापासी त्याचे रुपये मागो लागतील यास्तव सूचनार्थ लिहिले असे. ज्याप्रमाणे बोलून गेला त्याप्रमाणे याची निशा घेउन ऐवज सरकारात पावता करणे. कळले पाहिजे. वसूल घेणे. यथील वर्तमान तर अजमेर किला फाल्गुन शुध १० दसमीस फते जाला. मकारपूर्वक[१२८] इकडे आले होते. मागून श्रीमंत आले

---

(१२८) मल्हारजी होळकर 'होळकर इकडे आले. मागाहून श्रीमंत आले म्हणूनच विजेसिंगाने दम धरिला असे. श्रीमंताकडील जाबसाल जाला म्हणजे येथील कार्य होउन येईल' हे शब्द मननीय आहेत झुज लागून आठ मास व्यतीत झाले तरी राठोडाचे वकील राघोबाकडे शिष्टाई करीतच होते या मितीसदेखील ते समागमेंच होते एवढेंच नव्हे तर तिसरा वकील स्वत पेशव्याकडे होता. त्याला निरोप दिला तो शिंद्यास दगा झाल्यानतर. [ले ६९] हा शिष्टाईचा सांप्रदाय विलक्षणच म्हटला पाहिजे 'गोसाव्याचा सावजाल वाटेने येता केला असता तरी कामास येता तेथें राहावयाचे काम काय होतें' असे सखारामबापु बोकिलाने राघोबास रागाने लिहिले होते अर्थात हा व्यवहार त्याच्या समतीने नव्हता [पेद २१ ले. ६२] तेव्हा शिंद्याने चिडून राघोबास न येण्याविषयी स्पष्ट कळविले तर त्यात वावगें

म्हणोनच बिजैसिंगाने दम धरला आसे श्रीमंता [रावोबा] कडील जावसाल जाला म्हणजे येथील कार्य होउन येईल. चिंता न करावी विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपरी, लि॥ परिसोन लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री मेघशामजी सा। नमस्कार विनंती उपर. पाटणच्या बाकीचे कागद तुम्हापासी दिल्हे आहेत त्याचा फडशा करून घेणे. विस्मरण पडो न देणे. बहुत काय लिंहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२१२] श्री * संवत १८१२ वैशाख शुद्ध १४
[२५ अप्रेल १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल ता। छ * १२ रजब मुकाम नागोर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही आपले पत्र पाठविले ते उतम समई प्रविष्ट होउन लखनार्थ अवगत जाला. अक्षरशः यजमानास श्रुत करून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून कळो येईल. यथील वर्तमान राजश्री नारबानानानी लिहिले आहे त्यावरून कळो येईल.

---

ते काय ? या थरास गोष्ट गेल्यावर कोठें मेजवानी देऊन बिदागी झाली. 'यंदाची छावणी करावी. सत्वर सला जाला तर कूच करुन जावे येसे दोन्ही विचार आहेत' हे वाक्य शिंद्यांची मनोवृत्ती व्यक्त करते. तसेच सलुखाची भाषा बोलून दग्यासाठी सधी साधावी असे रामराव नारायण याने जें मत प्रदर्शित केले त्याला पुष्टी मिळते. इतकेच नव्हे तर 'गोसावी यास यश देता दिसत नाही' या शब्दावरून गोसावड्याच्या मृदु भाषणास दामोळकर भाळले असे निष्पन्न होते आणि या मिषातच गोसाव्याने खासा भोपळा फोडला. 'पत्र वकील घेउन जाताना बोलला की म्हनाल तर जाउन दगा करुन मारीन एसा करार करुन चौधे आषिक साधक घेउन येउन संद गाठून दगा केला. यामुळे तमाम रजपुत जाट व मोगल वगैरे काय हिंद व काय दक्षण सिरे जाले आहेत रजपुताचा विस्वास व दगाबाजी पूर्वीच विनती केलीच होती परतु कोन्हास विस्वास न आला'. [पिद २ ले ४८] बखरीतील मारेकऱ्याची सत्या-सत्य ठरते. अस्तु ३० जून १७५५ ही जयाजी शिंद्याची निधनथिती मात्र पेशवेदप्तराच्या सपादकाची चुकीची आहे [पिद २ ले. ५० टीप]

आद्याप सलुखाची चर्चादेखील नाही; काम बहुत आटीखाले पडले आहे. कळले पाहिजे. खर्चाची वोढ विशेष आहे तर कोठ्याच्या यैवजी व पाठणाचे यैवजी तरतूद करून दीडपावणेदोन[लक्ष]पावेतो आगत्यरुप यैवज पाठविला पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२१३] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ७

[१६ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। जेष्ठ * शुद्ध ७ मु॥ नागोर जाणोनं स्वकीय लखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लि॥ वर्तमान कळू आले. श्रीमंतास पत्रे पाठविली ते वाचून दाखउन त्याचे प्रत्योत्तर पाठविले. त्यापत्रावरून सर्व निवेदन होईल. यथील वर्तमान सविस्तर श्रीमंताच्या पत्रावरून कळू येईल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२१४] श्री * संवत १८१२ आषाढ शुद्ध ५

[१४ जुले १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो। चिंतो कृष्ण [वळे] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * ४ सवाल मुकाम नागोर जाणोन स्वकीये कुशल लेखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. येथील वर्तमानाचेविसी लिहिले तर जेतसिंग राउत राणाजीकडील आले आहेत. त्यासमागमे बिजैराम गोसावी व जगनेस्वर ब्राम्हण व रायसिंग चव्हाण यैसे त्रिवर्ग आहेत. अद्याप काही भाषन नाही. पाहावे कैसा डौल होईल. गावकरी लबाड आहेत. गोसावी यासीही यश देता दिसत नाही. कळले पाहिजे. येदाची छावणी मुकाम मजकुरीच करावी हा निश्चय जाला आहे. सत्वर सला जाला तर कूच करून जावे यैसे दोन्ही विचार आहेत. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास नमस्कार विनंती उपर. लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२१५] श्री * संवत १८१२ श्रावण वद्य १४

[५ सितंबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेशी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २७ जिल्काद मु॥ नागोर जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. सविस्तर वर्तमान कळले. सर्व यजमानास श्रुत करून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून कलो येईल. यथील वर्तमानाविसी लिहिले तर दुर्त अनुरुद्धसिंग खंगारोत नरायेणावर फौजसुधा आला आहे. त्याजवर येथून फौज रवाना केली असे. साताआठा रोजामधे मुकाबला होईल. ईश्वरकृपेकरून दुष्टाचे पारपत्य होईल. चिंता नाही. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती. पाटणचे यैवजी उजनीच्या हुंड्या पाठवाव्या. हे विनंती.

---

लेखांक [२१६] श्री * संवत १८१२ भाद्रपद वद्य ११

[१ अक्टुबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पोष्ये चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २४ जिल्हेज मुक्काम नागोर जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. हुंडी सतावीस हजार दोन रुपयाच्या हुंड्या पाठविल्या आहेत जमा जाल्याचे उतर पाठवणे म्हणोन लिहिले. तर हुंडीपत्रे जैनगरास पाठविली आहेत. सही हाउन यैवज जमा जाल्यानंतर जाब पाठउन देउ. यथील वर्तमानाचेविसी लिहिले. जोधपुरी राजश्री संताजी वाघळे व जीवाजी पवार व मालजी[१२९] वल्द शहाजी सिंदे वगैरे लोक व जगंनाथ पुरोहित व रागडेदेखील तेथेच आहेत. कछव्याची फौज सावेरसंनिध आली म्हणोन पुढे राणोजी मोईटे फौजसुधा पाठविले

---

(१२९) बखरीतील मालोजी सिंदे तो हाच. त्याच्या बापाचे नाव मिळतें इतकेच नव्हे तर 'तैनात सेनापती सन खमस' या यादीत 'शहाजी सिंदे' ह्मणून जे दुसरे नांव आहे ते याचेंच असले पाहिजे. अर्थात यादीतील राणोजी सिंदे हा कन्हेरखेडकरच होय हे निर्विवाद आहे. शकेस आता वावच नाही. [पिद ७ ले. २३] याच मालोजी व शहाजीसंबंधी दुसरा उल्लेखही सापडतो. [पिद २ ले. ४९]

आहेत. मागून राजश्री नरसिंगराउ शिंदे व खानाजी जाधव फौजसुधा व सवाईराम यैसे पाठउन दिल्हे आहे. ते हे एकत्र जाल्यानंतर अनुरुद्धसिंग याने सलूख करून माघारे गेले तर उतमच जाले. सलूख न जाला तर लुटून घेतच आहेत. चिंता नाही. [जयाजी] आपासाहेब मृत्य पावल्यानंतर फौज व तोफा पाठउन नागोरच्या आसपासच्या गढ्या चाडू व रोहेण व दुगोली व झाडोली व खाटू दोन्ही व काळ्या वगैरे गढ्या आसपासचे गांव सर्व लुटून घेउन गढ्या पाडून टाकल्या. तेणेकरून रसद बंद जाहली आसे. पहिल्यापेक्षा नागोरवाल्यावर दबाव विशेष आहे. यथील बंदोबस्त राखून कछव्यावरही फौज पाठविली आहे. मोठी हिंमत [दत्ताजी] पाटीलसाहेबानी[१३०] केली आसे. कळले पाहिजे. सदैव पत्री सांभाळ करीत जावा विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती. राजश्री

त्रिंबकजीबावास सा नमस्कार विनंती उपर. लिा परिसोन लोभ असो दीजे हे विनती.

---

लेखांक [२१७] श्री

[१७५६]

राजमान्येयाविराजित राजेश्री

बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] सा नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम जाणू[न] तुम्ही आपले क्षेम लिहित जाने. यानतर तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान श्रुत जाले. पत्राचा उतर श्रीमत [दत्ताजी] पाटीलबावानी लिा आहे त्यावरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(१३०) 'पहिल्यापेक्षा दबाव विशेष आहे येथील बदोबस्त राखून कछव्यावर फौज पाठविली मोठी हिमत पाटीलसाहेबानी केली' हे वळयाचे उद्गार मननीय होत 'भाउसाहेबाचे नेत्र सतोष जाहाले. याप्रमाणे निघडा मराठ्यात नाही' हे बखरीचे वर्णन निराधार ह्मणवत नाही 'दत्तबा ईश्वराचे घरचे सिपाई. परम वीर्यवान मर्द पराक्रमी हिमतीस बहादुरीस चुकतील येसा अर्थ नाही' [खड १ ले. १५५, १५७] 'दत्तबा केवल भीमच आहेत' [लि. ५८] 'सिंदे मोठ्या हिमतीचे माणूस जवामर्द शूर पराक्रमी. येवढे आवडबर आले असता किमपि भय चिंता किंवा उद्वेग ज्याच्या मुखश्रीवर दिसतच नाही. माझ्लच घेतो हेच अक्षरे तोडावाटे निघतात' [पेद २ ले ११४ अ] 'नजीब दगा करुन वांचला रोहिले सुजा व अबदाली तिघे येक होतील त्यासी सिंदे मुकाबला घेतील' [पेद २१ ले. १७६ पेद २ ले. १०७] त्याप्रमाणे 'गिलच्यासी गाठ पडताच जुज उत्तम प्रकारे होउन त्याच रात्री

लेखांक [२१८] श्री * संवत १८१२ पौष शुद्ध ६

[७ जनवरी १७५६]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * ४ राखर मु॥ नागोर जाणोन स्वकीये कुशल लखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. यथील वर्तमानचेविसी लिहिले तर आनरूद्दसिंग खगारोद येथे आला आहे. त्याने करार केला आहे की पूर्णमेपावतो जोधपुर किला खाली करून देतो. ऐसा करार केला आसे. पौर्णिमेपर्यंत जो मनसबा होईल तो मागाहून तपसीलवार लेहून पाठउ. येते समई पाटणच्या व कोटाच्या ऐवजी हुंडया आणल्या पाहिजेत. खर्चाची वोढ विशेष आहे म्हणोन सूचना लिहिली असे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकबावा स्वामीचे सेवेसी सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लोभ असो दीजे हे विनंती. गरूडवाहन कमल बाळाजीबावाबराबर पाठविले पाहिजे. हे विनंती.

---

गिलज्या यमुना उतरोन पार गेला'. [पेद २ ले. ११२, ११७ पेद २१ ले १७८] नंतर दिल्लीकडे ५० हजार फौजेनसी 'गिलज्या आला. [पेद २७ ले. २४७] 'गवताचे दाटीमुले निकड जाली. फौजेचे तोड न लागले प्रथम सरदारासी गाठ पडली. गोली लागोन ठार जाले' अशी होलकरहिंगण्यादिकांची साक्ष आहे [पेद२७ ले २४७] अवदालीच्या ४० हजाराशी केवल २५ हजारानिशी गाठ घालून त्याची वीरश्री घालविणारा मराठा वीर इतिहासात हा एवढाच होय. 'अवदाली आला याजकरिता सिंदे रोहिल्याचा कारभार ठेउन गेले. तेच समई होलकर यास सामिल करुन जावयाचे होतें. ते न केले' असा पेशव्याचा आक्षेप होता [खड १ ले १५७] 'सोवती येकेजागा असलिया सर्वांचें पारपत्ये होईल. अवघ्या हिंदुस्थानचा वदोवस्त होउन येईल'. [चंद्रचूड १ ले १३७] हे सर्वमान्य तत्व असून त्याचें परिपालन न झाल्यामुळें पानिपतचे अरिष्ट कसे प्राप्त झाले आणि 'दत्ताजी सिंदे यानी मर्दुमी केली परतु कार्य न जाहाले हा दृष्टांत' गोपिकाबाईचा असून तो राघोबाने प्रथम उल्लेखिला आहे. [ऐटि २ क्र १८ ले ३] तीच री अनेक सशोधक ओढीत आले आहेत त्याचे उत्तर बखरीत मिळते. त्याचा विचार कर्तव्य आहे पण तो विषय पानिपतच्या मीमासेचा असल्यामुळें केवल टीपेंत मावणार नाही. यासाठी तो प्रश्न किंचित लावणीवर पडून विरस झाल्यास उपाय नाही.

लेखांक [२१९] श्री * संवत १८१२ फाल्गुन शुद्ध ७

[८ मार्च १७५६]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * ६ जाखर मुक्काम मोजे इडवे प्रां मेडते जाणोन स्वकीय कुशल लखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. हुंडया पाठविल्या त्या जैनगरास पाठविल्या असे. सही होउन यैवज जमा जाल्यानंतर पावल्याचा जाब मागून लेहून पाठउ. येथील वर्तमानाचे-विसी लिहिले तर नागोरवाल्याचा यजमानाचा सलूख जाला निमे मुलुक व नागोर किला व पंनास लाख खंडणी याप्रमाणे करार करून कूच केले. ते दरकूच जैनगरच्या मुलकात जात आसो. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपर. लिा। परिसोन लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२२०] श्री * संवत १८१३ पौष वद्य १०

[१५ जनवरी १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण व धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २४ राखर मु॥ श्रीगोंदे जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. पाटण कोटयाच्या यैवजी हुंड्या पंनास हजाराच्या करून उजनीस पाठविल्या म्हणोन लिहिले त्यावरून यजमानास श्रुत करून प्रतिउतर पाठविले आहे त्यावरून कलो येईल. राजश्री नारोबा कडे तीनसे रूपये पाठविले म्हणोन लिा। तर चिरंजीवाची पत्रे हमेशा येतात परंतु तुमचा मजकूर त्यानी काही लिहिला नाही. तुम्हापासी जाब आला आसेल त्याची नकल करून लेहून पाठवणे. जाते समई आपण करार केला त्याप्रमाणे यैवज पावता करणे. आपण जाते समई जे म्हटले तेच यैकिले. आपण सरकारातून काये सोडून घेतले काये दिल्हे ते सर्व विदित आहे. सूचनार्थ लिा। आसे. कराराप्रमाणे तरी यैवज चिरंजीवास पावता करावा. येथील वर्तमाना तर श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी व श्रीमंत राजश्री

भाउसाहेब व श्रीमंत राजश्री दादासाहेब येसे सेनेसह श्रीगोंदास येहून येजमानाचे समाधान[१३१] बहुता प्रकारे केले. नवा सरंजाम खानदेशात येक परगणा यावल दरोबस्त दिल्हा व श्रीगोंदामोवते चालीस गांव दिल्हे. याप्रमाणे गौर केला. श्रीमंत राजश्री जनकोजीबावाचे लग्न माघ वद्य आष्टमीचा निस्चये केला आसे. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लोभ आसो दीजे. राजश्री रावो जर्नादन याजबा। जिनस पाठविला तो पावला. हे विनंती.

---

लेखांक [२२१] ॥श्री * संवत १८१३ फाल्गुन वद्य ८

[१३ मार्च १७५७]

श्रीमंत राजेश्री [रामाजी] भा[ऊ] स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सां। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल तां। छ * २२ जाखर मु॥ श्रीगोदे जाणोन स्वकीये कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. कृपा करुन पत्र पाठविले ते उतम समई प्रविष्ट होउन समाधान जालें. स्वकीये वर्तमान कितेक प्रकारे विस्तारे लिहिलें तें सविस्तर यजमानास श्रुत केले परंतु त्यानी वर्तमान येकून आम्हांस आज्ञा जाली की वर येथे राहावयास आहे. बाईकामुळें समागमे आणावी. ओषधउपाये करणे तोही येथेच करावा म्हणजे घरी राहाणे ही जाले ओषधही × × × होईल आणि समजाविसीचे × × त्यास सत्वर बोलावणे त्यास × × ही आपणांस पत्र त्यास × सविस्तर कळो येईल. आपण × × × पाहिजे. यात्रेस वर्ते जाव × × (मो)कूफ केले. समजावीस करुन उपरांतीक जावें म्हणोन निश्चये केला आसे. प्रस्तुत समजावीस ब्याली लागली आहे. तमाम लोकास पत्रे गेली आसेंत. काही लोक आलें. राहिले तेही येथील. आपण सत्वर आले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

(१३१) भेदभाव न बाळगिता अविश्रांत श्रम करुन अलोट संपत्ति कर्जासाठी समर्पण केली असता मारवाडच्या स्वारीत मोकळया मनाने सहाय न केले त्याचा विषाद शिंद्यास वाटला ह्मणूनच त्यानी नारो शंकराची उपेक्षा केली [पेद २ ले. ५९] आणि देखी येतांना स्वारी सरळ गावी गेली. ती रूक्षता ओळखून पेशव्याची ही सपावणी होय. या 'महालास' यावलचोपडा असें नाव कागदोपत्री असून तो या वेळी प्राय. उजाड होता. 'मुलेमाणसे ठेवावयास किला द्यावा असे मान्य केले असतां सिवनेर' मिळाला नाही. [पेद २ ले. ७०] 'रहावयास जागा पेडगाव द्यावें ह्मणून करार होता ते काम

लेखांक [२२२]                    श्री    * संवत १८१३ फाल्गुन वद्य ११

[१६ मार्च १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी

पो    चिंतो कृष्ण व धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा विनंती उपर. यथील कुशल ता छ * २५ जाखर मुा श्रीगोंदे जाणोन स्वकीय लखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. पाटणच्या हिसेबाच्याविसी लिहिले, तर ज्याप्रमाणे आजता हिसेबाचे फडसे होत आले आहेत त्याच रतीप्रा फडशा केला असे. गब्द लावासा काये आहे, आपले पत्र तपसीलवार यजमानास श्रुत करून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून कळो येईल. येथील वर्तमान तर यजमानाचे लग्न माघ वद्य ७ सप्तमीस[132] जाले, प्रस्तुत फौजेची समजावीस नालबंदी[133] देत आहेत. सत्वरीच कूच करून हिंदुस्थानात येणार. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा नमस्कार विनती उपर. लिा परिसोन लोभ आसो दीजे हे विनंती.

---

जाल्ने नाही'. [खंड १२ ले. ७२ पेद २९ ले ५९] इतकेच नव्हे तर देशी पूर्वापार जे महाल होते ते पानिपतानंतर बहुतेक जप्त झाले. [खंड ६ ले ५०७ वाड ९ ले १६५] त्याच्या मुळाशी जें कारण होते त्याचा मागीलपुढील राजकारणाशी संबंध येतो एतदर्थ ही गोष्ट वाचकानी लक्षात ठेवावी. पुढे किल्ला असेर घेतला त्याची पूर्वपीठिका अशी आहे. [लि. ११९, १२०]

(१३२) 'लग्नाचा निश्चय अष्टमीचा' होता [लि २२०] पण ते 'सप्तमीसच जाले' असे हा पत्र सांगतो. जनकोजीच्या पत्नीचे नाव 'कासीबाई' होतें याविषयी बखरीची व वंशावलीची एकवाक्यता आहे. केवळ माहेरचे आडनाव जुळत नाही. खर्डेकरास निंबाळकर मानले तर वादच सुटला कासीबाईचा बंधु व्यंकटराव ज्याचे नाव बखरीत येते ते पत्रात आढळत नाही हणमंतराव निंबाळकराचे नाव अनेकदा आलें असून त्याचा 'मेहुणा नागोजी माने जुझात ठार पडला' हे बखरीचे कथन कसोटीचे आहे [लि १७८, १७९] याच हणमंतरावाचे एक पत्रही उपलब्ध होते त्यात तो 'आपला आमचा स्नेह जिवाला माया ममता आहे' असे स्पष्ट दर्शवितो किंबहुना त्याच्या मध्यस्थीनेच निजामाशी तह झाला असावा असे अनुमान होते. [७ दिसबर १७५७] अस्तु 'पेशव्यास अगत्य' काय या बखरीच्या कटाक्षा विषयी मारवाडच्या स्वारीचे सूक्ष्म निरीक्षण करून पाहिले पाहिजे.

(१३३) 'शिलेदाराचा हिसेब भाद्रपदमासी. नालबदी अश्विनकार्तिकात रोजमुरा चैत्रात' देण्याची प्रथा होती असे गोपाळराव गणेश सांगतो [१० मे १७५५] तेव्हा अबदालीसाठी शिबानी नालबंदीचे दिवस नसता वैशाखमासी ४० हजार फौजेस नालबदी दिली असे बखर म्हणते ते या पत्राने खरे ठरते. [लि १७७, २२१]

लेखांक [२२३]                श्री        * संवत १८१४ ज्येष्ठ शुद्ध १२
[३० मे १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो॥ माहादाजी[१३४] कृष्ण व चिंतो कृष्ण व धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता॥ छ * ११ रमजान मुकाम श्रीगोंदे जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. पा॥ पाटण येथील नानाचे वर्तमान लिहिले व राजश्री नारो बालाजी याची वरात जाली त्याचे वर्तमान लिहिले. ते सविस्तर यजमानास श्रुत करून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून कळो येईल. मुख्य गोष्ट की केल्या कराराप्रमाणे मुदतीच्या मुदतीस रुपये यावे यातच उत्तम आहे. राजश्री रामरावजीपासी ऐवज पावता केला त्याच्या कबजाची नकल पाठविली ती पावली. सदैव पत्र पाठउन परामृष करीत आसावे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावा स्वामीस सा॥ नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसीजे. लोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२२४]                श्री
[१७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावाचे सेवेसी.

पो॥ चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपर. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करणे विशेष. आपली पत्रे येतात ते श्रीमंतास श्रुत करून त्याची प्रतिउत्तरे पाठविली आहेत त्यावरून वर्तमान कळो येईल. आम्ही

---

(१३४) या पत्रात वळे बधूंची नावे ज्या क्रमाने दिली आहेत त्याप्रमाणेच ते वडीलधाकटे होते सर्वांत लहान नारोपंत होता. [लि २३७] असतु. या वडील महादाजीपंताचा मुलगा विठलपंत चांगला राजकारणी निघाला. सर्वोजनगावचा तह करणारा विठल महादेव तो हाच वळे होता. त्याची पत्रें पुढे मालेत पहावयास मिळतील.

स्वामीचे पदरीचे आसोत. पत्र पाठऊन परामृष करीत आसावा. पूर्वस्नेहास आंतर न कीजे. विशेष काये लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार. लि॥ परिसोन कृपा करीत असावे हे विनंती.

---

लेखांक [२२५] श्री * संवत १८१४ आश्विन वद्य ३
[३० अक्टुबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो माहादाजी कृष्ण व चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * १६ सफर मुकाम नजीक शहर [औरंगाबाद] सडीस्वारी[१३५] जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते अक्षरशः यजमानास श्रुत करून प्रतिउत्तर पाठविले आहे त्यावरून कळो येईल. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपर. लिहिला मा।र परिसोन लोभ असो दीजे. आमचे वार्षिकाचे उजनीस पावते करणे. हे विनंती.

---

लेखांक [२२६] श्री * संवत १८१४ कार्तिक वद्य १२
[८ दिसंबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो माहादाजी कृष्ण व चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * २५ रावल मुकाम पइतूर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष: तुम्ही पत्र पाठविले ते पावले. ते सर्व यजमानास श्रुत करून प्रतिउतर पाठविले आहे त्यावरून सविस्तर कळो येईल. यजमान सत्वरीच श्रीमंताचा निरोप घेउन हिंदुस्थान प्रांते येणार आसत्ते. सदैव पत्र पाठउन संतोषवीत आसावे. विशेष काय लिहिणे कृपालोभ आसो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसीजे. लोभ असो दीजे हे विनंती.

---

(१३५) कास ले १४५, १४६, १४७, १४८ ही पत्रे १७५७ तील असून संपादकाचे वर्ष चुकले आहे.

लेखांक [२२७] ॥श्री * संवत १८१४ फाल्गुन वद्य १२
[५ अप्रेल १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पोष्ये धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २६ माहे रजब मु॥ उजेन जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावोन समाधान जाले. उजनीस येजमान किती रोज राहणार हे लि॥ म्हणून लि॥. तरी उदईक त्रयोदसीस कूच आहे. सांप्रत तुमच्याच मुलकात येतात, तुम्ही राज्यास व कारभारी यास घेउन सन्मुख यावे. नाही तरी मुलकाची खरावी होईल. श्रीमंत राजश्री [दत्ताजी] पाटीलसाहेब मागाहून[१३६] येका महिनिया येतील. त्याजसमागमे तीर्थस्वरूप राजश्री [चिंतोपंत] तात्या आहेत. बहुत काय लि॥ लोभ आसो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबावास सा। नमस्कार विनंती. लि॥ परिसीजे हे विनंती.

---

लेखांक [२२८] ॥श्री * संवत १८१५ वैशाख शुद्ध १४
[२१ मे १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पोष्य धोंडो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १३ रमजान जाणून स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. मोतियाच्या चौकडीयाविसी आपणास सांगितले होते त्यास चौकडा राजश्री रावोपंत सोपारकर व अथवा राघो जनार्दन याजसमागमे पाठवावा. येथे पाहून ठेवावयाचा असेल तरी ठेउ. नाही तरी सत्वरीच आपणापासी पाठउन देउ. फार दिवस ठेवणार नाही. कोटवाल्यानी आमचा करार केला आहे तो येवज आपण उगउन घेतलाच असेल. तो यैवज तुम्हाकडील वार्षिक तीर्थरूप राजश्री [चिंतोबा] तात्याचे व आमचे दुसाला येणे आहे. तो यैवज राजश्री राघो दादाजी नि॥ राजश्री साबाजी पा। सिंदे याजपासी पावता करावा. बहुत काय लिहिणे लोभ असो देणे हे विनती.

---

(१३६) दत्ताजी शिंदे चाभारगोंदियास लग्नाकरिता गेले ते मागाहून आले हे बखरीचे वर्णन यथार्थ उतरते. पेद २७ ले ८४ हे पत्र 'दिसबर १७५८' चे असून संपादकास त्याची तारीख साधली नाहीं

लेखांक [२२९] ।श्री * संवत १८१५ श्रावण शुद्ध ४

[८ अगस्ट १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक धोंडो कृष्ण [वळे] साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत छ * २ माहे जिल्हेज मुा सावर जाणोन स्वकीये लेखन करीत गेले पाा विशेष. पेशजी पत्रे पाा ते पावली परंतु कासिद आज येउन गेला नाही. सांप्रत आपण हुंडी पाा ते पावली. सदैव येणारासमागमे पत्र पाठउन सांभाळ करीत जाणे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लालाजीस व गोपाळरावजीस साा नमस्कार विनंती. लिाा परिसीजे हे विनती.

---

लेखांक [२३०] ।श्री * संवत १८१५ भाद्रपद शुद्ध ४

[६ सितंबर १७५८]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक धोंडो कृष्ण [वळे] साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत छ * २ माहे मोहरम जाणोन स्वकीय लेखन करीत गेले पाा विशेष. तुम्ही पत्र पाा ते पावले. लिहिले वर्तमान विदित जाले. आपण सरकारात कोठ्यापाौ व पाटण पाौ चालसा हजार रुपायाच्या हुंड्या पाा त्या पावल्या. सेकारून येवज जमा जाल्या नंतर लहून पाठउन देउ. तदनंतर आपण पेशजी लिहिले होते की श्रीमंत राजश्री सुभेदाराचे ताकीदपत्र राजश्री आबाजी [रघुनाथ] पतास पाा त्यावरून मारनिलेस ताकीदपत्र पाा आहेत. हे पावतील. सदरहू चालसा हजाराच्या हुंड्या राजश्री साबाजी पाा [शिंदे] याजकडे आपण पाठविल्या. त्यानी येथे पाठविल्या. त्या पावल्या. माहाराव अजीतसिंगजीचा[१३७] काल जाला म्हणून लिाा त्यावरून चित्त खिन्न जाले. ईस्वरसत्ता

---

(१३७) महाराव दुर्जनसालजीनंतर ४० लक्ष खंडणी देऊन अजीतसिंगजी कोटयाच्या गादीवर आले [भाग १ ले १८०, १८१] ते या वर्षी वारले तेव्हा त्याचा मुलगा छत्रसाल गादीवर बसला [भाग १ ले. २१२] अर्थात् याविषयी टाडचे कथन चुकले आहे हे सहज लक्षात येईल [Tod Rajasthan vol II page 416] तसेच प्रथम जनकोजीची [भाग १ ले १९०] आणि नंतर दत्ताजी शिंद्याशी होलकराची भेट होऊन तुकोजी होलकरास समागमें दिले असे बखर सांगते तें या पत्रावरुन खरे ठरते [चंद्रचूड १ ले १३७] भेटीचा कालही या पत्राने निश्चित होतो

प्रमाण. हे वर्तमान कळल्यानंतर श्रीमंत राजश्री मल्हारजीबाबाचे मानस बहुत आहे जे तत्र स्छलास जावे. दबाउन च्यार रूपये घ्यावे. आपले येजमानास चला म्हणत होते परंतु येजमान यानी टाळा दिल्हा. जे अम्हास मारवाड व दिलीकडे जाणे जरूर आहे. तुम्ही म्हणाल माहाराव दुर्जनसाल मृत्य पावले त्याप्रमाणे अताचा प्रसंग नाही. बंदोबस्त उतम आहे. उगेच दबून रूपये देणार नाहीत. त्यानी उतर दिल्हे जे त्याचे भाउबंद कारभारी सिवसिंग झाल्यासुधा होडीते त्याची सूत्रे आम्हाकडे आली आहेत. पनाससाठ लक्ष रूपये यासिवाय मुलुक सोडवितो. येजमान बोलिले जे बहुत उतम. रूपये येत आसतील तर अम्ही मना करीत नाही. सुखरूप घ्यावे परंतु आम्हास यावयास फावत नाही. हजारपाचसे फौज देहू. याप्रमाणे करार जाला आहे. आपणास कळावे. घराउ वर्तमान आपणास कळावे म्हणून लिा आसे. बहुत काये लिा लोभ असो देणे हे विनंती.

राजश्री त्रिंबकबावास सा। नमस्कार विनंती. लिा परिसीजे हे विनंती.

---

लेखांक [२३१] श्री

[१७५९]

राजश्रियाविराजित राजमान्य रा।

त्रिंबकबावा गोसावी यांसि.

सेवक चिंतो कृष्ण सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करणे. यानंतर तुम्ही पत्र पाठविले ते पावले. हतीचे वाहन पितळी पाठविले ते पावले. त्याचे रूपये दाहा १० रा। बाळोबा याजकडून देविले ते घेउन उतर पाठवणे. सदैव पत्र पाठउन सांभाळ करित असिले पाहिजे. रा। दयानाथराव याचे वर्तमान लिहिले तर रांगडे लोक लबाडच आहेत. कळले पाहिजे. बहुत काये लिहिणे कृपालोम असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२३२] श्री

[१७६०] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक महादाजी कृष्ण व चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २० जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे

तदनंतर तुम्ही पत्र पाठविले ते पावले लिहिले वर्तमान अवगत जाले. येसेच सदैव पत्र पाठउन संतोषवीत जाणे. श्रीमतास पत्रे पाठविली ते त्यासी वाचून दाखविली. त्याचे उतर पाठविले आहे त्याजवरून अवगत होईल. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२३३] श्री * संवत १८१७ आश्विन शुद्ध २

[११ अक्टुबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। छ * १ रोवळ मु।। नजीक सोनपत जाणोन स्वकीय कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. श्रीमंताच्या सरकारच्या कारकुनाचा बोभाट लहून पाठविला. त्यावरून श्रीमताचे पत्र त्यासी पाठविले आसे. त्यास ते पत्राचे उतर देउन कारकुनाची रवानगी करणे. उजनीस रूपये पाठविले. उतम केले. यथून वरात जाली आहे. पनास हजाराची ते रूपये हर तजवीज करून देणे. वरात माघारी न पाठवणे. यथील वर्तमान तर दिलीहून कुच जाल. कुंजपुन्यास जातान अलीगोहर पातशाह केला. अवदाली वगैरे सर्व येमुनापारच आहेत. जुंज जाल्यावर सर्व गोष्टी होतील. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२३४] श्री * संवत १८१७ कार्तिक शुद्ध १

[८ नवबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लाल्वा [गुळगुळे] स्वामीचे सो.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ * २९ रोवळ मु।। पाणीपत जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री रामचंद्र कृष्ण यास श्रीमंतानी पंनास हजार रुपये देविले ते रुपये बहुत प्रयत्ने करून दिल्हे. याउपर वरात न करावी म्हणोन विस्तारे लिहिले ते सविस्तर कलो आले. श्रीमंतास सर्व वर्तमान श्रुत केले असे. आपण रुपये वरातेप्रमाणे दिल्हे तेणेकरून बहुतच कृपावंत यजमान तुम्हावर जाले

आसेत की या समई तुम्ही बहुत केली की वरातेचे रुपये पावते केले. फार उत्तम आवण केले. येथील वर्तमानाचेविसी लिहिले तर शाहजहा पातशाह कैद करून अली गोहर पातशाह नवा केला. त्याच्या पुत्रास छ ‡ ३० सफरी वलीआहादी दिल्ही. तेथून कूच करून कुंजपुऱ्यावर गेलो. अब्दुल्समदखान मोमिनखान गिलज्याकडील व कुतुबशाहा नजीक[ब]खानाचा ऐसे जमावसुधा राहिले होते. कदक खाणून भिंताडे घालून मजबुतीने राहिले होते. त्याजवर छ † ७ रावली हला केली चढे घोडे त्यास लुटले. तत्क्षणीच कुंजपुऱ्यावर हला करून किला घेतला. मोमिनखान गोलीने लढाईत कामास आला. अबदुलसमदखान व कुतुबशाह यासी धरून सिरच्छेद केला. निजाबतखान कुंजपुरेकर कबिल्यासुधा कैद केला. पांचसहा हजार माणूस मारले व सासात हजार माणूस जखमी केले. बरकड मुखी तृण धरून तुम्हारी गौ ऐसे म्हणोन निघोन गेले. दाहा हजार घोडे पांचसहा हती उंटे डेरेदांडे वगैरे वस्तभाव आणिली. सरकारचा हती जवाहिरगज[१३८] पूर्वी गेला होता तो यजमानाकडे आला. वीस हजार माणूस हत्यारबंद होते. ईश्वरे फते केली. अबदाली रोहिले यासी लढाई होत असे. त्यासी श्रीमंतासी कोसाचा तफावत आहे. निशानी गोळागोली तोफाचा मार होत आसे. श्रीभगवंत कृपेकरून धर्माची स्थापना करून शत्रुचा नाश करून श्रीमंतास यश देईल. चिंता नाहीं. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

‡१० अक्टूबर १७६०. †१७ अक्टूबर १७६०

(१३८) हे पत्र अत्यंत महत्वाचे होय वाचक आणि विशेषत पानिपतची मीमांसा करणारे इतिहासभक्त हे विचक्षण बुद्धीने वाचतील अशी आशा आहे बखरीतील कुंजपुऱ्याचा वृत्तांत किती वास्तविक आणि विश्वसणीय आहे याची तुलना करून निवाडा करण्यासाठी हे अप्रतिम साधन होय दिल्लीहून मराठे निघाले ते '१ रावली नजीक सोनपत' मुकामी पावले [ले २३३] कुंजपुऱ्यावरी '७ रावली हला केला' आणि '२२ रावली पानिपतावर' माघारे आले [खंड १ ले २६१] कुंजपुऱ्यास असता 'शिंदेहोलकर डेरियास आले अर्ज केली की आता दिलीस जाऊन पोचावे मांत उत्तम आहे ऐसे ऐकून भाऊने विकल्प चित्तात आणिला. ते समयी दिलीस प्रविष्ट होते तर अवघड न पडते ते कुंजपुरियात बसल्या जाऊन तेथेच स्वस्थ राहिले'. हा आक्षेप बखरीचा योग्य असून सप्रमाण सिद्ध होऊ पहातो 'कुंजपुरा येथील बंदोबस्त केला तो आबदाली सुज्याउद्दौला नजीबखान रोहिलेसुधा येमुना उतरून आलीकडे आला. हे वर्तमान ऐकून तेथून अबदालीवरी फिरोन दरमजल पानिपताजवल गाठून सख्या फौजा करून मागें बुनगे पुढें तोफाचा आरवा देऊन मजबुतीने आहो' हे प्रत्यतर पहावे [पुरंदरे १ ले ३९१] जखमी व मेल्या माणसाची सख्या जुळते. जवाहर गजाचे स्पष्टीकरण होते कालाचे कौतुक कळतें. गोलवदीचे कथन मिळते केवल सोवत्याचें अर्ज काल्पनिक म्हणता येतील की काय याचा विचार पुढें विस्तारे केला आहे तो वाचनीय आहे.

लेखांक [२३५] श्री * संवत १८१७ फाल्गुन शुद्ध १

[७ मार्च १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लाल्वा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनती उपर. येथील कुशल ता। छ * २९ रजब मुकाम ग्वालेर जाणोन स्वकीय कुशल लखन करणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. कछ्याची फौज पाटणावरू[न] येहून बुंदी प्रातीचा गला कुली नेला. नुकसानी विशेष जाली. सोपारकरानी राघो शंकर व भगवतराव शंकर यासी बेमानी केली म्हणोन कितेक लिहिले. त्यावरून येथून तुम्ही लिहिल्याप्रमाणे श्रीमंत राजश्री सुभेदाराची [होळकर] पत्रे पाठविली आहेत त्यावरून सुटका होईल तर उतम असे. येथील वर्तमानाविसी लिहिले तर श्रीमंत राजश्री भाउसाहेब व श्रीमंत राजश्री जनकोजी सिंदे हे उभयेता लडाईतून निघोन आला जाटाच्या मुलकातून लखे जंगलाकडून बिकानेराकडे गेले म्हणोन बहुतामुखे वर्तमान आहे त्याच्या शोधात येथून कासिद जोड्या दोनतीन पाठविल्या आहेत. तथ्य वर्तमान आले म्हणजे लिहून पाठउ. तपसील-वार वर्तमान पूर्वील पत्री लिहिले आहे त्यावरून कळू येईल. विशेष काय लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती. तुम्ही लिहिले की यजमानाच्या खबरीकरिता कासिदजोडी पाठविली आहे म्हणोन लि॥ तर उत्तम केले. कळले पाहिजे. हे विनंती.

---

लेखांक [२३६] श्री * संवत १८१८ चैत्र वद्य १३

[२८ मे १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपर. येथील क्षेम छ * २६ माहे रमजान मु॥ श्रीमथुरा जाणोन स्वकीय लखन केले पाहिजे विशेष. आपण चैत्र शुध त्रियोदसीचे पत्र कोटेहून पाठविले ते छ २४ रमजानी पावोन लिहिला मजकूर सविस्तर विदित जाला. श्रीमंत यजमानसाहेबाचे वर्तमान तर चैत्र वद्य पूर्णिमचे दिवसी कस्बे विजैपुर सबलगडचे पलीकडे साता कोसावर कस्बे मजकुरच्या वैरागियाचे मठी रात्रीचे वस्तीस होते. समागमे तटु कुंमेद १ व जाट दोघे व

वैरागी १ यसे होते. त्यास राजश्री विठल सिवदेव [विंचुरकर] याचा खिजमतगार कुसाजी खामकर राजश्री विठलरायाच्या पुतण्याच्या सोधास निघोन जात होते. त्यास रात्रीचे वैरागी मजकूर कस्बेकर तेथे वस्तीस खिजमतगार व दोघे जाट ऐसे राहिले होते. तो खिजमतगार पुरता श्रीमंतास वळखत होता. त्याणे श्रीमंत बावासाहेबां वळखोन रामराम केला. तेव्हा त्यास खुणेने एकांती बोलाउन लस्करचे व सरदाराचे नावे घेउन वर्तमान पुसले. त्यास त्याणे सविस्तर लस्केरचे व सरदाराचे वर्तमान यजमानसाहेबास श्रुत केले. तो समागमे खिचमतगाराचे माणसे जाठाची दोघे होती त्याणी तर्क करून रामराम केला. तेव्हा खिजमतगारावर व त्या माणसावर राग केला. तेव्हा ते दूर सरकून बसले. उपर मोठे प्रातःकाळी खिदमतगार व माणसे जाठाची निद्रस्तच सोडून त्यास न कळता कूच करून लस्केराकडे जावयास गेले. खिदमतगार व माणसे जागी होउन वैरागी यास पुसले. तेव्हा त्याणे सांगितले की लस्केरास जावयास गेले. हे तहकीक करून सतरा प्रहरामधे करोलीवरून आले. ते येथे जाटापासी मथुरेस दाखल जाले. त्या माणसानी सविस्तर वर्तमान सागितले. त्याजवर ठाकराने [सुरजमल] इनामे दिल्ही. आनंद आनंद केला. आम्हीही इनाम देउन खुसवक्ती केली. हेतहकीक वर्तमान आहे. केवळ ठाकराचे जिथालेची माणसे होती त्याणी सांगितले. दुसरे दिवसी राजश्री विठलरायाचे खिदमतगारास आम्ही राजश्री गंगोबातात्या [चंद्रचूड]नी पुसले. त्याणे शफतकिरिया करून जाहले वर्तमान सिधांत सांगितले. त्यास दिवसगत लागली. अद्यापि लस्केरात पोचलियाचे वर्तमान येत नाही. यामुळे चिंतार्णवी आहो. लस्केरात पावलियाचे वर्तमान येईल तो सुदिन असे. इकडील वर्तमान तर कितेक बंदोबस्त पूर्ववताप्रमाणे जाहला आसे. बाकी दिलीच्या वगैरे महालचे वकील कुली आले आहेत. तो बंदोबस्त होता येक मास लागेल. सुजातदौलाने व गंगापारचे रोहिले याणी पूर्ववताप्रमाणे बंदोबस्त करून गेले असेत. आंतरवेदीत अमल जाला. याकूफअली खान आबदालीकडील आला आहे. त्याने वजिरीचे कलमदान गाजुद्दीखानास वस्त्रे सुधा दिल्हे. राहिली कामे सत्वरीच करून घेतो. श्रीमंत यजमान नित्यानी दोन कोस तीन कोस चालतात. ते गुप्तरूपे जातात. त्यास उजनीस जावयास येक मास पाहिजे. तदनंतर पत्र येईल. लस्कर दरमजल उजनीस गेले म्हणोन गाठ न पडली. जीवंत आहेत. बहुतनी दृष्टीने यजमानास पाहिले. चिंता न करावी. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२३७] ॥श्री *संवत १८१८ भाद्रपद वद्य १४

[२७ सितंबर १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लाल्जीबाबा स्वामीचे शेवेसी.

सो नारो कृष्ण [चळे] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * २७ माहे सफर जाणोन स्वकीय कुशल लेखन कीजे. तदनंतर तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान अवगत जाले. तीर्थस्वरूप राजश्री [चिंनोपंत] तात्या ग्वालेरीस आले. उजनीस सत्वर येतील. दक्षण प्राती मोगलाने दंगा केला. शेवगाव पर्यंत जपती केली. संगमनेर वगरे जपती केली. बरहाणपुर शहर मोगलाने घेतले. रा। साबाजी पा। शिंदे देशी गेले. कळले पाहिजे श्रीमंत रा। रघुनाथरावदादा पुण्याबाहेर डेरेदाखल आहेत. फौज जवळ नाही. संग्रही गृहस्थास लुटीत आहेत. सदाशिव रामचंद्र [पुखठणकर] याजपासून चौदा लक्ष रूपये घेतले. वासदेव दिक्षित तीन लक्ष व आबा मजगदार बावीस येणेप्रा। अकरा आसाम्या नेमल्या आहेत फौजेची चिंता नाही. शक[२३९] पुरावयासि आला आहे. बहुत काये लिहिणे हे विनती.

तीर्थस्वरूप राजश्री राघोपंत मामास सा। नमस्कार सागणे. हे विनंती

---

(२३९) पहा भाग १ ले २२३ टीप २२७ 'जनकोजी शिंदे मलकापुर प्रांत जटवाडा येथें जिवत होते अशी बातमी देशी निंबाबाई शिंदास देणारा पितोबा चळे होता [पेद २९ ले २] मात्र त्याच्या बिषयी पूर्ण निराशा पेशव्याची झाली असावी. कारण 'सिरोंजेहून माघारे फिरल्यावर पूर्वलोभास अंतर केले उजनीस आले कारभाऱ्यापासून ११ लक्ष घेतले कापडजवाहिरही घेतले पवाराचा सरंजाम जप्त केला. सार्थकाची जात चांगले तऱ्हेने दिसोन आली' [पेद २ ले १४२] 'तेथून इंदुरास आले. गौतमाबाईकडे पाचसात लक्ष खर्चास व तोफा मागितल्या तिणे साफ सांगितले की आपणास येक पैसा द्यावयास अनकूल पडत नाही. वाड्यात येतील ते समयी काये देणे ते देउ [खरे ३ ले ७१४] या पत्राची मिती खऱ्याची चुकली असून खरी तारीख १४ अप्रेल १७६१ येते कारण याच वर्षी दसऱ्याच्या सुमारास गौतमाबाई मरण पावली अस्तु 'येक दिवस राहून प्रयत्न करावयाचा तितका करुन पाहिला बराणपुरास गेले तेथून पत्रे पाठविली की देशचे महाल जप्त करतो येणेकडून यजमानाची मर्जी फारच कडू जाली' [ऐच ले २] 'सुभेदार याचे चित्तास उदासीनता आली सेवा केली त्याचे फल हे पुढे केलिया कळतच आहे [ऐच ले. १] 'जनकोजी सिंदे याच्या अशा गती त्याच्या स्थलास जाउन करावयाचे नवते ते केले राणोजी जयापा दत्तबा कामावर आले सर्फराजी करावयाची ते येकीकडेच ठेउन नवेच आडलात येते चाकरी केल्याचे सार्थक हे येणेप्रमाणे असताही सेवा करावयास चुकत नाहीत' [पेद २ ले १४३] 'चिमाबाई सिंदी पुण्यात आहे तिने श्रीमंतास विनती करुन

लेखांक [२३८] ॥श्रीराम

[१७६२]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजी बल्लाळ स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो कृष्ण [वळे] कृतानेक सा। नमस्कार विनंती. यथील कुशल

---

जफतिया उठविल्या रवलोजी सिंदे याच्या बाबाला सरंजाम श्रीमंत करनार ऐसी वार्ता होती. [पेद २९ ले ४] किंवा तुकोजी सिंदे याचा भाऊ महादजी सिंदे आउचकर याचे नावे सरदारी सागावी ऐसे घाटत आहे [खड १ ले २९२] ती यथार्थ होती 'याद कलमवार होती तिजवर नानासाहेबाचे बोलणे होऊन पवाराची व शिंद्याची जप्ती उठविली जिवाबाई सिदी याचे कारभारियास बोलाव पाठविले' [खंड ६ ले ५०७] या पत्राची मिती राजवाड्यास सापडली नाही म्हणूनच निंबाबाईच्या जागी जिवाबाई हा पाठ वाचला गेला पत्र १३ जून १७६१ चे आहे असु वर सुटला. सर्व भयचकित जाली पेसजीचे पैसुन्ये काहाडून श्रीमंताची पत्रे' आलीच होती तेव्हा बाईचे कारभारी गेले नसावेत अर्थात 'आबाजी महादेव निंबाबाईचे भेटीस गेले बोलले. बाई रागास आली. बोलली जे आमचे अकारीक साबाजी सिंदे व चितोबा हिंदुस्थानात चाकरीवर आहेत ते आलियावर फौज ठेवणे ते ठेविली जाईल परतु महादजी सिंदे याचे अनकूल पडत नाही उजनीहून चितोबाचा पुत्र श्रीगोदियास आले जनकोजी जिवत आहेत म्हणोन वार्ता मात्र सागतात [पेद २९ ले. ११] सापत्न मातेची अनूकूलता का नसावी याचे कारण हे पत्रच सागते 'शक पुरावयासी आला' या वेळी आणि तोही बळयाच्याच द्वारे या वर्षांतील पत्रें उपलब्ध नसल्यामुळें इत्यंभूत वृतात कळत नाही एवढें खास का वडीलकी केदारजीकडे राहून मुखतारी महादजी शिंदे करू लागले ही व्यवस्था बहुश निंबाबाईच्या समतीने असावी असे वाटते सक्षेपात कारण सागावयाचे म्हणजे १२ हजार सैन्य जे निजामाच्या लढाईंत विद्यमान होते [खरे १ ले ४३] ते नारो शकराकडून ४० लक्ष कर्ज काढून महादजी शिंद्यानी उभे केले दत्ताजीचे उपकार स्मरून राजेबहादरानें या वेळी पैशाचा पुरवठा केला म्हणून त्यास दिवाणगिरी दिली. त्याचे पहिले पत्र ७ डिसबर १७६१ चे पुढें येईल याच तारखेचे दुसरें पत्र निंबाबाई शिंद्याचे असून त्यात नारोपताचे नाव येते [भाग १ ले २६८] या पत्रान्वयें नारोपत व वावले याच्या नेतृत्वाखाली जे सैन्य उत्तरेस निघावयाचे होते त्याचे अधिपत्य केदारजी व महादजी शिंद्याकडे गेले. [भाग १ ले २७३, २७४] 'सिंदे याची सरदारीत चिवडा दिसतो. पेशवे बदमामली भेटीनतर सागू' [पेद २९ ले ३६] हे वाक्य वरील व्यवस्थेस उद्देशून आहे किंवा वेगळीच भानगड दर्शविते हे समजण्यास साधन नाही होळकराच्या भेटीचा योगही देशीच घडून आला [पेद २९ ले ३३] तदोत्तर 'केदारजी व महादजी सिंदे यासही पाठविले आहे याचेही स्वरूप राखून उपयोग पडल ते करावें. साप्रत सिंद्याचे जागी तेच आहेत' [विधद ५३] या स्वारीत नारोपंताचे काम त्याचा मुलगा शिवकराव पहात होता. तो उभयतास 'यजमान' असे स्पष्ट सबोधीत असे ते प्रमाण पुढें पहावयास मिळेल तसेच 'केदारजी सिंदे सुभेदार' हे हिंगण्याचे शब्द मननीय होत [खड ६ ले ४२५] हे पत्र १७६२ चे असून त्यातील बोध अप्रयोजक होय. 'गुलराज वकील दिमत अबदाली यासी ४०

[जाणून] स्वकीये कुशल लिहित जाणे. लस्करातून कूच करून निघालो ते मुा मुकुंदवरीस[140] सुखरूप पावलो. विशष. रा गशादीपंत लस्करात राहिले आहेत. त्यास पंचवीस रूपये खर्चास देणे. तुम्हास हरयेक यैवजी मजरा पडतील. चिंता न करणे. आगत्यरूप खर्चास देणे. बहुत काय लिहिणे लोम असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२३९] श्रीमदनंत

[६ फरवरी १७६५] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सो चितो कृष्ण [वळे] कृतानेक साष्टांग नमस्कार विंनती उपरी. यथील कुशल ता छ * १५ माहे शावान जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही मुजरद कासिदासमागमे पत्र पाठविले ते पावले. अक्षरशः आर्थ ध्यानास आला. कोटेकराचे घोडेचे रूपयेचा हवाला तुम्ही घेतला होता त्या यैवजी येनरायेचे दुकानची हुंडी दोण्या रूपयेची पाठविली ते पावली. हुंडीची मुदत जालिया यैवज

---

हजाराची जागीर अतरवेदीत नेमून देण्याविषयी' उभयतास पत्रें गेली [बाड ९ ले १] १७६३त शिंदे उत्तरेकडून देशी आले. 'भेट जाली सरकारीची घालमेल नाही असा बेलभडार दिला' [खरे १ ले ३७३, ३७४] 'जयाजी दत्ताजी व जनकोजी सिंदे याचे कारकीर्दीस सरजाम होता त्याप्रमाणें करार करून दिला असे तरी दौलतीचा बदोबस्त अच्युतराव गणेश याचे विद्यमाने करीत जाणें [बाड ९ ले १६०] अशी वस्तुस्थिति असता चिकित्सेचे घोगडे सशयामुळे कसे भिजत पडले हे वाचकावरच सोपविणे बरे [खड ११ प्रस्तावना १, २]

(१४०) पहा भाग २ ले ६५ टीप ५२ 'जालमसिग झाले दिा कोटेवाले याणी पेसजी भटवडे याचे लडाईत पाणिपतचें साली कामकाज चागले केले म्हणून कैलासवासी होलकर याणी सिदेसुधा अमल करार करून दिल्हा' होता असे आता स्पष्टीकरण होते [पेद २१ ले २८३] इतकेच नव्हे तर भटवड-याची लढाई '२ जावली इदुवासरी' म्हणजे ३० नवबर १७६१ रोजी झाली त्यात 'कोटेकराचे अखेराम पचोली व जालमसिग झाले व धामाई वगैरे रजपुत यानी सेवेसी अतर न केले मल्हारजीबावाच्या मन गटास गोळीची जखम लागली' असे शिंद्याचा सेनापती व चितोबा वळे हे उभयता सागतात [पेद २ ले ५, ६ पेद २१ ले ९२, ९३, ९४] पेद २ ले ६चा शोध सपादकाचा चुकला आहे खरी तारीख ५ दिसबर १७६१ अशी येते. तसेच टाडचे कथन मिथ्या आहे हें निराळें सागावयास नकोच या स्वारी-तून वळे माघारा फिरला तेव्हा मुकुदवारीस पोचल्याचे हे पत्र असावे त्या दृष्टीनेच क्रम लाविला आहे

जमा होतील. यजमानाची आज्ञा घेउन इंदुरास गेलो होतो.- तेथे राजश्री बाजीराव[१४१] राघोबामामा यहून बहुता प्रकारे समाधान करून उजनीस घेउन आले. कळले पाहिजे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री नारोबास नमस्कार विनंती उपर. सदैव पत्र पाठउन संतोषवीत जाणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२४०] श्री * संवत १८३५ मार्गशीर्ष शुद्ध ९
[२८ नवंबर १७७८]

चिरंजीव राजश्री नारोबाबाबा यासि प्रती माहादाजी कृष्ण [वळे] आसिर्वाद उपर. कसबे श्रीगोंदे येथील वाडे समाईक चौघा[चे] २ दोन त्यापैकी चिरंजीव वामनराव धुंडीराज वेगळे निघाले ते [स]मई सरकारचे वाड्याचे उतर भागीचा नवा वाडा चिरंजीवास स्वतंत्र दिल्हा. त्यात त्रिवर्गांचा विभाग नाही. दुसरा वाडा जुना थोरला नांदता सरकारवाड्याचे दक्षण भागीचा तो त्रिवर्गाचा आमचा व चिरंजीव चिंतोबा तात्या व तुमचे विभागाचा राहिला यात वामनरायाची वाटणी नसे. चिरंजीव चिंतोबा तात्या वेगळे निघाल्यावर वाड्याची वाटणी तिजाई त्याची त्यास द्यावी. [पण] त्याची समजूत न पडे सबब चौघे ग्रहस्त मध्यस्त पडून या वाड्याची किमत बमये आमला २४००० चोवीस हजार ठरावली. त्याचा तिजाई हिसा तुम्ही व आम्ही उभयता मिळून रुपये ८००० आठ हजार देउन कजिया तोडला. सदरहू वाडा नांदता तुमचा व आमचा उभयेताचा समाईक राहिला त्याची हदहादूद लांबी दक्षण उतर सिवाय आवाराच्या भिंती गर्भी हत सुमार ८० येकयासी व रुंदी पूर्व पश्चम सिवाये आवाराच्या भिंती गर्भी समेत गली हत सुमार ४१ येकेताळीस याचा तपसील.

८१ लांबी दक्षण उतर. ४१ रुंदी पूर्व पश्चम हत सुमार.

[या पुढील भाग किरकोळ म्हणून गाळला आहे]

---

(१४१) बाजी नरसिंह तो हाच याचे उपनाम कोठेच दिले नाही तो इदापुरचा राहणारा असावा असे केवल अनुमान होते [वाड ७ ले ५८०] त्याची पत्रे पुढें पहावयास मिळतील अस्तु. हे चिंतोवा वळयाचे शेवटचेच पत्र समजले पाहिजे कारण 'हुजूरची व पथकाची फडणिसी याजकडे होती ती दूर होउन नारो विठलास' मिळाली [खड १३ ले ५] अर्थात तो वेणी जात असता मंडळी त्यास परत घेऊन आली पण तो महादजी शिंद्याजवळ टिकला नसावा असे वाटते यानंतर त्याचे नाव मुळींच येत नाही. सखुबाई शिंद्याची फडणिसी करीत असल्याचा लेख मात्र सापडतो. [पेद २९ ले २८३] १७७८पर्यंत तो जिवत होता. [ले २४०] अस्तु पत्राचे वर्ष शंकास्पद असून ते १७६३ तही मार्गे जाऊं शकेल.

येणेप्रमाणे जंवी गर्भ येकयासी हत वंदी येकेतालीस हत याची वाटणी उभयेताच्या रजावंदीने केली.

[तपसील गाळला आहे.]

सदरहू कलमवंधा लिहिल्या आहेत त्याप्रमाणे तुम्ही अम्ही वाटणी घेऊन नांदनूक करावी. यासी अंतर करु नये. मिति शके १७०० विलवी नाम संवछरे मार्गशीर्ष * शुध ९ नवमी सन हजार ११८८ [फसली.] बंद ७ सात असेत. ।' हस्तक्षर माहादाजी कृष्ण [षळे] हे लिहिले सही.

गोही

अनंत शकर कुलवडे

अकोबा वां नार सेट. सदाखत असी सेटे पेटे शाहापुर का। मजकूर.

खडो सदासिव कुलकर्णी का। मार

जानोजी वां विणेजी कोथबिरे माली का। मजकूर.

गोजाजी वा। देवजी वडोकर का। मजकूर.

खडोजी वां पंदाजी गाजेकर [?] का। मजकूर.

हरजी वां सुर्जाजी रोही [?] का। मजकूर.

बापु छेजमल सेठ पेट जोतपुर का। मजकूर.

———ॐ———



श्री दत्ताजी शिंदे.



# किरकोळ पत्रव्यवहार.

१७९४–१८२८ विक्रमी.

लेखांक [२४१] श्रीमंगलमूर्ती

[नकल]

माहाराज राजश्री मोकदम मोजे वाल्के व मोकदम मोजे देउलगाउ व मोकदम मोजे कोरेगाउ यासी सकुमाई मुलाना व झालोजी सुतार व कृष्णाजी लोहार व साकुजी कुंभार व तुलानाक माहार व खेना माहार व खंडनाक माहार व चावनाक माहार मोजे हिवेर. गोत मायेवताचे सेवेसी के धरम दिल्हे येसेजे. मायवते पुरसीस केली जे वागुलराउ पाटील व बावाजी पाटील याचे मोकदमीचे भांडण कैस आहे ते सागणे ह्मणउन पुरसीस केली तर मोजे मारची मोकदमी मोळ पाटील मोकदम याची. वेल विस्तार कागजी पाटील मोकदम. त्याचा विस्तार रतन पाटील. त्याचा विस्तार गोदजी पाटील मोकदम. हे खरे तहकीक असेत. पुढे याची वर्तनूक कैसी जाली ह्मणउन पुरसीस केली तर त्यास कोन्ही भाउबंद नवता व पोटी संतानही नवते. नाचारविचार बहुत जबुन होता. त्यास जीवाजी व रखोजी गांवामधें पाटिलकी चाकर फार [दिवस] करीत होते. पुढे गोदजी मोकदमास गावात सुखे भीक मागून देत नवते. पुढे गोत मायेवते पुरसीस केली की गोदजी मोकदामचा व जीवाजीचा व रखोजीचा दांडामेंढा वेलविस्तार कैसा आहे ह्मणउन पुरसीस केली. तर हे जीवाजी व रखोजी त्याच्या घरामधील नाहीत. याचा वडील बाबजी गावावर आला. सुकवस्तीने राहिला. कागा पाटील मोकदम यानी त्यास सेत व मळे कौल देउन लाविले. सुखकौलप्रमाण कीर्दीची सेते करून राहिले. याप्रमाणे जीवाजी व रखोजी याची वर्तनूक असे. पुढे अणीक पुरसीस केली जे

वंजारियास मोकदमी कैसी दिधली. तर गोदजी मोकदमास अन खावयास नवते, कालदुकाल पडला व गावावर दिवाणची बाकी होती. त्याचा तगादा लागला यामुळे मोकदमी देउ लागला. ये प्रांती मोकदमी कोन्ही घेईना मग गोदजी मोकदम मोजे कोवरगावास गेला. तेथे साउजी मोकदम मोजे कोवरगांउ यास भेटला. मग त्यानी मालजी मोकदम मोजे पारगाउ याजपासी पाठविले ते घेउन का। कडियास गेले. त्याजवदल अपला गणनाक माहार होता मग तेथे मोकदम का। कडे येसी पुरसीस केली की काये निमित्य मोकदमी देता. त्यास गोदजी मोकदमानी जोव दिल्हा की दिवाणची बाकी गावावर मोबलग राहिली. त्यास पुढे आपल्यास यैवज काही खावयास नाही व बैलढोरही नाही. आपला बहुत नातवानीचा विचार जाला यामुळे मोकदमी देतो. त्यास पोटी संतानही नाही. अगर आपल्यास भाउबदही नाही. मग का। कडियात राजश्री भउजी व सटवाजी बागुलराउ व जोरवे कडाचे फौजदारसाहेब पासी चाकर होते त्यास गोदजी मोकदम त्यास भेटले. त्यानी त्यास पुसिले की तुह्मी मोकदमी काय निमित्य देता. त्यानी आपला वर्तमान जो होता तो सागितला. मग भिउजी व सटवाजी बागुलराउ यांस मिन्नतमाना करुन गोदजी मोकदमाने आपली दरोवस्त मोकदमी होती त्यापैकी निमे मोकदमी भिवजी व सटवाजी बागुलराव यांस दिधली. का। कडियाचे थली खरीदपत्र करुन दिल्हा. त्या खरीदपत्रावरुन गोदजी मोकदम व भिवजी व सटवाजी बागुलराव येसे मिळोन का। कडोगणास आले. तेथे महाराज राजेश्री त्रिंबकजी देशमुख व[हं]डे माढोगणांस आले होते. मग त्याची भेटी महाराज राजेश्री खंडोजी भोपतराव व सिदोजी भोपतराव याचा हाते त्रिंबकजी देशमुखास भेटले. मग त्यांस मोकदमीचे वर्तमान विदित केले की भवजी व सटवाजी बागुलराव यास आपली दरोबस्त मोकदमी आहे त्यापैकी निमे मोकदमी यांस दिल्ही. त्यावरुन राजेश्री त्रिंबकजी देशमुख यांनी महजर करुन दिल्हा. मग बनजारियानी देशमुख देशपांडिये व हालीमवाली याच्या जे खर्चास रुपये पडले ते मोजेचा बसविले वर रुपये राजेश्री खंडोजी सिदोजी भोपतीराव याचे होते ते देशमुख देशपांडियांस व हालीमवाली यांस दिल्हे. त्यावरुन आपला महजर करुन गावाव्र आले. आपली पाटिलकी करीत होते. याचे जामिन कोलगांवकर होते. त्याचे तरपेने पाटिलकी करावयास ताई व अंतरोजी पाटील मोकदम मोजे नारायनडोवे करीत हरदोजतु आले. त्यामाधे भिव व सटवाजी मोकदमाचा धाकटा भाउ बुवाजी पाटिलकी करीत आला. त्याजमाधे त्याचा भाचा भिकाजी पुदे मोकदमी त्याचे तरफेने करीत आले. याजवर सकराजीरामाची

मिरासपटी आली. रुपये २०० दोनसे. ते निमे वंजारियानी दिल्हे आंणि निमे गांवानी दिल्हे. यावर अनिक नागवण गडवी [गनीम] याची गांवावर आली. रुपये ७०० सातसे आले. ते वंनजारियानी व गांवानी समाइक मिलोन दिल्हे. याजवर अनीक गांवाची बुरे व नफरी याची बुरे गनिमानी वडऊन नेली. ते गुरेही बुढवली आंणि रुपये ३०० तीनसे घुतले ते रुपये वंनजारियानी व गांवानी मिलोन दिल्हे. यावर पांढरी वेरांण जाली. आपण गांव [सोडून] देसावर गेलो. मागती फिरोन गांव भरला. त्यांस वंजारियाचे कोन्ही गांवावर आले नवते. मग आपला गांव महाराज राजेश्री वजाजी नाईक [निंबालकर ?] याजला जागीर होती त्यांस जमाबंदीबदल देशमुख व देशपांडे व जवारदार का॥ करडे तेथील पाटील व बाबाजी पाटील येसे मिळोन वजाजी नाईकापासी भुमसनाथ होते त्यांसही हा गांवास रहावयास गेले. तो तेथे सटवाजी मोकदम होते. त्यानी त्यांस भेटोन रहाउन मेजमानी केली. दुसरे दिवसी त्यांस पागोटी बधंली. मग त्यानी सटवाजी मोकदमास जाव दिल्हा की आपण नाईकाची जमाबंदी करुन कौल घेउ[न] देतो. तुम्हास घेउन गांवास जातो. त्यांस जमाबंदी करुन फिरोन परभारे जात होतो. त्यांस वनजारियांस खबर कलली. मग त्यानी जाउन घेउन आले मागती जाउन मेजमानी करुन मग देशमुखदेशपांडे म्हणो लागले की तुम्ही गांवावर चालणे. मग सटवाजी मोकदमानी जाव दिल्हा की कवार तो आहे येसा मान जालियावर मावास येउन चुका अस्तमान जालियावर राणोजी व सटवाजी झरेकर आनावयास पाठिविले. मग सटवाजी मोकदमासी वयउत काही घेउन गांवावर आनले मग सटवाजी मोकदम खानवालाशान याची भेटी घेतली. त्यांनी कौल दिल्हा व ठाणियात का॥ करडे येथे जाउन फौजदारसाहेबास व देशमुख व देशपांडियात हालीमवाली यांस भेटोन गांवावर आले. आपली मोकदमीच्या मलियात व सेतात नागर घर नवे पडीक हाजर किरदी केली त्याचे रुपये १०६ एकसेसहा पाटिल म्हणून घेतले. त्याजउपरी बाबाजीने सटवाजी मोकदमास खानवालाशान याजपासी घेउन गेले. तेयील वर्तमान जे जाले ते तुम्हास विदित आहे. त्यामधे आपले कोन्ही नवते. येसी वर्तनूक जाली. सेवेशी लिहून दिल्ही. ये लिहिले सही.

---

लेखांक [२४२] श्री * संवत १७९४ आश्विन शुद्ध १०

[२२ सितंबर १७३७]

हिसेबु राजश्री देवजी पाटील ताकपीर व कान्होजी पाटील ताकपीर बिन तान्हाजी पाटील ताकपीर मोकदम मोजे चिखली ता हवेली प्रांत पुणे सु॥ समान

सलासीन मया व अलफ. सन हजार ११४७ [फसली] छ * ८ माहे जमादिलाखर सके १६५९ पिंगलनाम संवछरे. मोजे मजकुरची मोकदमी खरीदी[१४२] केली त्यास खर्च यो जमा १९९९६ रुपये

तपसील

२२०० सोनगढहून बराबर राजश्री कान्होजी ताकपीर याणी आणिलें होते.
१००० राजश्री देवजी ह्यानी दिल्हे.
१००० धाख्या हता आणविले.
२०० जीवाजी जाधव दिले.

२२००

७००० मुराद जिलीबदार याज हता सोनगडीहून राजश्री देवजी ताकपीर याणी पाठविले हता हुडी मोरोबा नाईक ताहवेकर मुकाम पुणे. का सोनगडीहून देविले.

१०७४६ गुा देवजी ताकपीर.

५० माणकोजी पाटील जगथाप मोजे पिंपल याजला कर्ज दिल्हे होते त्या पेकी त्याणे मोजे मजकुरचे मुकामी दिल्हे गुा खुद.

१९९९६

खर्च १९९९४ रूपये यासी तपसील.

७६ श्रीचिंचवड मोरेयास खर्च.
७० श्रीजेजूरी.
१०८५० पंतप्रधान.
२४९ जिल्हेदार [बापुजी श्रीपत]
८३२ देशमुख प्रगणे मजकूर.
२०० त्रिंबकपंत देशपांडिये.
३५ नाईकवाड.
७ काजी प्रगणे मजकूर.
१८५ पुण्यात गोत मेळविले त्यास खर्च
२००४ मोजे मजकुरी येउन महजर केला ते समई गोत मेलविले त्यास भोजन कापड वगैरे खर्च.
९२२ मेजवाणीखर्च.

(१४२) हा हिशेब महत्वाचा आहे मोजे चिखलीची पाटिलकी ४०९८ रुपयास विकत घेतली त्याची नोंद होऊन केवळ राजपत्रे मिळविण्यासाठी १५९०० रुपये ताकपीरास दरबारखर्च पडला त्यावरून बाजीराव पेशव्याच्या न्यायाचे चित्र मूर्तिमत दिसते छत्रपतीच्या शिरणीचे माप आणि हा

४०९८ खरिदी मोकदमी मोजे मजकुरीची केली त्यास मोजे मारचे पाटील यास रुपये दिल्हे.

१०० यादोपंत माली देशमुखाचा गुमास्ता.

३८ मोजे मजकुरचे समस्त माहार

२ मागिण मोजे मजकूर.

२९१ समा माहार.

३१ बाजेखर्च.

१९९९४

तपसील

७६ श्रीचिंचवड श्रीमोरयादेव यासी खर्च.

१३ मोहर १ देवापुढे ठेविली गुा मुम्हाजी पाटील ताकपीर.

६३ कापडखर्च.

७६

७० श्रीजेजुरीस खर्च जाला. तपसील अलाहिदा असे.

१०३६३ श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामी रूपये. यासी तपसील.

९००० नकद रुपये पो वजा मोरे पाटील मौजे मार याजबदल दिल्हे रुपये ५०० बाकी.

१३६३ बहुमान

८७३ सोन्याची कडी २ वा.

३२४ पंतप्रधान.

३२४ आपा [चिमाजी भट]

२ उपाध्या ब्रहिरंब भट

३९१ कारकून.

१०० आयाबा मजदार.

१२० अंताजीपंत फडणीस

९५ अमृतराव चिटणीस

५० चिमाजी मिवराउ.

२६ सदासिव जमिनीस.

३९१

---

ध्याप कोठें याची तुलना वाचकानीच करावी 'प्रधानपताच्या सर्व गोष्टी सर्वोत्कर्ष आहेत परंतु येक गोष्ट अनुचित्त करितात की दृव्याची आशा धरुन वत [नदारापासून लाच घेतात] येवढी गोष्ट न करीत ते करवणें. मागे दादाजी कोंडदेव लहानसाच ब्राह्मण आला परतु त्याणे जे इनसाफ केले ते पातशाहा सही वच जाहले'. असा जो शाहुचा आरोप होता तो निराधार म्हणता येत नाही. [पेद १७ ले ५२ पेद ९ ले ४२] अशा 'महजराचे काम चालीस लावतें' वेळी असलीच अपेक्षा शिंद्याकडून होती. [ले २४३] किंवहुना 'सिके करावयास अनमान करण्याची' प्रथा पुढेंही प्रचलित होती. [पुरंदरे १ ले २४३] अस्तु. वरील उतारा साग्र नसून कामापुरता घेतला आहे.

२२५ नाना [बाळाजीभट]
४९० पत्रे तपसील [गाळ्या]

१२६३

९४ शागिर्दपेशा [यासी तपसील]

४ हरीपंत आचार्या
४ जासूद त्रिंबकजी व हंसाजी.
२ फकीरा पखाली.
१९ चोपदार.
१ मशालची.
२ दलाल

३१

३ कान्होपंत तूपवाल्या.
१ गोविंद पाणभरा.
१ बाळाजी वाळ्या.
१ विठोजी आबदागिरा.
५ सोनजी सराफदार.
२० फरास वगैरा.
१ नगारची.

३२

६४

३० खिदमतगार लिंगोजी [माने ?]

९४

लेखांक [२४३] श्री

[४ सितंबर १७३९] ?

चिरंजीव राजश्री मोरोबास प्रती सिवाजी नारायेण असिर्वाद उपरी. येथील वर्तमान ता। भाद्रपद * शुध त्रयोदसी मु॥ सातारा सुखरूप असो विशेष. राजश्री राणोजी सिंदे यानी हिवेर प्रां। कर्डे येथील महजराबसी राजश्री रामचंद्रबुव [सुखठणकर] यास लिहिले होते. त्यास त्याची अमची भेटी जाली. कितेक स्नेहवादाच्या गोष्टी त्यानी सांगितल्या. त्यास तेही थोर आहेत. त्यांचे कार्य करावे हेच उतंम अहे. राजश्री राणोजी सिंदे स्नेहवादास चुकतात येसे नाही. हा विचार चितात अणून मोजे मारचे खापत्र मनास अणून त्याचे महजराचे काम चालीस लावणे व खाखताची नकल अम्हाकडे पाठउन देणे. येथून दुमालेपत्रे पाठउन दउन. बहुत काय लिहिणे हा आसिर्वाद.

लेखांक [२४४] श्रीमंगलमूर्तीप्रसन

[१७४०] ?

राजश्री राणोजी पाटील सिंदे मोकदम
मोजे हिवेर प्रो कर्डे गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्यराजश्रीविराजित स्नेहांकित बाबुराव थोडके मोकदम मोजे पारगोउमोल्हा पा पाडियापेडगोउ सुमा सन हजार ११५३ [फसली] कारणे पत्र लेहोन दिधले येसेजे. मोजे हिवेर येथील पाटिलकी आपण पेसजी घेतली होती त्यास निमे पाटिलकीचे खरीदखत कसबे कडाचे पारचे गोंदजी वा रतनजी पाटील मो झुरेकर यानी आपल्या वडिलांच्या नावाचे दिधले होते व त्याजवरी चौथाई पाटिलकी देसमुख व देसपांडिये याच्या दस्तकानसी महजर करून दिधला होता त्यास प्रस्तुत तुम्ही तेथील पाटिलकी मोकदमी निमे घेतली. त्यास पूर्वीपासून तुमचा आमचा माउपना यासाठी आह्मी कागद आपण तुह्मास दिधले [कीं] तुह्मी वंशपरंपरेने मोजे मजकुरची मोकदमी करून भोगवटा घेणे. आपला कज्या काही राहीला नाही. आनखी कोठे काही कागदपत्र आपणापासी असला तरी रद असे. सदरहू कागदपत्र आपणापासी होते ते आपण खुशरजा-वंदीने तुह्मास दिधले. आपला काही कज्या मोजे मजकुरी राहिला नाही. हे लिहिले सही.

निा नागर
बा गणेशराम देशपांडिये प्रो पाडियेपेडगोउ.

गोही

| | |
|---|---|
| अपाजी पा मोटे मोकदम का चांभारगोदे. | जानोजी कदम पा मोजे गारसी ता फलटण. |
| अपाजी पा मो का सासवड. | विठल नारायेण कुलकर्णी का चांभारगोदे. |
| साक्ष भगवतराये रामराये देशमुख पाडिये पेडगाव पा आहमदनगर. | पत्रप्रमाणे साक्ष गोंदजी पाटील व जीवाजी मुदगल देसपांडिये का चांभारगोदे. |

लेखांक [२४५] श्री * संवत १८०० मार्गशीर्ष शुद्ध १

[६ नवंबर १७४३]

रोखा सके १६६५ रुधरोद्गारी नाम सवत्सरे मार्गस्वार सुध प्रतिपदा ते दिवसी खा लिखते धाको नाम राजश्री राणोजी सिंदे यासी णिको नाम सुमानजीराउ

थोरात.[१४३] तुह्मापासून घेतले मुदल रुपये २००० दोन हजार यास व्याज दरमाहे दरसदे रुपये २ दोह्मप्रमो देउ. हे खत लिहिले सही. दस्तखत रामोजी खंडेराउ [दिा] जेकरराव थोरात. छ * २९ रमजान.

[६ नवंबर १७४३]

लेखांक [२४६] श्री * संवत १८०० मार्गशीर्ष शुद्ध १

[६ नवंबर १७४३]

राजश्री राणोजीबावा सिंदे सुभेदार साहेबाचे सेवेसी.

अज्ञाधारक रामाजी खंडराउ दिा राजश्री सुभानजीराव थोरात अनेक असिर्वाद विनंती उपरी. राजश्री सुभानजी थोरात यानी मांदे हाल्यापासून कर्ज घेतले रुपये २००० सदरहु दोन हजार त्याचे खत राजश्री नावचे तुह्मास दिधले आहे. मोहरनसी दिधले आहे. हे रुपये आपणापासून भरणा भरून पावलो. बहुत काय लिहिणे हे विनंती.

छ * २९ रमजान.

[६ नवंबर १७४३]

---

लेखांक [२४७] श्रीगजानन * संवत १८०४ चैत्र शुद्ध ६

[५ अप्रेल १७४७]

राजश्रियाविराजित राजश्री

बाळोबा स्वामीचे सेवेसी.

सेवक भिवाजी[१४४] शंकर [ओढेकर] साा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ * ५ राखर मुकाम गडकालिंजर प्रांत बुंदेलखड जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष. बहुत दिवस जाले कांही पत्र येउन वृत कलत नाही. सदैव कुशलार्थ पत्री लिहित जावा. यानंतर स्वामी सरमुजु[मु]च्या सनदेविषई अनमान करितात. त्यासी श्रीमत राजश्री [रामचंद्र]बावानी तुह्मास पूर्वी सांगितलेच आहे आणि [आता] पत्राचा आक्षेप करावा ऐसे नांही. येथही गड मार काम पडले आहे. या प्रसंगाकरिता गुंता आहे. येथील निर्गम जालियावरी सनद मागून पाठउन देउ ।" आणि सर्व प्रकारे चिरंजीव मगराउ याचा परामृष करीत जाणे. विशेष लिा तर उपरोध आहे. लोभ असो दीजे हे विनंती.

पोष्ये दादो महादेव कृतानेक साा नमस्कार. सेवकावरी सदैव कृपा करीत असावे. लोभ दुणाहीजे हे विनंती.

---

(१४३) पेशवेदप्तरात हे नाव अनेक वेळा आले असून त्याचा सबंध निजामाशी दाखविला आहे याला पारनेकर थोरात असे म्हटले आहे [पेद २८ ले ३९]

(१४४) याचे आडनाव ओढेकर असून तो धारकर पवाराचा कारभारी होता.

लेखांक [२४८] श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
वाळोबा स्वामी गोसावी यांसि.

पोा सिवाजी शंकर [ओढेकर] साा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिाा विशेष. स्वामीकडील पत्र येउन वर्तमान कलत नाही. तर सविस्तर लिाा आणि श्रीमत [रामचंद्र]बावास तुह्मी रुप्याचे सिंहासन करून पाा आहे. हातीसिंह आहेत त्याजप्राा सिंहासन अगत्येच करून चिरंजीव भगवंतराउ याचे स्वाध्यान करणे अनमान [न] करणे. पैका लाग[ल] तो देइल. बहुत काय लिाा लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२४९] श्री

[६ मे १७४५] पूर्वी

यादी दास्त[१४५] १६ [लक्ष] रुपये. [यासी] तपसील

| | | |
|---|---|---|
| ८ नख्त | रुपये. २ | दोन लाख निशा श्रीमंताची दिवस पंधरा १५ |
| ४ च्यार द्यावे मोर्चे उठवावे. | ६ | निशा करून द्यावी श्रावण वद्य किस्ती २ |
| ४ च्यार डेरेमध्ये द्यावे मग कूच करावे. | | निशा भोपतरामजी व बाळाजी व उदेरामजी तपसील. |
| ८ | | जेष्ट सुध १ श्रावण वद्य १ |
| | | ३ ३ |

---

१६

---

लेखांक [२५०] श्री

[जनवरी १७५२]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
वाळोबा स्वामीचे सेवेसी.

सेवक गंगाधर यशवंत [चंद्रचूड] व रामाजी याधव साा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते

---

(१४५) पहा भाग १ ले ८८ ही यादी बाळाजी यशवंत गुलगुले याची स्वदस्तुरची होय.

पाउन वर्तमान कळू आले. इकडील वर्तमान तर पठा[णा]स पराभवाते पावविलियाचे पूर्वी लिहिलेच आहे. प्रस्तुत ये प्राती छावण्या जाल्या. पठाणाकडील मुलुक दरोबस्त उभयेता सरदाराकडे जाला आहे. ये प्रांतीचा बंदोबस्त होउन सत्वरीच त्या प्राती येणे होईल.॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२५१]

श्री * संवत १८०८ आश्विन वद्य ६
[२९ सितंबर १७५१]

राजश्रियाविराजित राजश्री
बाळोबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक रंगराव सिवदेव [ओढेकर] कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ * १९ जिल्काद जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जाणे. यानंतरी तुम्हाकडील पत्र येउन वर्तमान कळत नाही. सदैव पत्रव्दारे संतोषवीत जाणे. सरमुजुमुचा यैवज राजश्री भगवंत सामराज याजकडे पावता करीत आहा त्याजप्रा॥ साल मजकुरीचाही यैवज मारनिलेकडे प्रा॥ कीजे. याचे हरयेकविसी साहित करावे भरवसा आपला आहे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

पौ वैशाख शुध २ संमत १८०८
सुमा इसने खमसैन मया अलफ.
[५ अप्रेल १७५२]

---

लेखांक [२५२]

श्री * संवत१८०२ वैशाख वद्य १
[ १८ अप्रैल १७५२]




बइस्म[१४६] × × × फौजदारान व राहदारान व चौकीदारान व थाने व्दारान व सायर मुस्तहिफजान तर्फ व शवारे आं के मबाजी चहार मंजिल बहल सवारी

---

(१४६) बादशाही दरबारात अनेकांचे वकील रहात होते त्यात मराठयाच्या वतीने केवळ छत्रपतीचाच वकील प्रथम असे. नंतर बाजीराव पेशव्याचा वेगळा राहू लागला महादेव हिंगणे याने नाव

मरदाना वगैरा अज मानिकचंद साहु बअकबराबाद मीरवद. बायद के अहदे दर असनाये राह बइल्लत नक्द महसूल राहदारी वगैरा अबवाब ममनुआ मालिका मुजाहिम व मुतहरिक न शुदा. अज हुदूद खुद सही व सालिम वागुजारंद. दरीं बाब ताकीद दानंद.

तफसील  बैल सवारी मरदाना चार मंजिल.  मियाना सवारी यक.

बेगी दो अदद.

तहरीर फित्तारीख चहार दहम १४ शहर जमादिउस्सानी सन ४ [जुलूस]

॥ रुजु दफ्तर दिवान [मोडी]

---

लेखांक [२५३]  श्री

[सितंबर १७५२]

पुा राजश्री [जयाजी] आपासाहेब गोसावी यांसि.

विनंती उपर राजश्री बाजीराव घोरपडे[१४७] यांचेविशई बहुत प्रकारें लिहिले तर आपले आह्मेखेरीच कोण आहे. नवाबाचा मागती इनायतनामा बहुत कृपेचा पाठविला आहे. मशारनिलेस इकडे मार्गस्त करावें. शहराजवळ आल्यावर येखादा भला मातबर माणूस पालकीनशीन पाठउन घेउन येऊ. उतप प्रकारे मुलाजिमत करउन भले बहुमानाची देवऊं. पूर्ववतप्रमाणे जागिराचे बहालीचा परवाणा देवऊं. ज्यादा अगत्यवाद आपणांस त्याचा अगत्यवाद सर्वास. अम्हीं तर आपल्या मर्जीचे ताबे. जे मर्जी असेल तेणेप्रमाणे करूं. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२५४]  श्रीशंकर

[सितंबर १७५२]

राजश्री [जयाजी] आपासाहेब गोसावी यांसि

कृतानेक आसिर्वाद विनंती उपर. राजश्री नागोराम यांजबराबर पत्रें पाठविली तें पावलीं. श्रीमंताकडून पत्रे व थैल्या व अर्ज्या पारसीच्या नवाबाकडे पाठवायाच्या

---

१७३३पासून आढळते त्याला नुसते 'राव' म्हणत होते त्याच्या पुत्रास 'महाराव' असे कागदोपत्री म्हटले असून त्याची तशी मुद्राही सापडते [खंड ६ ले ३६०] रोहिलखंडच्या स्वारीत 'राजा' अशी पदवी प्राप्त झाली त्याचे हे प्रत्यंतर होय. हे व अताजी माणकेश्वराचे [खंड ६ ले ५३७] उदाहरण पाहिले म्हणजे आगरे व सावंतवाडीकर याविषयी ग्रामण्य माजले त्याची तुलना करण्यास स्वल्प जाईल. पत्र व मुद्रा फारसी आहे.

(१४७) हा बाजीराव राजे घोरपडे कोण व कोठील हे समजत नाही तथापि त्याचे नाव पुढें येतें खरें [लें २५४] याच घोरपड्याविषयी जयाजी शिंद्याचे दुसरे पत्र सापडते [खंड ६ ले. ४९१] त्याची तारीख या आधारे लावली पाहिजे आम्हाजवळील खंड कसर लागलेला असल्यामुळें पत्रातील तारीख कळत नाही ले २५३, २५४ चे अक्षर कापरे पण सुवाच्य आहे. लेखक दामोदर हिंगणे असावा असे वाटते.

आल्या त्या तुम्हांकडे पाठविल्या आहेत गुजराणून उतरें पाठवावी व इनायतनामें आणविले आहेत त्याची याद बजिनस श्रीमंतानी लिहिलीच आहे त्याप्रो इनायतनामें तयार करउन पो. श्रीमंताची पत्रें आलीं तीं बजिनस पाठविली असेत म्हणून लिहिले त्यास थैल्या व अर्जा व इनायतनाम्याची यादी व अम्हीं आपल्यापासून बारा मोहरा व सततीस रुा गुजराणून थैल्याची उतरें व अर्जाची उतरें व इनायतनामे आणिविल्याप्रमाणे पाठविले आहेत. सदरहुप्रमाणे पाहून घेणे.

४ थैल्या

१ स्वामीच्या नावची

१ जाणोजी निंबालकर

१ खानआलम

१ राजे रामचंद्र जाधवराव

४

६ अर्ज्यांचे जाब

१ भवानी शंकर

१ राजे येशवंतराव सिंदे

१ सतुसिकनखां

१ महमद अबदुलाखां

१ हैदरयारखां

१ कवीजंग

६ यांच्या तरफेने आम्हीं आपल्यापासुन बारा मोहरा व रुा सततीस नजर केले आहेत.

१ इनायतनामा दगकुवर फिरंगी याचे नावे

१५ इनायतनामे आणविले श्रीमंताच्या लिहिल्याप्रो

१ यशवंतराव निंबालकर

१ मालेराव गुरुबक्ष पांढरे

१ आनंदराव जमिदार कमरनगर

१ मान्या नायक

१ मकरंदसिंग नाइक निंबालकर

१ आगाजी भिलेगर

१ मालोजी घोरपडे

१ रायाजी भोंसले

१ गिरजोजी ह्यके

१ जमिदार पा कानुरगी

१ महिपतराव निंबालकर

१ ज्ञंकर[मा जमिदार] अंडोल

१ भूपालराव निंबालकर

१ पाकनाइक जमिदार वाघनगिरा

१ कृष्णाजी नाइक निंबालकर

१५

यासिवाये गदवालच्या जमिदारास व अजेचंदास लिहिले गेले की तुम्हीं अनवरुदीखानापासी बलावोन जाणे याकरता यांस दोघास इनायतनामे न दिधले.

१ बाजीराव घोरपडे

२७

१ फर्द मतालब तहवरजंग

२८

सदरहुप्रमाणें आठावीस अदद पाहून घेणे. गोळ्याचा फर्मा पाठविला तो रावला. नवाबाकडून तो पैसा जिनस हातीं लागणे कल्तच आहे. विकत पाहिला मिळतो परतु त्यापेक्षा घरीं कारखाना लाउन करविल्याने उतम होईल. आज्ञा येईल तर रुये खर्चून घरीं कारखाना लाउन अगर विकत घेउन पाठउं. येतदविषयी जे आज्ञा. ह्मफिज महमदअलीखां आले याची खातरजमा शफथपूर्वक करविली व सैद लष्करखानास आणायास रुखसत केले. अम्हींही रविवारी निघालों. भेटीनंतर सर्व वर्तमान सांगू. श्रीमंताकडील पत्रे मावारे पाठविली आहे तें पावतील. एक पत्र मोहरा १२ व हाो सनतीस नजरेस देणे म्हणून दस्तावेजी होता तो अम्हीं आपल्यापासी ठेविला असे. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२५५] ॥श्रीशंकर गंगा * संवत १८०९ आश्विन शुद्ध ८
१११] [१५ अक्टुबर १७५२]

| |
|---|
| श्रीसीवचरणी<br>तत्पर बापुजी<br>सुत हणमंतरा<br>व नींबाळक<br>र |

राजश्री जयाजी सिंदे गोसांवी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो हणमंतराउ निंबालकर रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेलं पाहिजे विशेष. साप्रत वर्तमान येकिले ××× श्रीउतरोन अलीकडे राक्षसभुवनापासी अले. गांवगना चिट्या घासदाणियाच्या जाल्या व तमाम जिराईत सजगुरे वगैरे कापून घोडियासी नेतात. पलीकडे लस्कर होते ते तेव्हाही अगदी थडीचे गाव लस्करचे मुकामाखाले उठले. जिराईत गेले. साप्रत अलीकडेही येसेच होत आहे. त्यासी बीड प्रगणा आमची जागीर ते आपली आहे. दुसरा अर्थ आहे येसे नाहीं. गांवचे गाव उठले व जिराईतही कापून नेतात येसे जाले तेव्हा सर्वस्वें नुकसानी आहे याजकरिता हे पत्र अपणांस लिहिले आहे व राजश्री केदारजी लेहणें पाठविले आहेत हे कितेक 卐 अर्थ सागतील त्यावरून कलो येइल. तरी चितावर धरून गावगना चिट्या केल्या असतील त्या मना कराव्या व लस्करांत ताकीद करून जिराईत जोरीबाजरी कोणी कापून न नेत येसी गोष्टी करून मुलकाचें संरक्षण होय कोठे अजार न लागे ते केले पाहिजे. अपला अमचा स्नेह आहे म्हणून लिहिले असें. रा छ* ७ जिल्हेज. बहुत काये लिहिणे हे विनंती. अमचा मुलूक खराब जालियाने अपणासही समाधान आहे येसे कांही नाही.

जागीर तुमचीच आहे अणि सर्वस्वें अपले श्नेहाची जोडी आहे तरी चिती धरून मुलकाचे संरक्षण केले पाहिजे. कृपा असो दीजे हे विनती.



---

लेखांक [२५६] श्रीशंकर गंगा

[अक्टुबर १७५२]

पुरवणी राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसी.

विनंती उपरी. नवाब गाजदीखान बाहादर फेरोजजंग याचे इनायेतनामे आम्हास आले व त्याकडील मातवर मनुष्य मीर शमशुदीखान आम्हांस न्यावया आले आहेत त्यावरुन आम्हीं आपली तयारी केली आहे. कूच करुन त्यांजकडे जावें लागतें. त्यासी आपण आपले हदीत श्री उतरोन आमच्या मुल्कांत येउन मोकाम केला. राजश्री बालाजीपंडित प्रधान हेही आपले भेटीस येणार. अवघ्या फोजेचा जमाव गंगातिरी जाल्यावर मग आमच्या मुलकाचा बचाव होतो येसे काही नाही. अधींच पलीकडील तिरीचे गांव उठले. अता अलीकडे मोकाम जाल्याने अगदी मुल्काचा सत्यानास होतो. त्यासी आपला व आमचा काही दुसरा अर्थ नाहीं. आमची जागीर ते आपली आहे याजकरितां लिहिले आहे. तरी हें गोष्टी चित्तांत अणून लस्करचे मोकाम आमचे जागिरीत न होये ते तेथून कूच होउन दुसरे प्रगणियाकडे त्वरित जाणे जाल्याने आमचा मुलुक कांही वाचेल. तरी आपण खामखा हे गोष्टी चिती धरुन केली पाहिजे. आपला आमचा स्नेह आहे यास्तव लिहिले असे. जे उचित श्नेहास ते आपण करितील हा भरवसा आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२५७] श्री

[११ अक्टुबर १७५३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा स्वामीचे सेवेसी.

सेवक गंगाधर येशवंत [चंद्रचूड] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वृतात कळू आला. राजश्री माहारावजीनी पैका झाडून दिल्हिया उतम आहे. इदुरीहून कूच होउन दरमजल येत आसेत. राजश्री [जयाजी] आपासाहेबही देसीहून निघाले. सत्वरच येतील. ॥ बहुत काय लिहिणे हे विनती.

---

लेखांक [२५८] ॥श्री * संवत १८११ चैत्र शुद्ध ११

[३ अप्रेल १७५४]

विनंती.[१४८] छ * ९ जाखर प्रातकाल सुखरुप असो विशेष. काल पत्रे लिा आहेत त्यात एकदा लिहिले की सरकारचे पत्र पाा म्हणोन लिा मग लिहिले की पत्र पाठविले नाहीं. त्यास हाली सरकारचे पत्र पाा आहे. कळले पाहिजे. हे विनंती.

---

लेखांक [२५९] ॥श्री * संवत १८११ चैत्र वद्य १

[८ अप्रेल १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत थाउ स्वामीचे सेवेसी.

पोा गणेश कृष्ण [पेंडसे] साा नमस्कार विनंती. येथील कुशल ताा छ * १४ जाखर जाणून स्वकीये लिहित जावे विशेष. राजश्री बाबुराव गणेश याविसी आपणांजवळ पुणेयास असता मजकूर चाकरीचा केलाच होता हे आपणासही ठाउक आहेतच. हाली आपणांकडे आले आहेत. चाकरीचे कामाचे आहेत. या योग्य धंदा सांगावा. हेही विनंती करणें ते करितील. आम्हासही अगत्य आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२६०] ॥श्री * संवत १८११ वैशाख शुद्ध १२

[४ मे १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामीचे सेवेसी.

पोष्य जनार्दन बलाळ [भानु][१४९] साा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ताा छ * १० रजब जाणून स्वकीये लिहित गेलें पाहिजे विशेष. आलीकडे तुम्हांकडून पत्र

---

(१४८) या पत्राचा लेखक गणेश कृष्ण पेंडसे आहे. [पेद २४ ले. १४१] तो भानुकडील कारकून असून राघोबाच्या पहिल्या स्वारीत उत्तरेकडे होता. त्याची अनेक पत्रे या भागात आली असून कार्स ले. १२२ चा लेखक हाच पेंडसे होय. विद्यमान पांडुरंग काशिनाथ पेंडसे एडव्होकेट हे या घराण्यातील वंशज असून त्यांच्याकडे तपास करितां कागदपत्र नसल्याचे समजले.

(१४९) याचे उपनाम भानु. याचा 'भाउ बाळाजी भट पेशव्यावरोबर मजमुनिसवतीने फड-णिसी लिहिण्याचे प्रयोजन होते ते दिलीस गेले तेव्हां युद्धप्रसग जाला ते समयी असना लागोन बाळाजी महादेव मृत्यु पावले' [इस २१ पान १७४] तेव्हांपासून हे घराणे विशेष उदय पावले. नाना फडणीस याचाच मुलगा होय

येउन वर्तमान कळत नाहीं. तरी सदैव पत्र पाठउन कुशल वृत लेहून संतोपवीत जाणें. यानंतर राजश्री लक्षमणपंत[१५०] वैद्य यांस पाठउन द्यावयाविसी सांगितलें होते त्यावरून गारनिलेस तुम्हाकडे पाठविले आहेत. हे येथील सविस्तर वर्तमान सांगतील त्यावरुन कळों येईल. रा त्रिंबकपंत दिवेकर तुमचे हाती दिल्हे आहेत त्याचा परामृप तुम्हीं सर्व प्रकारे घेतच आहा परंतु लेकरु आहे. अद्यापपर्यंत कोठे स्वारीशिकारी केली नाहीं व परदेशांत गेले नाहींत. नूतन अनभ्यस्त आहे याजकरितां लिहिले असे. बहुत काये लिहिणें कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२६१] श्री * संवत १८११ आपाढ शुद्ध ६

[२१ जून १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पो त्रिंबकराउ सिवदेव [ओढेकर] मा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता छ * २९ साबान मुक्काम कस्बे आगर जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र येउन संतोषावाप्तीस न पाविले. येसे न पाहिजे. निरंतर पत्री कुशलार्थ लिहित जावा. तीर्थस्वरूप रा रंगराउआपा कैलासवासी जाले. ईश्वरास मान्य जाले. त्यासी कोणाचा उपाये नाही. पूर्वीपासोन तीर्थरूप आबा कैलासवासी याचे ठाई मायाममता होती त्याजप्राच आपा कैलासवासी याचे ठाई लोभास कृपेस स्वामीनी आतर न केले. उभयेता कैलासवासीप्रा ममता चालवावी. कोट्याचे सर मजमुचे दुसाला वेतन येक हजार रूपये रा भगवतराउ याजपासी प्रविष्ट केलेच आसल. सर्व भरोसा आपला आहे. येथेल सालदरसाल रुपये ५०० पांचसेप्रा रा केसो आनंत सुनेळकर याजपासी प्रविष्ट करीत जावा. आम्ही श्रीमंताची [रघोबा] आज्ञा कुंभेरीहून घेउन देसास चालिलो. येथून उदईक कूच करून जाउ. ।' बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

(१५०) याचे पूर्ण नाव लक्षमण केसव वैद्य असे असून तो भानूच्या प्रशस्तीमुळें या वेळी दाभोलकराकडे आला अर्थात ही उपराळ्याची योजना नेमणूक नव्हे हे उघड होय या वैद्य घराण्याचा संबंध जो या वेळी जुळून आला तो पुढे दाभोलकराशी ५० वर्षे राहिला जिवासबंधी वरांचं साठा होता तो निःशेष झाला असे समजते अस्तु या पत्राची मिति सशयित आहे ती मागेही जाऊं शकेल .

लेखांक [२६२]　　　　श्रीगजानन * संवत १८११ आषाढ शुद्ध १०
[२९ जून १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पो　बाळाजी जनार्दन [भानु][१५१] सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ता॥ छ* ७ रमजानपावेतो सुखरूप असो विशेष. तुह्माकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तर असे न करावे. सदैव पत्र पाठवीत गेले पाहिजे. तुमचे घरची सर्व मनुष्ये सुखरूप आहेत. काही चिंता न करावी. तिकडील नवलविशेष वर्तमान लिहित गेलें पाहिजे. ईकडील वर्तमान तर तीर्थरूप राजश्री बाबानी लिहिले आहे त्यावरून कळो येईल. बहुत काये लिहिणे कृपालोभ असों दीजे हे विनंती.

ॱ राजश्री त्रिंबकपंत [दिवेकर या]स सां नमस्कार विनंती. तुह्माकडील वर्तमान कळत नाही तरी असे न करावे. सदैव पत्र पाठवीत गेलें पाहिजें. बहुत काये लिहिणें हे विनंती.

ॱ सेवेसी माहादाजी नारायण कुंटे सां नमस्कार. कृपा करीत असावे हे विज्ञापनी.

---

लेखांक [२६३]　　　　श्री　* संवत १८११ आषाढ वद्य ६
[१० जुलै १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
गणेशपंत [पेंडसे] स्वामीचे सेवेसी.

पो　जनार्दन बल्लाळ [भानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ* ४ जिल्कादपावेतों क्षेम जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. तुह्मी छ १८ रमजानचें पत्र पाठविले ते पावले. लिहिलें कीं यंदा छावणी येथें जाली पुढे दुसरी छावणीं कोठे होईल ते पाहावीं ह्मणोन लिहिलें कळले. मेटीचा लाभ लौकर व्हावयाचा असिला तरी दुसरें छावणीस येथेंच याल. यांत ईश्वरीसत्तेने घडेल ते खरें.

---

(१५१) याचे पूर्ण नाव बाळाजी जनार्दन भानु. हे सबंध पत्र त्याचे स्वदस्तुरचे असून कालक्रम पहाता हे त्याचें पहिले पत्र म्हटले तरी चालेल. 'पंधरावे वर्षी पित्याचा काळ जाला सेवाधर्म चालावा या योगे कर्नाटक प्रांती श्रीरंगपटणपर्यंत गेलो' असा उपक्रम तो आपल्या आत्मचरित्रांत देतो. [फासं ले. १९२] पण १७५६च्या आरंभीं तो 'कोंकण पहावयास व पुण्याचे गणपतीचें दर्शनास स्वारीसंमागमें' होता असे पुढें स्वतःच सांगतो. [ले. ३३८]

तुह्मी आपले शरीराची जतन चागली करीत जाणे. वरचेवर सविस्तर वर्तमान लेहून पाठवीत जाणें. तुमचें घरची सुखरूप आहेत. काहीं चिंता न करणें. छ २० रजबचे " राजश्री शंकराजीपंत भागवत याबबरोवर तुह्मी पत्र पाठविलें होते तेंही पावलें. लिहिलें वृत कललें. जेष्ट वद्य २ द्वितियेचे पत्र पो तेही छ २ जिल्कादी पावले. लिहिलें वृत सविस्तर कललें. यंदा कर्जपटी सरकारची फार भारी सर्वांवर जाहाली आहे. त्यामध्यें आह्मा उभयतावर फार भारी आली आहे. आमची इमारत सर्व तुम्हावर आहे. तर यं गोस्टीचा विचार जो करणे असेल तो करा ा. राजश्री रामाजीपत [दाभोलकर] यांस लेहून पाठवावयाचे असिल तर लेहून पाठवणें. घरी मातुश्रीस पत्रें पो ती पावती केली. उतरे घेउन पाठविली आहेत त्यावरून कलेल. बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती.

राजश्री माहादाजीपंत व बाबुराव व मल्हारपंत स्वामीस सां नमस्कार. पत्रें पो ती पावलीं. वृत सविस्तर कललें. असेंच सदैव संतोषवीत जाणे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

सेवेसी माहादाजी नारायण कुंटे सां नमस्कार विनंती. आपण पत्री संतोषविना तेणेकरून बहुत उत्साह होतो. असेंच पत्री दर्शन देत असावे. घरची सर्व सुखरूप आहेत. कलले पो हे विनंती.

मातुश्री आयांचे आसिर्वाद उपरी. तुह्मी पत्रें पाठविता ते सर्व पावतात. असेंच पत्र पा जाणे. हे आसिर्वाद.

---

लेखांक [२६४] श्री * संवत १८११ श्रावण वद्य ३
[६ अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतमाउ स्वामीचे शेवेसी.

पोष्य गोविंद बलाल [ बुंदेले ][१५२] कृतानेक सा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता भाद्रपद* वद्य त्रितिया मु नजीक सकोरावाद जाणून स्वकीयें लिहित असिलें पाहिजे विशेष. आह्मीं इकडे आलियावर सविस्तर वर्तमान लिहून मुजरद दोन जोडी आपणाकडे

(१५२)-याचे सपूर्ण नाव गोविंद बलाळ खेर. मात्र या उपनामाचा लोप होऊन इतिहासात बुंदेले या नावानेच तो प्रसिद्ध होता. त्याचे कारण असे की बुंदेलखंडाशी त्याचा आजन्म संबध राहिला 'गोविंद बलाल बिमत पंताजीपत' असा त्याचा पहिला उल्लेख सापडतो. [पेद २२ ले. ३८] अर्थात अप्रेल १७२९ पूर्वीच तो या भागात कमाविस करू लागला होता असे निश्चित होते. 'गोविंद बलाल

रवाना केली आणि निराळीं पत्रें लिहून रा गणेशपंताकडे दिलीस पाठविलीं तीं पावलींच असतील. उतर आले नाहीं. त्यास तिकडील सायंत वर्तमान लिहावे. इटायेस पठाणाचें ठाणें होतें ते उठउन लाविलें. सरकारी ठाणें बसविलें. पा सकोगवादेमधें गढीबद जमिदार मवासी सुरलीत आमल देणे त्यांस ठाउका नाहीं. त्यांस मोर्चे लाउन दोनतीन गढी घेतलीं. वरकडाचेंही पारपत्य करीत आहों. ग्वालियेरच्या किल्यास रा विठलराव सिवदेउ [विंचुरकर] यानी मोर्चे लाविले. पडकोटासीं लडाई होत होती. यांजबरोबर लक्षणी फौज थोडकी. ईकडील जमिदारी मीर जमा करुन मोर्चे लाविले होते. पडकोटाचा दरबाजा बंद केला. लोकही किल्यांतील गडबडलेसे जालें. किलेदाराने अनुसंधान गोहदवाला राणा भीमसिंग याजकडे लाउन किला त्यास द्यावयाचा कबूल केला. त्याजकडील हजार बंदूख आली. जमिदार सर्व येक मोर्च्यास. चोक्या जमिदाराच्याच होत्या. त्याचे मेदाने हजार बंदूख पडकोटांत दाखल जाली. किला वलकांवला. तो दुसरे दिवसीं पाच हजार प्यादा व हजार बंदूख घेउन भीमसिंग येउन जबरदस्तीने यांचे मोर्चे उधलून आपण किल्यात दाखल जाला. किला भीमसिंगाने घेतला. तमाम मीर जमा करीत आहे. जमिदार ग्वालियेर नरवर वगैरे सर्व भीमसिंगाकडे सामिल जाले. ग्वालियेरच्या जागियांत कजिया कराव याचा विचार आहे. रा विठलराव यानी मदत[१५३] करावी फौज पाठवावी ह्मणून दिलीस श्रीमंतास लिहिलें आहे. कितिक फौज येईल ते पाहावें. जे वर्तमान होईल तें आपणांस लिहित जाउ. तिकडे आपण गेलियावर वर्तमान जालें असेल ते सायंत लिहिले पाहिजे. आहे ते वर्तमान त लिहिले आहे. पै वरचेवर होत जाईल ते लिहित जाउन.

सोरीठ सकतपुर सिवली खेवराबोर येथील पैसा वसुलाचा आह्मास साल मजकुरी कोणी देत नाहीं. आह्मीं प्यारसा रोजानी परगणेयात जातो. वसूल त्याजकडे काय आला तो सायंत हिसेब पाठवितो. बहुत काये लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] व रा चितोपंत [वळे] स्वामीस सा नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

---

पूर्वी बुंदेलखडचे स्वारीस स्वामीसमागमें होता व हली आम्हासमागमेही वाकिफ जाला होता' असे चिमणाजी भट सागतो [पेद १४ ले ८] या सुमाराची दोन पत्रेंही त्याची उपलब्ध होतात. [पेद १७ ले १११ पेद ३० ले. ९४] तथापि यापेक्षा विशेष विसवणीय असे साधन प्रस्तुत भागात प्राप्त झाले आहे. 'तीस वर्षे चाकरी केली. ती सर्व पाणियात जाईल' असा लेख गोविंदपताचा १७५५चा आहे. [ले. ३२९] तेव्हा त्याचा उदयकाल १७२५ असा ओघानेच प्रतीत होतो.

(१५३) याचे मूळ उपनाम दाणी असें होय परतु कागदोपत्री विंचुरकर या नावानेच ख्याति आहे. विंचुरकरांच्या इतिहासात याचा उदयकाल १७१५ असा दिला असून १७२० साली पेशव्यांच्या

लेखांक [२६५] ।श्री • संवत १८११ श्रावण वद्य ६

[९ अगस्ट १७५४]

विनंती. ता॰ १०, सवालपावेतो सुखरूप असो विशेष. तुह्माकडून पत्र येऊन कुशल वर्तमान कळत नाहीं तर सविस्तर लिहावें. किसनगड घेतल्याचें वर्तमान मल्हारबाकडे धनगीचे आले व मायकारी लिहिले आले त्यावरून कळेल. येथील वर्तमान वे आहे तेच आहे. कोल्हलेस्वार जाटाचे स्वाधीन जाले. पाउपरी रूपरामपासून पैका घेतील. सारांश आपणाकडील कुशल वर्तमान लिहावें म्हणजे संतोष होईल. कृपा केली पाहिजे हे विनंती. समस्त मंडळीस नमस्कार.

लेखांक [२६६] श्री

[अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामींचे सेवेसी.

पोष्य जनार्दन बल्लाळ [भानु] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकिये लिहित गेलें पाहिजे विशेष आलेकडे तुमचे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर लेहून पाठवावें. मारवाडांत तुह्मी गेलियावर येक पत्र आलें होतें. त्यास तिकडील कारभार कोणे प्रकारे विल्हे लाविला. ठाणी कोणकोणती घेतली. खंडणी काये केली. वसूल आला की नाहीं हे सविस्तर लिहून पाठवणें. तुमच्या घरची समस्त

---

तैनातीस गेल्यानें म्हटलें आहे [पान ५, ७] तैनातीचे वरील विधान चुकीचें असून खरे वर्ष १७२४ असावे असा लेखी आधार सांपडतो आणी तेंही शिंदेशाहीपाच होत. 'चालीस वर्षे येथ्ना जागा वाढलो' असें. गोगारराव पदवर्णनात त्यानें लिहिलें आहे. [खरे २ ले. ४९१] इतराप्रमाणे त्यानेंही आपला उदयकाळ दाखविला आहे. वर्यात ह्याच काल तैनातीचा समजला पाहिजे इतकेच नव्हे तर पेद २९ ले. १५८ हे शिंदेशाहीचें पत्र दाखवितें म्हणजे त्याचा संबंध पेशव्याशी शिंदेहोळकरानंतरचा ठरतो. 'सर्वत्र सारखे हे येक अपूर्व वाटते. बरकड मजकूर तर दोघे सरदार वेगळे करून आम्ही मरणास अथवा निष्टेस कोणास गोष्ट लागू देणार नाहीं' हे वाक्य मननीय होय सोवत्याच्या उदयाविषयी जें विवेचन आम्ही केलें आहे त्याची साक्ष हे विंचुरकराचें पत्र देते असतु. हा १७५४ तील कुंभेरीच्या स्वारीत असून तेथून तो ग्वाल्हेरीकडे आला [पेद २७ ले ८१] तेव्हां त्याचा भीमसिंग जाट गोहदकराशी बिघाड होऊन युद्ध जुपले त्याने राघोबास सहाय्याची याचना केली असता [पेद २ ले ४५] 'कितिक फौज येईल ते पहावें' हे वाक्य राघोबाच्या कामसा तरक व सैन्याची उणीव दाखवितें असतु. पेद २ ले ४०. पेद २७ ले ९७, ९८, ९९, १००, १०२ हीं विंचुरकराचीं पत्रें १७५७ तील आहेत.

सुखरूप आहेत !' कांहीं चिंता न करणें. वरचेवर पत्रें पाठउंन संतोषवीत जाणें. बहुत काये लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लक्षुमणपंत [ वैद्य ] व बाबुराव लिमये स्वामीस सां। नमस्कार. तुह्मी दोंन पत्रें पाठविलीं ती पावलीं. असेंच सदैव संतोषवीत जाणें. तुमचे घरची समस्त सुखरूप आहेत. काही चिंता न करणें. हे विनंती.

राजश्री त्रिंबकपंत दिवेकर यास नमस्कार. पत्रें पावली. वर्तमान सविस्तर कळले. राजश्री रामाजीपंतमाउ याचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीत जाणे. वरी काही खर्चास पाठउन देणे. तुमचे बंधु व मनुश्ये समस्त सुखरूप आहेत. काही चिंता न करणे. हे विनती.

' विनंती पोष्य बापुजी बलाल [फडके] सां। नमस्कार विनंती. कृपा करीत आसावे. पदरचे आहो. कृपा करावी. हे विनंती.

---

लेखांक [२६७] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध ७
[२४ अगस्ट १७५४]

चिरजीव राजश्री रामापंजीपत यांसि प्रती विसाजी दादाजी [आठवले][१५४] आसिर्वाद उपरी. येथील कुशल ता भाद्रपद * शुध सतम्मी मो पुणे जाणून तुह्मी आपणाकडील कुशल वर्तमान लिहित गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस तुह्माकडून पत्र येउन वर्तमान कळत नव्हते त्यास हाली आषाढ वद्य ७चे पत्र आले त्यावरून साकल्य वर्तमान कळलें. पुढें मारवाड प्रांते गेलियावरी साकल्य वर्तमान लेहून पाठवणे. वरकड गत वर्षी तुम्हास आकुलनेरचे वर्तमान श्रावणमासी लिहिले होते त्याचा मजकूर हाली लिहिला तो कळला. चिरंजीव राजश्री आपाजीपंताच्ये कमाविसीचा तपसीलवार मजकूर लिहिला तोही कळला.' येशास त्यास चौथाई लाउन कडून कमाविस होती तिचा मल्ता तुमच्या

---

(१५४) याचे सपूर्ण नाव विसाजी दादाजी आठवले [पेद ३९ ले १६९] दाभोलकरवघूस 'चिरजीव' असे लिहितो अर्थात तो त्याचा आप्त होता हे निर्विवाद होय नाते मात्र कळत नाहीं. या पुरुषाचा सुगावा १७३३पासून लागतो [पेद ३ ले १०३ खड ६ ले ८४] १७३६च्या स्वारीत तो पेशव्यासमागमें उत्तरेकडे असला पाहिजे. [पेद १५ ले ६७] १७४६त बाजीराव पेशव्यांची पत्नी यात्रेस गेली तिच्याबरोबर तो होता [पेद १८ ले १४१] १७५५च्या आरंभी 'पुण्यास कारभारी प्रस्तुत विसाजीपतदादा आहेत असे फडके सांगतो. [ले २९५] पानिपतानतरही तो जिवत होता. अशी मोटक माहिती त्याची मिळते.

यमाजिरदारांनी करून घेतला. त्याजकडे काही सना नाहीसी आलियावरी ज्या घरात आपा राहात होते ते घरही घेतले. त्यांसी मुली दुसरी जागा गावांत नेमून दिली आहे. घर बाधावयाचें आनकूलता पडिले तरी तेथे आकुलतेरीच राहातील. नाही तरी दुसरे जागा करुन राहातील. त्यांस सागत असतों. मानकरी कबूल न करीतसे जाले मग तुमचाही उपाये करावे. जागिरीची कमाविस आपाकडे न जाली म्हणून काही आमच्या चितात दुसरा विचार नाही. तुम्ही त्याहीहून आलियावरी भेटीनंतर सावकाश वर्तमान लिहित जाणे. चिरंजीव हरबाजी [दामोलकर] व मुलेमाणसे सर्व सुखरूप आहेत. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे !" हे आसिर्वाद.

राजश्री लक्षमणपंतास [ थंच ] नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

लेखांक [२६८] श्री * संवत १८११ भाद्रपद शुद्ध ९
[२६ अगस्ट १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
गगाजीपंतभाऊ स्वामीचे सेवेसी.

पो गोविंद बलाळ [बुंदेले] कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। भाद्रपद * शुध नवमी जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस जाहाले आपणाकडील पत्र येउन कुशल वृत कळत नाहीं. तरी सवैव पत्री संतोषवीत असावें. रांगडे लोक मनमाने तेशा तिकडील खबरी उठवितात यास्तव सांप्रत वर्तमान जाले असेल तें लिहिलें पाहिजे. इकडील वर्तमान तर रा। विठलराव सिवदेउ [विंचुरकर] यानी ग्वालेरच्या किल्यास मोर्चे लाविले होते. किलेदाराने गोहदवाला राणा भीमसिंग याचकडे सलूक करुन किला भीमसिंगास दिल्हा. हजार स्वार व पांच हजार प्यादिया-नसी भीमसिंग येउन यांचे मोर्चे उधळून किल्यावर दाखल जाला. यांजकडील माणसें बहुत मारलीं गेलीं. त्यावर हे निघोन आंतरीस गेले. फौजेकरितां श्रीमंत रा। दादा स्वामीस लिहिले आहे. फौज जाईल तेव्हा उपराळा होणे ते होईल. आम्हीं सकुराबादेस येउन पठाणाचे ठाणे इटायेस होते तें उठउन सरकारी ठाणे [बसवून] बंदोबस्त करीत आहों. !" अम्हास वातमी आहे जे मेरतेयासी फौज जाउन लागली. विजेसिंग मेडत्यात आहे. त्यास जे वर्तमान होत जाईल ते लिहित जावे. दूर देश आहे याजकरिता सविस्तर लिहावे. विजेसिंग कोठे आहे. फौज त्याजपासी किती आहे. आपले लस्कर कोठे आहे ते

लिहिले पाहिजे. राजे रामसिंग याजपासी किती फौज जमा झाली. राणाजीकडील कोणी फौज आली न आली हे सार्यंत लिहिले पाहिजे. इकडील वर्तमान होत जाईल ते लिहित जाउन. श्रीमंत राजश्री नानास्वामी व श्रीमंत रा। भाउस्वामी पुणेयांत आले. श्रीमंत रा। भाउस्वामी नासिकी आले होते कुशावर्ती गोसावी पनास हजार मिळोन मोठे जुज व्हावे. त्यास श्रीमंत रा। भाउस्वामीनी येउन गिरी भारथी याचा कजिया होता याजकरिता येउन उभये पक्षी सलूख करुन दिल्हा. जुज होउ दिले नाहीं. स्नान करून दक्षणेस पुणेयासी यावयासी गेले. वरकड वर्तमान उतमच आहे. रा। महादजीपंत बाबा पुरधरे सासवडी आहेत. रा। घोडोबा निराले निघाले. नानाही निराले जाले. त्याचे घरात फूट जाली. प्रस्तुत ते आपले घरचे कलाहात आहेत. देवासा वैद यासी पत्र लिहिले आहे त्याजला × × वे. त्याचे घरची सुखरुप आहेत. राजेश्री [जयाजी] आपासाहेबाचे शरीराची भावना कसी काय आहे तेही लिहिणे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती. कुशल वर्तमानाचे पत्र श्रीमंत रा। दादास्वामीचे स्वारी आलियावर रा। गणेशपंताजवल म्हणजे आम्हास पावेल. इटावे येथे पठाण होते त्यासही कोणीकोणी बावली दिली जे उठून न जाणे. कायम राहाणे. तीन हजार प्यादे रोहीले वगैरे दोन हजार फौज व महमूदखान आसे होते. आमची बदनक्षी व्हावी असे तमासा पाहात होते परंतु श्रीमंत स्वामीचे व रा। [जयाजी] आपाचे कृपेने कार्य जाले. पठाणास घेऊन दबाउन कहा डिले आणि सलूखही राखिला. याप्रमाणे जाले. पुढे वर्तमान होत जाईल ते लिहित जाईन. आम्ही येथील पंधरा रोजात कामकाज बंदोबस्ती करुन पुणेयाकडे जावयाचे करुन. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

वेदमूर्ते राजेश्री जोसीबावास नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लक्ष्मणपंत [वैद्य] बाबुराव [लिमये] समस्त मंडलीस सां। नमस्कार.

---

लेखांक [२६९] श्री

[सितंबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामी गोसावी यांसि.

पो। सखाराम भगवंत [वोकील] साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथून कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. आपण दोनतीन पत्रे पाठविलीं ते पावली लिहिला अर्थ सविस्तर अवगत जाहाला. येथील अर्थ संविस्तर श्रीमताही

लिहिले आहे त्याजवरून कळो येइल. हाली छ २६ जिल्कादी सनवारी तुमचे व बिजेसिंगाचें युध्य जाले. बिजेसिंगास तुहीं मोडिलेत. हती तोफखाना घेतलात बिजेसिंग पळोन गेला येसे वृत जयपुरीहून लिहिलें आलें परंतु तुहीं लिहिले नाहीं. येसे न करावे. हमेशा पत्रें पाठवीत जावीं.।" येथे नाना प्रकारचे वर्तमान येउन रात्रदिवस काळजी वाहावी ऐसे असता अजरदार करून वर्तमान कसे न लिहिले. परस्परे जयेनगरोहून साड आली तेव्हा कळले व दुसरीही लिहिली आली. येविसी आपल्या येजमानाचे तोडात साखर[१५५] घालणे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

---

लेखांक [२७०] श्री

[सितंबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामी गोसावी यांसि.

पोष्य सखाराम भगवंत [ वोकील ] सां नमस्कार विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिले पाहिजे विशेष. बिजेसिंह मोडिलात फत केलीत हे हर्षाचे वर्तमान तुम्हीं न लिहिले. येथे कितेक प्रकारच्या वार्ता पहिले उठल होता याजकरिता तुम्हाकडील रात्रदिवस चिंता वाहात होतो येस असोन अजुरदार कासिदजोडी तर्‍ही पाठवावयासी अनकूळ न पडले. आपूर्व आहे. याउपरी युध्यप्रसग जाल्याचे वृत जखमी जायां कोणकोण हे सविस्तर लिहिले पाहिजे.।" बहुत काय लिहणे लोभ असो दीजे हे विनती.

---

(१५५) 'जयापाचे मनात विषम फारसे येउन स्वतंत्र मोहीम करून राठोडासी लढाईस गेले होईल प्रसग तो कळेल. बहुतेक कळलाच आहे' असे होळकरपक्षीय हिंगण्याचे अनुमान होते [पेद २१ ले. ६०] तसाच गोविंदपत बुंदेल्यास संशय होता [लि २६८] इतकेच नव्हे तर पेशव्यासदेखील भ्राति होती [ले ४९] राघोबा तर होळकराचे सहवासातच यामुळे त्याला निराशा वाटली तर नवल काय [ले. ४२] 'जन्मादारभ्य मल्हारराव याचे जुगातून निघालो मल्हाररावाचे हिरेने दातनिसकीस येउन सिंदे याणी फत्ते केली आणि मल्हारराव याजपासून निघालियाचे सार्थक जाले' हे बखरीचे वर्णन किती मार्मिक आहे हे वाचकास कळेल 'तुम्हाकडे यश मिळाले ये गोष्टीचे असाह्य उजवे बाजूस फार जाले त्यामध्ये पुरुषोत्तमपत मुनसी याचे तो सर्वस्व गेले त्याप्रमाणेच दादासाहेबी फते बानविली. रायसिंग रडत बसला' [ले २७१] 'आपासाहेबाची फते जालियामुले सर्वांस दवा भारी नमला आहे [ले २८२] 'सोबतियास फार भारी जाले असेल' [ले २८३] 'श्रमी व्हावयाचे त्याम श्रम आहेतच' [लि २७८] यावरून बखरीची सरणी किती श्लाघ्य होय हे स्पष्ट होते तेव्हा वोकिलाने 'तोडात साखर घालण्याचे' श्रेय का संपादू नये [ले २७६, २७७]

लेखांक [२७१]  ॥श्री  * संवत १८११ आश्विन शुद्ध ८
[२४ सितंबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पो गणेश कृष्ण [पेंडसे] सा नमस्कार विनंती.छ* ६ जिल्हेजपावेतो सुखरुप असो विशेष. गंगोबातात्या [चंद्रचूड] व दामोदर महादेव [हिंगणे] वकील छ ५ जिल्हेजी आले. दाहा लक्षाची टीप जीवनदासाकडे जाली आहे. कांही शाला व मोहरा पहिले वसूल पांच सहा आहेत तेसुवा कागदो पंचविसाचा भरणा करितात परंतु अद्याप हस्तगत नाहीं. गाजदी खानानें अड घातला आहे की तुम्हीं पैका घेउन देशास जाल. मागे जाट दिलीस येउन बसेल ये गोष्टीचा बंदोबस्त करुन देणे मग पैका हातास येईल. ऐसा अटकाव जाहाला आहे. फिरोन गंगोबातात्या व वकील काल दिलीस संध्याकाली गेले. दसरिया येतील. ते वर्तमान वास्तविक कळल्यावर लेहून पाठउन. तुम्हाकडे यश मिळाले ये गोष्टीचे असाद्य उजव[156] बाजूस फार जाले. त्यामध्ये पुरशोतमपत [हिंगणे] मुनसी[157] याचे तो सर्वस्व गेलेसे जाले ते पत्री लिहिता येनच नाहीं परंतु थोडेसे लिहितो. जे साली नानावर छापा सलाबतजंगाचा पडला ते वर्तमान तुम्हाकडे कुमाउचे पाहाडांत आले ते तुम्हीं गौप्य करुन नानाची फते जाली म्हणोन हतीवर साखरा वाटल्या त्याप्रोच येथे जयापाचा लौकिक व्हावा म्हणोन दादासाहेबी फते वाजविली ऐसे आहे म्हणोन मुनसी बोलतात. याप्रो वर्तमान आहे. इतक्यात रायेसिंगाचे लिा आले की बिजेसिंग मोडला त्यावरुन रायेसिंग रडत बसला आहे. सविस्तर वर्तमान कलावे म्हणोन लिा असे. बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

(१५६) 'जडभरत वोवला अजामीळ' [ग्रच ले २९८, २९९] याप्रमाणेच 'उजवी बाजु किंवा उजवा नेत्र' ही सांकेतिक संज्ञा होळकराची होती [कास ले १९२] याची उत्पत्ती अशी दिसते-की माळव्याची वाटणी होऊन मुतालकी शिंद्याकडे आली तेव्हा स्नेहांत परस्परे अंतर पडू नये म्हणून ती एकट्यानेच न चालविता त्यात होळकरास अधिकारी मानून भगवाझेंड्याच्या उजवे बाजूस चालण्याचा व तल देण्याचा मान होळकरास दिला आणि शिंद्याने डावी बाजू स्वीकारली असली पाहिजे [पेद २९ ले १७६] त्याचे हे शब्द द्योतक असून प्रचारात आले यालाच पुढें 'जेष्ठत्व' असे नानाभिधान प्राप्त झाले [इस १४ ले ११]

(१५७) पुरुषोत्तम महादेव हिंगणे. पेद २१ ले. ६० चा लेखक हाच असून त्याचें वरील विवेचन 'किंचित' विचक्षण दृष्टीनेच पहाणे या पत्रामुळें भाग पडते. अस्तु. मार्च १७८२पर्यंत दिल्लीस हा पेशव्याकडून वकिलीवर होता. [मदबा १ ले. ४७, ५०]

लेखांक [२७२]                श्री    * संवत १८११ आश्विन शुद्ध १३
[२९ सितंबर १७५४]

विनंती उपरी. पहिली मामलत ठहरलियावर व रुपयांचे वसुलास दिरंग लागलियावर मधे किंचित संशये वाढला होता तो दूर करावयास छ * ११ जिल्हेजी वजीर मल्हारबाचे डेऱ्यास आला. जाटाकडील फौज व लोक जमा होउन पलवल प्रगणियाचे ठाणे वजिराचे होते ते मारुन आपले ठाणे कायम केले व वालभगड आमचे फौजेचे मुकामीहून पांच कोस तेथे जाटाचे लोकांनी मोर्चे लाविले यतद्विशईचा रड बहुत गायला. उपरांतिक त्याचे भाषण जालियावर उभयता श्रीमताचे डेऱ्यात आले. येथेही तोच प्रकार बोलिला कीं तुम्हीं चौ कोसावर जवळ असतां जाटाने या प्रकारे करावे ऐसे नाहीं. तस्मात तुम्हींच त्यास सांगून आमचे ठाण्यास उपद्रव करविला तर ऐसे न करावे. आमचा पक्ष पहिल्यापासून अंगिकारला तो सिधीस न्यावा. पैकियास चार रोज आगेमागें जाले तर रुपया आमचे घरात आसोन दिल्हा नाहीं [असें तों नव्हे] हे सर्व जनास विदित आहे. कावादावा करुन देणे लागला यास चार र ज लागले तर कौल्ही वडलाच ऐसे नाहीं. लोक ज्यात तुम्हास पुर्ते ×× करा ऐसे म्हणत ते तुम्हीं करा. याप्रमाणे मृद भाषण केले व लौकिक फाज तयार करुन पाठवावी. निदान आपण जावे ऐसा आरंभ केला तेव्हां जलालुदीखान व वकील रुपयांचा मजकूर बोलो लागले तेव्हां बाकीचे रुये राहिले ते आठाचा रोजात निश्चये बावेसा करार करुन पुन्हा नवीन परस्पर कौलकरार लेहून बेलभंडार केला. पूर्व करार यानी व त्यानीं मिळोन केला आहे तो चितापासून चालवावा. ये गोष्टीची आणशपथ जाली. सूर्त जाटाचे लोकांनी उपद्रव न लावावा म्हणून रुपराम वकील जाटाकडील त्यास युक्तीने सांगितले की आम्हीं दिलीवर आसता तुमचा उपद्रव न लागावा. याप्रमाणे इकडील धावउन बाकीचे [दोन] लक्षाचे निशापत्रींसाठी गंगोत्रातात्या व वकील [दिल्ली] शहरात गेले आहेत. त्यास पाचसात रोज जालें. पुढे पाहावे. सारांष रुपयाचा वसूल सुधा दिसत नाहीं. खानखाना याजकडील सूत मल्हारबाकडे आले व त्यानी बलाउन त्यास आस्वासन दिले कीं तुम्हास आम्हीं लाहोरची सुभेदारी देवउन तेथे पावते करुन. दहा लक्ष रुये बावेसा करार ठहरला आहे. मल्हारबाचे विचारे श्रीमंत देशास चाललियावर आपण मागे[१५८] राहून कांही कामें करावी याप्रमाणें मनसबा आहे. पुढे घडोन येईल ते

(१५८) हे पत्र अत्यंत महत्वाचे आहे. 'मल्हारबाचे विचारे श्रीमत देशास चाललियावर आपण मार्गे दिलीस राहून कार्यभाग करावा याप्रमाणे मनसबा आहे श्रीमताचे चितात मल्हारबास देशास घेउन जावे आणि भकारपूर्वकाचे चितात तो देशास जावयाचे नाहीच' हे शब्द पानिपतची खात्रीच

खरे. ।' मल्हारबाचे मते श्रीमंतास देशास लाउन द्यावे. आपण दिलीस राहून कार्यभाग करावा. श्रीमताचे चितात मल्हारबास घेउन देशास चैत्रमासी जावें. मकारपूर्वकाचे चितात तो देशास जावयाचे नाहींच. याप्रो वर्तमान आहे. साराश दिलीचा पैका सातआठ लाख आजता वसूल आहे. टीपा हातास आल्या आहेत. बाईदे चहु महिन्याच आहेत. घडेल ते प्रमाण. दिलीचे पैक्याची वाट जाल्याखेरीज कूच होत नाहीं. कलले पाहिजे हे विनंती.

---

लेखांक [२७३] श्री * संवत १८११ आश्विन शुद्ध १५
[१ अक्तुबर १७५४]

चिरंजीव राजश्री रामाजीपंत यासी त्रिंसाजी दादाजी [आठवले] आसिर्वाद उपरी. यथील कुशल ताा आस्विन * शुध पुर्णिमा मुाा पुणे सुखरुप असों विशेष. प्रस्तुत तुम्हाकडील वर्तमान कलत नाहीं तरी सविस्तर लिहिणे जाणें. सविस्तर अर्थ चिरंजीव हरीपंती लिहिला आहे त्यावरुन कलेल. ।' प्रस्तुत तुमची छावणी मारवाड प्रांतें कोणे ठिकाणी जाली आहे पुढे काये मनसबा आहे ते साकल्य लिहिले पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे आसिर्वाद

राजेश्री लक्षमणपतास नमस्कार. तुमची मनुस्ये सुखरुप आहेत. लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२७४] श्री * संवत १८११ आश्विन वद्य ४
[५ अक्तुबर १७५४]

चिरंजीव राजश्री रामाजीपंत यांसि प्रती त्रिंसाजी दादाजी [आठवले] आसिर्वाद उपरी. येथील कुशल ताा आस्विन * वद्य चतुर्थी मुाा पुणे सुखरुप असो विशेष. तुम्ही आषाढमासचे येक पत्र पाठविले व श्रावणमासचे पत्र व भाद्रपदमासचे पत्र पाठविले ते पावलें. साकल्य वर्तमान कलले प्रस्तुत तुम्ही मारवाड प्रांते गेला आहा येशयास

---

मीमासा करणाऱ्या सशोधकानी अवलोकन करावेत. शिंदेहोलकरात परस्पर कलुशता वाढली तरी अहदनाम्याचे ध्येय दोघासमोर सारखेच होते. [पेद २१ ले. ४९, ५४] सरदाराचा चढ न होऊ देतां उभयतावर वरचढ रहावा म्हणून राघोबाचा लोढणा गळ्यात पडला त्याचे हे दृष्य असून १७५७तील अवदालीची स्वारी यशस्वी कशी झाली याचे वर्म ओळखू येते. वजीर 'पस्ट बोलतो की सर्वस्व जाउन पातशाहीची अब्रू गेली. [मराठे] याणी येउन साहे करावें ते न जाले. सर्वास बुडालो. बेहुरमत जालों'. [पेद २७ ले. १७०] हे शिवशिष्याच्या शुक्रनीतीचें नगारे वाजले तर वावगें काय झाले ?

तिकडील ठाणीठुणी कोणती घेतली. पुढे कोणत्या प्रांतास जाणार हे सविस्तर लिहिले पाहिजे. ईकडील वर्तमान तरी उभयता श्रीमंत प्रस्तुत येथेच आहेत. दिपवाली जालियावरी कोणीकडे जावयाचे ते जातील. घरची मुलेमाणसें तुमची सुखरुप आहेत. वरकड साकल्य वर्तमान चिरंजीव रा हरीपंतानी लिहिले आहे त्यावरून कलेल. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लक्ष्मणपंतास [वैद्य] नमस्कार. लोभ असो दीजे हे आसिर्वाद.

---

लेखांक [२७५] श्री * सवत १८११ आश्विन वद्य ५

[६ अक्टुबर १७५४]

विनती. रामचंद्रबावा [सुखठणकर] आस्विन * वद्य पचमीस मृत्य पावले. हे वर्तमान कललेच असेल. फार वाईट जाहले. वासुदेव जोसी अश्विन शुध राष्टीस वारले. रामचंद्रबावाची बायको सयागमन केले. समागमे गेली. कलले पाहिजे. ॥ हे विनती. ॥ मनसब्याचा चिवडा जाला [ तो ] पत्री कोठवर लिहावा. आपण जाणतच आहेत. ॥ हे विनंती.

---

लेखांक [२७६] श्री

[अक्टुबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचे शेवेसी.

पोष्य सखाराम भगवंत [बोकील] सा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित असिले पाहिजे विशेष. येथील वृत्त श्रीमंतीं राजश्री जयाजी आपा यांसी लिहिले आहे त्याजवरून अवगत होईल. ॥ ईकडील वर्तमान तरी अद्यापि दिलींच्या रुपयाची वाट जाली नाहीं. रुपरामाकडील ऐवज येणार आहे. तर्त ऐवजाची वोढच आहे. लोकांचे समजाविसीचा प्रसंग आहे. येवज आलिया तर्त लोकास द्यावयास पाहिजे. आलियाउपरी देउ. तुह्मीं याउपरी माग्वाड्याचा निकाल काढावयाचें होत असिले तरी करून मोकले व्हावें. दुराग्रहाखाली वाढुन लाववावे [तरी] न कले कोणता प्रकार होईल. काही मनोदयानरूप होउन आलियास फार वोढू नये. त्याहीमध्ये जसे दिसेल तसे करावे. वरचेवरी वर्तमान लिहित जावे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

लेखांक [२७७] श्री

[अक्टुबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचे सेवेसी.

पो॥ सखाराम भगवंत [बोकील] सां। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिते असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले प्रविष्ट जालें. राजश्री दत्ताजी सिंदे याच्या जखमा बऱ्या जाहाल्या पाणी घेतल्याचे वर्तमान लिहिले तें अवगत जालें. बिजेसिंगानी पेगाम सलुखाचा केला आहे तथ्य होईल ते लेहून पाठउन म्हणून लिहिलें तें कळले. आशास त्याचे तुमचे भाषण कसकसें जाहालें. तथ्यांत आले किंवा नाहीं हे सविस्तर लिहिणें ।' उचित असें. साराष या प्रसंगी निकाल साधारण होत असल्यास बहुत लांबवावेसे नाहीं. त्याहीमध्ये तथील प्रसंगानरुप जे दिसेल ते कराल. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२७८] श्री * संवत १८११ आश्विन वद्य ७

[८ अक्टुबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाऊ स्वामीचे शेवेसी.

पोष्य गणेश कृष्ण [पेंडसे] सां। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * २० जिल्हेज मुा। खोजेयाची सराई यमुनातीर [समीप] दिल्ली सुखरूप असो विशेष आपण पत्र पाठविले ते पावले. बिजेसिंग मोडल्याचे वर्तमान लिहिले ते सविस्तर कळोन बहुतच हर्ष जाहाला तुमची पत्रें आलियावर श्रीमंत वारंवार बहुतच खुष आहेत. वरकड जे श्रमी व्हावयाचे त्यास श्रम आहेतच. ते सर्व आपणांस ठाउकच आहे. वरकड येथील वर्तमान नवऽविशेष लिहावेसे नाहीं पुण्यांत यंदा श्रीमंतानी कर्ज वारावयाचा मजकूर करुन तमाम मुत्सदी लोकावर पटी घातली आहे. वरकड चाकरलोक कारकून वगैरे तमाम याची तैनात व पाईप्यादे याचे दुमाही घ्यावे याप्रमाणे मजकूर केला आहे येविसी श्रीमंत राजश्री [जनार्दन] बावानी आम्हांस पत्र लिहिले तेच बजिनस आपणांकडे पा। आहे त्यावरुन कळेल. ।' बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

विनंती. आमचे उभयेता यजमानावर पटी पनास हजार घातली आहे. कळले पाहिजे हे विनंती.

---

लेखांक [२७९] ॥श्री संवत * १८११ आश्विन वद्य ७
[८ अक्टुबर १७५४]

विनंती. आपणांस मागावे सरकारची फौज आहे त्याजकडे वार्षिकाचा येवज येणे त्याविसी पूर्वीं आपणांस लिहिले आहे त्याप्रो आपण करितीलच. वांडयाकडील येवज उगवावा. स्मरणार्थ लिहिले आहे. कोणाकडे जुनी बाकी आहे जगदल्याकडे जुनी बाकी आहे ते मनास आणावी. लक्ष्मणपंताचे रुबरु जगदल्याचे कारकुनासी करुन दिली होती त्याप्रो मनास आणावे. कृपा केली पाहिजे हे विनंती. आम्हांस श्रीमंत बाबानी लिहिले आहे की यंदा कर्जपटी आम्हावर पंनास हजार घातली आहे त्यास रामाजीपंत व तुम्हीं तिकडे हा अर्थ ध्यानात असे देणे म्हणोन लिा. त्यास सिलेदाराकडील वार्षिक आहे ते आम्हीं मनास आणू. दिलीतील कारभार व जाटाकडील व जयनगरचा पैसा प्राप्त होणे ते कलतच आहे आपण प्रसंगी असते तर काही होउन येते. असो उदेपुरचा मजकूर आपण मजला मागे सांगितलाच होता तो आपण करुन घेणे तो घेतीलच. खुमानसिंग[१५९] विष्णुपंत [गदरे] तिकडे आले आहेत. त्यास आपण स्मरणपूर्वक सागोन जे करणे ते करावे. आम्हीं खासगत काम नासिकास हजार दोन हजार रुपया × × चे लाविले होते. त्यास पाचसहापावेतो जाईलसे दिसते. परिणाम लावणार आपण आहेत. आधी काम करु नये. आता आरंभेल त्याचा सेवट लावणे आपणांस आहे. बहुत काय लिा कृपा केली पाहिजे हे विनंती. पत्र फाडुन टाकावे.

---

लेखांक [२८०] श्री संवत * १८११ आश्विन वद्य ७
[८ अक्टुबर १७५४]

विनंती. कर्जपटीच्या[१६०] यादी पुण्याहून आल्या आहेत. त्यामधे तुम्हावर पटी पंचवीस हजार व गंगोबातात्यावर येक लाख व राघो लक्ष्मण दहा हजार. रामाजी यादव पंचवीस हजार हुजरातचे कारकूण दफतर वगैरे निमे तैनात याप्रो पटी आहे. आपणास कळावे म्हणोन लिा असे. ॥ हे विनंती.

---

(१५९) हा मेवाडकराचा वकील असून त्याच्या मध्यस्थीने २५ लक्षाचा नजराणा घेण्याची करार केला होता [वाड ३ ले २२९] ही रकम जमेस धरून कर्जाचा विचार केला पाहिजे. पहा ले १०२ टीप ६१

(१६०) कर्जपटीचा विस्तार पहावा [ले २६३, २७८, २७९] वाड ३ ले ४८८ ते ४९६ ही पत्रें यासबधीच होत. वज्रयोगिनीच्या देवालयाची दुसरी पटी याच वर्षी झाली [वाड ३ ले ५०८, ५११ पेद ३२ ले १६६]

लेखांक [२८१] श्री * संवत १८११ आश्विन वद्य १३

[१४ अक्टुबर १७५४]

पुरवणी राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

विनती उपरी. पहिली पत्रें लखोटा अलाहिदा आहे त्यावरुन कलेल. छ * २६ जिल्हेजी आज पत्र हे लिहिले आहे. नवलविशेष मजकूर तर गाजदीखानाकडील पैक्याचा निकाल सत्वर न होये याकरिता खानखानाकडील राजकारण उमे करुन दौलतराव मुरार व रूपराम कठारे त्या अनुसंधानात आहेत. दौलतराव दिल्लीत गेले आहेत. हे वर्तमान गाजदीखानास कळले त्यावरुन तो खटा आहे. याचे वेलभंडार तुह्मी गेल्यावर दोनचार वेळा जाल. त्याचेही प्रमाण नाहीं. सत्याम वाटले.[१६१] टीपा दहाबारा लक्षाच्या चार महिन्याचे मुदतीच्या आल्या आहेत. त्यासही हिसका बेसेलसे दिसते. पुढे काये होईल ते पाहावे. मंमूरअलीखांन मेला. त्याचे वर्तमान आले आहे. मंनसबे जागाजागा घाटनात. परिणाम लाविनील तो खरा. सविस्तर श्रीमंतानी आपणास लिहिले आहे त्यावरुन कळेल. येथे पैका अद्याप काही येत नाहीं. सातआठपावेतो आला आहे तोच आहे दुसरा रुपया नाहीं. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे ॥ हे विनंती.

---

लेखांक [२८२] श्री * संवत १८११ कार्तिक शुद्ध ३

[१८ अक्तुबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पो॥ गणेश कृष्ण [ पेंडसे ] सा॥ नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता॥ छ * १ मोहरमपावेतो यथास्थित असे विशेष. सांप्रत आपणाकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहावें. येथील मजकूर तर गाजुदीखानाकडून पैक्यास दिरंग लागला म्हणोन खानखानासी सूत्र लाविलें तो मजकूर पूर्वी आपणांस लि॥ आहे. हाली खानखाना व गाजदीखान येक होउन पातशाही आंमखासांत पातशाहाजवळ

(१६१) हे पत्र अत्यत महत्वाचे आहे. 'वेलभंडार दोनचार वेळा जाले. त्याचेही प्रमाण नाहीं. सत्यास वाटले'. हे राघोबाच्या करणीचे कौतुक पहावें 'येथीलही प्रमाण काय आहे. येथील अविवेकीच कारभार आहे'. [लि २९८] 'कारभारचे तिरपडेंच आहे. हे करितात ते त्याचे मनास येत नाही येसा घालमेली नित्य नव्या होतात. [लि २८५] सुदैवाने हा फडणिशीकडील पुरावा होय. अन्यातर पक्षपाती म्हणूनच प्रतिष्टा पावता 'उभयता सरदाराचा बहुत भरोसा. त्यांत जयापाचा तर विशेष होता. [खंड ६ ले ५४५] याची बखरीची तुलना करुन वाचकानीच निर्णय करावा.

भेटी छ १ मोहरमी होणार. गुंता राहिला नाहीं. दौलतराव मुरार जंत्रात[१६२] गेले आहेत. ते व जे जे या कर्मात होते ते सहजच उगेच राहिले. गाजदीखांनाचेही चितात विपर्यास यावयाचा तो सहजच आला. टीपा दाहाबारा लक्षाच्या आल्या आहेत, त्याच्याही मुदनी आहेत. पैका हातास यावयास दिरंगच आहे. सातआठ लाख आजतागाईत वसूल आहे. सेठाणीची टीप साडेचार लाखाची चांगली आहे ते गंगोत्रातात्यांनी घेतली. त्यांपैकी कांही वसूल आला आहे. कांही येणे ते त्याजकडेच येतील. ते टीप [राघोबा] मागतात परंतु तात्या टीप देत नाहीं यावरून खावंदाची मर्जी दिक आहे. मनसूरअलीखान मेला. हे वर्तमान येताच रोहिले पठाण व मनसूरअलीखानाचे पुत्रास पत्रे रो केली आहेत. अंतरवेदीत उतरावयाचे मानस आहे. मल्हारबा आपली फौज पलीकडे उतरावयास लागले. पुढे काये होईल ते लेहून पाठउं. आपणाकडील सविस्तर लिहावे. राजश्री [जयाजी] आपासाहेबाची फते जालियामुळे सर्वांस दबा मारी बसला आहे. कोणी फार बोलों सकत नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती.

सेवक माधवराव नारायण पाटणकर सा नमस्कार. पदरीचे असो हे विनंती.

सेवेसी महादाजी केशव सां नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२८२] श्री *संवत १८११ कार्तिक शुद्ध १४

[३० अक्तुबर १७५४]

राजश्रियांविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामीचे सेवेसी.

पों जनार्दन बलाल [मानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * १३ मोहरमपावेतों क्षेम जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत गेलें पों विशेष. तुम्हीं पत्र पों तें पावलें. राजश्री जयाजी सिंदे व विजेसिंग मारवाडकर यांचे युध्य तुंबल जाहले परंतु राजश्री जयाजीआपा सिंदे यांस इश्वरें यश दिल्हें म्हणोन तपसीलवार पत्र लेहून पाठविलें तें पावोंन बहुत संतोष जाहाला. येसेच निरंतर सविस्तर वर्तमान [नवल आ]लेल ते लेहून पाठवीत गेलें पों. तुमचे घरची सर्व मनुष्यें सुखरुप आहेत.

---

(१६२) जयपुरकर सवाई जयसिंगाने दिल्लीस वेधशाला निर्माण केली त्यास 'जंत्रमंत्र' म्हणण्याचा इकडे परिपाठ आहे. त्याचाच हा निर्देश असून हिंगणे वकील जंत्राजवळच रहात होते असे निष्पन्न होतें.

कांहीं चिंता न करावी." जो खावंदाचे पायांसी येकनिष्ठतेनें वर्ततों त्यास ईश्वर महदयश देतो. ही कीर्ती व लौकिक लहान जाहाला ऐसें नाहीं. मोठे यश ईश्वरें दिल्हे. स्वपराक्रमाचा लौकिक व शिपाइगिरीची [शर्त] व सरदारपणाचा लौकिक मोठासा जाहाला. सोबतियास फार भारी जाहाले असेल. बहुत काये लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री लक्ष्मणपंत [वैद्य] स्वामीस सा नमस्कार विनंती उपरी. तुमची घरची मनुष्यें समस्त सुखरुप आहेत. कांहीं चिता न करणें. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२८४] श्री * संवत १८११ मार्गशीर्ष शुद्ध १२

[२७ नवंबर १७५४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचें सेवेसी.

गणेश कृष्ण [पेंडसे] सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ * १२ सफर मु॥ बारपुल [नजीक] दिल्ली जाणोन स्वकीये लेखन केले पाहिजे विशेष. आपण छ २७ मोहरमचे पत्र पाठविले ते पावोन बहुत संतोष जाहाला. लिहिलें वर्तमान कललें. याचप्रमाणें सदेव पत्रद्वारें कुशल वर्तमान लिहून पाठविले पाहिजे. येथील वर्तमान तर राजश्री मल्हारबा रुसोन कूच करुन गेले हे पेशजी लिाच होते. कूच करुन गेलियावर फिरोन समजाविसी करुन आणिले. त्यांणी खानखानाकडील राजकारण केले होते तेच करार कायेसे केले. छ ३ सफरी येकत्र जाले. गावातून खानखाना तयार होउन भेटीस आले. येथून श्रीमंत [राघोबा] फौजसुधा तयार होउन मल्हारबा आधीकरुन सर्व पुडे गेले. भेटी जाहाल्या. श्रीमंत व मल्हारबा व खानखाना येक हतीवर बसोन डेऱ्यास आले. खानखानाने भोजन केले. वस्त्रे दिल्ही. हती दिल्हा. मल्हारबाकडे गेले. तेथे वस्त्रें हती वगैरे दिल्हे. तेच रात्री शहरांत गेले. पैक्याची निशा त्याणे करावी. वजिरीचे खिलत याणी आणून द्यावे. याप्रमाणे करार केला. शहरांत गेलियावर गाजुदीखानाने सांगोन पाठविले कीं पातशाही चाकर आसिला तर भेटीस येणे. नाहीं तर मराठे याजकडे जाणें व शहरची किल्याची बदोबस्ती केली. तलबी लोकांचे समाधान केले. थोडेबहुत खर्चास दिल्हे. त्यावरुन खानखानाने आपणांवर हल्ला करितो म्हणोन भय मानून रात्री डोलीत बसोन येकटा जत्रात वकिलांचे घरास आला. तेव्हां वकिलानी आपल्या घोडयावर बसउन मल्हारबाकडे लष्करात दामोदरपंत [हिंगणे] घेउन आले. खानखाना भेटला म्हणोन गाजुदीखान

कुशल वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहावे. शरीरी समाधान आठव्यार रोज नव्हते परंतु साप्रत आरोग्य आहे ह्मणोन लिा ते कळले. तुमचे शरीर वातव्रध आहे याकरिता थंडीचे दिवसात औषध घेउन शरीराची जतन करावी. पुणेयाकडील पत्रे आपणांस येतच असतील. पुणेयास सर्व सुखरुप आहेत. पत्रे आली होती. कळले पाहिजे. हिकडील नवलविशेष तर जे आहे तेच आहे. बहुत काये लिा कृपा केली पाहिजे हे विनती.

राजश्री बाबाचे पुत्राचे [नाना फडणीसाचें] पत्र तुम्हास आले ते पो। आहे. हे विनंती.

---

लेखांक [२८७] ।'श्री

[जनवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य सखाराम भगवत [वोकील] कृतानेक सां। नमस्कार विनती उपरी. यथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. आपणाकडून पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लिहवें. इकडील वर्तमान सविस्तर राजश्री [जयाजी] आपास लिहिलें आहे ते ध्यानात आणून उतर समर्पक पाठवावें तदनरुपच अमलात येईल. ह्मारांष दिवस गेले. अत:पर जे उतम दिसेल ते करावें. श्रीमंतर गंगेहून स्नान करुन येत तो पंधरा दिवस लागतील. उतर आपलें लौकर आले पाहिजे. आपल्या साहित्यास येउन कोणेही प्रकारें तूर्त निकाल काढावा असे असले तरी सत्वर लिहावे. येथून चार मजली तुमचे शाहावरी आलियाने निकाल पडत आसिला तर तसेंच लिहावे. जो विचार आपले ध्यानात असेल तोच लिहावा. त्याप्रोच होईल. सारास फार लाव्रणीवरी न पडावें. माघमासात गुंता उरकावा हे उतम आहे. उतर लौकर पाठवावें. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.[१६३]

रा। रामरावजी नमस्कार विनंती.

प्रो। छ २९ रावल
[१३ जनवरी १७५५]

---

(१६३) पत्रात मिती न लिहिण्याची खोड सखारामपंत वोकील व गंगोबा चंद्रचूड या उभयतास सारखीच होती. तेव्हां त्याची पत्रें पेवस्तीवर किंवा अनुमानावरच विसंबून रहावयाची.

लेखांक [२८८] श्रीशंकर * संवत १८११ माघ शुद्ध ४

[१६ जनवरी १७५५]

श्रियासह चिरंजीव राजश्री लालाजीस माळाजी यशवंत [गुल्गुले] आशिर्वाद. ता माघ * शुध ४ गुरुवार श्रीपुष्कराहून मुा अजमेर जाणोन स्वकीय लेखन करणे विशेष. कासिद लस्करातून कूच करून आला. तेथून लिहून सविस्तर पा ते पावलेच असेल. रा उधोपंत व सदाराम यास पाटणास रवाना केले होते. [ते] गेलेच आसतील. आम्ही कूचदरकूच येतो. आठ रोज वाटेस लागतील. कळले पाहिजे. हे आशिर्वाद.

सेवक नारायेण येशवंत नमस्कार विनंती. लिा परिसोन कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२८९] श्री * संवत १८११ माघ शुद्ध ८

[२० जनवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामीचें सेवेसी.

पोष्ये सखाराम भगवंत [बोकील] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. आपण पत्र व पंचवीस हजाराची हुंडी पाठविली ते श्रीमंताकडे रावाना केली. आमचे पत्र पावलें. वर्त साल्जाब उठला आहे. ठाणी इकडील जुजतात हा प्रकार कठिणच आहे. सविस्तर राजश्री [जयाजी]आपाचे पत्री लिहिले आहे ते पाहून त्याचा मनोदगे यथास्थित लेहून पाठवावा. जयनगरचा कारभार बरावाईट विल्हे लाउन [दे]उन तह जालियावरी त्याचा मुलुक राखिला पाहिजे यारतव मार्गे जयनगर डावे टाकुन सांबरेवरुनच वाट चमलीकडे जावयास करार जाली आहे. श्रीमंताही सत्वरीच येतील. मुख्य गोष्ट आपास येथें ठेउन श्रीमंतानी जावें हे आमचे चितात येत नाहीं त्याहीमध्यें श्रीमंतर व सुभेदार मिळोन ग्वाल्हेरीचे रोखे रा विठलपंताचे [विंचुरकर] साहित्यास गेलियाने याचे काम खामखा होते असे असले तरी तोही प्रकार आपण त्यांस पुसावा. सारांश ज्या प्रकारें करुन मातब्र सरदार पेचातून निघेत ते जरुर केले पाहिजे. हेही पत्र आपल्या यजमानास दाखउन ज्यात दुराग्रह होउन गोष्ट नासेसे सहसा न करावें. हे उचित आहे. कासिद अजुरदार करुन उतर पाठवावें. आपले उतर आल्याखेरीज कोणीयक विचार येथें होणार नाहीं. अती त्वरेने उतर पाठवावें. बहुत काये लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती.

पो छ ७ राखर. संन खमस.

[२१ जनवरी १७५५]

लेखांक [२९०]  श्री  * संवत १८११ माघ शुद्ध ९

[२२ जनवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामी वडिलांचे सो.

पो॥ मनोहर बगाजी सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * ९ राखर मु॥ प्रगणे अहार श्रीभागिरथीतीर येथास्थित जाणून स्वानंद लेखन करावें. यानंतर बहुत दिवस कृपा पत्र येउन परामर्ष न जाला. तरी ऐसें न करावें. सदैव पत्रद्वारा सांभाळ होत असावा विशेष. दिलीचे कार्यभागाचा निकाल महाप्रयासे होउन राजश्री सुभेदार व राजश्री सखारामपंत [वोकील] जयनगरचे रोखें गेलें व श्रीमंत खासा स्वारीनसीं गंगास्नानास म्हणून श्री गणमुक्तेश्वर क्षेत्रास आले. समागमें राजश्री गंगाधर येशवंत [चंद्रचूड] आले आहेत. येथे रोहिल्याची मागील बाकी साडे सोळा व दीड दहा॥की राहिली होती. त्यात येंदा साहा लक्ष घ्यावें. पुढे दरसाल सा. येणेप्रमाणे करारमदार ठहरला. सामर्थ्यें तीन नख्त. हुंडिया आल्यावर बाकी दों महिन्यानी येणार. निशांत्री जाली. बरेली वगैरे माहाल खालशाचे त्याजवर गाजदीखानाने पंधरा लक्षाची तनखा दिली. ते रुपये तीन वर्षानंतर पांचसाला करुन द्यावे ऐसे कबूल केले. याप्रो॥ ठहराव होउन गंगातीरेच खासा स्वारी मुक्काम मजकुरावर आली आहे. पुढे जाटाकडील तीन किस्ता तीन लक्ष रुपये येणें तेथील गुंता उरकून खानखाना भेटल्यामुळें व लाहोरास त्यासमागमे फौज [सु]भेदाराची जात होती यामुळें वजिरानें काही रुपये × × ×

खानखाना वजिरास भेटला. परस्परे त्याचा सलू × × [फौज सु]भेदाराची बहुधा माघारें गेली असेल. त्या ऐवजाचा गुंता वजिराकडून उरकून श्रीमंत व सुभेदार येक होउन त्या प्रांते येणार. आपणांकडील निर्गम श्रीकृपेकरुन जाला असिला तरी उतम. नाहीं तर तेथील कार्यभागाचाही गुंता आपले विचारें उरकावा व देशास जावें ऐसा मनसुबियाचा डौल प्रस्तुत कालात दिसतो. बहुतेक आपण तिकडील गुंता उरकावाच व संतोषपर वर्तमान लिहावे कीं सर्वत्राचे समाधान आहे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

लेखांक [२९१] श्री
१३५]

[ जनवरी १७५५]

राजश्री जयाजी सिंदे गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो सुखाराम भगवंत [बोकील] आशिर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले, प्रविष्ट जाले. लिहिले वृत्त अवगत जाले. आपास सांप्रत आपण कोठे आहेत विजेसिगाचा ईरादा काये आहे आपण मनसवा कैसा योजिला आहे हे वृत सविस्तर लिहिले पाहिजे. येथील वृत श्रीमंती लिहिले आहे त्यांजवरून कळेल. । सारान केवल कुंभेरीप्रमाणे न गुतावे. बहुत दिवसांचे काम विचारें दमउन करावे. उतावळीनें लोक जाया होउन कार्य सुधे होणार नाहीं. आम्हास सुचले ते लिहिले. तेथील प्रसंगानरूप आपण जे करणें ते करीतच आसतील. लोभ आसो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२९२] श्री * संवत १८११ माघ शुद्ध १५
[२८ जनवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य गोविंद बलाळ [बुंदेले] कृतानेक सां नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता माघ * शुद्ध पौर्णिमा मुग कुरा जाणून स्वकीयें लिहित असिले पाहिजे विशेष. । ईकडील वर्तमान नवाब वकाउल्लाखान[१६४] याजवळ चार हजार फौज व प्यादा पांचचार हजार व तोफखाना आगाव व.ण येबाळें आपल्या सरंजामानसी कुरा शहरच्या नसीगाने होता. आम्ही सडे फौजनसी कुऱ्याजवळ येउन त्यांसी रदबदल केली. सनदा दाखविल्या

---

(१६४) 'वकरलाखान' असाही अवांतर पाठ आहे परंतु आमच्या कागदांत 'वकाउल्लाखान' असें स्पष्ट आहे त्याची सिपास दगा होण्यापुर्वीच गोविंदपंत बुंदेल्यानें त्याचा मोड केला होता. [खंड २ ले. १३७] अर्थात विमोडाचा भाव मनोत मानून ही निति ठरविली आहे. या मानानें पेद २७ ले. १२५, २१५ची तारीख चुकली आहे. 'वकरुल्लाखान बुडविला. त्यास मराठा सरदार हें म्हणे करिता तर जमिनीवर न मातां'. [खंड ३ ले १३७] 'आम्ही गत वर्षी बुंदलो. कुऱ्यावर मेहनत केली श्रम केला. पैका सर्वला पण खावदानी वूस न केली'. [लि ३३०, ३३२] याचा अर्थ इतकाच की 'फौज बारमाही असावी'. [पेद २१ ले २६] 'अंताजीपंत थोर सरदार. त्यांनी माउवर फौज [पेद २७ ले १२०] तशी आपल्या पदरीं असावी असा गोविंदपंताचा हेतू होता. या दर्शीच खंड १ ले २४४ हें भाऊसाहेबाचें पत्र होय.

परंतु मानीना. येक महिनाभर रोज उठोन जुजे होंत. निदान माघ सुध त्रयोदसीचे दिवसीं तयार होउन मोगल आम्हावर चालोन आला. जुजही उतम जालें. मोगलाकडील अडीचसें तीनसे माणूस ठार पडले आणि जखमी बहुत जालें. रा। गंगाधर बाजीराव रा। मानाजी पायेगुडे यांजकडीलही घोडीं पडलीं. माणसें पडलीं. जखमीही बहुत जाले. आम्हांकडील घोडीं पडली परंतु रा। गंगाधर बाजीराव यांजकडील लोकानी बहुतच शर्थ केली. ते पत्री लिहितां पुरवत नाही. त्यांचेंच काम आहे. मोगल लुटून फस्त केला. तोफखाना तमाम घेतला. सडे फौजेनसीं पळोन जिवानसीं गेला. सारांश धण्याचे प्रतापेंकरुन नक्ष उतम जाला. प्रस्तुत इकडील बंदोबस्त करीत आहों. तिकडील सांघत वर्तमान लिहावे. दिलीतील फितुरामुळे आम्हांस भारी पडले. कुमेरीसारखे काम जाले. श्रीमंत स्वामीचे कृपेनेंच हे महद कार्य जाले. नक्ष जाला. तीस तोफा वगैरे लुटीत आली. मोगल पळोन शभर स्वारानसी गेला. तुम्हाकडून पत्र दोन महिने न आले याजकरिता चिंता आहे. तर सांघत वर्तमान लिहावे. इकडील बंदोबस्त करीत आहो. मागाहून सांघत वर्तमान लिहून पाठउन. ॥ बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२९३] श्री मोरया

[१३२]

[जनवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी

सेवक गंगाधर येशवंत [चंद्रचूड] सां। विनंती उपर. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित आसावे विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्र येउन वृतात कळू येत नाहीं तर निरंतर पत्र पाठउन संतोषवृधी करावी. यानंतरे गंगास्नानास श्रीमंत [राघोबा]सा। आम्ही आलो. रोहिलियाची मामलत जाली. वसूल आला त्याची वाटणी होउन राजश्री आपासाहेबाचे वाटणीचा येवज श्रीमंतास विनंती करून आपल्याकडे घेउन दिलीहून हुंडी बाळाजी सामराज यांजवर करुन पाठविली आहे. प्रविष्ट जालियाचे उतर पाठवावे. वरकड वृत प्रस्तुत यमुनातिरास येउन मुकाम ग्वालेरीच्या कामाकरिता आहे. सत्वरच श्रीमंताचे कूच करून तिकडे येत असो. राजश्री सुबेदार सामरच्यां सुमारे आले आहेंत. कागदपत्र येतजात आसतील. आपण प्रसंगी आहेत उतम ते करतील. आह्मी सत्वर राजश्री सुबेदारापासी येत आसो. ॥ लोभाची वृधी करावी हे विनंती.

---

लेखांक [२९४] श्री * संवत १८११ माघ वद्य ५
[१ फरवरी १७५५]

श्रीमंत राजेश्री रामाजीपंतभाउ स्वामीचें सेवेसी.

विनंती पोष्य बापुजी बलाल [फडके] सां नमस्कार विनंती. येथील कुशल तां छ * १९ राखर मुा कृष्णातीर को यैनापुर येथास्थित असें विशेष. कर्णाटकाचें स्वारीस श्रीमंत राजेश्री महादोबाबाबा [पुरंदरे] गेले. आम्हाकडील बरोबर राजश्री नारोपंत पालंदे आणीख दोनतीन कारकून गेले. नारोपंतास आफ्तागीर दिल्हे. फौज मातबर गेली. पंचवीस हजार फौज चागली निवडक गेली. खासा स्वारीबां फौज अंताजी माणकेश्वर व पांडबा संमसेरबहादर ही मातबर वरकड लाहानमोठी पथकें दाहा हजार फौज राहिली. श्रीमंत कृष्णातिरी प्रस्तुत आहेत. मोगल यादगिरीवर आहे. तो कोणीकडे जातो हे पाहून मग जिकडे जाणें तिकडे जातील. श्री त्रिंबकेश्वरचे यात्रेस जावें येसा विचार आहे. आपणां कलावें म्हणून लिा असें. आम्हीं आपलें आहों. कृपा निरंतर असो दावी हे विनंती.

राजेश्री लक्षमणपंतदाजी[१६५] [वैद्य] स्वामीस सा नमस्कार.

---

लेखांक [२९५] श्री * संवत १८११ फाल्गुन शुद्ध ६
[१७ फरवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
गणेशपंतदादा [पेंडसे] स्वामीचे शेवेसी.

विनंती पोष बापुजी बलाल [फडके] कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान तां छ * ५ जमांदिलोवल मुकाम नजीक सांगोले. स्वामीचे कृपेंकरुन यथास्थित असें विशेष. आपणं पत्र छ १० रावल दिलीच्या मुकामचे पत्र पाठविले ते पावले. गढमुक्तेश्वरास गंगास्नानास जातो म्हणोन लिहिलें तें सविस्तर कललें. इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजेश्री माहादोबाबावाची रवांनगी कर्णाटक प्रांती जाली. माघ शुद्ध येकादशीस मुहुर्तें करुन कृष्णातिरीहून यैनापुरच्या मुकामीहून गेले. समागमें फौज वीस

---

(१६५) दाभोलकर वैद्य फडके व भानु या घराण्यात परस्परे गोतवळा होता वैद्याची मुलगी दाभोलकरास. फडक्याची वैद्यास व भानूची फडक्यास दिली होती असे सागतात परतु हे नाते पत्री क्वचितच अढळते. फडक्याचे नाते वैद्याशी काय असावे हे या पत्रामुळे मात्र स्पष्ट होऊ पहाते. [ ले. ३३९ ] इतराचें कळेल तेव्हा खरे. परस्परे अगत्य होते हे उघड होय

पंचवीस हजार दिल्ही. मातबर पथकें बाबाचे [पुरंदरे] पथक व विसाजी बीनी त्रिंबकराव सिवदेव [विंचुरकर] व त्रिंबकराव तुकदेंव जाचक करोल वाडीकर गौळी बोधे थोरात गोपाळराव गोविंद [पटवर्धन] रास्ते वगैरे नारायणरावतात्या कदम मुजफरखांन व तोफखांना वगैरें लाहानमोठी पथकें व सरलसकर व फतेसिंगबाबाचें लोक माहादाजी नाा निंबाळकर आदी करुन फौज देउन रवानगी केली. बराबर कारभारी रामाजी माणकेश्वर व त्रिंबक विनायेक दिल्हे. मुदसंदीं रामजीबावा चिटणीस अमृतराव शंकर [दिनकरराव] महिपतराउ पोतनीस मजमदा[रा]चा कारकून नरसिंगराव पागा माधवराव तोफखाना गेले. आम्हाकडील राजश्री नारोपंतनाना व निळोपंत व उभयना आगासे बंधु ऐसी गेले. नारोपंतास अफ्तागीर दिल्हे. याप्रो रवानगी जाली. श्रीमंत [महादोबा]बाबा गोकाकेस जाउन दोन दिवस मोर्चे लाविलें. सेदोनसे माणूस जखमी जाले. पंनासपाउणसे माणूस ठार जालें. खावदाचे प्रतापें ठाणे घेतले. ठाणे फार चांगलें होते परतु घेतले. पंनासपाउन लक्षाचा मुलुख आहे. सावनूरकर मोगल याचे ठाणे घेतलें. ते [नारायणराव] तात्या घोरपडे याचे हवाली केले. तेथून कूच करुन पातशापुरचे घारीनें पलीकडे कितुरकराचे मुलकात गेलें. तेथील खंडणी पनास हजार केली. पुढे सावनूरकराकडे जावे हा विचार आहे. श्रीमंताची आज्ञा आहे कीं सावनूरचा मोगल गेला त्याचा लेक पटास बैसला आहे त्यास निमे मुलुक वाटून घ्यावा. ऐसी खावदाची आज्ञा आहे परंतु त्याचे विचारे जसा मनसबा होईल तसा करितील. येथील कामकाज उरकून बिदरार हरपनहली वगैरे संस्थानें गुदस्तांप्रो खंडावी येसी आज्ञा आहे. श्रीरंगपटणपर्यंत जावत नाहीं. वकील त्यांजकडे पाठविले आहेत. स्नेहाचे रीतीने जें होईल ते बरें. मोगल यादगिरीवर आहे. फौज सर्व त्याची जमा जाली. जानबा [निंबाळकर] चंद्रसेन [जाधव] हनमतराउ [निंबाळकर] वगैरे मराठे मोगल जमा जाले. त्याचा मनोदये होता कीं आपली सर्व फौज जमा करुन मुरारजी घोरपडे व पठान पालेगर सर्व मेळउंन श्रीमंतासी गाठ घालावीं ऐसा विचार होता. त्यास मूसा बुसी समागमे होता. त्याचे खावदाचे पत्र आलें त्यावरुन तो गेला. दुसरा फिरंगी सरदार आला आहे. मुरारजी येत नाहीं. पठाण तसेच याप्रो मनसबा जालियावर त्याची उमेद सहजच राहिली. मोगलाचा दुसरा विचार श्रीरंगपटणास जावे येसा होता तो राहिला. प्रस्तुत यादिगिरीवर आहे. त्याजमध्यें विशेष बळ आहे ऐसे नाहीं. पुढे कोणीकडे जाईल ते पाहावें. श्रीमंताचा मुकाम यैनापुरावर होता त्यास बावा [पुरंदरे] कर्णाटकात गेले आपण उगेच काये निमित्य बसावें मोगलाचा काही शह नाहीं हे जाणून कूच करुन गंगास्नानास जावे हे विचार करुन सांगोलेपर्यंत आले. पुढें येकादो रोजी नरसीपुरास जाउन तेथून सिर्णेच्या

पाण्याने नगरावरुन नासिकास जावें ऐसा मनसबा आहे. समागमे फौज समसेरबहादर पांडबा अंताजी माणकेश्वर व आईतवले वगैरे दहाबारा हजार फौज आहे. नासिकास गेलियावर समसेरबहादर यास गुजराथ प्रात रवाना करावे. अंताजी माणकेश्वर हिंदुस्तानात पाठवावें. पांडबास कोंकण प्रांती परशराम क्षेत्रीं रवाना करावें. रामाजी माहादेव साष्टीहून जलमार्गे विजयदुर्गास इंग्रज सामिल करुन जावें. वरुन फौज पांडबा व हशम दिनकर माहादेव त्याजसमागमे देऊन महिमतगडास जावें. तेथून माणकर आपण मिळोन खुसकीने जावें आणि येलगार करावा. कितेक त्याजकडील भेद आले आहेत. हा नवा मनसबा प्रस्तुत सिद्ध जाला आहे. होईल तेव्हा पाहावे. माहादाजीपंत गुरुजी दसर कृष्णातीरपर्यंत होते ते माघारे गेले. राजेश्री माहादाजीपंततात्या यास श्रीमंत राजेश्री रावस्वामीनी पुण्यास रवाना केले. निमित्य आपल्या दिवाणखान्यापुढे गली आहे. पुढे गपचुपाचे घर मेरालपंताचें आहे. त्यास भिंत त्याची आहे ती पाडून नवी मातबर भिंत बांधून दिवाणखान्यावरुन वरच्या तुल्या टाकून खाली गली राखोन वरती बाग करावी. दीवाणखान्यांतून तमासा पाहावा हा विचार करुन आठपंधरा दिवस पाठविले आहे. प्रस्तुत लष्करांत मी व गोविंदपंत नारखानी व माहादाजीपंत जोसी व लक्षुमण सिवपा ऐसे आहो व राजश्री बाळाजी कृष्ण आठवलें विसाजीपंतदादाचे आहेत. श्रीमंत राजश्री [जनार्दन]बाबा नासिकास गंगास्नानास गेले. पुण्यांत कारभारी प्रस्तुत विसाजीपंतदादा [आठवले] आहेत. बाबा [भानु] लवकर येतील. राजेश्री त्रिंबकरावमामा [पेठे] नासिकासच आहेत. तेही लौकरच येतील. सातारियापासून अनुसंधाने येत आहेत. प्रमाण नाहीं. आपणांस कळावे म्हणोन लिहिलें असे. आपण देशास येतात म्हणोन आइकतो परंतु आपण लिहिलें नव्हते तरी लिहावें. भेटीचा हेत फार लागला आहे तो श्री जाणे. भेटी होईल तों सुदिन. मजवर माया पहिल्या प्रो करावी. सर्व प्रकारे आपण वडील आहेत. बहुत काये लिहिले कृपा केली पाहिजे हे विनंती.

राजश्री माहादाजीपंत राजश्री बाबुरावजी व राजश्री मल्हारपंत स्वामी सां नमस्कार. स्नेह करीत जावा भेटीचा हेत आहे हे विनंती.

पो छ ८ जाखर<br>
मुा नजीक रुपनगर सात कोस<br>
[२२ मार्च १७५५]

---

लेखांक [२९६] श्री मोरयां * संवत १८११ फाल्गुन वद्य १
[२७ फरवरी १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाऊ स्वामीचे सेवेसी.

सेवेसी गंगाधर येशवंत [चंद्रचूड] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणउन स्वकीये कुशल लिहित असावे विशेष. श्रीमंतासमागमे सामरछग मुकामपावेतो आलों. श्रीपुष्करस्नानास श्रीमंत [राघोबा] येणार. आपणास पत्र लिहिले आहे. ध्यानास आणून उचित ते करावे सर्व येकरुप[१६६] जालिया उतम आहे. पुष्करास

(१६६) कुंभेरीवर तेढ पडून शिंदेहोलकराचे जुग विस्कटले आणि राघोबाशी प्रसंग पडल्यामुळें नित्य नवी प्रचीति येऊं लागली तेव्हा कोठें होलकराशाही मुत्सद्याचे डोळ्यात अंजन पडून स्नेहाची स्मृति होऊं लागली [लि २९३] हे पत्र त्याची साक्ष पटविते जाटाविषयी आगळीकाचा बोभाट वोकाळला तितका दोष सोवल्याचा नव्हता असे निदान कारभारियास तरी वाटू लागले. 'जयापाच्या चितात मनसवे आहेत त्याप्रो मल्हारबानी आईकोन विल्हे लावावे' या उक्तीवरून तेढ पडली ती केवल जाटा-मुळे असे मात्र म्हणता येणार नाही [लि २९८] 'हिंदुस्थान प्राते जातो. राणाजीकडील पटा घ्यावा. निमे मुलुक झरकोण घ्यावें म्हणोन आज्ञा तर दोही गोष्टीचे अगाद काय आहे कोणाच्या आश्रियाने राहिले आहेत हे आपण जाणतच आहेत उभयताचे पारिपत्य चितापासून करणेच आहे तर आज्ञा करावी. दादासाहेबास उचित मनसवा दिसेल ते लिहित जाणे म्हणोन आज्ञा तर हिंदुस्थानात गेल्यावर असा मनसवा मळेल तैसा त्यास लेहून पाठउ आपण त्यास लेहून पाठवावें की तुम्हास विनती पाठ-वितील ते कार्य चितावर वरून करणे म्हणजे सर्वही गोष्टी होउन येतील' हे भविष्य राघोबाची स्वारी होण्यापूर्वीचे होय. [पेद २ ले ३४] 'स्वजनविरोधाचे मूल आजपासूनच लागले आहे राघो लक्ष्मण मल्हार याचे सूत्रे गंगोबानी पाठविले साराश पहाता जयापाचे पेचाचा मजकूर आहे आम्हास येथून नेउन त्यास दबवावे आपली मातबरी हिंदुस्थानात आहेच आमची भेट जाली येकत्र जालो म्हणजे खावंद हातास आला सर्व गुंता उरकला. पुढे चितास मानेल तो मनसवा केला तरी कार्यास येईल. जयापास दुरा-भिमान रामसिंगाचा आहे. तरी जसी स्वामीची मर्जी असेल तसे शेवटास न्यावे लागेल मल्हारबा येतीलसे दिसते परतु जयापाची मर्जी कलत नाही. मोगलासी तो कलह होईलसे वाटते व हे मदतीस यत नाही [खड १ ले २] उत्तरेस प्रयाण राघोबाचे झाले त्या वेळची भूमिका अशी होती 'दत्ताजी सिंदे याजवल दाहा हजार फौज होती परतु ते न आले. जयापाची वाट पाहात राहिले. आम्ही फजित पडावे या आशयाने दतवा राहिले नाही परतु मूलपण जाले असो रामसिगाविसी सिंद्याकडील भोइटे आणून खातरजमा केली की हे काम खामखा करु तथापि ते न आले. याजमुळे मल्हारबा अमलसे सटे आहेत'. [पेद २ ले. ३५] 'राजे माधोसिंग याजकडील जावसाल कनहीराम याचे हातून करवीत जावा. हरगोविंद याजला जावसालात न आणावे. तो लवाड बोलण्याचा विश्वास नाही'. [खड ६ ले. ५६२] राघोबासह होलकराचे राजकीय धोरण पाहून 'पत्रे पावतील त्या मुकामी श्रीमताचा मुकाम करवावे कितेक मजकूर कागदोपत्री लिहिता येत नाही. भेट जाल्यावर सागिला जाईल'

जावे व आपण स्वदस्तूरे आपणांस पत्र लि॥ आहे. त्यास हा मजकूर आपणांस कळावा म्हणोन लि॥ आहे. गंगोबातात्याही समीप होते. दुसरा मजकूर होलीचे दिवसी दौलतराव यांचा व विसाजीपंत लेले यांचा व रामचंद्र गणेश [कानडे] वगैरे ब्राम्हण याचा कजिया[१६७] होलीवर जाला. त्याचा विस्तार लांबच आहे परंतु तूर्त श्रीमंतानी विसाजी पंतावर इतराजी केली. तोफखान्यास दारोगे त्रिंबक खंडेराव केले काल छ १६ जाखरी त्रिंबक खंडेराव यास वस्रें दिली. पागेवरही दुसरा ठेवणार. येसे वर्तमान आहे. घडेल तें पाहावें.॥ कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

लेखांक [२९८] ॥श्री * संवत १८११ चैत्र शुद्ध १

[१३ मार्च १७५५]

[पहिला बंद महाळ]

विनंती ✽ * २९ जाखल वर्षप्रतीपदापावेतो सुखरुप असो विशेष. येथील वर्तमान तर रामराव आल्यावर गोविंद कृष्ण [क्षीरसागर] देखील येकत्र श्रीमंतसहवर्तमान बसोन खलबत जाले. त्यातील सारांष अर्थ कीं श्रीमतानी [राघोबा] येथे राहावे. धणी आहेत. मारवाडचा कारभार विल्हेस लावावा मल्हारबास न आणावें. त्याचा पाये यांत नसावा. तो आणावयाचे चितात असिले तर श्रीमंतानीही जावे. आमचे आम्हीं विल्हेस लाऊ. याप्रो रामराव याणी विनंती केली. त्यावर गंगोबातात्यास श्रीमंतानी बोलाउन खलबत केले. ते जाल्यावर सारेच येकत्र होउन विचार केला की श्रीमंतानी रूपनगरास लागावे. गंगोबातात्यानी मल्हारबाकडे जाउन मल्हारबास आणावें. जयापाचे चितात मनसबे आहेत त्याप्रो मल्हारबानी आईकोन विल्हेस लावावे. मग साऱ्यानी येकत्र होउन देशास जावे. याप्रो ठहरोन गंगोबातात्या आज प्रातःकाली सुभेदाराकडे निघोन गेले. जाबस्वाल

---

(१६७) हे होली प्रकरण अगदी नवीन आहे या कथेचा 'विस्तार लांबच आहे' तो समजला असता तर बरें होते. कारण पुढे या पुस्तकाचा 'सरंजाम दूर करून घरी रहाण्यापर्यंत इतराजी झाल्याचे पत्र या भागात येते तो प्रसंग १७६९तील असून त्या वेळी कानडे व 'बिसाजी कृष्ण यानी आपापल्यात कजिया केला परतु त्याच्या दैवेकरून येथास्थित होउन त्याची रवानगी जाहाली' [पेद २० ले २७८] उत्तरेकडील स्वारीत हेच कौतुक पहावयास मिळाले तर त्याचे नवल नाही. अंताजी माणकेश्वर, विठ्ठल शिवदेव, हिंगणेबंधु, नारो शंकर, महादाजी काकडे व गोविंद बल्लाल याचे संबंध परस्पर पाहिले म्हणजे कुरघोडीची चाड केवल सोवळ्यासच होती असे म्हणता येईल काय आणि या आक्षेपास नानासाहेब भाऊसाहेब राघोबा व माधवराव भट हे तरी अपवाद ठरतील काय याची चिकित्सा वाचकच करतील.

लेखांक [२९७] ॱश्री * संवत १८११ फाल्गुन वद्य ३

[१ मार्च १७५५]

विनंती छ * १७ जावल शनवार मुा सावर सुखरुप असों विशेष. काल पत्रे राजश्री भवानी शंकर यांच्या माणसाबरावर पाठविली आहेत ती पावोन सविस्तर कलेल. आज प्रात:काली कूच होउन सवतेदेवर मुकाम सात कोसावर होईल. आदितवारी मधे मुकाम होईल. सोमवारी पुष्करास दाखल होतीलसे आहे. येथील मजकूर तर श्रीमंत [राघोबा] तुम्हावर कृपावंत जाले. मो रोबा चिटणीस यांस पुसले की रामाजी पंतास कागद कसा लिहित असता. मोरोबानी सांगितले की अखंडित लिहितो त्यावरुन आज्ञा केली की याउपरी राजश्रियाविराजीत नमस्कार उपरी येसे लिहित

---

पाठउ. यंदाचे स्वारीस हाच मोठा लाभ की यजमानास आरोग्य जाले'. [ले. २०६] 'जाटाचा मार तरी प्रथमच दिवस असे. आपासाहेब श्रीमंताच्या विचारे येथून उठत्री हरयेक मते सेउगावदेउगाव करुन उठावे. पुढे जागा नेमावी अगर हरयेक मनसबा करावा या विचारे रुपराम जाटाचा वकील त्यास कुंभेरीतून बोलाविला आहे भाजगड काली बरुन करीत असे' [ले. १४९]

वरील पत्राचा निष्कर्ष पाहून त्याची तुलना बखरीशी करू जातां वस्तुस्थितीचे दिग्दर्शन होते. त्यात मधाचे बोट कितपत होते हे सांगवत नाही. एवढे खास की नजर नजराणा किंवा दरबारखर्च या नावाने असत्य प्राप्तीचा राजरोस मार्ग मोकळा होता [पेद २७ ले. १०४, १०८] त्यास शिंदे अपवाद नसतील परतु ते आद्य कारण होते की काय हेच पहावयाचे आहे. ८० लक्षाची खंडणी करणाऱ्या राघोबास व्यक्तिश: २ लक्षाची प्राप्ती झाली, त्या मानाने ४० लक्षामागे शिंद्यास काय लाभले असेल याचे अनुमान होऊं शकते आणि तें आमिष किंवा राजकीय धोरण मुख्य कारण झाले हे सहज लक्षांत येईल. बखरीची भाषा विपरीत नसली तरी संदिग्ध व चमत्कारिक आहे आणि तीही हेतुपुरस्सर होय. मुख्य कारणाची वाच्यता करण्यास इष्ट नव्हती. अर्थात 'दिली काबिज जाली' म्हणून अभिमान वाटणाऱ्या भागास त्याने फांटा दिला आणि ज्या सोबत्याच्या बलावर मराठाधर्माची अपेक्षा अवलंबून होती ती कुंभेरीवर तेढ विकोपास गेल्यामुळे कशी निष्फल झाली हेच प्रामुख्यानें दाखविले आहे त्याचे हें कथन मिथ्या म्हणवत नाही विकोपाचे हे बाह्यांग असून अंतरंग वेगळेच होते. तें विशद करून दर्शविले नसलें तरी सर्वस्वी लपविले नाही. विकोपाचे बीज संक्षेपांत आरंभीच पहिल्या वाक्यात त्याने दिले आहे ते मननीय होय 'सत्पुरुषाच्या आसिर्वादे विजेच्या पदाप्रमाणे चढते कळें राज्य करीत असतां ग्रहकलह लागण्यास मुख्य कारण जाहाले की दादासाहेब प्रथम स्वारी हिंदुस्थानचे मोहिमेस पाठविले'. ही समस्या बखरीची आजवर नीट उमगत नव्हती ती आता या पत्रामुळें उत्कृष्ट उमटते. मात्र या राजकीय धोरणाचे रहस्य दाखविणारी पत्रें अद्याप उपलब्ध व्हावयाचीच आहेत. 'आम्ही दिलीच्या कामात नाही दिलीचे जे बरे अगर वाईट ते सर्व श्रीमंताकडे व सुभेदाराकडे आहे' या उदासीनतेचा [खंड १ ले. ३९] आणि 'क्षेमेच्या थोरवीचा' उमज पडेल तेव्हां खरे. [ले २९८] तात्पर्य की उत्तरेस हीन पायंडा कोणी किती घातला याची चिकित्सा करून न्यायनिष्ठुरतेने जो निवाडा गोतामुखे इतिहासांत लागेल तो खरा.

कीं जयापानी आम्हास लिा आहे की तुम्हीं जिकडे जाणे तिकडे जावे. आमच्या मनसब्व्यांत चित न घालावे. ऐसे असता तुम्हीं अटकोन कां राहिला येसे फारच रागे भरोन लिा आहे त्यावरुन आज मोर्चे रुपनगरास लावणार होते ते राहिले. याउपरी रामराव [ व ] गोविंदपंत [क्षीरसागर] सला देतील त्याप्रो होईल. बिजेभारती [गोसावी] यास श्रीमंतानी काल मेजवानी केली. बिजेभारती याकडे गोविदपंत रामराव जात असतात. बोलत असतात. याप्रो वर्तमान आहे. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे लोम असो दीजे हे विनंती.

पत्र फाडून टाकावें

---

लेखांक [३००] श्री संवत * १८१२ चैत्र वद्य ९

[५ अप्रल १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पोष्य गणेश कृष्ण [पेंडसे] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ * २५ जाखर मुा कसबे खातवली प्रा सोपार सुखरुप असो विशेष. हाली आपणाकडून पत्र येहून कुशलार्थ कळत नाहीं. तरी सदैव पत्र पाठउन संतोषवीत असावें. इकडील वर्तमान तरी श्रीमंत मजलदरमजल ग्वाल्हेरीचे रोखे चालिले आहेत. वरकड वर्तमान राजश्री यादवराव यानी लिहिले आहे त्यावरुन सविस्तर कळेल. ।' बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री रामरावजी व चिंतोपंत [वळे] स्वामीस साा नमस्कार. राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] व बाबुरावजी [लिमये] साा नमस्कार. सर्वांस नमस्कार सांगणे हे विनती.

---

लेखांक [३०१] श्री * संवत १८१२ वैशाख वद्य २

[२९ अप्रेल १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेशी.

पो गणेश कृष्ण [पेंडसे] साा नमस्कार विनंती येथील कुशल ता छ * १६ रजबु मुा क्तो पोहरी प्रा नरवर सुखरुप असो विशेष. पोहरी [स] मोर्चे लाविले आहेत. हे कार्य विल्हेस लागल्यावर ग्वाल्हेरीचे कार्य आहे. ते जालियावर खेचीस शह देउन कार्य होईल ते करु. पुढे देशास जाणार. याप्रो वर्तमान आहे. राजश्री [जयाजी] आपा

येई तो पंचगावीस रोज लागतील. रामाजी पवारही तिकडून येईल. तो वीस रोज लागतील. याप्रो वर्तमान आहे. रूपनगरास मोर्चे उदईक लावणार असे आहे. घडेल ते प्रमाण. चारा मिळत नाही. माहागाई. रूपनगराही जेर होते ऐसे नाही. का म्हणाल तर येथे फौज आहे ती कळतच आहे. सारी फौज जिकडेतिकडे गेली आहे. येथे दोनचार हजाराचा कारभार. कागदीपत्र × × × [दोन ओळी गाहाळ] ही रामरावजी × × × होते माउसाहेबच येत होते परंतु त्याचे शरीरी समाधान नाहीं मग मजला म्हणाले की रामर [उ] तूव जाउन येवढे कार्य करुन येणे त्यावरुन आले. आम्हीं जावयाल केला की शरीर आहे उपाये काये. तुम्हीं आलां हेच रामाजीपंत आहेत ऐसा शिष्टईच्या गोष्टी जाल्या. श्रीमंताचेही चितांत आले की शूद्र [१६८]माजला. बरे चिंता काय आहे. एसे बोलिले परंतु येथीलही अविवेकीच कारभार आहे परंतु धनी आहेत. सर्व वर्तमान निवेदन केले. तुम्हांसही स्वदस्तुरे पत्र लिहून दिले आहे त्यावरुन कलेल. भिरीगाव रामराव यास पूर्वी तुम्ही मोगलाई करून घेतला होता तो श्रीमंतानी हुमणाबादेस करार करुन दिला नव्हता हाली गंगोबातातात्यापासून श्रीमंताजवळ रदबदल करुन श्रीमंताचे दसकत करुन घेतला. सनदपत्र करुन घ्यावयास आम्हाजवळ आणिला नाही परंतु वर्तमान आम्हांस गंगोबा तात्यानी सांगितले. लक्षमण शंकर याजकडील मामला पो सिरोज अहिरवाडा त्यांजकडे ठेउन वरकड देखील अनरवेद येथील मामलत कमाविसीने हरी विठल यांजकडे सांगितली. सरकारचे कारकून माहालोमाहाली आले. हरीपंतही काल्पीस पोहचले असतील. खरगोणचे मुक्कामची पत्रे हरीपंताची [फडके] आली. श्रीमंत कृष्णातिरी ऐनापुराकडे दाखल जाले. याप्रो वर्तमान आहे पुढे होईल ती लेहून पाठउ. बहुत × × क्षमा थोर आहे. × × क्षमेने × × [अपूर्ण]

---

लेखांक [२९०] श्री * संवत १८१२ चैत्र शुद्ध ३

[१६ मार्च १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतमाउ स्वामीचे सेवेसी.

पो गणेश कृष्ण [पेंडसे] सा नमस्कार विनंती. छा * २ जाखरपावेतो सुखरुप असो विशेष. राजश्री सखारामपताकडील पत्रें श्रीमंतास रागे मरोन आली आहेत

(१६८) शूद्र म्हणजे कोण. शिंदे की होळकर. महाराष्ट्रमय किंवा भटशाही करणाऱ्या मराठीची ही भाषा मननीय होय.

लेखांक [२०३]

श्री * संवत १८१२ वैशाख वद्य १४
[१० मे १७५५]

गंगाश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचे सेवेसीं.

पोष्य जनार्दन बल्लाळ [भानु] सां नमस्कार विनती उपरी. येथील कुशल तां छ * २७ रजब जांणून स्वकीये लिहित जाणे विशेष. तुम्ही मागें येकदोन पत्रें पाठविली ती पावली. आलीकडे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लेहून पाठवणें. प्रस्तुत तेथील विच्यार काय आहे. कोणे प्रकारें [राठोड] जेर केला आहे ,पुढें काय म्हणतो. तुमच्या प्रहस्ताचा आशये [काय] केला [नर] सलामामला करावा किंवा खलच ध्यावें यात कोणता मनसबा करार केला आहे तो लेहुन पाठवणे. तुमचे घरची माणसें सुखरुप आहेत. घरचे पत्र पाठविले आहे त्यावरुन सविस्तर कळेल !' बहुत काये लिहिणे कृपालोभ असों दीजे हे विनंती.

राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] स्वामीस सां नमस्कार. तुम्ही दोंन पत्रें पाठविलीं ती पावली. लिहिलें साद्यंत कळलें. याचप्रमाणे सदैव कुशल वृत लेहून संतोषवीत जाणे. बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती. तुमचे घरची समस्त सुखरूप आहेत. काही चिंता न करणें. हे विनंती.

राजश्री बाबुराव लिमये व रा त्रिंबकपंत दिवेकर यांस सां नमस्कार विनंती उपरी. तुम्हीं पत्र दोंन पाठविलीं ती पावली लिहिलें वृत साद्यंत कळलें. असेच सदैव लेहून संतोषवीत जाणें. तुमचे घरची मनुश्ये समस्त सुखरूप आहेत. काहीं चिंता न करणें. लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२०४]

श्री * संवत १८१२ वैशाख वद्य १४
[१० मे १७५५]

तीर्थस्वरुप राजश्री [रामाजी]भाउ वडिलांचे सेवेसी

अपत्येसमान गोपाळराव गणेश [ बर्वे ] सा नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ * २७ रजब मुा पोंहरी नजीक नारवर आपलें कृपेंकरुन सुखरुप जाणोंन स्वकीये लिहित असिले पा विशेष. वडिलीं श्रीक्षेत्रास चैत्रमासी सन इसनेन आम्हास रावना केलें तें समई रा बाबुराव माहदेव घोरपडे वगैरे लोक समागमें दिल्हे. त्याचा मागील दीड वर्षाचा चैत्रपर्यंत हिसेब देउंन पुढें आमचे निस्बतीस हिसेब व लोक लाविले. त्यास मुा कुमेरीच मुकामी श्रीमंत राजश्री दादास्वामीनी हिसेबाचा फरशा केला. त्यासमई आम्ही विनती केली की चैत्रापासून आमचा हिसेब करावा त्यास राजश्री सखारामपंत

साहेबाकडील वर्तमान कळत नाहीं तर कोणी येईल ते समई सविस्तर लिहावे. तिकडील तहरह जाला म्हणोन लौकिक वर्तमान आहे. ते तर सविस्तर लिहावे. मागे आम्ही रुपनगराहून फिरल्यावर कासिदजोडीबराबर पत्रे देउन मुजरद पा होती. ते जोडी फिरोन आली नाहीं. कागद पावले की नाहीं ते कळत नाहीं. तर तोही मजकूर लिहावा. बहुत काय लिा लोभ कीजे हे विनंती.

राजश्री बाबुराव [लिमये] व राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] व गोविंदराव व समस्त मंडलीस सा नमस्कार विनंती उपरी. लोभ कीजे हे विनंती.

वेदमूर्ती राजश्री आपा जोशी स्वामीस सां नमस्कार.

---

लेखांक [३०२] श्री * संवत १८१२ वैशाख वद्य १२
[८ मे १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पों गणेश कृष्ण [पेंडसे] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ * २५ रजबुपावेतो मुा पोहरी यथास्थित असे विशेष. आपणांकडून पत्र येत नाहीं तर येसे न कीजे. सदंव येणारासमागमे पत्र पाठउन संतोषवीत जावे. येथील वर्तमान तर पोहरीस मोर्चे लागले आहेत. हे कार्य जाल्यावर ग्वाल्हेर आहे. रुपराम कटारा ग्वालेरीस आला आहे. पुढे काय होईल ते पाहावे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजेश्री बाबुराव [लिमये] व लक्षमणपंत [वैद्य] व गोविंदरावजी सा नमस्कार.

राजेश्री रामरावजी स्वामीस सां नमस्कार. राजेश्री यादवराव खुशाल आहेत. चिंता न करावी. येथील सविस्तर अर्थ श्रीमतानी लिहांव[ला तो] यादवराव यानी लिा आहे त्यावरुन कलेल. हे विनंती.

राजेश्री चितोपंत [वळे] स्वामीस सां नमस्कार. पत्र येत नाहीं अपूर्व आहे. सविस्तर श्रीमंतानी राजेश्री आपासाहेबास लिा आहे त्यावरुन कलेल. लोभ असो दीजे हे विनंती.

वदेमूर्ती रा आपा जोसी यांस नमस्कार.

---

लेखांक [२०५] श्री * संवत १८१२ अधिक शुद्ध १
[१२ मे १७५५]

चिरजीव राजेश्री रामाजीपंत यासी प्रति विसाजी दादाजी [ आठवले ] आसिर्वाद उपरी. येथील कुशल ता आधिक * शुध प्रतिपदा मुा पुणें जाणून स्वकीय लिहित गेले पाहिजे विशेष. तुमचे पत्र चैत्र सुध त्रयोदसी नोगूचे मुकामीचे आले ते पावोन बहुत समाधान आले व श्रीमत राजेश्री दादासाहेबकडील वर्तमान लिहिले ते कलले. ऐशास यदा तुम्हास मसलत बहुत भारी पडिली. लौकर उलगडा जाला म्हणजे देसास येणे होईल. भेटीनतर सर्व वर्तमान कळो येईल. उभयता श्रीमत पुण्यातच आहेत. राजश्री माहादोबाबा [पुरंदरे] कर्नाटकास गेले आहेत. महिन्याभरा येतील. चिरचीव राजेश्री हरबा [दाभोळकर] श्रीत्र्यंकेस्वरास गेले आहे. तुमची सर्व मनुष्ये सुखरुप आहेत. कलले पाहिजे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे आसिर्वाद.

ॅ अपले बालाने करव्दये जोडून सां नमस्कार विनती. आपली पत्रे हमेश येतात परंतु सांप्रंत आमचे स्मरण येकाही पत्रात होत नाहीं. दूर देसचा कारभार विस्मरण पडिले यांत कांही अपूर्व नाहीं. अम्हीं वडिलांस उदामपणे लिहावेंसे नाहीं परंतु बहुत दिवस आसिर्वाद येउन सांभाळ न जाहाला यास्तव लिहिणे पडिले. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

आपले सिवाजीराम सा नमस्कार विनंती.

ॅ राजेश्री लक्षमणपंत [वैद्य] स्वामीस नमस्कार.

ॅ बाळाजी कृष्ण साष्टांग नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

राजेश्री नागोपंत यांस सा नमस्कार. तुमचे घरची सुखरुप आहेत. राजेश्री लक्षमणपंत ह्या प्रांतीच आहेत ॅ हे विनंती.

राजेश्री लक्षमणपंतदाजी व नागोपंतदाजीस सा नमस्कार. हे विनती.

---

लेखांक [२०६] श्री * संवत १८१२ अ. ज्येष्ठ शुद्ध ५
[१६ मे १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेशी

पोष्य गणेश कृष्ण [ पेंडसे ] सा नमस्कार विनंती. येतील कुशल ता आधिक * जेष्ट सुध पंचमी मुा पोहरी प्रा नरवर सुखरुप असो विशेष. सांप्रत पत्र

बापुनी जाबसाल केला की सिलेदारांचा हिसेब भाद्रपदमासी. नालबंदी अश्विन कार्तिकांत: रोजमरा चैत्राचा हिसेब कोण्ही देत नाहीं. त्याजवर आम्हीं लोकांचें कर्जदार बहुत व स्वामीकार्यही न जाहालें. अड घ्यावी तरी कर्जदाराचा हमेश तगादा याजकरिता त्यांची मर्जी राखोन त्याचे आज्ञेनें हिसेब घेतला परंतु सांगोन ठेविले कीं सामाही हिसेब सरकारांत राहिला आहे. त्याजवर येथून निरोप घेउन पुणियासीं गेलो. श्रीमंत राजश्री नानास्वामीस विनती [केली] की चैत्रपासून साहा महिन्याचा हिसेब सरकारात राहिला आहे. त्याजवर त्याणी आज्ञा केली की चैत्रमासी दिढा वर्षाचा हिसेब मागील देउन पुढें तुम्हांकडे लोक दिल्हे याप्रो तुम्हीं राजश्री [जयाजी]आपांचे पत्र आणवणे म्हणजे तुमचा हिसेब देउं. आम्हीं कुमेरीहून निरोप घेतला. त्या अलीकडील हिसेब असता तरी आपले पत्रांचें प्रयोजन नव्हतें. हुजूरचाकरी केलींच होती. रुपये सरकारातून घेतों. मागील गुंता याजकरिता येथील पत्र पाहिजे. येविसीं पूर्वी आम्ही श्रीमंत राजेश्री आपासाहेबास पत्र लि॥ होते कीं श्रीमंतास पत्र पाठवावें त्यास त्यांचे मर्जीस न आले. हालीही त्यांस पत्र लि॥ आहे. त्याणी पाठविले तरी उत्तम. नाहीं तरी वडिली कृपा करुन आपलेच नावें श्रीमतास पत्र पाठवावे की चैत्रामासी श्रीक्षेत्रास रावना केलें तें समई समागमें लोक दिल्हे त्यांचा मागील दिढा वर्षांचा हिसेब चैत्रमासेतो देउन पुढे याचे निस्वतीस लाविले. याप्रो आपलें पत्र आल्याने आमचें कार्य होते. आपलें दफ्तरी हिसेब व तेनात जाबतेही आहेतच. सदरी गोष्ट लिहावयासीं चिंता काय. पूर्वी येक[१६९] घोड्यानसी आपणाजवळ होतो. सांप्रत आटनवशे राउतांची सरदारी करितों. सर्व प्रताप वडिलांचेच कृपेचा आहे. आपण उपेक्षा केलिया चाळीसपनास हजार रुपये आगावर पडतात. म्हणजे मनुष्यपणांतून उठावे ऐसा विचार होतो याजकरिता आपणांस विनंती लि॥ आहे. तरी अपत्यावर कृपा करुन पत्र अक्षरशाह वाचून कारकुनीचा पर्याय चितात आणून प्रमाणीक कारभार लटका नव्हे. पत्र पाठविल्यास दोष नाहीं ऐसे चित्तात आल्यावर पत्र पाटवावे. लटका कारभार असता तरी आपणांस विनंती कदापि न लिहितों. ॥ कळले पा॥. आपले वचनावर माणुसपणात पडतो. अनमान जाल्यावर उपराटी गोष्ट होते यास्तव येवढी गोष्ट ये समई आली आहे याची बाजी राखावी. ॥ बहुत काय लि॥ कृपा लोभ कीजे हे विनंती.

---

(१६९) या गोपाळराव गणेशाचे आडनाव 'बर्वे' म्हणून पेशवेदप्तराच्या संपादकानें दिलें आहे. स्वत:च्या उत्कर्षाचा उच्चार जो या पत्रात त्याने केला आहे तो विचारणीय आहे. रामाजीपंत दामोलकर शिंदेशाहीत १७५०च्यापूर्वी असावा असें जें अनुमान केले आहे ते यामुळें ग्राह्य वाटते.

१ पालगड.

---

७

याप्रमाणे रामाजी महादेव यांणी महतकार्य केले. पुढे विजयदुर्गास जाणार आहेत. गेले आसतील बाकी राहिले किले घेतील व श्रीमंत राजश्री माहादोबाबावा कर्नाटक प्रांते गेले. त्यांणी पहिले गोकाक घेतले. वरकड कुल सस्थानची खडणी करुन विदनुरास आले. तेथील खंडणी करुन माघारे देशास फिरले आसतील. लौकरच येतील. पुण्याहून पत्रे आली त्यांत्न राजेश्री बापुजीपताचे [फडके] पत्र पा आहे त्यावरुन सविस्तर कलेल. आपल्याकडील सविस्तर लिहावे कणीराम[१७०] आजपर्यंत येथे होते. येवजाच्या हुड्या औरंगाबादेस दिल्या आहेत. काही येवज आला वरकड बाकी येणे. हुडया खऱ्या म्हणोन करार [करून] गेले आहेत. पैका वसूल होईल ते प्रमाण आहे. बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनती.

---

लेखांक [२०७] श्री * संवत १८१२ अ. ज्येष्ठ वद्य ७
[१ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामजीपतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य गणेश कृष्ण [ पेडसे ] सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * २० साबान मुा मौजे सहश्रवे पा नरवर ना ग्वालेर सुखरुप असो विशेष. सांप्रत आपणांकडून पत्र येउन वर्तमान कलत नाहीं. तरी सदैव पत्रद्वारे कुशल वर्तमान लेहून सांभाल केला पाहिजे. येथील वर्तमान तर ग्वालेरची वालेमेल लागली आहे. रुपराम कटारा ग्वालेरीस आहे. त्याचे आहमुदे कितेक आहेत. सेवट निकाल पडेल तो पाहावा. राजश्री अंताजी माणकेस्वर येथे आले. छ १७ रोजी भेटी जाहाल्या. आपणां कलावे म्हणोन लिा असे. ।' बहुत काय लिहिणे लोम असो दीजे हे विनती.

राजेश्री गोविंदराव राजेश्री बाबुराव व लक्षुमणपत सा। नमस्कार. माधवराव व नारायणजी व महादाजी बाजी यास आसिर्वाद सांगावे हे विनती.

---

(१७०) माधवसिंग जयपुरकर याजकडील जाबसाल करणारा कनहीराम तो हाच

येउन कुशल वृत कळत नाहीं. तरी सविस्तर वृत लिहित असावे इकडील वर्तमान पोहरीचे गढीस मोर्चे लाविले आहेत. वीस रोज जाहाले. रोज जखमी व ठार होत आहेत. आद्यापि येकही निकाल नाहीं. पुढे ग्वाल्हेर मातबर कार्य होणे आहे. राजश्री विठल सिवदेव [विंचुरकर] गोहदेस मोर्चेबंदी करुन बसले होते. त्यास सांप्रत गोहदकरियाणीं याजवर घातले. जुजा मातबर जाले. याजकडील चागले लोक पडिले व जखमी जाहाले. त्यास सारे बळ सूरजमल जाटाचे आहे. रुपराम मध्ये खेळ करीत आहेत. जुंज जालियावर जागाजागा मोर्चेबंदी होते. ते माघारे उठोन विठलपंतसुधा सर्वत्र येकत्र हो उन राहिले आहेत. श्रीमंत किल्यास येवत नाहीं. जवळ गेलियाने शहास गुंतावे आणि परिणामही नाहीं. येथून जे होईल ते करणार. ग्वालेरीचे पारपत्य जाहाल्या विना श्रीमंतानी टाळा देउन देशास गेले तर विठलपंत सेवटच्या वाईधावर सिध जाले आहेत. त्याजकडून मीरखान टोंके येथे आले आहेत. सांप्रत काली रुपराम ग्वाल्हेरीस आहे. लंबोधरपंत दिलीहून जाटाकडे पाा आहेत. ते रुपरामाबरो च्यार महिने आहेत. किल्याची बोली लाविली आहे. हस्तगत होईल ते प्रमाण. असे मातबरच पेच आहेत. खेची वगैरे माहाल मवासी त्याजकडे च्यार सालाचा पैका येणे. कमाविसदार गुतले आहेत. त्याचे पारपत्य करुन पैका उगवावयाविसी पुण्याहून वरचेवर पत्रे येतात व करणेही जरुरच आहे. तथापि घडेल ते प्रमाण. राजश्री अंताजी माणकेस्वर यांस हिंदुस्तानांत रवाना केले. ते मार्गी खरगोणापासी यकडईस मोर्चे गुसकुटे याणी लाविले त्याजपासी गुतोन राहिले आहेत. इकडील लिहिल्याप्रमाणे कार्य करुन श्रीमंतास देशास जाणे जरुरच आहे. यामध्ये घडेल योग तो विशेष आहे. देशाचे वर्तमान तरी श्रीमंत स्वारीहून येउन श्रीत्र्यंबकेस्वरची यात्रा करुन वैशाख सुध प्रतिपदेस पुण्यात स्वारी दाखल जाली. पेशजी आगऱ्यावर मोहीम करुन आरमार व फौजा रवाना केल्या आहेत.

रामाजी माहादेव जलमार्गे गेले त्याणी.

१ सुवर्णदुर्ग.

१ कनकदुर्ग.

१ फतेदुर्ग.

१ गोवा

१ मंडणगड.

१ रसाळगड.

रत्नागिरी खडोजी माणकर याणी घेतली म्हणोन वर्तमान आहे. तहकीक नाहीं.

समसेरबहादर व दिनकर महादेव आव्या घाटावर आहेत.

वात्पी होय ते गोष्ट केली पाहिजे विशेष. बहुत दिवावधी अतिक्रम जाली असतां पत्रद्वारा स्वीय कुशल तथा नवीन वृत लेखनेंकरून संतोषाविक्य होय ते गोष्टीस विस्मृत व्हावी हे अपूर्वता स्वामीचे सद्‌गुणी अवलोकिता परम विस्मय जालो. तो अर्थ कोठवर लेखन करावा. बहुत कारभाराची दाटी विशेष तन्मुले स्नेहानुसंधानी विक्षेप ह्मणावा तर स्वामीचे ठाई सर्वावधानी सावधानता असतां हे कल्पनाही केली जात नाहीं. तर याचा काय अर्थ तो विस्तारे लेखन करावा व याउपरी अविस्मृतीपणे स्नेहसूत्राची वृधी होय ते कृपा करावयासी आपण सूज्ञ आहेत. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

॥ राजश्री बाबुराव लिमये व राजश्री लक्ष्मणपंत वैद्य स्वामीस सां नमस्कार विनंती उपरी. लिा परिसोन लोभ करीत जावे. बहुत दिवस कुशलार्थ कळत नाही तरी निरंतर पत्र पाठवीत जावे हे विनंती

राजश्री त्रिंबकपंत दिवेकर साा नमकार. तुमचे पत्र येत नाही तरी हरघडी पत्र पाठवीत जाणे. नारोपंत सुखरूप आहेत हे विनंती

॥ सेवेसी हरी बलाल [फडके] कृतानेक सां नमस्कार· पत्री परामर्ष करावा. कृपा केली पाहिजे हे विनंती

॥ सेवेसी विनंती सेवक रघुनाथ गणेश कोशे सां नमस्कार. कृपालोभ असो यावा हे विज्ञापना. सेवेसी रामाजी नारायण आगासे साा नमस्कार

॥ सेवेसी माहादाजी नारायण कुंटे सां नमस्कार. कृपा केली पाहिजे हे विनंती

सेवेसी नारो अनंत परचुरे साा नमस्कार हे विनंती.

---

लेखांक [३१०] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ३
[१२ जून १७५५]

चिरंजीव राजश्री रामाजीपंत यासी प्रति बिसाजी दादाजी [आठवले] आसिर्वाद उपरी. यथील कुशल ताा जेष्ट * सुध त्रतीया सुाा पुणे सुखरुप असो विशेष. सांप्रत तुमचे पत्र येउन वर्तमान कळत नाहीं याकरितां चित संचित आहें. तेथील मजकूर काये जाहाला. येंदा तुमचे येणे देसीं होईल कीं काये किंवा महिना पंधरा रोज तेथेंच गुता आहें ते तपसीलवार लिहित जाणे. इकडील वर्तमान तरी राजेश्री बावा [पुरंदरे] कर्नाटक प्रांते स्वारी गेले होते ते तिकडील कार्मेकाजे विल्हे लाउन देशास आले. सविस्तर अर्थ श्रीमंतानी लिहिला आहे त्यावरुन कळेल. ॥ प्रस्तुत मुकाम नागोरावरी की

लेखांक [३०८]  श्री  * संवत १८१२ अ. ज्येष्ठ वद्य ८
[२ जून १७५५]

राजश्रियांविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचें सेवेसीं.

पोष्य जनार्दन बल्लाळ [भानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तां छ * २१ साबान जाणून स्वकीये लिहित गेले पाहिजे विशेष. आलीकडे तुम्हाकडील पत्र येहून वर्तमान कळत नाहीं. तरीं वरचेवर सविस्तर वर्तमान लेहून पाठवीत जाणें. ईकडील वर्तमान तरी अधिकोंतर लिहावेसे नाहीं. तुमचे घरची समस्त माणसे सुखरुप आहेंत. ।' कांहीं चिंता न करणें. तुमचे येणे देशास कधी होईल ते लेहून पाठवणे. लोकर भेट होईल तर उतम आहे. राजेश्री त्रिंबकपंत [दिवेकर] तुम्हाजवळ आहे त्याचे घरी खर्चाची अनुपती फार आहे याजकरितां त्यास कांहीं खर्चाची बेगमी करुंन द्यावी. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

मातुश्री आयाचे अर्सिवाद.

राजेश्री बाबुराउ लिमये स्वामीस सा नमस्कार विनंती उपरी. लिा परिसिजे. तुमचे घरची मनुष्ये समस्त सुखरुप आहेत. कांहीं चिंता न करणें. हे विनंती.

राजश्री लक्षमणपंत वैद्य स्वामीस सा नमस्कार विनंती उपरी. लिा परिसीजे. तुमचे घरची मनुष्यें समस्त सुखरुप आहेत. कांही चिंता न करणे.

राजश्री त्रिंबकपंतास नमस्कार तुमचे बंधु व घरची समस्त सुखरुप आहेत. काहीं चिंता न करणें. हे विनंती.

---

लेखांक [३०९]  ।'श्री  संवत १८१२ अ. ज्येष्ठ वद्य ८
[२ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचे शेवेसी.

पो बाळाजी जनार्दन [भानु][१७१] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जेष्ठ * अधिकासित अष्टमी इंदुवासरपर्यंत यथास्तित जाणून स्वीयसुखसंतोष लेखनें संतोषा-

---

(१७१) या पत्राची आणि नाना फडणिसाच्या आत्मचरित्राची भाषा किती जुळते हे सहज लक्षात येईल.

किल्यावरील जकीरा व तोफखाना गेला.

१ नवा चढविला तो सारा द्यावा.
१ जुना आहे तो निमे.

२

किलेदार पातशाई.
१ कदीम गांव ३ तीन चालवावे.
१ राणा भीमसिंग [गोहदकर] यांणें किला घेतला ते समई बारा हजार रुपये करार केले ते चालवावे.

२

सरकारचे अमलापैकी पा खितोली रतनगड वगैरे गाव जमाबदीप्रमाणे पैका घेउन इजाऱ्याने.

२८ निा राजेश्री नारो शंकर.
१२ निा विठलपंत [विंचुरकर]
१२ निा अंताजीपंत [माणकेश्वर]
१२ निा ज्योत्याजी मोरे.

६४ चौसष्ट गांव द्यावे.

किरकोळ कामकाजे कांही आसतील ते सहित्य करुन करुन द्यावे. पुण्यांत घर बांधावयास जागा द्यावी १

येणेप्रमाणें द्यावयाचा करार करुन बेलमंडार [झाला] की सरकारचा अमल आहे तो चालवावे. याप्रमाणे रुपराम बोलोन बाा येथून सखोजी जगथाप सासवडकर व लंबोधर धुंडिराज व राजेश्री गोपाळराव गणेश यांचें स्वार देउन पो आहेत. तेथे जाउन किल्यावर निशाण चढउन द्यावे. आपले लोक वर चढिले म्हणजे येथे वर्तमान आलियाउपर कूच करुन दरमजल देशास जावे. याप्रमाणे केले आहे परंतु घडेल ते प्रमाण. किला गोपाळराव गणेश याचे स्वाधीन केला आहे. लक्ष्मण दिगांबर यास तूर्त किल्यावर ठेवावे. राजेश्री विठल सिवदेव [विंचुरकर] यांणी निशान चढले म्हणजे फौजसुधा देशास यावे. तेथे राह्यावयाचा काही गुंता ठेविला नाहीं. अंताजी माणकेस्वर याजकडेही तेथील गुंता नाहीं तूर्त येथे स्वारीबो आहेत. देशास कूच जाले म्हणजे अंताजीपंताची नेमणूक राजश्री गोविंद बलाल [बुंदेले] याचे निस्बतीस होणार आहे. राजश्री मल्हारबा येथे बोच आहेत. तूर्त उतम प्रकार सौरस्यांतच आहे. ग्वालेरचे कामकाज त्याध्याच विचारे विल्हे लांविले आहे. येथील वर्तमान तर राजश्री सखारामपंतबापु [वोकील] याचा पुतण्या निलोबा बरोबर होता त्यास नवज्वर येउन आधिक वद्य चतुर्दसीस देवद्वा

तेथून कूच जाले ते ते साकल्य लिहिले पाहिजे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे असिर्वाद. तुमचे घरची सर्व सुखरुप आहे हे असिर्वाद.

राजश्री लक्षुमणपंत [ वैद्य ] स्वामी सा। नमस्कार. लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३११] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ३

[१२ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामरावजी स्वामीचे शेवेसी.

पोष्य गणेश कृष्ण [पेंडसे] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १ रमजान जाणोन स्वकीये लेखन केले पाहिजे विशेष. सांप्रत पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तरी सदैव लेहून पत्रद्वारे परामर्ष करीत जावा. राजश्री यादवरावजी सुखरुप आहेत. यादवराव यास बरे वाटत नव्हते परंतु प्रस्तुत खुशाल आहेत. राजश्री सखारामपतबापु [ वोकील ]बरोबर पुढे गेले. कळले पाहिजे. तुमचा लाखोटा पा। आहे त्यावरुन कलेल. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३१२] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ४

[१३ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेशी.

पोष्य गणेश कृष्ण [पेंडसे] सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * २ रमजान मु॥ मोजे सहश्रावे पा। नरवर सुखरुप असों विशेष. आपण छ ४ साबानचे येक पत्र व छ १४ साबानचे येक पत्र पाठविले ते दोनी छ २० साबानी पावोन लिहिले वर्तमान सविस्तर कळले. याचप्रमाणे सदैव लिहित असिले पाहिजे. येथील वर्तमान तर याच मुकामी वीस रोज जाहाले. रुपराम कटारा येथे वोलाउन आणिला. ग्वालेरचा करार मदार केला. कुवर बळजीस यावे

| | |
|---|---|
| कदीम मुलुक त्यांचा जप्त केला आहे तो वमंये गढ्या' घेतल्या आहेत त्यासुधा-धांवे. १ | पाउण लक्ष रुपये रोख खर्चास जाटा कडील येवजी देविले येक साल. |

तुम्हीं दूरदेसी गेला आहा आपले शरीराची जतन उतम प्रकारें करीत जाणें. शरीर रक्षिले म्हणजे उतम गोष्टी आहेत. तुम्हांस विस्तारेकडून लिहावें ऐसे नाहीं परंतु सुचनार्थ मात्र लिहिलें असे. राजश्री बाबुराउ लिमये कोठे आहेत. काय वर्तमान उद्योग काय सांगितला आहे ते लेहून पाठवणे. बहुत काये लिहिणें कृपालोभ असों दीजे हे विनती.

राजश्री त्रिंबकपंतास [दिवेकर] नमस्कार विनती उपरी. तुमचे बधु व मनुष्ये समस्त सुखरुप आहेत कांहीं चिता न करणे तुम्हीं राजश्री रामाजीपंत यांचे आज्ञेत राहून वर्तणूक करीत जाणे हे वि ंती

---

लेखांक [३१४] श्री * संवत १८१२ आषाढ वद्य ४
[२७ जून १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पो गोविंद बलाल [बुंदेले] सा नमस्कार विनती उपरी येथील कुशल तां आषाढ वद्य ४ जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. प्रस्तुत आपणांकडून पत्र येउन वर्तमान कलत नाहीं. तरी सविस्तर लिहिले पाहिजे विशेष. आम्हाकडील वर्तमान तर पुरवणीत लिहिले आहे त्याजवरुन अवगत होईल. श्रीमंत रा दादा स्वामी व रा मल्हारजीबाबा सुमेदार देशास गेले. आम्हासही बोलावणे आले आणि पाच साले जाली सरकारी हिसेब फडशा करणे आम्हासही जाणे. तुमचा मार्ग पहात होतो. त्यास तुम्हीही सत्वरच याल. निकाल जाला तिकडील तर तुमचे येणे होईल. नाहीं तर चार महिने राहाणे लागेल. वर्तमान सविस्तर लिहिले पाहिजे. आम्हीं येवज सरकारी भरिला. शहरी व उजेनीस त्याचा तपसील रा आपासाहेबाचे पत्री लिहिला आहे त्याजवरुन अवगत होईल. आम्हीं सत्वरच देशास जाउन. वरचेवर वर्तमान लिहित जावे. आम्हांकडे तेनाती फौज होती ते देशास गेली. फौज नाहीं. रा अंताजी मानकेस्वर आले आहेत. त्यास पहावे त्याची फौज येते किंवा नाहीं येत. त्यास मागाहून सविस्तर वर्तमान लिहून पाठउन देनो. वरकड वर्तमान पुरवणीत लिहिले आहे त्यावरुन अवगत होईल. रा [जयाजी] आपांस पुरवणी लिहिली आहे [ती] येकती वाचून दाखउ[न] उतर पाठविजे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

जाली. बापुस ताप येत आहे. प्रस्तुत या मुकामी गर्मीचा आतिशये आहे. लस्करचे लोक बहुत दुखण्याने पडिले आहेत. सर्वत्र येकांत्र्याने ताप येतो. मरतातही फारच. यामुळे बापु पांचसे स्वारांनिसी काली छ १ रमजानीं येकु[थू]न निघोन पुढे सिरोज शाहाडोऱ्याचे सुमारे हलुहलु गेले आहेत. ग्वालेरचे पत्र आले ह्मणजे श्रीमंत कूच करुन दरमजल जातील. वरकड खेचींचे पारपत्य करणे होते परंतु तूर्त तो प्रांत राहिला. शाहाडोऱ्याचे पारपत्यास पेशजी दोन हजार फौज पाठविली आहे. तेथील काय होईल ते पहावे. वरकड कामकाजे होतील ते तूर्त सर्व राहिली. देशाकडील वर्तमान तर श्रीमंत पुण्यांत आले. राजेश्री माहादोबाबाबा कर्नाटक प्रांताहून स्वारी बरीच करुन आजपर्यंत मिरजपावेतो आले असतील. त्या प्रांते नक्ष बराच राहिला. आपणांस पत्रे आलीच असतील परंतु आम्हांकडे लिहिले आले ते आपणांस लिा आहे. राजेश्री विष्णुपंताची [गद्रे] भेट जालियावर सविस्तर कलेल ह्मणोन लिा त्यास खेचीस भेट व्हावयाचा करार होता. खेचीचा मजकूर राहिला. कलले पाहिजे. ।' आपण त्याजकडे पत्रे पाा आहेत ती आह्मा कडे येतील तेव्हां सर्व कलेल. आमचे शरीरी समाधान नवते परंतु आता आरोग्य आहे. पुणेयाहून तुमचे घरची पत्रे आली नाहींत. आलियावर पाठउन देउ. तिकडील तह जाल्याचे वर्तमान लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती.

सेवेसी बाबुराउ केशव साा नमस्कार. सदैव संभाल केला पाहिजे. कृपा करावी हे विज्ञापना.

---

लेखांक [३१३] श्री * संवत १८१२ ज्येष्ठ शुद्ध ९

[१८ जून १७५५]

राजश्रियांविराजीत राजमांन्य राजश्री

रामाजीपंत स्वामी चेंसेवेसी.

पो जनार्दन बलाल [भानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ * ७ रमजानपावेतो क्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. तुम्हांकडून बहुत दिवस पत्र येउंन वर्तमान कलत नाही. तरीं येसें केले न पाहिजे. सदेव पत्र पाटउन नवल विशेष वर्तमान वरचेवर लिहित गेलें पाहिजे. आमचें शरीराचें वर्तमान तरी दिवसेंदिवस अधिकोंतरच रोगाचें प्राबल्य आहे. तुम्हास कलावें म्हणोन लिा असें. तुमचें घरची सर्व मनुष्यें सुखरुप आहेत. कांही चिंता न कीजे. ।' आमचे शरीराविसी तुम्हीं चिंता किमपी न कीजे. शरीरभोग आहे तो भोगीतच आहों.

लेखांक [३१६] ॥श्री सवंत १८१२ आषाढ वद्य ४

[२७ जून १७५५]

पुरवणी राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सो

विनंत उपरी वर्तमान येणेप्रो॥

पा॥ मुगावी आम्हीं विकारीदास याजवा॥ बाकी येणें त्याजवा॥ तुम्हीं व तात्यानी सागितले की रुपये उगवणे. त्याजवर आम्हीं फौजेनसी जाउन हवाला येक लाख तीस हजाराचा पेकी ऐसी हजार बाकी राहिली ते आम्हीं ठिकाणी लावली. काही तहसील दाबावारा वसूल जाले तो रा॥ मल्हारजी बाबाकडून फौज व रामाजी पवार वगेरे येउन परगणेयात तीन महिने कजिया केला. राजेयापासून पैका घेउन गेले. आम्हीं काही बोलिलो नाहीं. उलटे आमची फिर्याद कृष्णाजी केशव रामाजी सखाजी रामाजी पवार याणी श्रीमत रा॥ दादा स्वामीजवळ केली. की येक लाख तीस हजार रुपये हे दरसाल सरदार व गंगाधरपंत रामाजीपंत गोविंदपंत खातात. तीन साले जाली. तीनसाला रुपये गोविंदपंतापासून घ्यावे. याप्रमाणे बहुतसी इतराजी आम्हावर केली ते पत्रीं कोठपावेतो लिहावी. आम्हीं तपसील उगउन लिहिला परंतु तो त्याचे चितास न आला. पत्राचे उतर न पा॥. आम्हांस सागोन पा॥ की पुणेयास जातो श्रीमंत रा॥ भाउस्वामीकरवी तुमचे पारपत्य करितो. तीन लाख नवद हजार

पुर्णेयास तुमचा येवज लस्करी घेतला होता तो रा॥ हरीपंत याजवळ रुपये देउन कबज आली. तिची नकल पाठविली आहे. पावेल. रुपये ४७४० सतेतालीसे चाळीसाची

बिठुरचे शब्द लाउन लिहिले. त्यास सोबती माहादुर्जन. काही त्याचे गुण सांगता येत नाहीं. असो. वारवार रड काये लिहावे. भेटीनंतर सांगत बोलोन. आमचे वस्तु होईल त्यास अंतर कसे करुन. वरचेवर लिहित जाउन. १

वरकड स्वकीये आर्थ लिहिला बुंदेले याजकडील त्यास हे राज्य बुडालेसे दिसते. काही जीव राजेयात कारभारियात राहिला नाहीं. मीही येथे फार फसलो आहे. त्यास मीही तुमचे कार्यास अंतर न करी. भेटी नंतर सर्व बोलोन.

रा॥ गंगाधरपंततात्यानी आम्हांसी परम व्दोतार्थ धरिला जे रा॥ आपा व [रामाजी] भाउ याजवर मजा करतात. हे दुख त्याजला फार जाले आहे. पुणेयात जात आहेत. वाल्मेली करावी. कितेक मनसुबेयावर आहेत. पुढे मीही श्रावणमासी पुणेयास जातो. तुमचे कृपेकरुन सर्व उतमच होईल.

लेखांक [३१५] ॥श्री * संवत १८१२ आषाढ वद्य ४

[२७ जून १७५५]

पुो राजश्री [जयाजी] आपासाहेब गोसावी यासी.

विनंती उपरी. मुजफरजग [१७२] गारदी श्रीमंत रा नानास्वामीनी चाकर ठेविला होता त्यास रा महादाजीपंत बावासमागमे गेला होता. त्यास तो रकम. हरामखोरी करुन सावनूरकर पठाण याजकडे जाउन चाकर जाला. वरकड फौज देशास आली. सलाबतजग यास श्रीरंगपटणचे चालीस लाख रुये मिळाले. काहीसी भूक हरली आहे. आर्काट अगर भागानगर येथे छावणी ते करितील. दरबारी कामकाज बारीक होत चालिले आहे. तपसील काये लिहावा. आपण सर्वजाण आहेत. साराष सत्वर दरबारी येणे होईल तर उतम आहे. दुसरा मनसुवा आहे. मनसूरअलीखान याचे पुत्र अमानसिंगासारखे सिरडी जाले. नित्य नागवी तरवार आणि मध्य भक्षून बाहिर निघावे गाढव घोडे उट हती जो मिळाला तो जिवे मारावा. फौज तमाम उठोन गेली. तलब मिळत नाहीं. त्यास अवध व प्रयाग खालीच दाखल आहे. जर हा मनसुवा होईल तर बहुत उतम आहे. मारवाडचे कार्य करुन दरबारी यावे आपणांस येथे काडी इतके जुज न होता दोनी सुभे अनियासे हाती येतात. तमाम मुत्सिये रजवाडे सर्व शामिल होतील. निमित्यास मात्र फौज पाहिजे. हे वर्तमान भेटीनंतर सागोन. मल्हारजीबावाचे ते पुत्र आहेत. आपण जाणताच आहेत. जर आपण मारवाडचे कार्य करुन सत्वर देशास येतात तरी हे दोन सुभे आपले पदरी पडिलेच. याचे वर्तमान मागाहून सावंत आपणास लिहून पाठउन. जागा थोर आहे. बदोबस्त मनसूरअलीखान याचा मोडिला. तिळमात्र राहिला नाहीं. आपण त्याचे बदोबस्तावर जातील तर [तो] तिळमात्र राहिला नाहीं. भेटीनतर सावंत सागोन. हेही कार्य ठीक करुन ठेविले आहे. अम्हास आपणांकरवी हे कार्य करवणे. येथे कजिया पडणार नाहीं. सहजात जागा हस्तगत होईल. आपणांस वरचेवर लिहित जाउन. बहुत काय लिहिणे कृपा करीत जावी हे विनंती.

---

(१७२) पहा ले ३८ टीप १६ हा मुजफरखान गारदी भालकीच्या युद्धानतरच १७५२त पेशव्याकडे आला असे आता सप्रमाण सिद्ध होते [पुरदरे १ ले २९३, ३६७] वरील दोन्ही पत्रें जनवरी १७५३ची असून संपादकास त्याच्या तारखा सापल्या नाहीत. सुखठणकराच्या मृत्युनतर १७५५त महादाजी पुरदरे याने कर्नाटकात स्वारी केली त्यात हा गेला असता तिकडेच शत्रूशी जाऊन भेटला तो पुढील वर्षी 'पुन्हा येउन पदरी पडला त्यास ठेवावा की न ठेवावा हा वुधिवाद' राघोवास विचारला असता त्याचे उत्तर अनिश्चित होते. [पेद २८ ले. १४५]

वावास हगवण बहुत जाहाली. वाचावयाचा पदार्थ नव्हता परंतु देवी उपाये फार केला येणेंप्रा.

१ हती

१ घोडा

१ किरकोली दाणे

१ नवपावेतो तुला रुयेयाची केली

येणेप्रमाणे केली. अद्याप बरे नाहीं. माघारे आले. श्रीरंगपटणात गेले नाहीं. मिरजेवर आले. पुणेयास दाखल होतील. १

मुजफरजंग रुसोन सावनूरकराकडे गेला. मोठी हरामखोरी केली. १

उतावलीने पत्र लिहिले आहे. मागाहून सावंत लिहून पाठउन देतो. आम्हास वरचेवर वर्तमान लिहित जावे. १

गिरीवर महिनाभरे बहिरेंचे देवलात होते. गाव मारुन गर्द जाला. किला सावधान जाला. उठोन आले. आरमार रामाजीपंत [घेउन] सुवर्णदुर्ग येथे आले. समसेरबहादर वगैरे पुणेयांत येतील. किले घेतले त्याची नावे.

१ सुवर्णदुर्ग

१ कनकदुर्ग

१ फतेगड

१ अवचितगड

१ बाणकोट

१ मंडणगड

१ पालगड

---

७

१ खोरपाटणची गढी

---

८ येणेप्रमाणे घेतले आहत.

येणेप्रमाणे वर्तमान आहे ते लिहिले आहे. वरचेवर होत जाईल ते लिहित जाउन. तुम्हीं नवलविशेष वर्तमान लिहित जावे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

आयोध्या प्रयाग खाली पडिली. मनसूअलीखान याचे पुत्र [शुजा] सिरडी जाला. काही जीव नाहीं. त्यास आम्हीं सर्व ठीक केले. येक तुमचे साहित्य पा आपासाहेब दोन महिने फौजसुधा आलियास दोनी सुभे जुज न होता दस्त होतील. या विचारात रा मल्हारजीबाबा आहेत. पुणेयास जाउन हे कार्य आपले स्वाधीन करुन घ्यावे या मनसुबेयात आहेत. जर रा आपासाहेब मारवाडचे कार्य करुन सत्वर पुणेयास येतात तर हे कार्य रा आपाचे हवाली होउन कार्य होय तेच करावे. त्यास याचा विचार काये ते सत्वर लिहिला पाहिजे. या गोष्टीची वाच्यता न होये. रा आपासाहेबास येकाती पुसोन उतर पा. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनती. हे दोनी सुभे खाली आहेत. श्रीमंत आपले खालसे ठेउन तुमचे स्वाधीन करितील. चिंता नाहीं. हे विनंती.

रुपये तुम्हापासून पुणेयात घेउन म्हणून मनात येईल ते बोलोन इतराजी केली. त्याजवर आम्हीं सागोन पा की बरे. बाकी शिकारीदास याची राहिली ते वसूल करावयासी मार्गसीरमासी गेलो. समागमे गंगाधर बाजीराव व भानाजी पाइगुडे होते. परगना चोरुन मी भक्षिला नाहीं बरे. चोर दोनी सरदार व गंगाधरपंत रामाजी पंत होतील तेथे पाचवा मीही होईन. कोणी तरी इनसाफ करील. रुये कोणी चोरिले नाहीं. कोणी या गोष्टीस मीत नाहीं. या प्रमाणे श्रीमत रा दादा स्वामीस रा सखारामपंती सागोन इतराजी करविली. त्यास यात कांही कोणी चोरी केली नाहीं. दरबारी आम्हासही जाबसाल होतील. चिता नाहीं. तुम्हास कळावे म्हणून लिहिले आहे. प्रसगी गंगाधरपंत होते त्यांणी काही जाब साल केला नाहीं. आम्हास उल्टे लिहितात की तुम्हीं श्रीमंत रा दादा स्वामीस तसे सागितले नाहीं. तस्मात तात्याचाही पेच दिसोन आला. असो. पेच करुन अमचे काये करणार. जाबसाल प्रसगी करुन. १

प्रो महादाजीपंतबाबा कर्णाटकास गेले. सावनूर बकापुर वगैरे बिदनूरपावेतो गेले. तीस लाख रुपयेपावेतो खडणी जाली. श्रीरगपटणास जावे तो अगोदर मोगल तेंथे जाउन चाळीस लाख रुये खडणी त्यांनी केली आणी महादाजीपंत मीही कोणासीं कजिया केला नाहीं परतु त्याचा स्वभाव त्यास इलाज काये. असो. आम्हीं तो तात्याची परम स्नेह धरितो आणि ते मनापासून आमचा घात तो इछितात. असो. वरचेवर तुम्हास लिहित जाउन. १

मारवाडचे वर्तमान काये. तह होतो किवा नाहीं. छावणी होईल किवा निकाल निघेल ते लिहिणे[ले] पाहिजे. १

रा विठलराउ सिवदेव फार खराब जाले. कर्ज फार जाले. हैराण जाले. किल्ला येणे प्रा देउन बावासा ठहराव जाला.

१ जकीरा पहिला पातशाही नोफबुधा निमे जाटास बावा. निमे सरकारी ध्यावा.

१ नवा जकीरा जाटाचा जाटाने दरोबस्त न्यावा.

१ पाउण लाख रुये नकद जाटास द्यावे.

१ विठलपंतानी जी ठाणी मुलक घेतला तो सर्व जाटास दिली गढीबुधां.

१ लाख रुयेयाची जागा खतोलीचे व रतनगडचे गाव इनाम दिल्हे.

१ जो तालुका पहिल्या त्याजकडे होता त्याचा मामला सदामदप्रा द्यावे.

येणेप्रो ठहरले. किल्यावर ठाणे बसउन देशास जातील.

आगरेयावर फौज गेली. त्यानी सात किले व खोरगटण घेतले. रतनागिर आंजनवेल जयेदुर्ग सर्व राहिले. रतना

लेखांक [३१९] श्री

[जुलै १७५५]

श्रीमत राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पो। त्रिंबकराव गोपाळ कृतानेक सां नमस्कार विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे विशेष. सांप्रत स्वामीकडील काही पत्र येउन वर्तमान कळू येत नाहीं याजकरितां चित सचित आसे. तरी आपणांकडील अनंदरुपाचे वर्तमान लिहून सतोशवीत आसिले पाहिजे. येथील वर्तमान स्वामीच्या कृपावलोकनें येथास्थित आसे. कितेक तपसीलवार श्रीमत राजश्री आपासाहेबाचे पत्री लेखन केले आसे त्याजवरुन सेवेसी श्रुत होईल. येथील झडती[१७३] सन अर्वाची पाठविली आसे. सांभाळून घेणार स्वामी समर्थ आहेत. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

लेखांक [३२०] ।'श्री * संवत १८१२ श्रावण शुद्ध ४

[११ अगस्ट १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपतभाउ स्वामीचे सेवेसी.

पो। गोविंद बलाल [बुंदेले] सा। नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। श्रावण * सुध ४ मु। आया प्रांत अंतरवेद जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे. यानतर काली प्रहर दिवस राहाता तुमची पत्रे नागोरचे मुकामीची आली ती पावली वाचून पाहोन आनंद पावलो. त्यास अस्तमानी पत्र इटावेयाहून आले. त्यात वर्तमान राजे माधोसिंग याणे आपले कारभारी यासी बोलिला की रा। जयाजीआपा यांचे कार्य आम्हीं केले. आसे बोलिला. त्या मुसदीयाने इटावेयात कोणी त्याचा सोइरा होता त्याजला लिहिले. त्याणे आम्हास लिहिले. दुसरे आगरेयाहूनही याचप्रमाणे आले. वर्तमान या प्रकारे श्रावण वध २ भृगुवारी रा। आपासाहेब स्नानास चवकीवर उघडे बसले त्यासमई रजपुत दगेयासी आला. सुरी घेउन अस्तनीत लपउन त्याने पोटात दोन सुरी चालविली या प्रकारे दगा जाला. रजपुतही मारला. त्यास रजपुत मारला तर काये वाचला तर काय. रा। आपासाहेबाची लाखाचे पालणेवाले. त्या लस्करचे तहकीक लिहिले नाहीं. आले

(१७३) या पत्रावर मोडीचा खर्डा मुलानी गिरविला असून काही हिशेबी टाचणेही कोणी केली आहेत. पत्र तत्कालीन दिसते ते खरे असल्यास ही केवल उज्जनचीच झडती समजली पाहिजे कारण तीन साला झडत्या तयार नव्हत्या असे अन्यत्र पावले जाते [कास ले १४७, १४८]

लेखांक [३१७] श्रीशंकर * संवत १८१२ ज्येष्ठ वद्य ९
[३ जुलै १७५५]

आशिर्वाद उपरी. ता जेष्ट वद्य नवमी जाणोन स्वकीये लखन करणे विशेष. तुमचे पत्र काली साइकाली आले. इजारे गाव वावे त्यास रामाजी जगंनाथ याच्या गुमास्ता म्हणतो की विना साहुकारी निशा गाव देणार नाही त्यास पचोला गावकरी व कितेक प्रकारे सांगितले परंतु मानीत नाही म्हणून कितिक विचारे लिा तरी रामाजीस आम्ही सांगितले त्याणी मान्यही केले असतां दगाबाजी करितो. काही चिंता न करणे. त्याचा बंदोबस्त करणे तो आम्ही तेथे आलेउपरी करून. दरबारी लिहिले आहे त्याचाही जाब येतील. ते गोष्टीची चिता काये आहे. प्रस्तुत कत्रिलेस रवाना करणे आहे. हे गडबडीमध्ये आहो. शुक्रवारी प्रस्थान कोठडीस आहे. मजलदरमजल जाणे लागते. याची रवानगी केलिया तेथे येतो बरखंदाज पनास त्यास हिसेब करून तयार करून येथे पाठवणे. स्वारही येथे पाा म्हणजे देणे घेणे ते देउन नालबंदीही करावी लागती याकरिता सत्वर रवाना करणे. तुम्हीही बुधवारी साईकाली येणे. बहुत काय लिहिणे आशिर्वाद.

---

लेखांक [३१८] श्री * संवत १८१२ आषाढ शुद्ध ११
[१९ जुलै १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पो गणेश कृष्ण [पेंडसे] सां नमस्कार विनंती. येथील कुशल ताा * ९ सवाल मुाा थाल्नेर तापीतीर सुखरुप असों विशेष. आपण पत्र पाठविले ते पावोन बहुत सतोष जाहाला. लिहिले वर्तमान सविस्तर कळलें यांप्रमाणें सदैव लिहित असावे. सला जाहला म्हणोन आइकितो व आपणही संकलित लिहिले होते त्यास सला जाहालियाचे तथ्य वर्तमान सविस्तर लिहिले पाहिजे. इकडील वर्तमान तर श्रीमंत [राघोबा] दरमजल थाल्नेरपर्यंत आले. पुढे श्रीत्र्यंबकेश्वरास जाउन पुण्यास जाणार. राजश्री मल्हारबा इंदुरास राहिले. पंधरा रोजा मागाहून यावयाचा करार केला आहे. आपणांस कलावे म्हणोन लिा असे. ||' कोंकण प्रांताकडील नवलविशेष नाही. जे आहे तेच आहे. लोभ असो दीजे हे विनंती.

राजेश्री चिंतोपंत [वळे] व रामरावजी स्वामीस सां नमस्कार. यादवराव खुशाल आहेत. हे विनंती.

---

आहे त्याप्रोच आहे. विशेष लिहावया योग्य नाहीं. राजेश्री बाबुराव लिमये येथे सुखरुप पावलें. श्रीमंत राजेश्री दादासाहेबास कन्या जाली. ती आठ महिन्याची. दुसरे दिवसी वारली. सौ जानकीबाईचे शरीर अशक्त आहे. श्रीकृपेंकरुन खावदाचे प्रताप सर्व गोष्टी उतम होतील. आपलें घरचे पत्र पाठविलें आहे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ केली पाहिजे हे विनंती.

---

[पेद २८ ले. ६३] अर्थात 'ब्राह्मणराज्यास निरोपद्रव जाला'. [पेद २८ ले. ८५] 'पुण्यक्षेत्रें देवाब्राह्मणाची स्थले असतील ते सर्वांही उभार व परपाल करणेस्तव श्रीमतसाहेबी अवतार केला आहे' [पेद २८ ले ८७] असे सर्वतोमुखी होणे इष्ट होते एवच 'सप्तद्वीपीचा वदोवस्त करुन देवाब्राह्मणाची स्थापना जैसी पूर्वी केली त्याप्रोा सर्वांस सुख देउन प्रतिपाल स्वामी करणार' होते [पेद २७ ले ७५] 'येकाती मकारपूर्वकास [होलकरास] सागितले की श्रीमत ईश्वरी अवतार आहेत' [पेद २७ ले. २१९] 'अपूर्व गोष्ट जाली येक गृहस्थ पोटशुलाची व्यथा ह्मणून कोल्हापुरास लक्ष्मीजवल सेवेस गेला तेथें स्वप्न जाले की पेशव्याचे तीर्थ घेणे त्यावरुन पुण्यास येउन पूजासमयी भेट घेतली ते गोष्ट विनोदावर नेली तो पेशव्यास स्वप्न जाले की तीर्थ देणे तीर्थ घेताच व्यथा दूर जाली घते प्रसगी होते त्यानी सागितले' [खड ३ ले ४३३] 'श्रीवज्रयोगिनीची आज्ञा जाली की देवालये बाधावे. त्यास येकाच्या द्रव्याने बाधो नये सर्वांपासून भिक्षा मेलउन बाधावे म्हणोन आज्ञा' जाली असे दैवी चमत्कार पेशव्यास होऊ लागले [पेद ३२ ले १६६] 'युगातरी रामकृष्णादि अवतारचरित्र तैसेच याही मनमत्री देवब्राह्मणसरक्षणार्थ अवतार प्रसिद्ध श्रीमत नामना विश्वतोमुखी कीर्तिविस्तार कर्नाटकपर्यंत पावला' [पेद २८ ले १६१] 'पातशाही स्वामीची होती. [पेद २१ ले ९६] 'हिंदुस्थानचा वदोवस्त स्वराज्यादाखल होईल' [पेद २७ ले १६१] 'साराश महाराजास ईश्वर पृथिवीचे राज्य जाले. असा प्रताप ब्राह्मणात वो कोणाचा ऐकिला नाहीं' [पेद २१ ले १६३ पेद २७ ले २१९] 'स्वामीच्या तेजोप्रकासे हिमालयपर्यंत छत्र फिरते' [पेद २ ले ९९] 'तुम्ही सावकार लोक आजी पातशाहा श्रीमत आहेत'. [पेद २४ ले १९१] असले अनेक उतारे देता येतील पण त्यातून निष्पत्ति निघावयाची ती वरील उताऱ्यातून बहुतेक उतरलेलीच आहे ही सर्व भाषा शाहुनतरची होय यापूर्वी तिचा उच्चार क्वचितच आढळतो आणि तो किंचित भिन्न प्रकारचा. 'तोहमास गारुडीचा खेल आला नवी सृष्टी जाहाली' [ऐच क ४ ले. ८] यालाच 'पातशाहीगर्दी' असे नाव तत्कालीन लोकानी दिले आहे [पेद २८ ले १६] 'तोह्मासकुलीने बाजी जिकली परतु औघ्या हिंदुनी हिंमत बाधल्यास हिंदुचीच पातशाही होईल छत्रपती पातशाही इछित नाहीत. जीर्णोधार केल्यास सतोष मानतील' [ब्रच ११८, ११९] 'रायाचे मनी राणाजीस दिलीत तक्ती बैसवावे सबब जे बरकड राजे थोर असल्यासही राउस सलाम करणार नाहीत आणि राणाजी व राजश्री एकच आहेत बदल राणाजीस बसउ हिंदु राजे सर्वत्र स्वारीची प्रतीक्षा करितात'. [ऐच क्र. ४ ले. ७] हे परचक्र निस्तरताच भाषाही निमावली. स्वामी आजारी पडले वारसाचा प्रश्न उद्भवून [पेद १९ ले १६०] 'शाहूचा जिवात्मा तो वाह्यात्कारी त्याचे सेवक वतर्यामी स्वामीचे शाहु कैलासवास केल्यावर दोही राज्यावर सत्ता स्वामीची आणि आम्ही सेवक स्वामीचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक कर' [कास. ले २४६] रायाचे वैभवाची वृधी व्हावी यास्तव बहुत श्रम केले कावडी रामेश्वरास

वर्तमान आइकताच भोजन न केले. निद्रा दोन रोज लागत नाहीं. त्यास आमचे कासिद गेले आहेत त्यास हे वर्तमान काये कसे जाले याचा तपसीलवार वर्तमान लिहिले पाहिजे. ईश्वर हे लटके केले तर कोट गुणे बरे आहे. अम्हांस परम संकट श्रम जाले आहेत. तपसीलवार वर्तमान लिहिले पाहिजे. हे वर्तमान आइकोन काहीच वर्तमान लिहावयासी सुचले नाहीं. वहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३२१] श्री * संवत १८१२ श्रावण शुद्ध '२

[१८ अगस्ट १७५५]

श्रीमंत राजेश्री रामाजीपतभाउ स्वांमीचे सेवेसी.

विनंती पोष्य बापुजी बलाल [फडके] कृतानेक साष्टांग नमस्कार विनती. येथील कुशल ता। छ * ९ जिल्कादपावेतो यथास्थित असे विशेष. आपंण पत्र पाठविलें ते उतम समई पावोंन संतोषावाप्ती जाली. ऐसेच निरंतर येणारा वार्तिकासमागमे पत्र पाठउन परामर्ष करीत असिले पाहिजे. छ २७ रमजानचें पत्र पाठविले तें पावले. तेथे लिहिले की नवलविसेस वर्तमान लिहिणें म्हणोन आज्ञा त्यास श्रीमंत राजेश्री दादासाहेब श्रावण शुध त्रितियेस पुण्यास दाखल जाले. श्रीमंत राजेश्री नानासाहेबास पुत्र जाहाला. सातआठ दिवस जालें. श्रावणमासचा समारंभ उतम प्रकारें जाला. बारा साडें बारा लक्ष[१७४] लागले पंचावन हजार ब्राह्मण जालें. सातारियाकडील व कोकणचे वर्तमान

---

(१७४) 'दाभाडे सेनापती याणी पुण्यक्षेत्राचे ठायी श्रावणमासी धर्मदक्षणा देउन लौकिक संपादिला. त्याचा पराभव करून श्रीमती वास्तव्य केल्यापासून दिगत कीर्ति मेलउन आसमुद्रात ध्वजारोपण केले' असा इतिहास वेदाती देतो [खड ६ ले ४३६] श्रावणमासाचे महात्म वाढून पेशवाईत प्रति वर्षी मोठा समारंभ होत असे त्याला वार्षिक उत्सवाचे स्वरूप प्राप्त झाले उत्कर्षाचे ते कारण समजले जात असल्यामुळें दानधर्माचे प्रमाणही वाढत गेले या दक्षिणेलाच 'धर्मादाय अथवा देकार' ह्मणत त्यासबधी केवल दोन वर्षाचेच आकडे उपलब्ध होतात त्यावरुन धर्मादायाची कल्पना होऊ शकेल '१६ लक्ष धर्म केला ८० हजार ब्राह्मण मिळाले होते मुठीने वोजळीने चुकटीने दक्षणा दिली मोजून दिल्हे नाही' [खड ३ ले ४३२, ४३३] हा खर्च १७५३चा असून १७५५ साली 'साडेबारा लक्ष लागले ५५ हजार ब्राह्मण जाले' असे फडके या पत्रात सागतो 'मोहराची दक्षणा वाटावी' अशी इच्छा पेशव्याची होती असे अनुमान करण्यास वाव आहे [खड ३ ले ३८७] या धर्मसत्राचे बीज परमार्थासाठी पेरले गेले असले तरी ते प्रपंचाचेही मुख्य साधन होते 'काय निमित्य की राज्य या प्रकारचें झाले' [पेद २८ ले. ५६] शाहुमहाराजाही सेवकास वाढविले कृपा विशेष करुन राज्यभाराचा सर्व यखत्यार दिल्हा [खड ६ ले २७६, ३३६] देवब्राह्मणाचे पूजास पुण्यपात्र जाले'

सविस्तर वर्तमान कळले. ग्वालियेरचे वर्तमान पूर्वी लिहिले आहे त्यावरुन कळलेच असेल. त्याजधर मजलदरमजल देशास आलो. श्रावण शुध त्रितियेस पुणियास सर्व मंडलीसहित सुखरुप पावलो. येथे आलियावर श्रीमंत राजश्री नाना स्वामीस श्रावण शुध चतुर्थीस पुत्र जाहाला. आपणास कळावें म्हणून लिहिले असे व श्रीमंत राजश्री दादास श्रावण शुध अष्टमीस कन्या जाहाली. ती दुसरे दिवशी देवआज्ञा जाहाली व सौ। जानकीबाईस बरें वाटत नाहीं. ईश्वर आरोग्य करील. कांहीं चिंता नाहीं. तुमचे खर्चा कागद येउन पाठविला आहे।' त्याजवरून सविस्तर वर्तमान कळेल. जानकीबाईस फार बरे वाटत नाहीं. कळल पाहिजे. विष्णु महादेव [गदरे] याजकडील कारकुनीचे रुपयाविसी लिा त्याची भेट जाली होती. याद पाहिली. त्यांणी सांगितले की उदेपुरचा येवज आला म्हणजे सर्वांची प्रविष्ट करु. ते सर्व कागद त्यापासीच आहेत तेहीं सत्वरच येणार आहेत. आलियावर विल्हे लागेल. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३२३] श्री ॰ संवत १८१२ श्रावण शुद्ध १२
[१८ अगस्ट १७५५]

विनती कासीबा थोराताकडे तीर्थस्वरूप राजश्री कृष्णाजीपंत मामाचे रुपये येणे आहेत त्याचा वाइदा सन सितचा नालबंदी समई तीनशे रुपयाचा आहे. त्यास राजश्री शामराव नागनाथ यास सांगोन तीनसे रुपये यदाचे त्याजपासून घेउन आपणाजवळ ठेवावे. गेले साळचे तीनसे रुपये आपणांजवळ आहेत ते त्यास येथे आम्हीं दिले. पंधरासे रुपये आपले नारो शंकरापैकी आम्हाजवळ थोडाजी नाईकानी जमा केले आहेत. ज्यास देणे आसेल त्यास देवावे अगर घरी हरीपंताजवळ ध्यावयाची आज्ञा करावी. देउ. कळले पाहिजे।' बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३२४] ।'श्री ॰ संवत १८१२ श्रावण वद्य ७
[२१ अगस्ट १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामीचे सेवेसी.

पोष्य जनार्दन बलाल [भानु] सा। नमस्कार विंनंती उपरी. येथील कुशल ता। छ ॰ २० जिल्काद जाणून स्वकीये कुशल लिहित असले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविलें ते पावले. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. असेच निरंतर पत्र पाठउन संतोषवीत जावे. नवलविशेष अभिकोतर वर्तमान आढळत जाईल ते वरचेवर लिहून पाठवीत जावे.

सेवेसी हरि बलाल [फडके] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. कृपा केली पाहिजे हे विनंती.

पो छ १२ जिल्हेज.
[१९ सितबर १७५५]

---

लेखांक [३२२] श्री * संवत १८१२ श्रावण शुद्ध १२
[१८ अगस्ट १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य गणेश कृष्ण [पेंढसे] सा नमस्कार विनती उपरी. येथील कुशल ता छ * ९ जिल्कादपावेतो समस्त सुखरुप असो विशेष. तुम्ही पत्रे पाठविली ती सर्व पावली.

---

पाठविल्या राज्यप्राप्तीकरिता दूर्वा वाहिल्या' [कास ले ३६] प्रथम जो धर्म गुप्तपणे चालू होता तो पुढे उघडपणे होऊ लागला 'यमुनातीरपर्यंत अमल होउन [पेद १० ले. ८१ पेद १३ ले ४५] अनेक वेळा 'आसिर्वादे फत्ते जाहाली'. [ब्रच ले ४३, २६, ३६, ५२] 'श्रीमताची दौलत आसिर्वादाची' [ब्रच ले २३९] 'आसिर्वादाचा महिमा थोर तन्मुले सर्व गोष्टी अनुकूल आहेत' [ब्रच ले २२, २३] आणि 'ब्राह्मणाचे आसिर्वादें दिली काबिज केली' अशी पदोपदी प्रचीति येत गेली [के. ७३] अर्थात दानाचे स्तोम माजावें यात नवल नाही या दानधर्मास विंचुरकर अहिल्याबाई इत्यादिकानी श्रेयस्कर मानले होते. [मदबा १ ले ५, ८१] त्याच्याशी कर्तव्य नसून उगीच दोष देण्याचे प्रयोजनही नाही. केवल तारतम्य न्यायाने महाराष्ट्रधर्मास ही प्रथा कितपत पोषक होती एवढेच पहाणे इष्ट असून त्या दृष्टीनें निष्कर्ष काढणे भाग पडतें हा प्रश्न तत्कालीन लोकास शोबला होता. [ले ३३८] नाही असे नाही 'मोठा दीर्घरोग अवदाली आहे महाराजे हिंदुस्थान व दक्षण या रोगापासून सोडविलेसे होईल. ५० लक्ष प्रति वरुषी महाराज धर्म करिताती म्हणून यैकितो माझे मते जरी हा रोग दूर जाला तरी त्याजपरिस शतगुण धर्म याजमधे आहे यथार्थ लिहिले आहे' [पेद २७ ले २५१] अशी पृच्छा एका चाणाक्ष गृहस्थाने पानिपतच्या संग्रामापूर्वीच प्रत्यक्ष पेशव्यास केली होती ती वाचनीय होय वार्षिक दानापेक्षा महाराष्ट्रधर्माची चाड पेशव्यास अधिक होती की काय असा सहज प्रश्न उद्भवतो. त्याचे निराकरण केल्यासिवाय इतिहासाला गत्यंतर नाही. महाराष्ट्रधर्माचा अभिमान बाळगणाऱ्या पुरुषाने स्वामीच्या कर्जाची सोय लावून स्वत.च्या कर्जाची फेड कोणत्या रीतीने केली सोबत्याचे साह्य कितपत केले आणि आपल्या ध्येयपूर्तीसाठी तोफखाना आरमार व फौज किती वाढविली सारांश सर्व महाराष्ट्रमय करण्याची कल्पना मूर्तस्वरूपांत आणून महाराष्ट्रधर्मध्वजारोपणाचें श्रेय किती संपादिले हे पाहू जाता पेशव्याची श्रद्धा या धर्मावर कितपत होती हे स्पष्ट होऊं शकेल. पेशवाई देकाराचे वार्षिक प्रमाण [पेद २३ ले ६६ खड १ ले १३२] आणि 'धर्मादाय चालत आहे तो पाचा लक्षाची दौलत राहीपर्यंत चालवावयासी अनमान करु नयें' [इस. २१ पान १३७] हे वचन लक्षात घेऊन अहिल्याबाईचा दानधर्म कीर्तिकारक असला तरी साम्राज्यसवर्धक नव्हता असा शोध लागला आहे [मोइसं. २४ पान ११०, ११४] तो तुलनात्मक दृष्टीने कितपत न्यायनिष्ठुरतेचा आहे याचा निवाडा करण्याचे काम वाचकावरच सोपविणे बरे

लेखांक [३२५]

श्री * संवत १८१२ भाद्रपद वद्य ६

[२६ सितंबर १७५५]

राजश्रियांविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामीचे सेवेसीं.

पोष्य जनार्दन बल्लाळ [भानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १९ जिल्हेज जाणून स्वकीये लिहित गेले पाहिजें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें ते पावले लिहिलें वर्तमान कळलें. राजश्री जयापास दग्याने रागड[या]नी मारिले. वाईट गोष्ट जाली. आपासारिखे अतःपर माणूस होणे नाही. राजश्री दतबावर सर्व वोझें पडले आहे. तरी तुम्ही तेथे बहुत सावधपणे असणे. राठोडाचा विस्वास नाही. राजश्री दतबास पत्र लिहिले आहे त्यावरून कळेल. श्रीमंतानी च्यार लक्ष[१७६] रो तिकडे देविले आहेत त्याच्या चिठ्या आलाहिदा पाठविल्या आहेत त्याप्रो। येवज येईल. ईकडील वर्तमान तरी नवल विशेष ल्याहावेसें नाही घरची सर्व मनुषे सुखरूप आहेत. [?] काही चिंता न करणे. राजश्री बाळकृष्णपंत लिमये तुम्हांकडून आले. त्याणी वर्तमान सांगितले त्यावरून सविस्तर कळले. रा। त्रिंबकपंत दिवेकर यास दोनसे रो। खर्चास देविले तेव्हड्याने त्याचा काल चालतो असें नाहीं. घराणदार कुलीन ग्रहस्ताची मुलें आहेत. कर्जदार आहेत याजकरिता तुमचे हाती दिल्हे आहेत यास्तव उत्तम रीतीने परामर्श करावा. कर्जापासून मुक्त होत तें करावें. येखाद धदा मजमु अगर फडनिसी माळव्यांत अथवा स्वदेशी योजून खामसा सांगावीच सांगावी. यदर्थी अनमान सहसा न करावा. या ग्रहस्तावर मोठा समय आहे यास्तव वारंवार तुम्हास ल्याहावे लागते. याचे उतर स्मरणपूर्वक लेहून पाठवावे. बहुत काय लिहिणे कृपालो[?] असो दीजे विनंती.

---

(१७६) 'वकील माधवसिंगाचा आहे त्यास आम्ही फौज द्यावयाविसी ताकीद केली आहे काही देईलसे दिसते' हे राघोबाचे कथन [ले ४२] किंवा 'खासा स्वारीची तयारी होत आहे चालीस-पनास हजार फौजेनसी येणे होईल' हे पेशव्याचे वचन [ले ६८, ६९, ७०] जसे फोल निघाले त्याच प्रमाणे 'चार लक्ष पाठविले' असे भानु सांगतो त्याचा प्रकार होता ही सर्व रकम शिंद्यास पोचली नाही 'श्रीमंत स्वामीनी देविले लाख रुपये ते उधनीस जमा करविले' असे गोविंदपंत बुंदेले लिहितो [ले ३३३] या समयातील इतर देवघेवीचा व्यवहारही चिंतनीय होय 'जयनगराकडून तीन लाख देविले होते त्यापैकी येक पैसा आला नाही रोहिल्याचा येवज देविला तोही पावला नाही' असे दाभोलकर सांगतो. [पेद २१ ले ७२] तसेच 'श्रीमंतास खर्चास मागितले परंतु द्यावयास अनमान करितात म्हणोन लेखन केले तर येते समयी मागोन पाहणे दिल्हे तर फारच उत्तम जाले नच देत तर आम्ही चाकरलोक आहो. फर्ज होईल ते तेच वारतील' [कास ले १४८] हे शिंद्याचे पत्र वाचनीय होय

जयाजी सिंदे यांचे वृत लेहून पाठविलें त्यावरून चितास बहुत खेद जाहाला. अशा सरदारास अशी गत व्हावी असें नव्हते[१७१] परंतु ईश्वरइछेस उपाय कोणाचा आहे असे नाही. याउपरी तऱ्ही राजश्री दताजी सिंदे बहुत सावधतेकरून राहात तो विचार करावा. बहुत काय लिहिणे कृपालोभ असों दीजे हे विनंती.

राजश्री लक्षुमणपंत [वैद्य] स्वामीस सां नमस्कार उपरी. लिा परिसीजे हे विनंती.

पौा छ २५ जिल्हेज
[२ अक्टुबर १७५५]

---

(१७५) जयाजी शिंद्यास दगा कसा झाला याचे कारण जाणण्याची जिज्ञासा सर्वांस उत्पन्न झाली त्याविषयी दाभोल्कराचे पत्र पेशव्यास गेले [लि ६८] ते किंवा चितोबा वळयाचें पत्र अद्याप उपलब्ध नाही यासबंधी केवल दोन पत्रें पेशवेदप्तरात प्रकाशित झाली असून पहिले रामजी पवाराचे असावे असे भाषा सागते. [पेद २ ले ४८] दुसरे रामराव नारायणाचे होय. [पेद २७ ले ११६] ही पत्रे विचारणीय असून 'रजपुताचा विस्वास व दगाबाजी सर्व पूरवीच विनती केलीच होती परतु कोन्हास विस्वास न आला' ही पवाराची उक्ती पत्राधारे उचित वाटते 'दुराग्रहाखाली घालून लाव वावें न कले कोणता प्रकार होईल' [लि २७६] 'दुराग्रह होउन गोष्ट नासेसे न करावें' [लि २८९] 'केवल कुमेरीप्रो न गुतावे उतावलीने लोक जाया होउन कार्य सुधे होणार नाही' [लि. २९१] 'आपाचे वर्तमान कलले. मोठा घात जाला सर्व दौलतेचा भार त्यावरी या गोष्टी कोण्हा रीत्या व्हाव्या. पुढील बदोबस्त सरदार मर्द आहेत तुम्ही प्रसगी आहा. चिता नाही उपरोधिक नाही'. ही सखारामपत बोकिलाची भाषा चिंतनीय आहे [लि ३२९] अस्तु 'आपासाहेब स्नानास चवकीवर बसले त्या समई रजपुत दगे यासी आला सुरी घेउन अस्तनीत लपउन त्याने पोटात दोन सुरी घालविली रजपुतही मारला गेला' असे गोविंदपत बुंदेला सागतो [लि ३२०] वकील घोडियावर बसून चौघे आणिक साधक घेउन येउन दगा केला चौघे तेही मृत्यु पावले मग लस्करात गंजनाव जाला अवघे सिध जालेत विचार दृढ केला द्वाही जयापाचे पुत्राची फिरली. मोर्चे कायम केले अजमेरीस विचार यावयाचा होता तो राहिला की आता फुटून फळी उचलावी तर बाजी जाते. अवघे फितूर करतील. आता खेल मोडावा. सह न सोडावा, आता दद लागले रागड कापून काढावे यैसा करार जाला' हे वर्णन बखरीशी ताडून पहावें [पेद २ ले ४८] तसेच 'दगा व्हावयासी कारण हेच की गोसावी राजसिंग चव्हाण व जगनेस्वर माध्यस्तीस आले होते. नागोराहून गोवर्धन खीची आला होता. तो योग घडोन न आला. मग या त्रिवर्गांनी जैतसिंग राणावत घेउन येथे आल्यावरी काहीयेक दिवस सलुखाच्या गोष्टीत रदबदलीस लागलिया गोसावी व चव्हाण याच्या अगभूते मारेकरी मानसे होती त्यानी सधी पाहून दगा केला' याची बखरीशी तुलना करावी म्हणजे बखरीच्या सिद्धाताची श्रेष्टता लक्षात यईल 'मकारपूर्वक इकडे आले मागून श्रीमत आले म्हणोनच विजेसिंगाने दम धरला. [ति]कडील जावसाल जाला म्हणजे येथील कार्य होउन येईल' हे वळयाचे विवेचन [लि. २११] राघोबाकडकणीराम याचे आगमन [लि. ३०६] आणि पेद २ ले. ४९ पेद २१ ले ७४, ७७ या तीन पत्रातील नामावली बखरीच्या साहित्यपत्राशी जुळवून जें सार शास्त्रीयरीत्या निघेल ते सशोधकानींच काढावें हेच श्रेयस्कर होय.

शुध नाहीं. अद्याप त्याचा कारभार निर्गमांत आला नाहीं. काय ठराव होईल तो पाहावा. सातारियाकडील वर्तमान तरी दोनतीन महिने [सिदमट ठकार व विठलराव बाबाजी जाधव याचा दिवाण आले आहेत परंतु आद्याप करारांत गोष्ट आली नाहीं. मुख्य गोष्ट परस्परें यास व आईसाहेबास इतबार कोणांचा पुरत नाहीं. याचे मानस राम] राजा आधी बाहिर काढावा मग भेटीस जावें. त्याचा आशय आधी भेटी व्हाव्या मग जो विचार करणे तो करावा. याप्रो दोंन दोघाचे मनसवे आहेत. तेव्हां भेटी कशा होंतील. या प्रकारचे वर्तमान आहे. आपणास कळावें म्हणोन लिहिलें असें. ॥ बहुत काये लिहिणे ॥ लोभ असो दीजे हे विनती.

---

लेखांक [३२७] श्री * संवत १८१२ आश्विन शुद्ध ९

[१३ अक्टुबर १७५५]

चिरजीव राजश्री रामाजीपंत या प्रति विसाजी दादाजी [आठवले] आसिर्वाद उपरी. येथील कुशल ता आस्विन * शुध नवमी मुा पुणे जाणून स्वकीये लिहित गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस पत्र येउन वर्तमान कलत नव्हते त्यास श्रावणमासचे पत्र आले व आगोधर येकदोन पत्रे आली त्यावरून साकल्य वर्तमान कललें. राजश्री जयापास दुस्टानी दगा केला. बहुत काम जवून जाले परंतु ये गोष्टीस काहींच उपाये नाहीं. त्यामागें राजश्री दताजी सिंदे व राजश्री जनकोजी सिंदे आहेत. कोणेविसी ठुमस खातातसें नाहीं. मसलत भारी पडिली आहे. तुम्हीं बहुत सावधपणे असिले पाहिजे. राजश्री दताजी सिंदे व रा॥ जनकोजी सिंदे यास पत्रे पाठविली आहेत.

---

म्हणून त्याचा कारभार निर्गमात आला नाही' खड ३ ले ४६४, ४६५ ही पत्रे या प्रसगाचीच असून 'मल्हारजी होलकर याचे चितात होते की सख्य करून द्यावें' परतु त्याच्या मध्यस्थीने ते घडले किंवा नाही हे सागवत नाही तथापि एवढे खरे की 'उभयपक्षी समजावीस होउन समान वाटणी दौलतेची करून समाधान करावें असा निश्चय' पेशव्याने ठराविला [खड ३ ले ४६९] भाऊबदकी प्रथम भोसलेकुळात उम्दवून पुढे ती नागपुरकरात प्रबल झाली तेव्हा शाहूनी 'तिजाई सरजाम देउन रघोजी भोसल्याचे समाधान केले' [वाड १ ले १६३ पेद २० ले ५] आणि स्वत कोल्हापुरकराशी वारणेचा तह वाटणीदाखल केला [कास ले १४, १९, २०] वत समयी रघोजी भोसल्यानेही आपल्या मुलाविषयी व्यवस्था करून ठेविली होती [खड ३ ले ४७४] तिकडे दुर्लक्ष करून 'समान वाटणीस' समति दिल्याबद्दल पेशव्यास दोष देता येत नाही हे वरपागी खरें आहे पण वाटणीची पाळी स्वत वर आली तेव्हा हे तत्व मात्र रुचले नाही मग इतरासाठी ते का मानवले असा साहजिक प्रश्न उम्दवतो आणि या धोरणाचे जे दुष्परिणाम घडले ते विचारणीय होत एवढेच येथें सुचवावयाचे आहे

॥ पो। गणेश कृष्ण [पेंडसे] सा। नमस्कार विनंती. मागे आपण पत्रे पाठविली ती पावली. सविस्तर कळले. याचप्रो। सदैव पत्री संतोषवीत असावे. घरचा लाखोटा पाठविला आहे त्यावरून कळेल. घरी सर्व सुखरूप आहेत. लोभ असो दीजे हे विनती. रा। आपा जोसी यांस सां। नमस्कार प्रविष्ट करावा हे विनंती.

---

लेखांक [३२६] श्री

[१७५५]

राजेश्री रामाजीपंतभाऊ स्वामीचें सेवेसी.

विनंती उपरी. ईकडील वर्तमांन तरी राजश्री मल्हारबा चांदवडास आले आहेत. त्याचे कितेक मुदे होते ते श्रीमंत राजेश्री दादासाहेबानी मान्य केलेच आहेत. परंतु लौकर पुण्यास यावयाचा विचार दिसत नाहीं. किल्याचे वगैरे कितेक मनसबे घातलें आहेत. त्यास राजश्री रावो लक्ष्मण आले. त्याणी श्रीमंतास सविस्तर वर्तमांन सांगितलें त्यावरून लाहानसाहान कामकाजें होती ती केलीं. याउपरी येतीऐसे दिसतें. येथे आलियावर भेट जालीवर नवलविशेष वर्तमांन जालियावर लेहून पाठउ. आगरे याजकडून रा। पुरंधरपंत आले होतें त्याच्याने बोलीचा ठराव जाला नाहीं. श्रीमंतानी त्यास आज्ञा केलीं कीं रत्नागिरी जयगड विजयेगड अंजणवेल गोवलकोट इतके किले द्यावें तेव्हां सख्य करावे. पुढें चाकराप्रमाणे वर्तावें. विजयदुर्ग आणिख येकदोंन किलें ठेवावे याप्रमाणें जालें तरी सख्य होईल म्हणोन आज्ञा केलीं. त्याच्यानें कबूल न करवें. अंजणवेल गोवलकोट मात्र देउन सला करावा हा विचार होतां परंतु राहिला आणि निरोप देहून आगरे यांकडे पा। आहे. आपणांकडील दामोदर रघुनाथ पाठविलें आहेत. याप्रो। मान्य केले तरी उतम नाहीं तरी पारपत्य उतम प्रकारे होईल. कर्णाटकाकडील मजकूर तर मुजरफरखान लबाडी करुंन गेला तों सावनूरकरांकडे राहिला त्याणे त्या प्रांती दगा आरंभिला आहे. सोंधे वगैरें ठिकाणाची खंडणी घेतली. सरकारची ठाणी त्या प्रांती आहेत त्यास तसदी देणार आहे यास्तव तिकडे फौजा रवाना करणार. समजाविसीस प्रारंभ जाला आहे. पथके रवाना करितील खासा लग्न जालियाखेरींज दूर जात नाहीं. बाहेर निघोन चहूकडे अवाई बाळाची फौजा जमा कराव्यां याअनवये दसरा जालियावर बाहिर निघतील. राजश्री रघोजी भोसले[१७३] याचे पुत्र येथे आले आहेत. परस्परें बंधूत चित

(१७३) 'फाल्गुन शुध त्रितीया शुक्रवारीं' म्हणजे १४ फरवरी १७५५ रोजी 'रघोजी भोसलें नागपुरकर गात जाले. त्याला चार पुत्र होते'. [पेद २० ले ८०] 'त्यात परस्परे चित शुध नव्हते

प्रकारें बंदोबस्त होईल. शिवराजपुरवाला फौजेखेरीज दवत नाहीं. त्याविसीं चिरंजीव रा बाबांसही लिहिले आहे. ते जाउन तेथील अमल ठीक करितील. आम्हीं मेहनत करावयासी सावधानीस अंतर करणार नाहीं. सर्वस्वें आपलें आसो. येवजाविसीं आपण लिहिलें होतें त्यास ईकडे दिली आगरे यामधे मोठेमोठे सावकार याची दिवाळीं निघाली आहेत. विचारें करुन हुंडी करावी लागती. चकले कुरा व चकले कडा हे जागा श्रीमंत राजश्री दादा स्वामीनी रा गोपाळराव याजकडे देविली. ते सनद घेउन आले. त्यांशि कजिया करितां नये. सनदी गोष्ट. अम्हीं सर्वस्वें गुंतलों आहों परंतु धण्याची अज्ञा प्रमाण मानून जागा गोपाळराव याचे स्वाधीन करुन त्याची रजावंदी केली. चारपांच परगने मात्र तूर्त अम्हाकडे आहेत. देशास जावयाची तयारी केली. दरमजलीनी देसास जातो. जें विनंती करणे तें श्रीमंतास करुं. जे अज्ञा करितील त्याप्रो वर्तों. श्रीमंत राजेश्री नाना स्वामीची पत्रें निकडीची चार जोडी आली की जागा हकनाहक त्याचे हवाली करणे. त्यास श्रीमंत स्वामीचे दरबारचा प्रसंग एक प्रकारचा जाला आहे. अम्हीं गत वर्षी झुजलो कजिया पडला. पैसा सरकारी मरला. त्याजपकी येक उगवला नाहीं. आसे परम संकट. गोपाळराउ अंताजीपंत आले. तमाम मुलकात कजिया जाला. रा अंताजीपंत आमची गोष्ट आईकोन माघारी गेले. तो पुणेयाहून पाच पत्रें आली. चारपाच जोडी श्रीमंत स्वामीची आली. त्यांस येथे कटकट केली येकादा कारकून मारला गेला लुटला गेला तर तीस वर्षे चाकरी केली [ती] सर्व पाणियात जाईल. असे परम संकटात पडिलो तो हार्थे काये लिहावा. साल गुा पैसा दिल्हा सरकारी तो उगवला नाहीं. श्रीमंत स्वामीची या प्रकारे सरफराजी. कुरावर जे मेहनत केली श्रम केला पैका खर्च जाला ते सांघं रा आताजीपंत नाना सागता कलो येईल. तूर्त दरबारी गेलो. श्रीमंत स्वामीजवळ जातो जे ईश्वरइछेने होईल आणि पार पडो ते पडोन. त्यास तुम्हीही परम संकटात पडला. आम्हीं ईकडे पडलो. आम्हास तुम्हाकडील परम चिंता आहे. पुणेयाहून फौज श्रीमंत स्वामीनी रवाना केली. आज सतावीस रोजाचा कासिद आमचा आला. त्यांस रा समसेरबहादर व रा यसवंतराउ पवार वगैरे बारा हजार फौज तुम्हाकडे रवाना केली. रा अताजीपंत ईकडून गेले. तेही जाउन पावलेच असतील अम्ही मोठे घोरात पडलो आहो. असे कधी अम्हीं कजियात पडत नाहीं परंतु ईश्वरे घोरात पाडिले आहे. वरचेवर वर्तमान तुम्हास लिहूत जाउन. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

प्रविस्ट करावी. वरकड सर्व मनुष्यें सुखरुप आहेत. तुमची माणसे सुखरुप आहेत. काही चिंता नाही वरच्यावरी वर्तमान लिहित गेले पाहिजे बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे असिर्वाद.

राजेश्री लक्ष्मणपंत स्वामीस नमस्कार. तुमची मनुष्यें सुखरुप आहेत हे विनंती.

---

लेखांक [३२८] ॥श्री

[अक्टूबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य सखाराम भगवंत [वोकील] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. आपणांकडून पत्र येत नाहीं. तरी येसे न करावे. सदैव पत्री परामृश करावा उचित आसें. राजश्री आपाचे वर्तमान राजश्री दत्ताजीबाबानी लिहिले त्यावरून कळले. मोठा घात जाला. सर्व दौलतेचा भार त्यावरी. या गोष्टी कोण्हा रित्या व्हाव्या. ईश्वराचे चितास आलें ते जाले. पुढील बंदोबस्त सरदार मर्द आहेत तुम्हीं प्रसंगी आहां. चिंता नाहीं. श्रीमंतानी समशेरबाहादर वगैरे फौजा तुम्हांकडे रवाना केल्या आहेत. सदैव पत्र पाठवीत जावें. उपरोधिक नाहीं. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३२९.] ॥श्री * संवत १८१२ कार्तिक शुद्ध १२

[१६ नवबर १७५५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्य गोविंद बलाल [बुंदेले] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। कार्तिक * सुध त्रयोदसी जाणून स्वकीये लिहित असिले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावलें. मत्रिस्तर कळोन संतोष जाला. पा। विठुरच्या येवजाविसीं लिहिलें तेही कळलें. येसियासी गतवर्षी जमिदारानी हरामजादगी केली होती. अम्ही बकाउलाखानाकडे गुंतलों. इकडे अमलांत खळखळसी जाली. त्यास यंदा उत्तम

पुढे गेलें. बुरुज गारी जाले. भंवाती मारुन कहाडिले. ठाणी कायेम केली. थोडी माणसे फार पडिली. आम्हास वर्तमान आम्हास कळले यावर आम्हीं धावोन मेणपुरीकडे आलो. त्याजवर आम्हीं चहुकडे गडबड पाहोन मेणपुरीकर भेटीस आला. त्यासी सल्ख केला. चालीस घोडीं पडिली व सिववदी अम्हावर पडिली ते पडिली. सल्ख केला. जे रुये वसूल आले ते आले. बाकी राहिले ते वाइदेबंदी करुन घेतली आणि राजे यास निरोप देउन आज तीन रोज माघारे येमुनातिरास आलो. याजउपर दरमजलीनी श्रीमंत स्वामीजवळ जाउन. वरचेवर तुम्हास लिहून पाठउन. आमचा सर्वस्वे असरा रा आपा होते. ईश्वरे त्याजला दगा करविला. आता त्याचे ठाई रा दत्ताजीबावा व जनकोजीबावा आहेत. त्याजहून [विशेष] आमचे चालवितील. मिती कार्तिक शुद १५. बहुत काये लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३२१] श्री * संवत १८१२ कार्तिक शुद्ध १५

[१८ नवबर १७५५]

पुरवणी राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सो.

विनती उपरी. आम्हास आसरा सर्व तुमचा आहे. मारवाड प्रांते गुंतला. ईश्वरे तेथील बदोबस्त सत्वर होउन यावे. इकडे आयेध्येचे काम ठीक आहे. तुम्हास येश देईल ईश्वर. असो. दरबारी जातो. वरचेवर तुम्हास लिहित जाउन. रा अंताजी मानकेश्वर यास आम्हीं पत्र लिहिले आहे त्याजला प्रविष्ट करावे. दरबारी जो प्रसंग प्रस्तुत आहे तो तुम्ही परभारा ऐकिलाच आहे. वरचेवर लिहित जाउन. रुये चार रोज न पावले ते सावकारियांत मोठी फजिती जाली. काही लिहिता पुरवत नाहीं. येणेप्रमाणे येवज रुये. पाठविला व कबज पाठवितो

४५००० पा विठूरपैकी औरंगाबादेची हुंडी. पाठविली आहे. शहरी पाठवणे.

४०००० मेणपुरीचे येवजी तुम्हीं लाला भिकारीदास याजला देविले त्यास येकादोन रोजी बाबु निहालचद याजला रुये देउन कबज पाठवितो.

---

८५०००

लेखांक [३३०] श्री * संवत १८१२ कार्तिक शुद्ध १५
[१८ नवंबर १७५५]

पुा राजेश्री रामजीपंतभाउ स्वामीचे सेाा

विनती उपरी. तुम्ही स्वकीये आथ लिहिला आणि रागे भरुन लिहिले तेही कलले. तुम्हीं रागे मारिला तरी फिकिर नाहीं. पाा विठुर येथे साल गुाा विस्वासराउ याणी कजिया केला. त्यास आम्हीं गम खाउन त्याजलाच खपीप केले त्यास साल मजकुरी त्याणी साल गुाचे कारकून दूर केले. साल मजकुरी दुसरे कारकून त्याणी ठेविले. हाली सलुखे वर्ततात. गाव वाटणी तो केली नाहीं परतु बहुलास लावणीस गाव साल मजकुरी वाटून घेतले त्याजमुले कजिया वारला. पुढे तुमची आमची भेट जालियावर जागा वांटून घेउन. साल मजकूरची फिकिर न करणे. येदा सिवराजपुरकराचे पारपत्य करणे आहे ते करुन. वरकड मेणपुरीवाला राजा याजपासून साल गुाा मेणपुरीजवल येउन रुये आसी हजार ठहराविले. काही स्वार ठेविले. सात्य पोटास ठहराउन दिल्हे. राजा केसोराम नागर होता. त्याजला पोटास देउ करुन वजिराकडील फौजदार तो येकीकडे ठेउन राजे याचे हवाली कामकाज केले. अम्ही ठीक करोन शंमर स्वार राजेयाजवल ठेउन कुराकडे गेलो. त्यासमागमे रामाजी पवार वगैर मेनपुरीकडे आले. दोनतीन महिने कजिया जाला. तमाम मुलक मारु[न] गर्द केला. लाख रुये मेणपुरीकरास पडिले. त्यांजवर वेसाखमासी चिरजीव जनार्दपंत पाा. काही थोडेबहुत काम जाले. राजा भमी की मी काय करावे. पावारानी जागा मारली. त्याजवर मुगाव परगनेत पठाणास आहमदखान पठाणास जागीर जाली. अम्हास संकट आले. मुगावात पठाण बसले म्हणजे इटावे सकूरेवाद फफुद तालगाव सोरीट सकतपुर याचेमध्ये हे जाले कामाचे नाहीं जाणून दिलीस वजिराकडे पैगाम करुन मुगाव परगणा ईजारा करुन घेतला आणि चिरजीव जनार्दनपत मेणपुरीकडे पाा. त्यास राा आपांचे वर्तमान ईकडे आलियावर तमाम जमिदार हरामजादगीस येउन लबाडीस आले. मणपुरीकराने जमाव करुन चिरजीव जनार्दनपंतावर छापा घातला. जुज मातब्र जाले. तीसपसतीस घोडे पडिल. मलेमाणूस ठार जाले. थोडी जखमी जाली. फारच कजिया जाला. हा कजिया मेणपुरी जाला. तो मिरजा साकर मेवाती व पतसिकतरेकर वगैरे चार हजार प्यादे दीड हजार स्वार जमाव करुन सकूरावादेवर आले. तीन गडी घेतली. त्याजवर आम्हास वर्तमान कलले. धावोन गेलो. तो सकूरावादेहून मोरो कृष्ण

विशेष. तुम्हीं वरात रा भिकारीदास याजला जोणपुरचे बाकीचे येवजी केली. दोलतसिग भिश्र याजला देविलेत रुये ४०००० चालीस हजार ते रुये पुगणे देउन कवज घेउन कवजेची नकल पाठविली आहे. मार्ग कठिण म्हणून असल कवज न पाठविली. बाकी आसी हजार राहिले त्याचे वाइदे राजेयापासून करून घेतले आहेत. वरचेवर वसूल करुन तुम्हाकडे हुडी पावेल. वरकड वर्तमान तर अम्हीं देशास जातो. वरचेवर लिहित जाउन. आमचे मानस होते मारवाडचे कामकाज तुमचे जालियावर देशास येता. समागम अम्हीं येतो. त्यास काम विलंबाखाले पडिले. पाउस त्या रानी नाहीं आणि दाणा महाग. त्यास जे वर्तमान असेल ते सविस्तर लिहिले पाहिजे. वरचेवर वर्तमान लिहित जाउन. माधोसिगाने फौज ठेउन बाहिर निघाला म्हणून वर्तमान आहे. दिलीत पातशा वजीर याणीही बाहिर[१७८] प्रस्तान केले. येक आजमेरीकडे याबे थिजेसिगाचे साहित्य करावे. माधोसिग आपण येक होउन तिकडे जबरई मराठेयाची

(१७८) पहा ले ४९, १५३ टीप २१, ९३ सावरेंत पाथ शिरताच अजमेरचा सुभा अहदनाम्यात मराठ्यानी सावला तेव्हा रजपुताशी लढा पडला त्याविषयी केवल एकच पत्र उपलब्ध आहे. [खड १० ले २९५] या पत्राचा लेखक जयपुर येथील मराठ्याचा वकील असून मारवाडात भोइटे गेला असता जाट व कछवा याच्या भेटीचा सवाद तो देत आहे पत्र महत्वाचे असून राजवाड्यास काल सापला नाही याचे आश्चर्य वाटते जाट व जयपुरकर याची दुसरी भेट नवबर १७५३त झाली [खड ६ ले २१५] अर्थात् ही पहिली भेट त्यापूर्वी म्हणजे १० अक्टुबर १७५२ नतरची समजली पाहिजे. [भाग १ ले ९८, १०३] 'आपली फौज शामिल जालियामुले रामसिगजीची बाजी सरशी दिसते विकानेरकर अद्यापि उभयपक्षी शामिल जाला नाही माधवसिगजीचा व बखतसिगजीचा पूर्वीपासून स्नेहभाव होताच साप्रत काली त्याजकडील कर्णीदान चारण येउन पेमसिगजीचे विद्यमाने मजबूती करुन गेला न कले कसा काय करार जाहला एवच टीका पाठउन एक्यता आणविली कुसलसिग झालावेकर याजकडील राडा होता त्यास सौख्य सपादून दिधले इतक्यात सुरजमल जाट यासह पेमसिगजी येउन पावले सुरजमलजीसी व बखतसिगजीसी परम स्नेह याजकरिता त्यानीही बहुत काही विचार केला की इतके दिवस दक्षणी चौथाईचे ग्राहक म्हणवीत होते. आता सर्वस्व ग्राहक जाले. आगरियात दखलच केला. राहिली अजमेर याचीही सनद हाती ठेवितात फौज रामसिगजीचे कुमकेनिमित्य गेलीच आहे. तुर्कानीही तिकडेच डौल दिधला आहे. या गोष्टीची पैरवी आतापासूनच केलिया उत्तम. याचा मनसुबा दिसोन आला की वजीरसार्वभौमादिकासी भर भरुन एकदा राजविराज करुन सर्व जमिदार राजे येकत्र होउन पुरुषार्थ दाखवावा समदुखी तो सकलही जाहालेच आहेत' हे भविष्य किती खरें निघाले याची साक्ष हे वुंदेल्याचे पत्र होय 'वजीर हिंदुस्थानाचा विघाड रजपुतास घेउन करणार' या अताजीपताच्या किंवा 'रात्रदिवस सर्व चिंतामग्न आहेत' या गलगलेकराच्या बोलाचे वर्म कळत नव्हते त्याची आता चागली जाणीव होते [पेद २१ ले ५५ पेद २७ ले १०६] चौथाई की निमें राज्य हा मुख्य राडा होता निमे राज्य घेण्याची नीती स्वकीयपरकीयात कशी खेळत होती याची चिकित्सा करुन त्याचे उत्तरदायित्व कोणाच्या वाट्यास किती जाते हे पहावे लागेल ले ४९, २९५ खड ६ ले २७६ वाड ३ ले २२, २९, ४७, २०५ पेद २ ले ५६, ८४, १०४ पेद २० ले २९ पेद २१ ले ११, ७९, ८२, ८३ पेद २७ ले ८७ ही पत्रें या बाबतीत मननीय होत

येणेप्रमाणे पचासी हजार देविले. साल मजकुरी येवज चिरजीव बाबा वरचेवर आपणांकडे पाठवितील. मेणपुरीचा येवज वायदे केले आहेत. वरचेवर बाबु निहालचंद ाचे पदरी घालून तेही कबज पाठवितील. सध्या चाळीस हजाराची वरात केलीत. हे ार रोजात कबज पाठवितो. तमाम मुलकात जमिदार हरामखोरी करितात. बारातेरा ेर धान्य. तमाम मुल्कात डाके पडतात. चोरमये जाले. लिहिता विस्तार आहे. वरकड ]दावनी घाट तुम्हीं बांधता त्याजविसी रा। मोरो कृष्ण सकुराबादेचा अमलदार त्याजवर ्हा हजार रुये घाटास देविले आहेत. घाटावर जो कोणी तुमचा असेल त्याजवळ चेटी पाो तो सकुराबादेहून रुये घेउन जाईल. मोरोपंत यास तुम्हीं पत्र आपलें नावे ेणे की रुये फलाणे यांस देणे म्हणजे मथुरेस पावते करून देतील. भाउ अम्हीं कुरे ाविसी फार श्रम केले. जिवानसी खर्च जालो होतो. खर्चाखाले आलो. खावदानी बूझ ा केली. बरे. दरबारी जातो. जे तुम्हास साहित्य होईल ते करावे. वरचेवर लिहित ावन. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

ेखांक [३३२] ।।श्री * संवत १८१२ कार्तिक शुद्ध १५
[१८ नवबर १७५५]

पुा राजेश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

विनती उपरी. वारवार काय लिहिणे जे आम्रु आमची ते तुमची. जीव जेथे ेक तेथे दुसरा विचार काये लिहिणे बरे ईश्वर सर्व उतमच करितील. तुम्हास जसे ंकट पडिले आहे ते सर्व आम्हीं जाणतो. त्यांस ईश्वर सर्व परिहार करील. वर्तमान लिहित जाणे. सागरपावेतो आम्हीं पत्रे तुम्हास लिहित जाउन. साराश अम्हीं मोठे पेचात डिलो. येक ईश्वर परिणाम लावील तरीच लावील. नाहीं तर ईश्वरावर भार आहे. तुम्ही सगी असता तर मोठे कार्य होते. त्यास मोठे पेचात गुतला. असो. तेथूनच जे होईल े साहित्य करणे. वरचेवर लिहित जावे. मिती कार्तिक * सुध १५. बहुत काये लिहिणे ोभ असो दीजे हे विनंती.

---

ेखांक [३३३] ।।श्री * संवत १८१२ मार्गशीर्ष शुद्ध ३
[ ६ डिसबर १७५५ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी

पोष्य गोविंद बलाल [बुंदेले] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ाा मार्गसीर * शुध ३ मुा रायेपुर जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे

प्रयुक्ती जालियामुळे फांजा अगदीच राहिल्या. श्रीमंत कोकणातील किले पाहावयासि गेले. ऐसा इकडील विचार. मातुश्री ताराबाई सातारा गेली. राजमुद्रा[१८०] नाही. कळले पाहिजे. अम्हास रा पाटिलबावानी पांचसे रुये उनेलीवर देत होते ते तुम्हाकडे

---

ही गोष्ट हातची नव्हती. तथापि तसल्या प्रकार सोवत्याचा म्हणता येणार नाही स्नेहाचा साधा संल झाला ही गोष्ट पानिपतच्या पराजयाचे प्रमुख कारण होय असे मत बखरीचे आहे ते १७४८ व १७५७ या दोन स्वाऱ्याचे मनन करिता कदाचितच चुकीचे ठरेल असे वाटते अस्तु याविषयी कोणाचे घोडें कोठें अडले हा प्रश्न सोडविण्याचे काम वाचकाचे होय

(१८०) 'हिंदवी स्वराज्य करणे' हे शिवरायाचे ब्रीद असून [खड १५ ले. २६८] या 'स्वराज्य-साधनाचा' अर्थ 'हिंदुपदपातशाही' होता अशी भूषणादिकाची वाणी सागते [भूषण ७८] आणि 'दक्षणची पादशाही दक्षणियाच्या हाती राहे' असा लेख प्रत्यक्ष शिवाजीचा आहे [शिपस २ ले १९०१] या वाण्याचा म्हणजे हिंदुपदपातशाहीचा उच्चार करणारें शिवकालीन पत्र अद्याप उपलब्ध व्हावयाचें असले तरी या ध्येयाच्या व्यापकतेविषयी आता शकेस वाव मुळीच उरत नाही. कारण 'महाराष्ट्रधर्म रक्षावा म्हणून विजापुर भागानगर औरगाबाद व दिली घेण्यासाठी' ४ जून १६९१ रोजी घोरपड्यास सनदच प्राप्त झाली होती [शिचसा ५ क ६] अर्थात राजारामाची ही महत्वाकाक्षा म्हणजे शिवबाची दीक्षा असली पाहिजे 'हे महाराष्ट्रराज्य आहे. तुम्ही या राज्याची पोटतिडिक धरता तरी कितेक राजकारणे आहेत चालणा करुन जमाव धरुन सावधपणे राहून स्वामीकार्य दृष्टीस पडेल ते करुन ठेविणे औरगजेबाचा हिसाब धरीत नाही ईश्वर करितो तरी फत्तेच आहे' ही भाषा वरील हेतु दाखविणारी आहे [खड १५ ले. २८२, ३४७] 'स्वामीचे वेलेस उभयता महापुरुष होते त्याच्या कृपादृष्टीने सर्व कल्याण होत होते. तथापि महाराज अवतारी बरदी होते तेणेकरुन इछिले पदार्थ सिधीस गेले. महाराष्ट्र नुतन निर्माण करुन स्वधर्मस्थापना केली'. असे आग्रे विपद करून सागतो तेव्हा शकाच कोठे रहाते ? [खड ३ ले २७३] राजारामानतर शाहु परत येईपर्यंत मराठ्याचा सेनापती धनाजी जाधव याची आकाक्षा काय होती याचा बोध पुढील पत्र करिते 'तुही निशेष करुन समुद्र-वलयाकित पृथ्वीत स्वामीचे शासन चालउन कृतकार्य व्हावे या [भावे] उदित होउन बुधिवैभवे-कडून समग्र सेना सजली जाउन योजिला मानस हा पराक्रमेकरुन अल्प काले सिधीते पाउन पुढे अनु-पद्रेकडून तात्राक्रात राज्य साधावें [प्रइ २५५]

यासबधी शाहूचे वैयक्तिक असे काहीच ठाम मत नसून 'हिंदुपदपातशाहीची स्थापना करण्याची प्रस्तावना बाजीरावाने केली' असा अभिप्राय राजवाड्याचा आहे. [ऐप्र १ पान ३५] त्याचा विचार करूं जाता हे विधान अवास्तव वाटते 'दिलेद्रास अत्युनमाद होउन फार अमर्यादाचरण केले त्यास कालेकरुन शिक्षा करणे ईश्वरासच अगत्य तदनुसार परयाय अलीगोहर याचे येण्यात दिसोन आले याचे येणे महदानदास कारण जाले' [खड ६ ले १०] 'बादाचे राज्य स्वराज्यात करुन सहा सुभे खेरीज गुजराथ मालवा साधेल तेथवर साधणे' [ऐप्र १ पान ३५] ही यादी मनन केली तर 'महाराज म्हणजे हिंदुपदपातशाही' या ९ मे १७१९च्या महजरातील उदगाराची कल्पना चागली होते [खड ३ ले १३५] 'परराज्य साधावे साहेबाचा चौका वसे ठाणी व जागा साध्य होत काटक हाता खाले येउन दुष्टास नतीजा पावे ऐसा येलउपाये करावा असा शाहूचा सकेत होता [पेद १७ ले.

जाली तर आतरवेद प्राते अमलात खतरा करावा हा विचार आहे. वरचेवर लिहित जाउन. मागे चिरंजीव बाळाजीस ठेउन अम्हीं देशास जाउन. तुम्हीं सर्व प्रकारे चिरंजीवाचा परामर्ष करीत जाणे. चिरंजीव वरचेवर तुम्हास वर्तमान लिहित जातील. आगरेयात हुडी मारवाडा प्रांतीची होत नाहीं याजकरिता हुडी दीड लाख श्रीमंत स्वामीनी देविले लाख रुये साही परगणेयाचे येवजी असे अडीच लाख रुये उजनीस रा। रामराउजीकडे जमा करविले. तेथून रसद रुये पावलियाची आलियावर पाठउन देउन. वरकड वर्तमान वरचेवर लिहित जाउन. तिकडील नवलविशेष लिहित जावे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती. मुजरद जोडीसमागमे पचेतालीस हजार रुये याची हुडी ओरंगाबादेची भिठुर येवजी पाठविली ते पावलीच असेल. उत्तर पाठवीजे हे विनंती. रा। अंताजी मानकेस्वर यासी पत्र पा। आहे त्यास प्रविष्ट करुन उत्तर घेउन पाठविणे. हे विनंती.

---

लेखांक [३३४] श्री * संवत १८१२ पौष शुद्ध ५

[२२ जनवरी १७५६] ?

राजश्रियाविराजित राजश्री

बाळोबा दाजी स्वामीचे सेवेसी.

सेवक नारो विठल कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. यथील क्षम ता। पुष्य * वद्य ५ मु॥ पुणे जाणून स्वकीय लेखन करीत गेले पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्र येउन कुशलार्थ कळत नाही तर ऐसी निष्ठुरता किमपी न करावी. सदैव पत्र पाठवीत असावे. यानंतर आम्हाकडील वर्तमान तर आम्ही यथ पुण्यात आहो. यदा नालबंदी समाजावीस[१७९] नाही. दंगा असावा तर थावी ते निर्वैर

(१७९) पहा ले. ५९ टीप २७ सैन्य घटविल्याचे कारण 'निर्वैरप्रयुक्ती' असे या पत्रात दिले असून अन्यत्र निराळेंच निदर्शनास येते [लि ३३४] कारण कोणतेही घडले असो परतु ही उणीव मराठ्यास घातुक झाली असून अवदालीविषयीची जबाबदारी आणि तदगभूत महाराष्ट्रमय करण्याची कल्पना या दोन्ही गोष्टी त्यामुळे पार पडू शकल्या नाहीत हे मात्र खरे होय स्नेहाचे जुग होते तोवर अनेक सकटें आली पण ती सर्व वारापाणी झाली असे इतिहास सर्वांस सागतो. या दृष्टीने उभयता एकत्र असते तर अवदालीस केव्हाही भारीच होते त्यात अहदनाम्यानुसार बादशाही सैन्य मिळते तर पारपत्य अगदीच स्वल्प होते. अवदालीचें परचक्र वारून महाराष्ट्रधर्मप्रचारार्थ ज्या पवित्र तत्वांची उभारणी झाली त्याची वजावणी मात्र होऊ शकली नाही. मोगलपक्ष अनुकूल किंवा प्रतिकूल होणे

जाले तेच आहे. यात आपण सर्वज्ञ. आम्ही तो ऐवज यात्रेचा करून ठेवीत आसो. सन्मार्गी पाहून ठेविला आहे. यात जे आपणास उचित आसल ते पूर्त चित्तात आणून पाठवणे. आम्ही पदरीचे आसो. इकड महागाई बहुत. आजीपावतो दोन पाइली दाणे आहेत. बहुत लिा म्हणून रागास न यावे. बहुत काय लिा आजुरदार कासिद रिकामा न पाठवावा. सदैव पत्री सांभाळीत आसावे लोभ आसो दीजे हे विनती.

---

टाकल्यास चोरचोर खातील आणि मोडल्याचे श्रेय आपणाकडे येईल 'दुसरे छत्रपती जीर्णोधार केल्यास सतोप मानतील [ब्रन पान ११८, ११९] नादिरशाह 'दक्षणेस चाल करणार मोठे अरिष्ट आहे याची पैरवी हिंदुस्थानची फौज सामिल करून घ्यावी आणि चमेलीपलीकडेच गुतवावे ये गोष्टीची तरतूद करण्यासाठी [पेद १५ ले ५५] मेवाड मारवाड व जयपुर या तीन वलिष्ट हिंदुराजाकडे राज-कारणे चालू झाली 'रायाचे मनी राणाजीस दिलीत तक्ती बैसवावे सबब जे वरकड राजे थोर असताही राउस सलाम करणार नाहीत आणि राणाजी व राजश्री एकच आहेत. बदल राणाजीस बसउ' हे आमिष पेशव्याकडून दाखविण्यात आले ते चिंतनीय होय [ऐच क ४ ले. ७] याच वेळी 'दक्षिणेत कुल मोगलाई अमलाचा बदोबस्त केला पाहिजे असा विचार होता पण वरील दोन्ही गोष्टी प्राय असाध्य झाल्या कारण की सर्व सैन्य या वेळी वसईवर गुतले होते त्यामुळे काहीच करता आले नाही आणि आकस्मिक लाभलेली सोन्याची सधी वाया गेली इत्युत्तर हिंदुपाद-शाहीचा छत्रपतीचा अधिकार सपुष्टात आणून तो बळकावण्याची महत्वाकांक्षा पेशव्याची प्रबल होऊन प्रगट झाली हे निश्चित होय. 'महाराजानी मालवा दिली आगरे प्रयाग पटणे बुंदेलखड इतका मुलुक दिला असता रोखे करावे ऐसे नाही' हा निर्देश पेशव्याशी समजोता झाल्याचे दाखवितो [पेद ३० ले २४५] पण त्याचा विस्तारे उलगडा होत नाही 'सा सुभे दक्षण मोकली व्हावी' या भावें ही सवड कदाचित मिळाली असावी किंवा पातशाही गर्दीनतर ती धारणा झाली असावी [पुरदरे १ ले १३९] १७४०त बाजीरावाचा अत होऊन नानासाहेब पेशवाईवर आले 'याचे समाधान तेच रक्षून सर्व राज्यभार चालवावा हेच योग्य आहे' इतकी समती मिळण्यासारखी सहानुभूति कोल्हापुरकराशी होती. [ पेद ३० ले २२७ ] एकच हिंदुपातशाहीच्या मधाचे बोट प्रथम बाजीरावाने मेवाडकरास चाखविले तेच आमिष नानासाहेबाने करवीरकरास दाखविले 'शाहूचा जीवात्मा तो बाह्यात्कारी त्याचे सेवक अंतर्यामी स्वामीचे. शाहु कैलासवास केल्यावर दोही राज्यावर [ सत्ता ] स्वामीची आणि आम्ही सेवक स्वामीचे' [ कास ले २४६ ] या आमिषालाच दोन्ही राज्याचे एकीकरण अशी सज्ञा राजवाड्याने दिली आहे खरी पण वरील शब्दात एकीकरणाच्या उदात्त तत्वापेक्षा स्वार्थाचाच गध अधिक येतो 'पूर्वसकल्प सिधीस नेउन प्रमाणिक वचन पहिली बोली केली आहे करारदाज यादी लेहून दिल्या आहेत त्याप्रमाणे निदर्शनास यावे' याचे स्मरण शाहूचा अत समीप आला असता करवीरकराने यावे हे सहाजिकच होते. [पेद ६ ले. १, २] 'शाहु मरते वेलेस काय काय बोलले होते सकवारबाई बोलली की राज्याचा खावंद सभाजी हे नवे उभे केले हे खूळ आहे या खुळाला हाती धरुन बघावील ही गादी धन्याची त्यास देईल त्याचे बरे होणार नाही हे साफ सती निघते वेली बोलली स्वामीसही स्मरण असेलच त्यास सकवारबाई व राजा याचा भाव कदापि दुसरा नव्हता परंतु ते वेलेस चौघानी भर देउन त्याचे येकू नये असे करून हे खूळ उभे केले या झाडास एरडयाची फळे आली सभाजी

देविले. ते सनद मागा पाठविली ते पावलीच असेल. तर सदरहू पांचसे रुये व आपले दात्रत्व सदापासून पावले नाही. ते एसे मुजरद कासिद पाठविला आहे तर उजनीस पावते हुंडी करून करावे. तथून जिवबा आम्हाकडे पावते करतील. कदाचित रागास येउन कर्ज देणे ऐसे म्हणतील तर तोच प्रकार आहे. आपले वचन

---

१२ ] 'दक्षण प्रातीच्या मनसब्याची कल्पना चितात आहे ते तपसीले पहिले लिहिले आहे. विदित होईल. स्वामीचे चितास उतरेकडील भर भरला आहे तो मनसबा करालच. दिलीसी ढेहा लाविला म्हणजे कोणे वेलेस तऱ्ही अरिष्ट येईल [पेद १७ ले. ४७] उगीच निजेली गावले उठविली' न पाहिजे असा शाहूचा कल होता. [पेद १७ ले १८] अर्थात प्रस्तावनेचे प्रयोजनच कोठें रहाते ? प्रथम दक्षिण की उत्तर एवढाच भेद होता

यासबवी शाहूचा शब्द पाळला जाईल अशी परिस्थिति १७३१ नतर राहिली नव्हती याला कारण दाभाड्याचा नाश हे होय 'दाभाडा मारिला महाराजानी आमचे काय केले' अशी वृत्ति पेशव्याची झाली [पेद १७ ले ३०, ५३] 'रायाचा प्रताप येसा आला की हस्तनापुरचे राज्य घेउन छत्रपतीस देतील तर आज अनुकूल आहे [पेद ३० ले १३४] परतु दक्षण तालुका द्यावा हे स्वामी कदापि सागणार नाहीत [पेद १७ ले ४७] या निराशेमुळें शाहूचा शब्द शेवटास कसा जावा आणि मराठ्याचे घोडें उत्तरेकडेच धाव का मारू लागलें याचे रहस्य कळते. १७३५च्या अती पेशवा स्वारीस निघाला तो शाहूची आज्ञा घेऊन चालला नव्हता तेव्हा याला प्रस्तावना म्हणता येईल काय ? स्वामीची आज्ञा न घेता तातडी करण्याचे दुसरे कारण असे दिसते की मोगलाचा सेनापती खानदौरा व त्याचा सोबती सवाई जयसिंग या दोघाचा पराजय शिदेहोलकरानी याच वर्षी केला होता ती शिकार हातची जाऊ नये असे समवते दिल्ली हस्तगत करुन दिग्विजय सपादावा असा मानस पेशव्याचा होता यात शका नाही परतु कित्येक हितचितकास हे कार्य साहसाचे भासत होते 'मनसबा करणे तो बहुत विचारें केला पाहिजे [पेद १५ ले २१] एकेच दिवसी सर्व पृथ्वी गोला करावी यैसे नाही' असे रेटरेकर व पुरदरे निक्षून सागत होते. [पेद १४ ले. ५४] या सदेहास्तव दडनीति सोडून साममार्गाचा अवलंब करून सरदेशमुखीच्या बरोबरीनें सरदेशपाडेगिरी इत्यादि हकाची मागणी केली. हेतु हा की दक्षिण तालुका स्वामी देत नव्हते तो मोगलाच्या नावावर पदरात घेऊन दोहीकडे पगडा बसवावा. मागणीचे वाढते माप मोगलास मानवेना. त्यात निजाम बलिष्ट असून त्याचा अतस्थ विरोध होता. तेव्हा भोपाळावर युद्ध होऊन निजाम 'ठिकाणी लागल्यावर अवघी दक्षिण निर्वेध होईल' असा सकल्प होता [ब्रच ले ३३] तो मावळून शेवटी मालवाच पदरात घेऊन सतोष का मानून घ्यावा लागला याचे कारण उघड होत नाही. ज्या साली हा प्रकार घडला त्याच वर्षाच्या अखेरीस नादिरशाहाची स्वारी झाली 'स्वामीचे वचन पातशाहासी गुतले आहे की परचक्र आले तर सर्वस्वे साहित्य करावे.' [पेद ३० ले २२२] याचा अर्थ पेशव्याने असा केला की 'छत्रपती पातशाही इछित नाहीत. तोहमास गारडीचा खेल आला. सर्व सृष्टी नवीन जाली. तोहमास्तकुलीने बाजी जिकली परतु औघ्या हिंदुनी हिंमत धाधल्यास पातशाही हिंदुचीच होईल एसा प्रसग दिसतो पातशाहीचा बंदोबस्त केल्यास लौकिक मोठा. त्यास आपण राजकारण राखून अमिरुलउमरा यासारखे व्हावे पोटास फौजास लागेल ते पातशाही माल पैदा करुन त्यात घेउ फौजेस जागिरा अलाहिदा मागाव्या आणि सर्वास राजी करावे. मोडून

लेखांक [३३५] ॥श्री * संवत १८१२ पौष वद्य १३
[२९ जनवरी १७५६]

श्रीमंत राजश्री भाउ स्वामीचे सेवेसी.

पोष्यं अज्ञांधारक यादो[१८१] रामराव सां। नमस्कार विनंती. येथील क्षेम ता। पोष्य * वद्य १३ मु।। लस्कर दरजागा ना। सानूर कोस तीन जागून स्वानंद लिहावयासि लेखकासी अज्ञापिलें पाहिजे विशेष. [बहुत] दिवस जाहले वडिलाकडून पत्र येउन वृत कळो येत नोते म्हणून चित सचित होते. तो कऋव्यार्चे पारपत्य कल्याची पत्रे श्रीमंतास आपली आली ते वाचून सविस्तर कळोन बहुत समाधान जाहाले श्रीमंत हे विजयाचे वृत वाचून परम सतोष पावल्याचा ताल सर्व श्रीमंताच्या पत्रावरोन सेवेसी श्रुत होईल. यानंतरे येथील वृत तरी पूर्वीपासोन लेख करीत होतो त्याजवरोन श्रत जाहालें असेल. आलीकडील वृत श्रीमताचे लग्नसिधी मार्गेस्वर शुध १४ कृष्णातिरी जाहाले. लग्नसिधी करुन सत्वरच हिंदुस्थानात आपणांकडेस श्रीमंत रा। दादासो येणार होते परंतु साप्रंत्य मुरारजी घोरपडे व मुजफरजंग व सानूरकर पठाण येकत्र होउन बारा हजार फौज व दा हजार प्यादा सानूरापासोन तीन मजली चालोन आले. त्याचे पारपत्य करणे जरूर जाहले त्याजमुले तमाम लोकास पत्रं पाठउन फौज जमाव करुन मु।। मजकुरास आलें. मार्गी येताना येक ठाणे वागलकोट म्हणून सोनूरचे पाचसात दिवस मोर्चे लाउन ठाणे घेतले तेन्हा मुरारजीस सलाबत बसोन शहराचा अश्रये धरुन राहेला आहे परंतु रंग दिसोन येतो की येक वेल लढाई जाहाल्याखेरीज गोष्टमात तहास येता दिसोन येत नाहीं. हा निर्गम अठापधरा दिवसानी विल्हेस लागल्यां लौकरच श्रीमंताचे आगमन हिंदुस्थानात होईल. इतकियावर पहावे. तुम्हाकडी [ल] पत्राचा मार्ग सलुक जाहाल्याचे रात्रंदिवस श्रीमंत त्रिवर्ग पाहातात. तरी तेथील प्रसंगीचे वृत श्रीमंतास वरचेवर लिहित असावे तेनेकडून बहु समाधान पावतील. येसे वर्तमान आहे.

---

(१८१) 'रामराव नीळकठ, रामराव नारायण व रामराव यादव' या नावाचे तीन पुरुष पूर्वपानिपतीय स्वारीत शिंद्यासमागमें होते चौथें नाव 'रामराव नरसिंह पुणतावकर' असेही आढळते [पेद २७ ले २७६] त्यापैकी कोणत्या रामरावाचा हा यादवराव मुलगा होता हे सागणे कठिण होय तथापि हा रामराव निळकठाचा पुत्र असावा असे वाटते. कारण की पेंढशाच्या पत्रात याचा जो निर्देश येतो त्याचा रामराव निळकठाशीच सबध दिसतो [लि ३००, ३०१, ३११, ३१८] हा राघोबाच्या स्वारीबरोबर उत्तरेकडून या वेळी देशी आला होता. त्याची पत्रें मात्र अद्याप सांपडली नाहीत

राजश्री त्रिंबकबाबास नमस्कार. दाजीस लिा आहे स्मरण देउन कासिद रा। करावा. चिरंजीव रा। गोपाळजीस आसिर्वाद. तुमचे घरीची समस्त सुखरुप आहेत. जिवबा आजीपा। येथेच पुण्यात होते. मातुश्री × × × [श्रीगों]बा गेले. हे अशिर्वाद. घरांत सौा आकास नमस्कार सांगणे.

---

आणावा गादीवर बसवावा सारे खुशालही होतील डागही लागणार नाही सकवारबाई जितसती आपली खावद आई तिनें सांगितले ते केले काही बेमानी नाही आपल्या खांवदाचे न यैकले आप.खी बुध धरली त्याचे हे फल येते हे पुर्ते समजावे'. [पेद ६ ले १४७] हे पुरन्दऱ्याचे पत्र वाचणीय असून पेशव्याच्या करणीत एकीकरणाचा अंश किती होता आणि 'कोल्हापुरचे न करने' हें पत्र कसे लिहिले गेले याचा विस्तार करणे नलगे वाचक स्वयम निवाडा करू शकतील.

४ जनवरी १७५० रोजी साताऱ्याच्या गादीवर रामराजा विराजमान झाला खरा पण त्यास राज्यारोहणाबद्दल जी भरपाई करावयाची होती ती तात्कालीन मापेतच देणे बरे 'पेशवे बाम्हनी राज्य करु म्हणतात' भरपाईचे स्वरूप असे वर्णिले आहे [पेद ६ ले १९, ५०, ६७, ६९] रामराजाचे वाढविलेले झाड एरव्याची फळे देणारे निघाल्यामुळे 'समूल वृक्ष काढतील तरीच या राज्याचा लगाम हाती' राहतो अशी विवचना लागली [पेद ६ ले ८७] हा हेतु ओळखून ताराबाईने जी राजकारणे केली ती श्लाघ्य होती अथवा नव्हती हा प्रश्न वादग्रस्त आहे तथापि तिच्या डागोऱ्याचा परिणाम एवढा घडला की इरानतुरानपासून रामेश्वरापावेतो दुर्लौकिक जाहाला तो दूर करावा अशी चिंता पेशव्यास उत्पन्न झाली. [खड ३ ले १३६] यामुळे झाडावर स्वत घाव न घालता कुऱ्हाड दुसऱ्याकडून घालविण्यासाठी करवीरकराशी सख्य साधून 'राजारामास कैदखल प्रतिष्टीने पोटास देउन ठेवावे पुरते ठिकाण लागेल तसे करावे असा सिद्धात ठरला [पुरंदरे १ ले. ३६९] राजा असल नसून नकल म्हणजे तोतया आहे अशी दौंडी पिटून त्याची मुद्राही बंद पडली करवीरकर संभाजी या वेळी का चचकला हे कळत नाही जीजाबाई वेगळे संभाजीचे येणे येकदर होत नाही असे जाले' इतकाच ओझरता उल्लेख वरील पत्रात येतो त्यावरून परिस्थितीचे आकलन बरोबर होत नाही एवढें खरे की यानतर त्याची अवश्यकता कमीच भासू लागली आणि नवीन मुद्रा आयणच करावी असा संकेत या भागातील पत्रावरून होतो. त्याचे कारण पुढील घडामोडीवरून असे दिसते की एका दगडाने दोन पक्षी मारावेत एवच हा वाद शिथिल होऊन लावणीवर पडण्याचे रहस्य काय ? १७६०च्या दिसबरात 'संभाजी समाप्त जहाल्याचे वर्तमान आल्यावर मुधोकर भोसले याचा भाउ राजा करावा. जिजाबाईने कारभार करावा ताराबाईप्रमाणे नेमणूक खाउन स्वस्थ राहावे याप्रमाणे कबूल केल्यास उत्तम नाहीतर जप्ती करावी असे ठरले' [ऐटि २ क्र १६] संभाजीची एक राणी गरोदर असून प्रसूतीची प्रतीक्षा न करिता ही व्यवस्था व्हावयाची होती. 'परामृषाचे पत्रही न पाठविता इकडील बदोबस्तास फौज पाठउन दिल्ही तेव्हा पताच्या गुणानुवधास सीमा आहे आणशफत वचनासी गुतले असता याप्रमाणे घडोन आले'. [पेद २६ ले २४९] याच सुमारास 'सातारा जाउन नवा राजा बसउन येणे असी आज्ञा' पेशव्याची होती [पेद ६ ले. २२४] असा हा एकीकरणाचा इतिहास सक्षेपांत आहे यालाच नवी मुद्रा करणे हे सांकेतिक नाव तत्कालीन प्रश्नात आढळते

आलीकडे तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही. प्रस्तुत कोठे आहा काये वर्तमान हे लिहून पाठवावें. ईकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री नानासाहेब व श्रीमत राजश्री दादासाहेब कोंकण प्रांत पाहावयास व पुल्याचे गणपतीच्या दर्शन[१८३] स्वारीस आले. समागमें आह्मी आहो. पुणियांत श्रीमंत भाउसाहेब व राजश्री विस्वासराउ आहेत. आपणास कळावें म्हणोन लिहिलें असे. तुमचे घरची सर्व पुणियात सुखरूप आहेत. ॥ बहुत काये लिहिणे लोभ असों धावा हे विनती.

राजश्री लक्षमणपंत वैद्य व त्रिंबकपत दिवेकर स्वामीस सां नमस्कार विनंती उपरी. पत्र पाठउन संतोषवीत जावे. नारोपंत दिवेकर आह्माबरोबर आहेत. तुमचे घरची माणसे सुखरूप आहेत. हे विनंती.

---

लेखांक [३३८] श्री * संवत १८१२ फाल्गुन वद्य ३०

[३० मार्च १७५६]

श्रीमंत राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी

पोष्य बापुजी बल्लाल [फडके] सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * २८ जांखर मुा। विजयदुर्ग येथास्थित आसें विशेष. बहुत दिवस पत्र येऊन परामृष होत नाहीं तरी सर्वदा सांभाल करीत असावें. श्रीमंत उभयेता कोंकण प्रांते स्वारीस व देश पाहावयास आलें. समागमे श्रीमत नाना फडनीस आहेत. आम्हास बरोबर आणिलें आहे. श्रीमत भाउसाहेब पुणियांत आहेत. दरबारची मर्जीस आपण वाकिफच आहेत. येदा फांज[१८४] ठेविली नाहीं. पैका कोणास देत नाहीं. कर्ज फेडावे हा हेत फार आहे परंतु फिटता दिसत नाही. आपणास कळावे. ॥ बहुत काय लिहिणे लोभ केला पाहिजे हे विनती.

---

(१८३) 'दादासाहेबाची स्वारी पुळ्याच्या गणपतीस गेली ती फाल्गुनात परत आली' अशी नोंद पेशवेशकावलीत आहे ती या पत्राधारे चुकीची ठरते [पेश १५०] कारण अगदी उघड आहे की १७५८च्या फाल्गुनात राघोबा लाहोराकडे होते [ले ८९, ९०, ९३, ९५]

(१८४) हा बापुजी फडके मार्मिक लेखक असून स्पष्टवक्ताही होता 'दरबारची मर्जीस आपण वाकिफच आहेत येदा फौज ठेवली नाही पैका कोणास देत नाही कर्ज फडावे हा हेत फार परतु फिटता दिसत नाहीं' हे प्रस्तुतचे वर्णन आणि 'घोड्यास दाणा ठाउक नाहीं घोडयामाणसात जीव राहिला नाही परिणाम कठिण दिसतो' हे पानिपताचे भविष्य चिंतनीय होय [पेद २ ले १३०] नानासाहेब पेशवा व सदाशिवराव भट या उभयताविषयी राजवाड्याची साधने व तदनुषंगिक चिकित्सेचा चमत्कार मावळून निराळीच चित्रें सशोधनाती निदर्शनास येतील यात शकाच नाही

रा अंताजीपंती पत्र कार्तिक वद १४ मितीचे पाठविले त्यात मार की अन्यरुद्रसिंग सुद्धा हजारा स्वारानसीं आपल्या गोटात येउन उतरला. नागोरचा सला ठहरला आहे. हे वृत मागाहून लखन करून पाठवितो त्याजवरुन निजध्यास आपल्या पत्राचा सर्वास लागला आहे. तर सविस्तर वृत खावदास लिहावे. वरकड वृत सर्व येथास्थित असें. निरंतरी पत्री वडीलपणें सांभालीत असावे. विशेष काये लिहिणे लोमाची वृधी केली पाहिजे. हे विज्ञसी.

---

लेखांक [३१६] श्री

[१७५६] ?

राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

विनंती उपरी. देसीहून आजच चिरंजीव रो बाबुराव याचे पत्र आले बसालतजंग आरकटेस जाउ[न] तेथील सुभा आपले मार्येत येउन फुलचरीचे फिरंगी सुधा सर्व येक गाठ जाहली. हे गोष्ट निजामअली यासही भारी जाहाली. वर्त सला बतजंग व निजामअली याचा मजकूर फुलचरीकडे जायाचा आहे. श्रीमंताचा त्या[चा] सहजच सन्मुख जाहाला. राजेश्री मल्हारजीबावाही या प्रांती यावयास मोकले जाहाले. सत्वरच येतील. । हे विनंती. हिसेब आपाजीपंत याजवळ बावा. हे विनंती. श्रीमंत स्वामीचे दैव थोर [की] बसालतजंगाने फिसाद केला. त्याचे कजियात निजाम गुतले. दहा लक्षाची जागीर आमदनगर दि[कि]ल मोगल देईलसे दिसते. श्रीमंत रा नाना स्वामीस शरीरी अवकाश नाहीं. श्रीमंत रा विस्वासराउ[१८२] स्वामी स्वारीस जातील. वर्त कजिया बारावसा आहे. हे विनंती.

---

लेखांक [३१७] श्री * संवत १८१२ फाल्गुन वद्य ३०

[३० मार्च १७५६]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

रामाजीपंत स्वामीचें सेवेसीं.

पोष्य बालाजी जर्नादन [भानु] सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तां छ * २८ जांखर मुा विजयेदुर्ग जाणून स्वकीये लिहित जावें विशेष.

---

(१८२) या पत्राचें वर्ष संदिग्ध आहे. होलकराचा तळ देशी असून ते उत्तरेकडे येण्यास मोकळे झाले अशी सधी १७५६ किंवा १७५९ ची होय. अर्थात पहिला योग येथें गृहित धरला आहे. [लि ७३] मास मात्र सांगवत नाही.

आलियाताा तुम्हाकडील व्रत काहीच कळत नाही. आम्हाकडील वर्तमान तरी भेटी जाहल्यानंतर सविस्तर लिाच होते. पावलच असेल. अलीकडील वर्तमान तरी गुदस्ताचा हिसेब विल्हेस लागला. साल मजकूर पर्जन पडिला नाही यामुळे नापीक आहे. अर्ध जमाहीं नाही त्याकरिता कारकून देणे [तो] तहकीकात करील त्यावरी त्याणी जबाब दिल्हा की कारकून कशाला पाहिजे. आम्ही त्या प्रांते येतो. बुंदी व जमिदार होळकराचे कमाविसदार तहकिकात मनास आणून निर्गम करून. तुम्ही कोटेस जाणे. महारावजीस ताकीद करून कराराप्रो रुपये आणवणे. नाही तर स्नेह राहणार नाही असे बोलिले. काये करावी. धणी ज्याप्रो आज्ञा करील त्याप्रो करणे आले. उदईक स्वार होउन येउ. येतो. तुम्हास कळावे याजकरिता लिा आहे. राजकी वर्तमान तरी रुपनगरात मोर्चे लाविले. जवळ गेले. सुरंग लाविला आहे. याचा मुदा घेतले विना सोडीत नाही. तोफा मातबर लाविल्या आहेत. फते करतील. येथून निर्गम जाहलिया त्याच मार्गे येतील असे आहे. तुम्ही आपले काजकाम शहाणपणे करीत जाणे. रामोस साणके ढोर दुर्जन सिंगाने घेतले त्याविसी श्रीमंताचे पत्र रावराजा उमेदसिंगास थैली पाा आहे. ते पाठउन गुरे आणवणे. बहुत काये लिहिणे हे अशिर्वाद. येथे राा नारबा नानानी वगैरे लोकानी गुलाबदाण्या व परजा नक्षी येण्या सागितल्या आहे तरी सातआठे गुलाबदाण्या व परजा १० येशा करवणे. तेथे होतील त्या तेथे करणे नाही तर कोटयातही काही थोडयाशा करवणे परंतु सत्वर करवणे. लस्कर त्या प्रांतास येतील तेव्हा वस्ता त्याच्या हवाला करावयास पाहिजे. तरी सत्वर करवणे. बहुत काय लिहिणे हे अशिर्वाद.

---

लेखांक [२४१] * श्रीशंकर

[१० मे १७५६]

सेवेसी राघो त्रिंबक कृतानेक साष्टांग नस्कार विनंती. लिा परिसोन सविस्तर वर्तमान तीर्थस्वरुपानी लिा आहे त्यावरून विदित होईल. व्दादसी त्रयोदसीस स्वार होउन येउ. सौसपना मातुश्री आकाजी व सौ बाईस साा नमस्कार प्रविस्ट करावा. सर्व खुशाल आहेत. सत्वरच येतील म्हणून सांगावे. बहुत काये लिहिणे कृपा असो दीजे हे विनंती. चिरंजी [व] राजश्री गोपाळरावजी ता चिरंजीव लालाजीस अशिर्वाद.

---

* हे स्वतंत्र पत्र नसून ले ३४०च्या अतीचा मजकूर असावा.

लेखांक [३३९] श्री * संवत १८१३ चैत्र वद्य १०

[२४ अप्रेल १७५६]

श्रीमंत राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचें सेवेसीं.

पोष्य बापुजी बलाल [फडके] सां नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता छ * २३ रजबु मुा पुणे जाणून स्वकीये लिहित असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणांकडून पत्र येउन परामृष होत नाही [तरी] सदैव पत्री सामाल करावा. श्रीमत कोंकण प्रांतें गेले होते ते फाल्गुन वद्य पंचमीस पुणियास दाखल जालें. आपणांस कळावें. राजश्री मल्हारजी होंळकर लोंणीवर काल आले. आज जेजुरीस जातील. येकदोन दिवस तेथें राहून मग पुणियास येतील. येथें आलियावर सविस्तर लेहून पाठउं. राजश्री हरीपतदादा [दाभोळकर] सर्व मनुषें सुखरुप आहेत. ।' बहुत कायें लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

राजश्री लक्षमणपत दाजी स्वामीस सा नमस्कार. लोभ करीत जावे हे विनंती.

'। सेवेसी माहादाजी बलाल [गुरुजी][१८५] सा नमस्कार विनंती. स्वामीचे घरची मनुष्ये समस्त सुखरुप आहेत. सदैव पत्री सामाल करीत असिले पाहिजे. बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

[पो] छ २४ साबान.

[२४ मे १७५६]

---

लेखांक [३४०] श्रीशंकर * संवत १८१३ वैशाख शुध ११

[१० मे १७५६]

श्रियासह चिरंजीव राजश्री नारोबा यासि बाळाजी यशवंत [गुळगुळे] आशिर्वाद. ता वैशाख * शुध एकादशी इंदुवार मुा रुपनगर सुखरूप आसो विशेष. आम्ही

---

(१८५) याचे खरे आडनाव कोठें मिळत नाही. 'गुरुजी' या नांवानेच त्याची सर्वत्र प्रसिद्धी होती 'महादाजीपत गुरुजी दप्तर कृष्णातीरपर्यंत होते ते माघारे गेले' असा पहिला शोध १७५५त लागतो [लि २९५] १७६०च्या अती तो पेशव्याबरोबर उत्तरेकडील स्वारीत होता [कास ले. १९२] नतर पहिल्या माधवराव पेशव्याचा तो विश्वासपात्र झाला. [इस २१ पान १३६] सखाराम पत बोकील व नाना फडणीस याच्या समान त्याची प्रतिष्ठा होती. याच गुरुजीच्या मध्यस्तीने पेशव्याचा गुप्त पत्रव्यवहार महादजी शिंद्याशी होत असे त्याचे केवल एक पत्र या भागात पहावयास मिळते तथापि त्याचा स्वतत्र लेखक शिंद्याकडे रहात असून त्याची काही पत्रेंही प्राप्त होतात. 'राघो बलाल सहस्रबुद्धे' उर्फ गुरुजी असे त्या लेखकाचे नाव असून तो १७६८ पासून १७८७ पर्यंत शिंद्याजवळ होता. मग तो या गुरुजीचा बंधूच असला तर न कळे या प्रकारे गुरुजी या नावाच्या दोन व्यक्तींचा व्यवहार शिंद्याशी होता ही गोष्ट वाचकानी लक्षात असू द्यावी. याच महादाजीपत गुरुजीच्या ठायी शिंद्याचा लोभ असून विश्वासही होता हे पुढें निदर्शनास येईल.

कळो आले की आपल्यास स्मरण नसेल. बरे आता स्मरणपूर्वक हिसेब पाहिला पाहिजे. सदरहू पाच हजार श्रीमंत राजश्री गंगाधरतात्याच्या [चंद्रचूड] नावे वसूल लहून सरकारचा कजिया फैसल तिकडेसच करावा अगर आपल्या चितास नये तर आपली खासगत चिठी पाठवणे म्हणजे आम्हीं तुमच्या नावे लेहून सरकारचे रुये राजश्री रामराउजीकडे जमा करून देउ. आम्ही स्वामी सिवाये काही नाहीत. जे आज्ञा कराल त्याजप्रमाणे वर्तणूक केली जाईल परंतु जोपर्यंत रा तात्याच्या विद्यमाने फैसल तिकडेच होईल तर उत्तम आहे. यावर आम्ही विजयादशमीचे दिवसीं मोहूर्त करुन सत्वरच सेवेसी येहून पावतो. भेटीनंतेर सकल वर्तमान निवेदन होईल. सदरहू पाच हजाराची रकम बा रोहिला मा राजेश्री दामोदरपंत [हिंगणे] वकील हे आपण आम्हापासून खासगत हिसेबी मजरा घेतले. सेवेसी कळावे यास्तव लेखन केले असे. विशेष काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३४४] श्री लक्ष्मीकांत

१४९ ]

[२४ नवबर १७५६]




राजश्री बालाजी पंडित प्रधान गोसावी यासि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. गोसावी यांनी पत्र पाठविले ते प्रविष्ट जालें. लिहिलें वर्तमान आक्षरशाहा अवगत जालें. राजश्री सिवाजी भिकाजी यांजकडे बाबती सरदेशमुखी प्रां वराड येथील साल गुदस्ताचा आषाढमासचा साडे ब्याणव हजार रूपये येणे त्यास मुदत होउन गेली त्यास तांकीद करून येवज पाठवावा मारनिलेचा बदोबस्त करून मामला यथास्थित चालविला नाही ह्मणोन येवजास दिरंग लागला. सिवाजी भिकाजी आपलें तर्फेचेच आहेत म्हणोन विस्तारे लिहिलें. एदियास गोसावीयानी आमचे

लेखांक [३४२] श्री

[१० जून १७५६] ?

अपत्ये बालाने[१८६] चरणावर मस्तक ठेउन सां नमस्कार. हाली पत्रें वडिलांकडून आलीं त्यावरुन सविस्तर वर्तमान कळलें. पत्रीं तपसील फार लिहिला परंतु आमचे स्मरण न जालें. वरकड श्रीकासीमध्य तीर्थरुप राजश्री दादा व मातुश्री आजीबाई सुखरुप आहेत सो॥ मातुश्री बाई यास जेष्ट वद्य प्रतिपदेस देवआज्ञा जाली. आपणास कळाव म्हणून लि॥ आहे. येथील वर्तमान तरी भेटीनंतर परस्परें निवेदन होईल. बहुत काय लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनती.

राजेश्री गोविंदराउभाउ स्वामीस सां नमस्कार विनंती. लि॥ परिसोन कृपा कीजे.

राजश्री लक्षुमण गोविंद दाजीस सां नमस्कार.

---

लेखांक [३४३] ॥श्री

[२८ सितंबर १७५६] ?

श्रीमंत राजश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे सेवेसी.

आज्ञांधारक लाला भिकारीदास[१८७] कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता॥ अश्विन * शुध ८ मुकाम उजेन जाणून स्वकीये कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. स्वामीनी पत्र पाठविले ते उत्तम समई पाउन वर्तमान अवगत जाले. पाच हजार रुपयेचा भार आपल्या पत्री व सरकारच्या पत्री लिहिला त्यांसि याचे वर्तमान येसे आहे जे सदरहु पाच हजार आम्हीं तुमच्या धरु हिसेबी मजरा दिल्हे. आपण हिसेब मनास आणिला पाहिजे. आम्हांकडे काही रकम राहिली नाहीं. हे रुपये आम्हापासून आपण मजरा घेतले आणि आम्हास दोनतीन टपकी लिहिले त्याजवरुन

---

(१८६) विसाजी दादाजी आठवले याचा हा बहुधा पुत्र अथवा आप्त असावा. कारण की हे नाव आठवल्याच्या पत्रात येते. [लि. ३०५] या पत्राचे वर्ष संशयित वाटते. सगुणाबाई भट यात्रेस गेली होती तेव्हा कदाचित हा समागमे गेला असेल असे समजून क्रम दिला आहे. तो मागेपुढें होऊ शकेल.

(१८७) 'सिद्याकडून भिकारीदास सुजादौला ह्याकडे आहे' असे भाऊसाहेबाने म्हटले आहे तो हाच वकील होय. [खंड १ ले. २०५] त्याचे नाव १७५५तही येते. [ले. ३३१, ३३३] अर्थात त्यापूर्वीच तो वकिलीवर असला पाहिजे. १७५१ हे साल धरले तर बाधगे नाही. या पत्रात दामोदर पंत हिंगण्याचे नाव दिले असून तो १७५७त मरण पावला [खंड १ ले. ६३, ६९] तेव्हां ओघानेच वर्ष त्यापूर्वीचें मानले पाहिजे.

लेखांक [३४६] श्रीशंकर * संवत १८१३ मार्गशीर्ष वद्य ५
[१३ दिसंबर १७५६]

श्रियासह चिरंजीव राजश्री नारोबा यासि बाळाजी यशवंत [ गुल्गुले ]
आशिर्वाद. येथील क्षेम ता मार्गशीर्ष * वद्य सप्तमी जाणोन स्वकीय लिहिणे विशेष. पत्र
पा ते पावले. दस हजार रुपायाच्या हुंड्या पाठविल्या. त्या पावल्या. बहुत काय लिहिणे
हे आशिर्वाद.

---

लेखांक [३४७] श्रीशंकर * संवत १८१३ पौष वद्य २
[७ जनवरी १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
गंगाधरबावा स्वामीचे शेवेसी.

पोष्य बाळाजी यशवत [गुल्गुले] सा नमस्कार विनंती. ता पौष्य * वद्य
द्वितीया भृगुवारपर्यंत यथास्थित असे विशेष. बहुत दिवस आपणाकडील कुशलार्थ
कळत नव्हता. सांप्रत आपले पत्र आले. राजश्री नारो शंकर याणी तोटाबा दुराग्रह
बहुतच केला. राजश्री लक्ष्मण नारायण व चंद्रभान सावकार दरम्यान होउन व्याज
कहून मुक्तता करून आपणासि ठेविले. तूर्त याचे अटकावात आहो. रा सदोबा व रा
रामचंद्र साबाजी उभयता येत्नास गेले आहेत असे लिहिले ऐसियास याणी हवाला
कितिक रूपयाचा घेतला बनोन काये आले हा सविस्तर वृत लखन करावा प्रस्तुत
वर्तमान येकितो की रा भवानी शंकरजीचे पुत्र तेथे आहेत त्यासि रा नारो शंकर
याणी कजिया आरंभिला. त्याचा त्याचा इतला तो काहीच नाही. महाली येत तो
तुम्हाकडून होती. हा काये विचार आहे. असेच असले तरी त्याचा उपराला करून
त्यासि कजिया न होये ते करावे. लेकरे आहेत. त्याच्या कर्तुत्वावर नजर न द्यावी.
आपला स्वधर्मच करावे. यानंतर सौ चिरंजीव आनुबाईस आणावी. मुहूर्त पुढा
नाहीं. आपण लिहिले की संकट प्राप्त जाले हे मुक्त जाहलियावरी पा तरी सरकारचा
तो गुता उरकला. मुहूर्तासही आवकाश आहे. तरी आपण कृपा करून हा मुहूर्त
साधलाच पाहिजे. तेथूनही मुक्तता जाहलीच आहे. त्यास आपल्या विचारे होईल
तरी हा मुहूर्तच उतम आहे. उद्याचा दिवस कसा येईल हे कळत नाही. आम्ही तो
लिहितच गेलो. तुमच्या चितास येईल ते खरे. सहा वर्षे लग्नास जाहली. आद्याप
दर्शन नाही. ऋणानबंधास काय इलाज आहे. बहुत काय लिहिणे. उतर येईल त्या
प्रो करू. कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

निसबतीस अमल दिल्हा आहे त्याचा बदोबस्त न केल्याने सरकारचा येवच सुटेल कीं काये. मामलतीचा बदोबस्त करणे तो- आम्हीं केलाच आहे. सिवाजी भिकाजी आमचे तर्फेनेच आहेत. सरकारचा येवज मुदतीस पाठवावा उचित गोटी परतु निजाम आली आले याणी वराडात दंगा नजरेचा केला यांजमुळे माहालोमाहाल बाकी ‹ राहिली आहे म्हणोन मुदतीस अंतर जालें. अत:पर आम्हीं वराडांत येतांच झाडियानसीं येवज पाठवीत आसो. पेस्तर सालचा मजकूर लिहिला त्यास सरदेशमुखीचा अमल आम्हाकडे तहनामियांत गोसांवीयानी लेहून दिल्हाच आहे त्याप्रमाणे साल मजकूरचा येवजांची ताकीद मामलेदारांस केलीच आहे. कराराप्रमाणे अंतर होणार नाही. ‹ रा छ * २ माहे रविलवल. वराडात आलियावर आईवजाचा निकाल मामलेदारास सागून जलदीने आईवज पावे येसे होईल. सूज्ञा प्रती विशेष काये लिहिणे. कृपालोभ आसू दिला पाहिजे हे विनंती (मोर्तब सुद)

पो छ २८ रविलोवल
[२१ दिसबर १७५६]

---

लेखांक [३४५] श्रीशंकर * संवत १८१३ मार्गशीर्ष शुद्ध १४
[५ दिसबर १७५६]

श्रियासह चिरंजीव राजेश्री नारोबास बाळाजी यसवंत [गुलगुले] आशिर्वाद उपरी. ता मार्गसीर्ष * शुध चतुर्दसी जाणोन स्वकीय लेखन करणे विशष. जवारी याची मोतेची जाडी चौकडी व नथ येक व आगोठ्या २ हिरेची येक येक पंनाची यैसा माल सातसे रुपयेचा घेउन हुंडी करून दिल्ही. हुंडी झूटी निघाली. यैसियास तो भूदेवजीचा जावाई आहे. माल आमचा आहे. तरी तुम्ही येत्न करून माल घेणे. जवारी मार याजकडे आमचे रुपये येणे आमचे रूपा घेउन उद्यम करितो याजकरिता लिहिले असे. वस्ता त्याणी गहाणे ठेविल्या असतील तरी आपले पदरचे रूपा सेपंनास देउन माल आपले हस्तगत करणे. आधी तों जेणे करून माल ये ते करणे. त्यापासी काही द्यायास नसले तरी आपणापासून रूपा देउन माल घेणे. या गोष्टीस अंतर न करणे. हे आशिर्वाद.

---

याची आसामीचे वेतन साला रूपये ७५० साडे सातसे देविले असेत तरी राजेश्री धोंडो रघुनाथ दिा श्रीमंत राजेश्री मल्हारजी होळकर याजकडेस रुा पाविले असेत. सदरहु सनदाप्रो रुपये साडे सातसे मारनिल्हेस देणे. सके १६७८ धातानाम संवत्सरे फाल्गुन * सुध १४ मुा लस्कर नजीक गंगरड. बहुत काये लिा कृपा निरंतर असो देणे हे विनंती.

पो छ २३ जाखर
[१४ मार्च १७५७]

---

लेखांक [३५०] श्री * संवत १८१४ वैशाख शुद्ध १
[१९ अप्रेल १७५७]

राजश्री लाख्याजीबाबा कमाविसदार
प्रो कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्षमीअलंकृत राजमान्ये स्नो गिरजाजी शहाने दिा चिंतोजी नारायेण दंडवत विनंती उपर. लिहावया कारणे की आमचे आसामीचा वरात तुम्हावर प्रो पाटण याचे ऐवजी रूपये २५० आक्षरी आडीचसे याची राजश्री चिंतो नारायणाची घेउन आलो होतो ते सदरहु आडीचसे रुपये भरून पावलो. रूजू करून देउ. हे कब्ज लिा सही. मिती सके १६७९ ईस्वरनाम संवत्सर वैशाख * शुध १ प्रतिपदा समत १८१३. बहुत काये लिहिणे हे विनती.

नगारा निशाणी.
गाही. बा दादो अनंत कुलकर्णी मोजे दौसी
फडनीस दिा श्रीमंत सुभेदार

---

लेखांक [३५१] श्री
[२७ अप्रेल १७५७]

सहश्राये चिरंजीव विजईभव राजश्री रामाजीपंत यासी प्रति गंगाज्यान्हवी राधाबाई कृतानेक आसिर्वाद उपरी. येथील वर्तमान वैशाख * सुध ९ पर्यंत कुशल जाणउन स्वकीये वर्तमान निरंतर लिहित असिले पाहिजे. यानंतर मल्हारीसमागमे पत्र पाठविलें ते पाउन समाधान जालें. येसेंच निरंतर पत्र पाठवीत असावे. यानंतर पत्री लिहिलें कि माया निस्ठुर केली पूर्वमायेस अंतर पडिले त्यासी आमची ममता पूर्ववतप्रमाणे दिवसेदिवस

लेखांक [३४८] श्रीलक्ष्मीकांत
१५३] [७ फरवरी १७५७] ?




राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसांवी यांसि.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष. गोसांवियानी पत्र पाठविलें ते प्रविष्ट होउन लेखनार्थ अवगत जाहाला. एशियास गोसांवियाचें लक्षानरूपच इकडील विचार आहे. वरकड सविस्तर अर्थ वरचेवरी पत्री लिहिला आहे त्याजवरून श्रुत जाहाला असेल. वारंवार ल्याहावे एसे नाही. फौज तयार आहे. जिकडे बोलाविलें तिकडे येत असो. वढगस्त सरदारी याजमुळे गवगवा येउन पडतो. याउपरी विलंब न लावितां गोसावियाचें आज्ञाप्रों मजलदरमजल फौजसह गंगातीराकडे येत असो. गोसांवियांचे आज्ञेखेरीज आह्मा डील तिलतुल्य विचार नाही. रा छ १७ माहे जमादिलोवल. श्री सु फ्ह ज्ञा प्रती विशेष कार्ये लिहिणे कृपालोभ आसू दिला पाहिजे हे विनंती. (मोर्तब सुद)

छ ८ जमादिलाखर. रविवार.
[२७ फरवरी १७५७]

---

लेखांक [३४९] श्री * संवत १८१३ फाल्गुन शुद्ध १४
[४ मार्च १७५७]

राजश्रियाविराजित राजेश्री
बाळाजी येशवंत स्वामीचे शेवेसी.

सेवेसी व्यंकाजी नारायेण कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशेल जाणोन स्वकीये कुशेल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. चिरंजीव चिंतो नारायेण

लेखांक [२५३]                                    ।'श्रीकालिका * संवत १८१४ आषाढ वद्य ३०

[१६ जुलै १७५७]

श्रीमत राजश्री सुभेदारसाहेब साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक सदाशिव पांडुरंग किले पावगड कृतानेक आसिर्वाद विज्ञापनां येसीजे. येथील क्षेम तागायेत छं * २८ माहे सवाल्पर्यंत साहेबांचे कृपादृष्टीकरून किले मजकूरचें व सेवकाचें वर्तमांन यथास्थित असे. यानंतर उजेंनी कासिद यांच बरोवर आज्ञापत्र आलें तें काल छं २७ रोजीं पावलें. त्यांजमध्यें आज्ञा कीं आमदा वादचे बातमीकरीता पहिले जासूद पाठविले ते वसउन ठेविले आणि बातमी वरचेवर लिहित नाहीं येसी सुस्तीं न करणें. त्यास पहिले जासूस हुंणगोजी व गोविंद छ ७ रमजांनी आले. तेच समई सर्व वर्तमांन तपसीलवार शहरांतील व बाहेरील लष्करचें लिहून रवानां केले ते पावले नसतील. मुख्य गोष्ट बातमींची कीं या फौजेस अद्याप प्रथंम दिवस आहे. नित्य दुसरे चौथे दिवसी मोगलाची फौज बाहेर निघोन युध्य होत असे. पर्जन्य प्रथंम बहुत जाहाला. ते दिवसीं याणीं मोर्चे उठविले. तेव्हा तेच मोर्चे मोगलानें कायेम केले. फिरोन यांणी हला करून उठउन आपले बसविले. ऐसी हिंदोला लढाई आहे. कांही मोगल जेर जाहाला नाहीं. शहरात लोकांस बहुत उपद्रव. सर्वस्व लुटून घेत असे. भारी फौज आलेया विलंब होणार नाहीं. वरकड वर्तमान अजंम बाबुखांनजीच्या पत्रावरून सेवेसी श्रुत होईल. सोथेची[१८८] खंडणीं दोनतीन वर्से आली नाहीं याजकरितां फोज झालोदेस पाठउन सोधचे गाव मारले. अद्याप सलुखास आलां नाहीं. फोज तेथेंच आहे. सेवेसी कलावें म्हणोंन लिहिलें असे. किले मजकूरचा बंदोवस्त उतंम प्रकारें साहेबांचे पुण्यप्रतापें आहे. बहुत काय लिहूं कृपा असो दिली पाहिजे हे विज्ञाप्ती.

---

लेखांक [२५४]                                    श्रीगजानन * संवत १८१४ भाद्रपद शुद्ध १२

[२७ अगस्ट १७५७]

श्रीमंत राजेश्री भाउ स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक केसो गोपाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। भाद्रपद * सुध त्रयोदसी मदवारपावेतो स्वामीचे कृपादृष्टीकरुन मु॥ श्री

---

(१८८) सुठ व लोणावडा ही सस्थाने सिंद्याची अंकित होती असे जे विधान केले आहे त्याचे हें प्रत्यक्ष प्रत्यतर पहावें. [भाग ४ ले. १ टीप १३]

वृधी होत आहे. त्याहीमवे अम्हांकडून ममनेस क्षीणता व्हावीसी नाहीं. सर्व प्रकारे तुम्हांवितरिक्त अम्हास अधिकोतर कोणी अहे असें नाहीं. यानंतर अंकुलनेरचा मजकूर किनेक प्रकारे लिहिला कीं चिरंजीव माहादाजीपत कबूल न केलें तर आमचा मजकूर अंकुलनेरावर काहीं सर्व प्रकारे मुलांचे चालीवणे तुम्हांस अवषक आहे. सर्व प्रकारे पूर्वांपासून तुम्हीं उभयेतानी चिरजीवाचा परामृश करीतच आला आहां. अताही सर्व प्रकारे चालिविले पाहिजे. तुम्हांवाचून मुलास दुसरा विचार नाहीं हा तुम्हास विदितच आहे. आम्ही त्याह्यवेसे नाहीं. यानंतर अंकुलनर अम्हांकरिता करुन आणिलें आणि चिरंजीवानी कबूल न केले म्हणउन लिहिलें तर मुलास आपण अज्ञा केली कीं गाव ईजारा पचरा सहश्रास करुन ताहुद लिहून देणे म्हणउन मागितलें. त्यासी राजश्री गोविंदमटने पत्र अलें कीं आकुलनेरची मामलेत कबूल न करणे म्हणउन गोविंदमटनी लिहिलें एसा कितेक मजकुर लिहिला. त्यासी तुम्हीं चिरंजीवापासून ताहुद लिहून घ्यावा येसा नाहीं. मुलांपासून तुमचे कार्यास अंतर पडणार नाहीं. येसा विचार होता त्यासी प्रस्तुत राजश्री कृष्णाजीपंतास साहेबयेखत्यारीने गाव स्वाधीन केला केला आहे. त्यासी चिरंजीवाचा अनविस्वास आपणांजवळ जाला येसें दिसोन आले याकरितां मुलास वहुत प्रकारे रागास आलो की तुम्ही काये अन्याये केला की तुमचे ठाई विस्वास नाहीं येसा प्रकार दिसतो. ॥ बहुत काये लिहिण कृपालोभ असो देण हा आसिरवाद.

---

लेखांक [३५२] श्री * संवत १८१५ वैशाख शुद्ध १०

[१९ मे १७५७]

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक सखाराम भगवंत [वोकील] साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता छ * १० रमजान यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करावयासीं आज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीनी छ ४ रमजानचे पत्र पाठविले ते छ ९ मीनहूस प्रविष्ट जाहाले. तेथें आज्ञा की लखउकंद साकरेचे मुजाअतदोले वहादर याजकडील वकील त्रिकमदास यांजकडून आणून पाठवणें म्हणोन लिहिले त्यास लखउकंदाचा तलास आज्ञेप्रो करुन आणून सेवेसी पाठउन देउ. ॥ हे विज्ञापना.

---

काही खर्चास दिल्हे त्याजवरुन येथे टिकलो आहे आणि कामही चालते जाले आहे. श्रीमत सुमेदाराकडील व तात्याकडील काम चालते. कर्जवाम करुन छत्रियाचे काम चालीस लावावे तरी येथे कोणापासी येक पैसा मिळत नाहीं. कर्जही मिळत नाहीं. तरी कृपा करुन तीन हजाराची हुंडी जरुर पाठवणे म्हणजे माल ठिकाण्यास लागेल. नाही तरी माल छीजतच जाईल. आमचा उपाय नाहीं यास्तव लिहिले असे. आणीक उपाय नाहीं. जरी छत्रियाचे काम पुरत जाले म्हणजे अम्हास येश येईल. आपला तो लौकिक जाला आहे. त्यासी पुरी पडले म्हणजे उतम होईल. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना

कासिद अमच्या घरास गेला तरी आपण उजनीस असला तर सरकारचे कासिदाबरावर हुडी देउन पाठवावी तो देउन जाईल. आमचीही काही खर्चावेचाची खबर घ्याल तरी उतम आहे. बहुत बेखर्ची जाला आहे यास्तव लिहिले आहे. काही घ्नास येईल तरी लिहून पाठवणे. आजपावेतो आपल्या कारबगर निधत येक रुपया लिहिला नाही आणि घेतलाही नाही. काम चालत होते. पुढील जागा करुन ठेविली होती. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [२५५] श्री * संवत १८१४ भाद्रपद शुद्ध

[सितंबर १७५७]

श्रीमत माहाराज राजेश्री पंत स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक गोविंद रायाजी दोनी कर जोडून सिरसाष्टांग नमस्कार विनंती. ता। भाद्रपद * सुध पावेतो मु॥ फरकाबाज येथे स्वामीचे कृपादृष्टीकरुन सुखरुप असे विशेष. स्वामीचे आज्ञापत्र वद्य ८ मीचे आले ते येथे सुध २ पावले. तदनंतर नवाबसाहेब याजकडे गेलो. वर्तमान विदित केले की दोचव रोजी कूच होउन अनूप शहाराजवळ फौज पोचते तुम्हीं आपले सरंजामाची तयारीमधे राहावे. वरकड आपल्यास सुज्यातदवले व गाजदीखान वजीर हे काही गोष्टीस लावितील तर येकांदर न लागावे. याप्रमाणे सांगितल्यानंतर बहुत प्रकारे आपण खात्री मानावी त्याचे गोष्टीत काही फायेदा नाहीं. या गोष्टीने तुमचे मनोरथ सिधीस जातील. मग नबाब यानी उतर दिले जे आम्हास कोणी सर्व पातशाहीची जागा व पारची जागा किंवा धनही पुष्यकळ देईल तरी ते आपण मानीत नाहीं. तुमचा माझा करार जाहाला. तुमचा सांगाती मी आहे. कोणाकडील कोणी आला तरी तुम्हीं त्याचा विचार मनात संशय न मानणे. विल कुल तुमचे आहे. वरकड म्हणाल जे कागदपत्र वकील वहुकडून येतात त्याचा विचार तर

वृंदावन येथे सुखरुप असो विशेस. पेशजी दोनतीन पत्रे पाठविली त्याचे उतर स्वामी कडून येकही आले नाहीं. पठाणाच्या दगियामुळे सर्व खराबी येथील दोज[?] श्रीमथुरा वृदावन येथील जाली ती लिहिता पुर्वत नाहीं· पठाणाचा चालीस रोज मुकाम जाला. चोवियाचा तो सत्यानास गेला. श्रीमथुरामधी च्यार हजार माणसे मेली व बंदीस गेली. श्रीवृंदावन येथील आठसात हजार[३८९] माणूस मेले. कोणजवल येक ताव्या राहिला नाहीं. बेफाम होते. येकायेकच चालीसपचेतालीस कोस आला आणि येथील लोक म्हणत होते की आजपावेतो या दोही स्थलास हिंदुमुसलमानाने कोणी हात लाविला नाहीं यास्तव कोणी येथील माणूस निघाला नाहीं आणि वस्तभावही कोणी नेली नाहीं यास्तव अम्हीही कोठे गेलो नाहीं. फाल्गुण सुध येकादसीस तिसरा प्रहरपावेतो पठाण दिलीहून माघारा गेलियाची खबर होती सांयकाली येउन पोहचला. अम्हीं येकादसीस अधरात्री पार अतरवेदीत येकेक धोत्रानिसी निघोन गेलो. दुसरे अगवस्त्र राहिले नाहीं. गाडे छकडे वस्तभावेचे भरिले ते निभावले नाहीं. येथील येथे लुटले. अम्हीं येकादसीस रात्री निघालो ते समई शिकारखानियाची बाकी रुपये सा[त]त हजार होते ते पुरुन ठेविले होते. त्यासी येक आमचा चाकर अम्हापासून फुटोन का कायेत होता त्यासी तेथील मोकदमानी त्या चाकरास फुसलून श्रीवृंदावनात आणून मोकदमानी व त्या चाकराने वस्तभाव काढून नेली व ते मोकद[म] काईम आहेत. फौज आली परतु अगरीयावरनच दुरुन दिलीस गेली आणि रुपरामानेही त्याजवल करार केले होते की आपण वस्तभाव घेउन देउ. त्यासी फौज गेलियाउपरी ती गोष्ट राहून गेली. जरी आपण येउन जबरदस्तीने वस्तभाव घ्याल तरी हातास येईल. बहारघाटाची बाकी रुये २२०० बावीससे गेले आहेत. छत्रियाचे काम राहिले आहे. माल तयार जाला आहे. तरी हे रुपये हातास तील ते समई काम होईल. अगर तेथून हुडी येईल तरी काम पुरत होईल. माल उजाडतो. रुपरायास ताकीद करुन रुपये घेउन देवणे अगर तेथून हुडी तीन हजाराची पाठउन देणे. तरी हा माल ठिकाणी लागेल. अधिक[ल] कोणाचे देणे राहिले होते ते कर्जवाम काढून दिले आहे आणि घाटावरी सकडा माणसे मेली आहेत. त्याची दोनचारसे रुपये लाउन ब्राह्मणभोजन करावयासी रुपया नाहीं आणि अम्हाजवल एक कपर्दिक राहिला नाहीं श्रीमत राजश्री[गंगोबा]तात्यानी

(३८९) हे पत्र महत्वाचे आहे. 'मथुरेतील ब्राह्मण व बैरागी बेसावध होते वृंदावनात आठ हजार बैरागी हत्यार धरून मेले' या बखरीच्या वर्णनाची तुलना करून पहावी म्हणजे तिची प्रौढी पटेल. अनेक साक्षीपैंकी ही एक झाली आणि तीही दामोलकराच्या कारकुनाची होय. तो स्वानुभवच सागतो. [ले. ३३१] लेखकाची पहिली दोन पत्रें उपलब्ध नाहीत.

लेखांक [३ ५६] श्री * संवत १८१४ अधिक आश्विन शुद्ध १४

[२६ सितंबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामराउ नीलकंठ कृतानेक सा। नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता। आधिक * शुभ १४पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे. तदनंतर श्रीमंत राजश्री यजमान स्वामींनी तनख्याच्या बाकीविषई आज्ञापत्र पाठविले ते बजिनस आपणाकडे पाठविले आहे. मनन करून स्वामी आज्ञेप्रमाणे बाकीचा येवज झाडियानिसी पाठउन द्यावी. श्रीमंताचे मुक्काम टोंकेवरी आहे. या प्रांती आगमन सत्वरीच होईल. येवज सत्वर पाठउन दिल्हा पाहिजे. परकड इकडील वर्तमान यथास्थित असे. तिकडील स्वकीये व राजकी वर्तमान लिहिले पाहिजे. ॥ बहुत काये लिहिणे कृपालोभ असो देणे हे विनंती.

पो छ २३ मोहरम. कासिदबराबर

[८ अक्टूबर १७५७]

---

लेखांक [३५७] श्रीमोरया

[१७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

गोविंद देवजी दि॥ राजश्री

चिमणाजी गोविंद स्वामी सोस.

सेवक गंगाधर येशवंत [चंद्रचूड] व आनंदरावराम सा। नमस्कार विनंती उपरी. गोपाळ त्रिंबक याची सनद तुम्हाकडे पाठण येवजी येजमानानी करून दिल्ही आहे त्याजविसी तुम्ही गईगुदर करिता म्हणून कळो आले. त्यास सरकारची सनद आसता दिकत का करावी. सनदेबरहुकुम चालवणे. तुम्ही व राजश्री बाळाजीबाबा येकेविचार राहून सरकारचे कामकाज करीत जावे. दरबारी कोणे रीतीने वर्तणूक होती. तुम्ही द्वैत दाखवावे. योग्य नाही. सारांश येकरूप आसत जाउन कार्यभाग करीत जाणे. कोणेविसी विलक्षण न दाखवणे. सारशे आसणे. हे विनंती.

---

त्यास नको म्हणावे येसे नाहीं आंण त्यासही आम्ही सागितले जे आपण राजश्री जनकोजीबावा व राजश्री दताजीबावा व स्वामीचे नाव घेउन सागितले की त्याचा माझा कउलकरार जाहाले [जे] ते जिकडे नेतील तिकडे मज जाणे. याप्रमाणे सागितले आण येक गोष्ट मनसबेची केली ते कोण तर सुजातदवला येथून पनरा कोसावर येउन राहिला. [तो] दुतच घाटावर येईल याजकरितां त्याचा हिरीस लडाईचा माहून फौजेची आफवा दाखउन मामलात करा म्हणउन त्याचे वकिलास सागितले. लडाई करुन काही परिणाम नाहीं. तुजा येक मातबर भलामाणस पाठउन दे अम्ही बोली करुन मामलात करुन देउ. येसे बोलिलो की आपल्यास जे जे घाट आहेत त्यांजवर तो नये येसे केले. सरजाम तयारीचा करणे म्हणउन आज्ञा त्यास सरजाम तो तयारच आहे. वगैरा जो करणे तो करीतच आहे. श्रीगंगा काही अद्याप उतरली नाहीं. दोन नक्षत्रे याप्रमाणे झडी. येथील मर्य दानशा बारा नजीक आहे. येथे गंगा वढोन आली. येक खेव नाव माटे महंनतीन दिवसामधे येतो. याप्रमाणे पात्र जाहाले. आंणखी त्याणी सागितले जे आम्हीं इमान प्रमाणाचे कागद लिहोन ठेविले परंतु तुम्हीं जे तेथे सेरदाजखान याजपासी इमानाचे कागद ठेविले आहेत ते येणेप्रमाणे श्रीमंत राजेश्री जनकोजीराव व श्रीमंत राजश्री दताजीराव श्रीमंत राजश्री पंत येसे तिनी वर्गांचे इमानप्रमाणाचे निराले निराले सिके मोहरानिसी सेरदाजखान याजपासी आहेत ते आणवणे. ते येथे तुम्ही आमचे हवाली करा. अम्हीं तुमचे हवाला करुन देतो आंण बिदा करु. त्यास स्वामीनीं कृपा करुन सेरदाजखान याजपासी काग: पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. येसजी नकल त्या पत्राची सरदाजखान याने पाठविली असल. आले नाहीं तर असल येत ते करणार स्वामी धणी समर्थ आहेत. याजकडील काही कोणे गोष्टीचा संवशय नाहीं. बिलकुल आपले येसे याचे भाषणावरुन व तरतुदीवरोन दिसते. काही गुंता नाहीं. श्रीगंगा मातुश्रीचा मात्र गुता. वरकड काही दिसत नाहीं. वरकड सुजातदोला साडीहून माघारा बिठुरा नजीक दोन कोसावर गेला. साडीहून माघारा तीन कोस आण तेथून बिठूर दोन कोस. त्याची मातुश्री येणार होती. ते नवाब याणी मना केली की तु न येणे. तुमचा आमचा कोण स्नेह आहे. अम्हीं दक्षणियाचे आहो त्यावरुन [ती] न आली. सर्व अटक इमानाचे पत्रावर आहे. ते मुजरद कासद स्वामीनी लेहून पोचती मजपासीं करावी किंवा सेरदासखान याचा जासूद घेउन येईल तर मज पत्र लिहावे म्हणजे मज कलेल. सेवेसी श्रुत होय वरकड वर्तमान त्याणी आपले सरदाजखान यासी लिहिले आहे त्यातही सर्व गुंता इमानाच्या पत्राचा मात्र आहे. जे वर्तमान अधिकोत्तर दिसेल तरी सेवेसी लिहोन पाठउ. बहुत काय लिहिणे कृपा करणार स्वामी धणी समर्थ आहे हे विज्ञाप्ती.

---

येविसी आपणास दोनतीन वेळा लिहिले. त्याचे उतर आले नाही. मग आम्ही त्याची सनद सदाराम तेजपाल याचे दुकानी देउन त्याजपासोन दीडसे रुपये घेतले. तुम्ही सेटी मार यास प्रविस्ट करणे. ।' सरकारची पत्रे आली होती ते आपणाकडे पावली आसेल. अम्ही देशास जातो. श्रीमंताचे दर्शनात आपण आज्ञा केली त्याप्रा वर्तमान निवेदन करू. बहुत काय लिा लोभ असो दीजें हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबाबा स्वामीस सा नमस्कार विनंती उपर. कृपापत्री सांभाळीत असिले पाहिजे हे विनती.

---

लेखांक [२६०] श्री * संवत १८१४ अधिक आश्विन वद्य ७

[४ अक्टुबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे शेवेसी.

सेवक रामराउ नीलकंठ कृतानेक सा नमस्कार विनंती उपर. यथील कुशल ता आधिक * वद्य ७ पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे. तदनंतर कृपा करून पत्र पाठवले ते उतम समई प्रविष्ट होउन कुशलार्थ आवगत जाला. रा राघोबाबास पत्रे लिहिली ती त्यास प्रविष्ट केली. आम्ही त्यास जे सांगणे ते सांगितले. आमझरेचा कार्यभाग उरकून याच मार्गे येतील. प्रा कोटेचा पाटणचा हिसेब तुम्ही सरकारात लहून पाठविलात आसल. आ हीही येथून दशमीच्या मुहूर्ते स्वार होउन ।' राजेश्री रावोबास तुम्हाकडे वाटे लाउन जाउ. त्याची निशा देसी करणे तैसी करून तिकडे पाठउ. वरकड सरकारचा हिसेब तुम्ही पाठविलाच आहे. आम्ही प्रसंगोचित जातो. आपले आज्ञेप्रमाणे तेथे निवेदन करू. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [२६१] श्री * संवत १८१४ आश्विन शुद्ध ५

[१७ अक्टुबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामराउ नीलकंठ कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल ता आश्विन * शुध ५ पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. स्वामीनी पत्र पाठविले ते उत्तम समई प्रविष्ट होउन कुशलार्थ आवगत

लेखांक [३५८] श्रीमोरया

[१७५७] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबा [गुलगुले] स्वामीचे शेवेसी.

सेवक गंगाधर येशवंत [चंद्रचूड] व रामाजी यादव सास्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकुशल लेखन करीत असावे विशेष. बहुत दिवस जाले कांही वर्तमान कळल नवते. त्यास रो आबाजीपंत [निगडीकर] आले याणी आपले व प्रगणे मजकूरचे वर्तमान सर्व निवेदन केले. त्यास येविशई पत्रे द्यावी परंतु येजमान मजलदरमजल पुढे चालिले याजकरिता सांप्रत अनकुल न पडिले. यजेमानापासी पोचल्याउपरी ताकीदपत्रे पाठउन देउ व तुम्ही येकाविचारे राहून सर[कार] किफायेत होय ते करीत जाणे. याणी तुमची स्तुत बहुतसी केली. यैसीच पुढेही करीत यैसे येक्याचित्ते असावे. ׀׀ येविसी सूज्ञा प्रती विशेष काय लिहिणे. लोभाची वृधी करावी हे विनंती.

---

लेखांक [३५९] ׀׀श्री * संवत १८१४ अधिक आश्विन वद्य ३

[३० सितंबर १७५७]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळोबाबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक रामराव नीलकंठ कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल ता। आधिक * वद्य ४ पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे. तदनंतर आपण पत्र पाठविले ते उतम समई पाउन सकळ वर्तमान अवगत जाले. प्रा। पाटणपैकी यैवज मा। सादाराम तेजपाल याचे दुकानची हुंडी पाठविली ती पावली. त्याची रसीद अलाहिदा पाठविली आहे ते प्रविष्ट होईल. दुसरे आपण राजश्री राघोबास पत्र लिहिले तेही त्यास प्रविस्ट केले. आमझरेचा कार्यभाग जालेवर तेच मार्ग येतील. श्रीमंत राजश्री यजमान [शिंदे] स्वामी टोक्यावर आहेत. मागून श्रीमंत राजश्री विश्वासराउ बल्लाळ [भट] येणार. यांची त्याची भेटी जालियांवर कुचे करून येणार. सत्वरीच आगमन होईल. रा। आउबा गोसावी श्रीगोंदेकर यासि श्रीमंत दात्रत्व तमाम मंडली करून दिल्हे त्याप्रमाणें आपणावरीही रुा। १५० दीडसें करून दिल्हे.

केले पाहिजे. तदनंतर आम्ही दक्षणेस जावयानिमित्य प्रस्तानास आलियानंतर श्रीमंताकडील पत्र आले. तेथे ताम्राचा व यजमान स्वामीचा युधप्रसंग जाला. परस्परे हर्पामर्प होउन समानरूपच राहिले. सलुखाचाही पैगाम [आला] सिघ्र काळेच सलुख होउन येईल परंतु मार्गाची सुरक्षितता पाहून चालावे. याजकरिता काही दिवस येथे मुकाम केला. अतःपर कूच उदईक करून मजलदरमजल जाउ. याउपर राजश्री राघो केशव यासि श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामीनी कोटयास राजश्री यशवंतराउ पवार याच्या हिस्याचा यैवज सरकारच्या कर्जाचे यैवजी घ्यावयाबदल यासि पाठविले आहे. यविषई मुख्य श्रीमंताची आज्ञापत्रे व श्रीमंत आपले यजमान स्वामीची तुमच्या नावे व राजाचे नावे आहेत. ते स्वामीच्या दर्शनाती दाखवितील. त्यासि आपण सरकारच्या कामावरी नजर देउन पवाराकडील कमाविसदार प्राचीन असतील ते जरी उठोन जातील तरी सुखरूप जावोन. अज्ञाही तेथील याच प्रकारची आहे परंतु तुम्ही याच्या कार्याची साहिता करून यैवज सरकारचा वसूल जालिया यानी श्रीमंतापासी आपली तारीफ केलिया कृपा संपादिलीसी जाली आणि याच्या कार्यात अंतर आपणाकडून जाल्या रुपये तो सरकारचे आहेत. घेणार जबरदस्त ते घेतील. परस्पर साहित्य न जालिया शब्द लागेल यास्तव अम्ही आपणास सूचनार्थ सरकारचे कार्य जाणोन आणि राघोपंताचा आमचा परम स्नेह त्याप्रमाणे रक्षूण कार्यभाग करावा. हे तेथील रीतीस नावाकफ म्हणोन आपणास लिहिले यास्तव ज्यामध्ये याचा कार्यभाग होय ते करीत जावे. सदैव पत्री परामर्षास अविस्कार आसवे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

राजश्री त्रिंबकजीबाबास सा॥ नमस्कार विनंती उपर. लि॥ परिसोन लिहिल्या प्रमाणे साहित्य करून जेणे करून मुख्या शब्द न लागे ते करावे. हे विनंती.

---

लेखांक [२६४] श्री * संवत १८१४ कार्तिक वद्य ७
[३ डिसेंबर १७५७]

श्रीमंत राजश्री भाउसाहेब [दामोळकर] स्वामीचे सेवेसी.

पोष्य लक्ष्मण केशव [वैद्य] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता॥ कार्तिक * वद्य ७ पर्यंत स्वामीचे कृपावलोकने करून समस्त सुखरुप असो विशेष. स्वामी गेलियादारभ्य दोनतीन पत्रे आली परंतु सेवकाचा परामर्ष पत्री न

जाला. रसीदा लहून पाठवणे म्हणोन लिहिले त्यावरून रसीदा लेहून पाठविल्या आहेत. प्रविष्ट होतील. दुसरे श्रीमंत राजश्री विश्वासरावजी व श्रीमंत यजमान स्वामी फौजसह आवरंगाबादेस शाह देउन बैसले आहे. मोगलाचा याचा हर्षामर्ष वाढला आहे. तेथील विचार जालियावर काये मनसब होईल तो पहावा. ॥ आम्हीही देशास जावियाचा निश्चय आश्विन वद्य १ प्रतिपदेस केला आहे. आमची कासिदजोडी गेली आहे. सविस्तर वर्तमान आलिया लहून पाठउ. वरकड इकडील वर्तमान यथास्थित असे. आपणा कडील हर घडी येनारासमवेत पत्राची लेखन करून सांभाळीत गेले पाहिजे. ॥ बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३६२] श्री * संवत १८१४ आश्विन वद्य १

[२८ अक्टुबर १७५७]

बंधुवर्गसिरोमणी राजेश्री रामाजीपंत स्वामीचे सेवेसी.

सेवक राघो हरी आठवले मुा पुणें साा नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा आस्विन * वद्य प्रतिपदापरियंत सुखे असों विशेष. आम्ही अधिक आस्विन वद्य त्रयोदसीस पुर्णेयासी आलो. आपले दर्शन बहुत दिवस भेट जाहाली नाही. भेट होईल म्हणून आलों तों आपंण लस्करांत गेलेत. बरे भेट होईल तो सुदिन. घडीघडी येणारा मांणसासमागमे आमचे स्मरण करुन पत्रिकाप्रेश करुन संतोषवावें हे योग्य आहे. स्मरणार्थ लिहिले आहे. कुटुंबगत आहो येसे चितात आणून लोभ करीत आसावें. आम्ही ज्या यजमानापासी होतो त्याणे संतोष दिला तो आर्थ पत्री लिहितां नये. आम्हा-विशीं साभाळास आतराये न करावा म्हणून बंधुवर्ग राजश्री हरीपंत दाजीस लिहावें ते तों सांभाळास आतराये करीत नाही. सर्वस्वें सामाळ करीत आहेत. तेथे विस्तार पत्री लिहावे येसे काये आहे. कृपालोभ करीत आसावे हे विंनती.

---

लेकांख [३६३] श्रीराम * संवत १८१४ आश्विन वद्य १२

[ ८ नवंबर १७५७ ]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजीबावा स्वामीचे सेवेसी

पोा रामराउ नीळकंठ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपर. यथील कुशल श्रीकृपेकरून ताा अश्विन * वद्य १२पर्यंत यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लखन

लेखांक [३६६] श्री * संवत १८१४ मार्गशीर्ष शुद्ध १२

[२१ दिसबर १७५७]

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेसी.

विनंती शेवक जनार्दनराम[१९०] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ * ९ रबिलाखर मुकाम नजीक गंगेरु नजीक ठाणे भीम स्वामीच्या कृपेकरुन वर्तमान यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा की राजश्री मल्हारजी होळकर व विठल सिवदेव [विंचुरकर] नजीबखानाच्या पारपत्यास पाठविले आहेत तरी तुम्हीं यासी सामिल होउन नजीबखान याचे पारपत्य करणे म्हणोन आज्ञा. त्यास नजीबखान तो गंगा उतरोन पार गेला. आम्हीं याजबरोबर राहावे तरी याचा आमचा बनाव बसणार नाहीं. स्वामीचे पाये सोडल्यास सहा महिने जाले. सरकार कामासाठी इकडे आलो. त्यास इकडील कामाची विल्हेवाट जाहाली. याउपरी आम्हीं निघोन चरणापासी येतो. येविसी पूर्वीं पत्रे सेवेसी पाठविली आहेत. आज्ञा होणे ते जाहालीच असेल. ते पत्र आम्हास पावले नाहीं म्हणोन हाली सेवेसी विनतीपत्र लिहिले आहे. त्यास-उतर आल्यावर निघोन सेवेसी येतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

पो छ १५ राखर

[२७ दिसबर १७५७]

---

लेखांक [३६७] श्री

[२९ दिसबर १७५७]

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब[१९१] यानी राजश्री रामाजी आनंत यांसी आज्ञा केली येसीजे. सांप्रत तुम्हाकडून विनंतीपत्र येउन वर्तमान विदित होत नाहीं. तरी साकल्य वृत विनंतीपत्री लिहून पाठवणे. यानंतर साहेबी तुम्हास संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत घेउन विनंतीपत्र पाठवणे. जाणिजे छ * ७ माहे रबिलाखर. ❜ बहुत काये लिहिणे.




---

(१९०) 'चिरंजीव जनार्दनपंत' असे गोविंदपंत बुंदेले एका पत्रात जें नाव देतो [लि ३३०] तो हा पुरुष नव्हे पेद २१ ले १३७, १४२ पेद २७ ले १८८ चा हा लेखक आहे त्याचे आडनाव आठवले असे संपादकाने दिले आहे

(१९१) ही मातुश्री जीजाबाई भोसले करवीरकर असावी कारण त्याची दोन पत्रें पुढें आली आहेत [लि ४०२, ४०३] पेद २१ ले. १०६ हे पत्रसुद्धा याचेच दिसते

जाला. येसे नसावें. सदैव पत्रप्रसणी आज्ञा करुन सांभाळ केला पाहिजे. दसरा जालियावर स्वामीकडें येणार त्यास मोगलाचा सळा लावतच चालला मार्ग सुरलीत चालत नाहीं म्हणोन आज जाउ उद्यां जाउ येसे करतां इतके दिवस लागलें. याउपरी कधीं यावें ते लिा पो त्याप्रो निघोन येईन. आपले घर तयार होत आले. खालचे काम तयार जाले. वरचे मजल्याचे काम चालत आहे. सर्व सुखरुप आहेत. सेवेसी विदित व्हावे. बहुत काये लिहू कृपा वर्धमान केली पाहिजे हे विज्ञापना.

॥ राजश्री नानाजी ना ता राजश्री जिवबा नाईक स्वामीचे सेवेसी सा नमस्कार विनंती. कृपा कीजे हे विनती. वो राजश्री पुराणीकबाबांस व थो राजश्री भास्कर भटजीस नाना तुम्हीं आमचे सा नमस्कार प्रो करावे. हे विनंती.

॥ सेवेसी रामाजी केसव [वैद्य] कृतानेक सा नमस्कार विनंती. सदैव कृपा पत्री सांभाळ करावा. कृपा वर्धमान केली पा हे विनंती.

---

लेखांक [३६५] श्रीशंकर * संवत १८१४ कार्तिक वद्य ११
१५७] [७ दिसंबर १७५७]

| |
|---|
| श्रीसिवचरणि<br>तत्परबापुजी<br>सुतहणमेतरा<br>वनीबळक<br>१ |

राजश्री दत्ताजी सिंदे गोसावी यांसी

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो हणमंतराउ निंबाळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. नवाबसाहेबाचा व आपला हर्षामर्ष अजी तीन महिने वाहडला आहे येणे करून दुतर्फाही स्नेहास उतम नाही. त्यासी त्यांचे व आपलें रहस्य व्हावे येसा मनोदये आमचा आहे. त्याचे पदरी तुह्मासारिखे मातबर सरदार आहांत व इकडे याचे पदरी अम्ही आहों त्यास अपला स्नेह अणि जिव्हाला मायाममता आहे म्हणून अपन्यास स्नेहाने पत्र लिहिले आहे. तरी हे गोष्टी ध्यानात आणून उतर पाठवावे म्हणजे कोणी कारकून पाउउन देउं. हे यश आपण घ्यावे यांत उतम आहे. बहुत लिहिणे तरी आपण सूज्ञ आहेत. रा छ * २४ रोवल. बहुत काये लिहिणे कृपा असो दीजे ॥ हे विनंती.

मोरन
बसुष

---

लेखांक [३६८] श्रीशंकर

[जनवरी १७५८] ?

श्रीमंत राजेश्री रामाजीपंतभाउ स्वामीचे शेवेसी.

पो नारो शंकर[१९२] सां नमस्कार विंनती उपरी. येथील कुशल स्वामीचे कृपेकरुन यथास्थित आसे विशेष. बहुत दिवस जाले कृपापत्र येउन वक ाचा परामर्ष होत नाहीं. येसे नसावे. सदैव कृपापत्रीं सामाल करीत असावां. याउपरी गत वर्षी पुणियांत आलों तेव्हा मागील मामलतीचा फडशा करुन पेस्तर इजारा करारवाक करुन घेतला. करारप्रों सरकारचा पैसा ठेविला नाहीं आणि चाकरीसही अंतर केले नाहीं. श्रीमंताची आज्ञापत्रें दोनच्यार आली. तेथे आज्ञा की श्रीमत राजेश्री दादासाहेब याजकडे जाउन आपला बंदबस्त करुन घेणे त्यावरुन सासात मास श्रीमंतासमागमे चाकरी फौजसह दिलीपर्यत केली. तेथे आज्ञा जाली कीं आम्हास पैका क्रोड रुपये येतात तुम्ही मामलत सोडणे. येसी आज्ञा जालियावर चाकरलोकास उजूर काये.

(१९२) 'आम्ही साठवासष्ट वर्षे दिवसेदिवस आब्रु मिळविली' असा चरित्रार्थ या पुरुपानेच आपला दर्शविला आहे. [खरे ३ ले ७२७] हे पत्र २६ जुलै १७६७चे होय. अर्थात त्याच्या प्रपचास प्रारभ १७०७ पासून झाला असे निष्पन्न होते १७१८तील दिल्लीच्या स्वारीत 'नारो शकर असे नाव येते ते याचे असावें असा भास सपादकास झाला तो मात्र सदिग्ध आहे. [पेद ३० ले. २०८] त्याविषयी सचयनिवृती या प्रकारे होते १७२६पासून १७४१पर्यंत तो होलकराकडे होता 'आमची चाकरी उपरालियाची होती' [पेद २२ ले. ५] 'नस्ती सेकटी काहाडोन आपणावरी काविषी करितात. पुढे श्रीमंताचे पदरी पडो यैसे करावे दाहापधरा वरसे होलकराची चाकरी केली परतु मराठे वयेमान आणि उभयताचा प्रसग यैकोन [शिंदेहोळकरांच्या] वृधीस भृष जाला आपणावरी फारसी गाड आहे. तरी उपराला श्रीमताकडोन करउन पदरी घेवणे'. [पेद २१ ले. १] 'राणोजी सिदे व रामचद्र बावा याणी आमची स्थापना केली. ते पदरा वर्षे क्रमिली' असे या पत्रांत म्हटले आहे त्यावरुन १७४२ त त्याचा मनोदय पूर्ण होऊन तो पेशवाईंत परत गेला असे स्पष्ट होतें 'उभयता सरदार व बावा स्वामीनी आम्हास इकडील पारपत्यास ठेविले म्हणून याच्या वधुचें पत्र मिळते ते यथार्थच होय [खड ६ ले. १८४] यानतर पुढे १७५७च्या आरभी दोघावर वरदळ आली. 'लक्षमणे शकराचा लवाजिमा नारो शकरापासी आहे ते आलियावर जप्ती करितो' हे राघोबाचे कथन [खड १ ले ५९] आणि 'स्वामीची आज्ञा घेउन झासीचे मार्गे आलो. तमाम ठाणी वोडसे दतिया भदावर कछुवाधार मिलोन खाली करुन दिली तदनंतर किले झासी व करेरा हवाला करुन रसीद घेतली. बाकी रुजू करुन दिली. माहादाजी गोविंद याचे जाब घेउन हवाला केले. चुगलानी भराच्या गोष्टी करुन मामलत काढिली परतु परिणामी तऱ्ही कळेल'. हे वर्णन या पत्राशी जुळते. [पेद २३ ले ९२] 'नारो शकर याजवर झासीचे मामलतसबधी हिसेबाचा पेच होता. ते समई दत्ताजी सिंदे यानी विनती करुन आपलेपासी

राजेश्री राणोजी सिंदे व रा रामचंद्रबाबा [सुखठणकर] याणी आमची स्थापना केली. ते पंदरा वर्षे क्रमिली. आता आपले हातें स्थापना करुन सरदारीचा डौल सजून सरंजाम जागा देउन अभिमान धरुन आपले तेनातीस करुन घ्यावे. मामलत करणार नाहीं. सिलेदारीचा [स्वीकार] करुन काही दिवस आयुष्याचे घालवावे आणि सत्समागमें राहावें. यासिवाये दुसरा अर्थ नाही परंतु खेडा पदरी आहे याची सोय करुन देवावी. शफतपूर्वक येविषई अभय उतर पाठवावें म्हणजे समाधान होईल. मार्गप्रतीक्षा करीत आसो. उतर सत्वर पाठविले पा. पेसमई टाकिलीसांड न देणें. निदानचा प्रसंग आहे. तुम्हासारखे मुरबी असोन कोणास शरण जावें. ।" बहुत काय लिा हे विज्ञापना.

---

लेखांक [३६९] श्री * संवत १८१४ पौष शुद्ध १

[१० जनवरी १७५८]

चिरंजीव राजमान्य राजश्री रामाजीपंत या प्रती कृष्णाजी माहादेव आसिर्वाद. येथील कुशल पोष्य * शुध प्रतिपदापावेतो वर्तमान येथास्थित असे विशेष. आपण पत्र मार्गसीर्ष वद्य सप्तमीचे पाठविले ते पावोन संतोषवासी जाहाली. लेखनाअभिप्राये अवगत जाहाला. यैसेच सदोदित कुशलवृत लेहून संतोषवीत असावें. सला जाहला म्हणोन लिहिले उतम गोष्ठ जाहाली. ईश्वरें येश तुम्हास दिल्हे. प्रज्या सुख पावेल. येजमानास असिर्वाद देतील येणेकरून सर्व कार्यसिधी आहे. आमचें वर्तमान यथास्थित असे. चिरंजीव राजश्री हरीपतांचें पत्रावरुन विदित जाहालेंच असेल. घरची मनुष्ये सुखरुप आहेत. चिरंजीव आपा व वेकटराव लक्षमणराव सुखरूप आहेत. वरही तयार होत आले आहे. चिरंजीवाच्या लग्नाकारणे यावे वधूची विवंचना केलीच आहे. सविस्तर घरच्या पत्रावरुन विदित होईल. सालिसीची सुखरुप आहेत. राजश्री बालाजी कृष्ण जोसी याची मुली सांगोन आली आहे. दूरचा पला आहे. परस्थली जावें तेव्हां बरेच गेले पाहिजे. तुमच्या नावावरी मुली सागोन येतात. बालाजीपंतही नामाकितामध्येच आहेत. आपणांस विदितच आहे. आपल्या विचारात येईल तरी लेहून पाठवावें. तीर्थस्वरुप राजश्री दादानी साउसीहून लेहून पाठविले आहे की आपणांस कांहीं सामर्थ नाहीं. तुमच्या विचारास येईल ते करणें. त्यानलाही बरे वाटत नाहीं. राजश्री बाजीपंती पेशजी पत्र व कारकून पाठविला होता. त्यास त्याचा जाब व मुलाचा जन्मकाल पाठविला. त्यास त्याचा जाब आताच आला. घटितार्थ येतो. बावीस गुण लामतात. त्यास हे वर्तमान चिरंजीव हरीपंतास व सखुबाईस पुसिले. त्याच्या चितास आले त्याजवरुन कबूलही केले आहे.

सेवेसी रामाजी[१९३] केशव [वैद्य] कृतानेक सां नमस्कार विज्ञापनां. स्वामीनी पत्री साभाल केला त्यावरुन बहुत संतोष जाला. येसेच सदैव कृपापत्रीं सांभाळ करावा. बहुत काये लिहू हे विज्ञापनां.

---

लेखांक [३७१] श्री

[१७५८]

पुरवणी.

वरकड ईमारतीची कामे कोणकोणती तयार जाहाली व पैका काये लागला तो लेहून पा म्हणून लिहिलें त्यासी येणेप्रा त्रितो.

४००० तुम्हीं गुा नेमून दिल्हीं कामे काळवादेवीचें तळें व गावठनातील तळे व वोढयाची काठची वाट आडापासून पाठपर्यंत लाब हात ७०० येकून नेमणूक रुा च्यार हजार. त्यासी आपण असते समई येक हजार दिल्हेत. बाकी तीन हजार राहिले तें आम्ही दिल्हे. कामे तयार जाहाली येकून रुपये

१५०० आडवी वाट गावची रंगाजीपंताच्या घरापासून आडपर्यंत. दुसरी वाट पाटापासून आडवी वाववाटेपर्यंत व उजवी वाववाट गुरवाच्या घरापासून वडापर्यंत येकून लाबी हात पंधरासे येकून रुपये.

२००० कासारवलीचे तळे लांबी हात ४० रुंदी हात २० व उंची हात १० येकून नेमणूक रुपये दोन हजार.

३००० येथील नव्या वाडयातील काम भिंती व विहीर मिळोन रुपये

१२०० सोपा व पछमेकडील सोपा दोनी मिळोन हात १०० शंभर यास खर्च रुपये

---

११७००

येणेप्रमाणें खर्च आहे वरकड समस्त ग्रामस्तांचा मनोगत आहे की श्रीमाहा लक्ष्मी व रवळनाथ याच्या देवळ्याभोवती पोवळ पादडी करावी. येसा सर्वांचा मनोगत आहे. येकदोन वेळा आम्हांस पत्रे लिहिली होती. आपली आज्ञा येईल त्याप्रमाणे वर्तणूक करु. तीर्थस्वरुप राजश्री नारोपंतदादांस पत्र पा तें पावलें. मुलाचा वृतबंध येथे माघमासी पुण्यास येउन केला. आवडीचे लग्नही जाहालें. शरीरसंबंध रा बाळाजीपंत जोसी हाली वस्ती वावशन नातु रा विसाजीपंतदादाचा द्वारकाबाईचा मूल. कळले पा व रा बाबुराव

---

(१९३) हा लक्षमणपंत वैद्याचा कनिष्ट बंधु असून हे सबंध पत्र त्याच्या हातचें आहे [ले ३६४]

सदरहूप्रमाणे कमाली गज ६९३॥ किमत रुपये ४५ पचेचाळीस घेउन तुम्हास मिरास करून दिधली असे. इदमोहदनाद पडसन्ध्यारी पूर्वेस रानोजी जामृद व दक्षणेस गावची गली. पश्चीमेस कान्होजी जामृद नदी यांची व पश्चमेस गावची गली. पश्चीमेस गावची गावकुस व उत्तरेस कुंपण तुम्ही दरवाजा पूर्वमुखी ठेवावा व मोरी दरवाजियासेजारी ठेवावी व पनाळ आपले आगनामधें ठेवावे. येणेप्रो तुम्हास मिरास करून दिधली आहे. या जागियावर इमारत बांधोन लेकरांचे लेकरी [उपभोग] करावा आणि नांदावे. यास कोणी दिकतदरकार करील त्यास आपण मनगाउ. आपण आपले खुशीने पचेचाळीस रुपये घेऊन तुम्हास मिरास करून दिधली असे. हे गहेदीपत्र लेहून दिधले सही

गोही नावनिशी | 
--- | ---
गोही नावर | रामाजी वा कान्होजी मोर हिसा १५
बा गोविंद नारायण जोसी | रानोजी वा कान्होजी मोर हि २ रु ३०
कुळकर्णी का मार. | 

गोही

रिठोजी बिन जोगाजी पा मो मोर मल्हारजी बिन गंगाजी को मार.

लेखांक [३७५] श्रीरघुवीर * सवत १८१५ चैत्र वद्य १२
१६१] फ [मुद्रा अस्पष्ट] [४ मे १७५८]

राजश्री रघुनाथपंत [भट] गोसावी यासि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. आपण आमृद जोडीसमागमे पत्र पाठविलें [ते] सुसमई प्रविष्ट होउन लेखनाभिप्राय अवगत जाला लाहोर फते होउन जाहानखान पळोन गेला. त्यांजमागें फौजा गेल्या आहेत म्हणोन लिहिले त्याजवरून बहुत संतोष जाला. हर घडी येणारा समागमे पत्रद्वारा साकल्य लिहित असावें. रवाना छ २५ माहे साबान. बहुत सूज्ञ प्रती विशेष काये लिहिणे लोभ असों दीजे हे विनती.




पो छ २ रमजान.
[१७ मे १७५८]

जनकोजी सिंदे याची फौज मालवियांतून जातां येतां आमचे परगणें गंगराड व छुग यास उपसर्ग फोजेचा लागोंन नसनस फार होते. त्यास प्रसंगी आपण असोन परगणियाची खराबी होत्ये. हा विचार नसावा. तरी येंदा फोजा तिकडे जातील त्यास आमचे [पर] गणियांतून जाउं न द्याव्या अगर कोणां कमाविसदाराचे सांगितल्यावरुन उपसर्ग लागो न द्यावा. राजश्री केसो विस्वनाथ तुम्हापांसी येतील त्यास स्मरण धरुन काडीमात्र उपसर्ग दोही महालांस न लगे येसे करावें. आपले भरवसियावर बेफिकर असों ॥ ताकीद उतम प्रकारें करावी. रा छ * ९ माहे रजब. ॥ बहुत काय लिहिणे लोभ कीजे. 卐 ॥ हे विनंती. मोर्तब सुद

---

लेखांक [३७४] श्रीगजानन * संवत १८१५ चैत्र शुद्ध १०
[१६०] [१७ अप्रैल १७५८]

खरेदीखत शके १६८० बहुधान्य नाम संवछरे चैत्र * शुा १० सोमवार ते दिवसी तिमाजी वा कान्होजी व रामाजी वा कान्होजी मोर मजरे मोरवाडी कों अकोलनेर प्रो पांडेपेडगाव यासी विठोजी पाटील मोकदम व समस्त दाहीजन समाकुल पांढरी मजरे मार को मार सन हजार ११६७ कारणे खरेदीखत लिहून दिधले एसाजे. सन हजार ११६१ येकसटीच्या सालात दोही राज्याचा दंगा जाला. तमाम मुलुक जाळून लुटून परागंदा जाला त्याजमुले मजरे मार परागंदा होउन [लोक] मुलकावर गेले. तो सन हजार ११६२ बासटीमध्ये मोगलईकडील जागीर निघोन स्वराज्यात श्रीमंत रो भाउसाहेबास [दामोलकर] जागीर जाली. मग साहेवी रयत गोळा करून मजरे मजकुरास कौल दिल्हा आणि गावची वसात केली आणि साहेब मोहीम प्रांत मारवाड देशास गेले. तो मागे राजश्री गोपाळ शंकर सरदेशमुख याणी को मजकुरावर दंगा करून राजश्री कृष्णाजीपंत ठोकदार व रा चांदजी पाटील जाधव व विसाजी बावाजी कुळकर्णी येसियास धरून ठाणे पिंपळगाउगर्मा येथे नेउन जबरदस्तीने सन हजार ११६१ येकसटीचे खंडनी सन ११६४ चोसटीमधे केली. त्यास रुपये द्यावयास एवज नाही. कोठे काही [मिळेना] नाईलाज जाला. मग तुमच्या गळा पडोन तुह्मास जागा पांढरी गावची खलपैकी खरेदी दिधली तपसील गज सुमारीप्रो करार

२१ पूर्व पश्चम गज सुमार १९॥ उतरदक्षण गज सुमार

लेखांक [३७७] श्री * संवत १८१५ मार्गशीर्ष वद ६

[२२ दिसबर १७५८]

चिरंजीव राजश्री रागाजीपत या प्रति विसाजी दादाजी [आठवले] असिर्वाद. येथील ता। मार्गशीर्ष ॥ वद ७ सप्तमी मु॥ पुणे सुखरुप असो विशेष. सांप्रत तुम्हाकडून पत्र साव्हने मुकामचे आले ते पावले त्यावरून सविस्तर वर्तमान कलले. येसेच निरंतर पत्र पाठवीत असिले पाहिजे. यानंतर नि[इ]कडील वर्तमान तरी प्रस्तुत श्रीमंत उभयेता येथेच आहेत. पधरा दिवस संगमावरी मुकाम जाला होता. श्रीमंत मातुश्री ताईस संगमावरीच देवाज्ञा जाली. त्याउपरी मग मागती गावांत आले. वरकड वर्तमान यथास्थित असे. तुम्ही लिहिले की ग्याठोराम जानो त्यास तिकडे गेल्यावरी साकल्य लिहोन पाठवणे. तुमच्या घरची समस्त सुखरुप आहेत. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

राजेश्री लक्षुमणपंत स्वामीस नमस्कार. तुमची माणसे सुखरुप आहेत हे विनती

---

लेखांक [३७८] श्री * संवत १८१५ माघ शुद्ध १४

[१० फरवरी १७५९]

श्रीमंत राजश्री तात्यासाहेब स्वामीचे सेवेसी

आज्ञांकित गोविंद भगवत नि॥ रामाजी अनत [दामोलकर] सिरसा॥ नमस्कार विनंती विज्ञापना एसीजे. श्रीमंताचे एत्रजापैकी रोख रुपये पोहचले १२,४९ येकोणिसे येकोणपनास रुपये पावले. मिती माघ * शुध १४. सुमा तिसा खमसेन मया व अलफ. सन ११६६ [फसली] माहे जमादिलाखर. बहुत काये लिहिणे हे विज्ञाप्ती

साक्ष जीनाजी आणाजी पत्राप्रा॥ साक्ष. साक्ष कृष्णाजी विठल दि॥

श्रीमत गंगाधरपंततात्या मा॥ त्रिंगजपुर.

लेखांक [३७९] श्री * संवत १८१६ ज्येष्ठ वद्य २

१७२] [१२ जून १७५९]

राजश्री रघुनाथरावजी [भट] गोसावी यासी

श्रीमंत प्रतापगुणवंत येश्वर्यकुसुमविलसितेकवसंत श्रेष्टप्रभाव श्नो॥ माहाराव जसवंत निंबालकर दंडवत विनती उपर. येथील क्षेम ता॥ छ * १६ सवाल जाणोन निजानंद लिहिणे विशेष. लाला व्रिजनाथ यानी श्रीमंताचे प्रतापासुन रूये घेतले सरकारचे

लेखांक [३७६] ॥श्री * संवत १८१५ चैत्र वद्य १३
१६२] [५ मे १७५८]

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे शेवेसी.

विनती सेवक आंताजी माणकेस्वर [मोघे] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता। चैत्र * वद्य १३ शुक्रवार मुकाम दिली स्वामीचे कृपावलोकनें करून यथास्थित जाणोन स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. सेवकास स्वामीनी कृपा करून पत्र छं ९ साबानचें पाठविलें ते पावलें वर्तमान लाहोरचें फतेचें व शत्रुचे पारपत्याचें व तिकडील मुलूक काबिज केल्याचे लिहिलें तें सविस्तर वाचून परम आनंद जाला तो पत्रीं कोठवरी ल्याहावा. हिंदुस्थानात कीर्त लौकिक मातब्बर जाली. कुल राजे उमराउ सुमे यास दहशत पडिली. सारे हिंदुस्थानाचा सूड आवदालीपासून येक स्वामीनी घेतला तेणेकरून येशाचे परवत जाले. स्वामी येशश्रीच आहेत. याचा विस्तार सेवकास लेखन करावयासी सामर्थ कैचें. हें वर्तमान वजिरानी येकोन बहुतच हर्ष मानिला. शत्रुनी बहुत उन्मता करून मथु [रा] क्षेत्रीचा कटा केला होता त्याचें फल ईश्वरें लवकरीच दाखविलें. स्वामीस येश आलें. याचा संतोष फारच वजिरानी मानिला त्याचा परिहार कोठवर ल्याहावा. स्वामी आवतारी पुरुष आहेत. त्याची स्तुत मनुशानी काय करावी. वरकड इकडील सविस्तर वर्तमान आलाहिदा पुरणिया लिहिल्या आहेत त्या ध्यानास आणून याची उतरें वेगलालीं पाठवावयास स्वामी समर्थ आहेत. सारांश गोष्ट सेवकास आश्रा स्वामीचे पायांखेरीज दुसरा कोठेही नाहीं. येविशई वारंवार सेवकानी ल्याहावेंसें नाहीं. स्वामीच्या द्रष्टीस थोडकेच दिवसांत पडेल. ॥ जरी स्वामीची छावणी लाहोर प्राती जाली तरी वजीर पातशाहास घेउन येतो जरी करिता आपण काही आपली दाहा हजार फौज ठेउन इकडे येतील तरीं हें दोघे सरदार आपल्या सरदाराजवल ठेवितील. आपण जेथे खासा छावणी करितील तेथेच हे खासा वजीर छावणी आपणाजवल करितील. आपणा वेगले कोठे खासा निराले राहात नाहीत परतु वजिराने व ल्हाहाणमोठे सर्वत्र ह्मणतात [की] खासा छावणी न जाली तरी पठाण मागती लाहोर प्राती पाउसाला येतील. उगेच लोक म्हणतात ते सेवेसी लिहिले. करणे न करणे येकत्यार खावंदाचा. वजिराच्या यावयाचा निश्चये कोणे प्रकारचा कोणे स्थली ती आज्ञा निवडून सेवकास व वजिरास ल्याहावी त्याप्रो। त्या स्थली दाखल होउन. रा। विठल सिवदेवही [विंचुरकर] त्वरेच सेवेसी येतील त्याजवरा रा। कृष्णरावजी येतील. सर्व विनंती करितील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

मो। छ ५ रमजान
[१३ मे १७५८]

गारनुरेप्या जवानी अज्ञा जे अंजनडोह येथील राजारास अटकाव केला आहे तो तूर्त न करावा. राजश्री भुवाजी नाईक व माहादाजी नाईक त्यारीस गेले आहेत ते आलियावरी त्याम सांगोन विल्हे लाविले जाईल. येसियासि अन्हास अज्ञा प्रमाण. येविशई राजश्री मल्हारपंत खिजमतगारजी यानी पूर्वी सेवेन विनंती केली असेल व प्रस्तुतही करितील. सांप्रत पूर्ववतप्रमाणे बाजार व मार्ग चाली लागला हे वृत्त राजश्री माधवराव सविस्तरे निवेदन करितील त्याजवरून श्रुत होईल. हे विज्ञप्ती.

---

लेखांक [३८२] श्रीरामजी

[१५ अक्टुबर १७५९] ?

श्रीघश्री लसकर माहासुमस्थाने श्री सरवउपमां जोग सदा राज्यमान राजश्री माउसाहबजी श्री रामांजीबाबा जोग श्री उजण सु श्री सेवक प्राणनाथ बंसीधर तथा श्रीमोहनलाल केन नमसकार बचनां. ईहां के समाचार माहाराज की क्रिपा सु भले है. माहाराज के सुपसमांचार सदा आरोग चाहीजे. अप्रच. आप का क्रीपापत्र बोहोत दीन हुये नही आया. सो सेवक उपर मेहरेबांनगी कर लीपोगे और हकीकत असी के राजश्री मीरजा आदलबेगजीने माहाराज की तरफ के रुपये छे हजार अक छ हजार दीवाये सो सेठ माधवजी कीसनजी की मारफत हम कु पोहोचे. सो माहाराज के जमां कीये हैं. उसको रसीद आगु सेठ माधोजी कुं हमने लीप दीवी है सो माहाराज कु पोहोचेगी ओर मुंखर बाबत रुपय आपने हमारे ईहां दीवाये थे सो हनोज ताई कोडी १ आई नही है. सो माहाराज कु मालुम रेहे. बोहोत का लीखे. हेम माहाराज के हे. मेहेरबांनगी बीसेक रखोगे. क्रीपापत्र सदैव लीषोगे. म १८१५ के मीती आसोज * वदी १० दसमी. ली. सेवक मोतीचंद का रामराम पोचे. सेवक आगनाकारी पुनमचंद का रामराम बंचनाजी.

पत्रीका श्रीमंत माउसाहबजी श्रीरामांजीबाबा जोग का लसकर पुर. [अपूर्ण]

---

लेखांक [३८३] श्री

[१७५९] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामाजीपंत स्वामी गोसावी यासि.

पोष्य सखाराम भगवंत [वोकील] सां नमसस्कार विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. राजश्री कासी

रामचंद याचे आसामीविशई ताकीदपत्र राजश्री त्रिंठल येमाजी याजला पाठउन ताकीद करुन त्यास आसामीचा येवज पावता होये येसे करावे. स्मरणपूर्वक ताकीद करुन आसामीचे रुपये पोहोचवणें म्हणोन यावे.।" बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [३८४] श्रीरघुवीर * संवत १८१६ पोष शुद्ध १४

[१ फरवरी १७६०]

राजश्री रघुनाथपंत [भट] गोसावी यांसि.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो मुधोजी भोंसले सेनाधुरंधर दडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे विशेष. गोसावी यांणी बहुता दिवसी स्मरणपुरस्कर पत्र पाठविले ते प्रविष्ठ होउन परम संतोष जाहाला. पूर्वीही पत्राची प्रतीक्षा बहुत दिवस करीत होतो परंतु कालदेशस्तव अविस्मरणता जाली. येसेच सदैव पत्रव्दारा कुशलार्थ लेहून तोषवीत जावे हे आपणांस उचित आहे. पत्री अर्थ लिहिले की कोठे आह्मा काय वर्तमान ते ल्याहावे. येसियासी पूर्वीपासून अद्यापात वृत वारंवार राजश्री पंतप्रधान यासी लिहित गेलो त्याजवरुंन आपल्यास विदित असेलच परंतु विस्मयेकरुंन लिहिले त्याजवरुंन अविस्मरणाचे आश्चिर्य वाटले. अस्तुं सांप्रत वराडात परस्परे यैक्यता होउन येके विचारे वर्तून कार्यास अविलंबे यावे येसे अचेरत असता त्याजकडोन जाबसालाचे करारात अंतराये दिसोन आले. आपले पत्र आले की मोगलाचा विघाड आहे. मुकाबला जाहाला निलशा युघ्य होत आहे. हाली मोगलावर तोफा जेजाला बाणाचा मार करुन मोगल सिकिदा केला आहे. तुम्ही लवकर यावे त्यास छ ८ रोज माहे जमादिलांखरी त्याजपासून कूच करुन मजलदरमल सत्वरच येत असो. भेटीअंती सविस्तर अर्थ श्रवण होतील. रवाना छ * १३ माहे मजकूर. आम्हीं कोणेही प्रकारे गोसावियाजवल येतो. वरकड सर्व अभिमान आपल्यासच आहे. उचित तेच केले पाहिजे. सूज्ञा प्रती विशेष काय लिहिणे कृपालोभ असो दिल्हा पाहिजे हे विनंती.

छ १८ जमादिलाखर माघमास सुा सितेन.

[६ फरवरी १७६०]

---

लेखांक [३८५] श्री * संवत १८१७ वैशाख शुध ९

[२३ अप्रेल १७६०]

श्रीमंत राजश्री माउसाहेबजीचें सेवेसीं.

सेवक पा नानाजी नाईक महाजन मुा उजनीहून कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी. राजश्री प्राणनाथ बनसीधर महतापासून घेतले रुपये १५६७५ अक्षरी पधरा हजार सहाशे पंचाहत्तर रुपये रासी हस्ते राजश्री गोविंदपतानी दुकानी भरती केली. मिती वैशाख * शुध ९. जमा अनांमत आसेत. शके १६८२ दस्तूर रामाजी शंकर समत १८१७ माळवीं.

---

लेखांक [३८६] श्री * १८१७ अधिक श्रावण शुद्ध ११

[२३ जुलै १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालोबा स्वामी गोसावी यांसि.

पोष्य त्रिंबक दताजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी. येथील कुशळ तागाईत * १० माहे जिल्हेज मुकाम उजेन जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान विदित जाहले. त्यास स्वस्थान पाटण येथील ऐवज श्रीमताकडे लस्करात पाठवावा. त्यास अगर येथील हुंडणावळ बारा रुपये घेतात तर आपले विचारास नये म्हणोन आम्हाकडे हुडया करून ऐवज रवाना केला. त्यास येथ हुंडीपत्र पावली ते सकारली आसेत. ऐवजी मुदती बरहुकुम पावेल परतु साल आखेर जाले आसोन बाकी ठेविता हेच आपूर्वात आसे. खावंद मोहिमसीर. वराता येथून होतात त्यास देणे पडते. खर्चास येवज नाही म्हणोन राघो हरीचे पथक रवाना केले आहे. त्यासही यैवज त्याचे आज्ञेप्रा दिल्हाच पाहिजे. तर यैवजविना महाला वेगळा ठेव नाही. मग त्यापो देणे तर घावा. यैसे तुम्हासही वाकफ आसोन दिरंग लेहून पाठविता हे उतमात नाही. याउपर तरी त्वरा करोन सनदे बरहुकुम प्रविष्ट जाल्या खावंदही बरेच म्हणतीऊ. कोटेकर तो दिवसाकडे पाहून स्थिरता करतात. आल्पबुधीचे कारण आहे. आती करारमाफक देणे सुटणार [नाही] देतीलच परंतु सध्याच त्यास हर प्रकारे उमजउन ज्या रीतीने तुम्हास येवज येई ते करणे. रात्रंदिवस ठमणीस आंतर न करणे. मुसल्वे नसले तर खावंद समजोन घेतील. तुम्ही पाटणच्या

यैवजाच्या हुंडिया पत्र पावताच रवानगी करणे. परमारे यजमानानी आणविले आण तुमच्याने पावते होत आसले तर करावे. उतमच आसे. लष्करचे व येवनाचे व सुजातदोलाचे मजकूर लिहिला तो विस्तारे कळला. याउपरही वरचेवर लिहित जाणे. प्रस्तुत डाक उठली आहे त्यामुळे वर्तमानात विलंब लागतो तर तुम्ही लिहित आसावे. आम्ही खासगत फरमास सांगितली ते केलीच आसेल. ते सोबतीने पावती करावी. बहुत काये लिहिणे कृपालोभ आसो द्यावा हे विनंती.

राजश्री नारोबा स्वामीस सा। नमस्कार. तरतूद करोन यैवज सत्वर पाठवणे. हे विनंती.

---

लेखांक [३८७] श्रीगजाननप्रा. * १८१७ अधिक श्रावण वद्य ९

[५ अगस्ट १७६०]

राजश्रियाविराजित राजश्री

लालाजी बलाळ [गुळगुळे]

प्रा। पाटण स्वामीचे सेवेसी.

सेवक चिंतो नारायण कास्टीकर कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जावे विशेष. श्रीमंत राजेश्री जनकोजी पा। सिंदे म॥ मोजे मजकूर यानी आपली असामी पेसजीपासोन असामी करार केली त्या प्रा। असामी दर साल रुये २५० अडीचसेप्रा। चउ सालाची असामी करार रुये १००० हजार याची नेमणूक प्रा। आपणावरी दिल्ही. त्यासि रो। सुरतराम व सिरदारसिंह महेता यास इकली. त्याजपासोन रुये येक हजार यथे नख्त भरणा भरोन घेतले. हे रुये मार निलेचे पदरी सदरहू सनदेप्रा। याचे पदरी घालोन कबज घेणे. यासिपाई श्रीमंताची ताकीद फार असे. तरी पत्र देखताच रुये सदरहु देणे. वरात याजपासोन घेणे. मिति शके १६८२ विक्रम नाम संवत्सरे अधिक * वद्य ९ मुा। दिल्ही स्वस्थान इंद्रप्रहस्त. बहुत काय लि॥ हे विनंती.

पैवस्ता छ १ रावल.

[११ अक्टुबर १७६०]

लेखांक [३८८]

श्रीलक्ष्मीकांत * संवत १८१७ भाद्रपद शुद्ध ८
[१७ सितंबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पोष्य रामचंद्र कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * ७ सफर मु॥ दिल्ली सालेमार बाग जाणून स्वानंद लेखनें संतोषवीत आसिलें पाहिजे विशेष. श्रीमंत राजश्री जनकोजीबावाही [शिंदे] आम्हापासोन खर्चाची वोढ जाणून रुपये ५०००० पन्नास हजार घेउन तुम्हावर हुंडी लिहून दिल्ही असे. तर पत्र पावताच सदरहु यैवज देणे. खूबचंद खुशालचंद यांस भरती करून देणे परंतु जो यैवज बाल त्याची पकी सावकारी निशा घेउन यैवज देणे. निशा ठिकाण खेरीज यैवज देत न जावे. अम्ही सरकारात यैवज तो पुरता भरून दिल्हा असे परंतु मारनिलेकडे आमचे पंचवीसतीस हजार रु॥ घेणे आहेत म्हणून आपणास लिहिले असे. तरी बरातेप्रमाणे वायेद्या बमोजिब पनासा हजाराची पकी निशा चौकसीने घेउन यैवज पदरी घाल्णें. आम्ही कासिदजोडी आमची मुजरद पाठविली असे. त्यास उतर सत्वर पाठवावें. अजुरा रोज तेरा रोजाच्या आहेत. तर हुंडी आमची सकारून आम्ही सरकारची बरात पाठविली आसे. ते घेउन यैवजाची सावकार मजकुराची निशा आपली घेउन यैवज पदरी घालोन आम्हास लिहून पाठवावे. जर हुंडी माघारे आली तरी सकराईनकराई आजुरा व्याजसुधा सरकारातून श्रीमंतास द्यावे लागतील ऐसे पष्ट समजोन यैवज सत्वर पदरी सावकाराचे ठिकाणा चौकस करून द्यावे. बहुत काय लिहिणे कृपालोभ करावा हे विनंती.

पौ। छ १८ सफर
[२८ सितंबर १७६०]

---

लेखांक [३८९]

श्री

*[१ अक्टुबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजीबावा स्वामी गोसावी यांसि.

शेवक त्रिंबक दत्ताजी कृतानेक नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। छ माहे सफर मुक्काम उजेन येथास्थित जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत आसिले पा।

विशेष. यैवजाची जरूर [म्हणून] राघो हरी खजीना न्यावयास आला. त्याची पूर्त जाली पाहिजे. तुम्हाकडे मुजरद कासिद पाठविला त्याजवरून तूर्त हुंडीपत्रे ९ येकूण रुये तीस हजाराच्या येकवीस दिवसाच्या मुदतीच्या पाठविल्या त्या प्रविस्ट जाल्या. वायदेसिरी यैवज घेउन पावती पाठविली जाईल परंतु येवजाची वोढ फार. आवदाचा प्रसंग कठिण यैसे आसता साल गुा यवज बाकीस ठेवावा हे उत्तमात नाही. दिरंगाव्रर घालून आजपर्यंत राखले. प्रस्तुतही झाडून कश्या वारला नाही. पुन्हा पत्राचा आक्षेप ठेवलाच आसे. माळव्यातही आवघड जाले आहे परंतु माणसे घरोवर बसउन यैवजाची रोजिना जमा करीत आसो. येविसई तेथीलच आज्ञा आहे याचा [विचार] परस्परे मनास आणोन येक वळ गुंता झाडून उरकावा. बोभाट कोठवर ठेवावा. त्यासही मर्यादा आहे की नाही. याउपर शिलक पैसा न ठेवता वनेल त्याप्रमाणे यैवज प्रविष्ट करुन देणे. बहुत विस्तारे पूर्व लिहिले त्याने काय जाले. याजमुळे संकलित आर्थ लिहिला आसे. मनन करुन लचांड वारणे. विशेष काये लिहिणे कृपा निरंतर असो देणे हे विनंती.

राजश्री नारोबास नमस्कार. लालाजीचा कारभार नुतन आहे. तुम्ही तो कालदेशवर्तमान जाणून चालढकली नेना. आपूर्व आसे. खावंदावर दिवस कठिण आहे. पैसा येकंदर न ठेवणे. हे विनंती.

पौ ॥ छ २१ सफर
[१ अक्टुबर १७६०]

---

लेखांक [३९०] श्री ॥ संवत १८१७ कार्तिक शुद्ध १
[८ नवंबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक गुंडो महादेव कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता। छ ॥ २९ माहे रावल मुा पाणिपत जाणून स्वकीय कुशल लिहित आज्ञा केली पाहिजे विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविले ते पावले. लिहिला अर्थ सविस्तर कळला. वरातीचा मजकूर लिहिला. त्यास निकडीचा समय जाणून वराती जाली. आपणही आज्ञेप्रमाणे रुपये दिल्हे. या गोष्टीने श्रीमंतसाहेब बहुत खुशाल जाले. स्वाम सूज्ञ आहेत. इकडील वर्तमान तरी अब्दालीसी लढाई लागली आहे. याचे पारपत्य जाल्यानंतर सविस्तर

वर्तमान शेवेसी लेहून पाठऊ. सदैव कृपापत्री सांभाळीत जावे. सविस्तर वर्तमान श्रीमंता या पत्रावरून कळेऊ. दुसरा ल्याहावेसे नाही मागाहून फत्ते जालियावरी लेहू. बहुत काय लिहिणे हे विज्ञाप्ती.

समस्त मंडळीस सा। दंडवत विज्ञापना.

---

लेखांक [३०.१] श्रीशंकर * संवत १८१७ कार्तिक शुद्ध १

[८ नवंबर १७६०]

चिरंजीव राजश्री लालाजी यांसि प्रती नारो विठल आशिर्वाद उपर. यथील क्षेम ता। कार्तिक * सुध १ प्रतिपदा मु॥ पानपत सुखरूप आसो विशेष. तुम्ही पत्रे दोनतीन पाठविली ती पावली. त्याचे उतरे मागा पाठविली ती पावलीच असतील. वरात केलियाचा प्रकार लि॥ त्यास निकड पाहून यथे खर्चास नाही जाणून यथे रुपये घेउन तुम्हावर वरात केली. याउपर तूर्त होणार नाही म्हणून बोलिले. त्यास रोज सावधता करावी. त्यास दोन कोशावर त्यांचे आमचे लष्कर राहते. आठाचौ दिवसी तथे जातो. त्यास जितकी तजवीज होउन आमचे हाते होईल तर करीत जाउ. मोगलाचा प्रकार तर यका कोशाचे अंतराने दोनी फौजात राहिल्या आहेत. मधे येक कोश मैदान राहिले आहे. आपली फौज पानपतगाव पाठीशी देउन मधे बुलगे पुढे तोफखाना देहून फाज उतरली आहे मोगल [अबदाली] रोज यहून तोफा आणून कटकट करितो. आजी हा बुधवार षष्ठी ता। आजी सनवार प्रतिपदापावेतो युद्ध होतच आहे. पुढा काय होईल ते पाहावे. उभयतो पक्ष भारी फौजा आहेत श्री करील ते होईल. तूर्त तोफाच[१९५]

---

(१९५) 'मातवर फौज गाडदी व तोफखाना बरोबर आहे. मल्हारबा जाट यासहित अबदालीचे पारपत्य करावे ह्याच विचार आहे' [खंड १ ले १७४] हा सकल्प वरील २८ अंकेलच्या पत्रात प्रथम भाऊसाहेबाने दर्शवून पुढे तोच भावार्थ उघड करून दाखविला आहे 'मातवर फौज तोफखाना गाडदी व दोन्ही फौजा सरदाराच्या व जाट इतके पाहून उभे राहून चालून घेउन तेव्हा अबदालीच्याने दम धरून उभे राहणे तोफाचे माराखाली बार येणे कळतच आहे' [खंड १ ले १८७] या निश्चयाप्रमाणेच तो 'ढवलपुरचे घाटे उतरोन गिलच्याचे पारपत्यास जातो' [खंड १ ले १८९] सोबत्याच्या सलामसलतीची अपेक्षा मुळीच नव्हती 'दिलीस किल्यात अबदालीकडील लोक होते तोफाचा मार दिल्हा तेव्हा घाबरे होउन कौल मागो लागले' [खंड १ ले २२४] यामुळें तर तोफाविषयी विश्वास विशेषच वाढला 'दिलीहून कूच जाले कुंजपुऱ्यावर जातात अबदाली यमुनापार आहे' [लि २३३] 'पाणिपताजवळ गाठ पडली तोफखान्याचा अरावा रचून लढाई करावयास तयारी केली' [खंड १ ले २६४] 'श्रीमतीही चोहोकडे तोफखाना पसरला आहे यवन चालोन येईल तरी क्षणमात्र बुडेल'. [खंड १ ले २६५] 'नित्यानी गोलागोली तोफाचा मार होत आहे' [लि २३३] 'मोगल

मुख्य होत आहेत. निकड होईल ते दिवसी श्री करील ते होईल. गोस्टी संकटाच्या आहेत. कासिदास दोनच्यार रोज राहा म्हणत होतो परंतु सोबतीकरिता निघोन आला. मागाहून होईल वर्तमान ते लिहोन पाठउ परंतु तुम्ही आणखी कासिदाची जोडी वरचेवर पाठवणे खबर लेहून पाठउन देउ. बहुत काय लिहिणे लोभ कीजे. राजश्री नारोबास आशिर्वाद. चिरंजीवास लिावरून कळेल. संकटाचे आहे. श्री निवारण करील. चिंता न कीजे. हे विनंती.

राजश्री राघोबास असिर्वाद. पत्र पा ते पावले. लिा वर्तमान कळले. साऱ्या जोडिला जागा जतन करून कालहरण[१९६] करावे. हे विनंती.

॥ सेवक अनंदराव नारायेण सा॥ नमस्कार. लिा परिसोन लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [३९२] श्री * संवत १८१७ कार्तिक शुद्ध २
[९ नवबर १७६०]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजी स्वामीचे सेवेसी.

सेवक राघो दादाजी सा॥ नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता छ * २० रबिलावल मु॥ पाणिपथ यथास्थित जाणोन आपणाकडील लिहित आसिले पाहिजे

---

रोज तोफा आणून कटकट करतो तूर्त तोफाच मुख्य होत आहेत. जागा जतन करुन कालहरण करावें सायकाली माघारे सरोन स्वस्त राहतात'. [लि. ३९२] 'पुढे तोफा आरबा देउन मजबुदीने आहो. त्याचे चालून यावें ही वाट पहातो आल्यानतर एकदाच लगटाने मारुन बुडवावा येसे आहे' [पुरंदरे १ ले ३९१] 'तोफखान्याच्या आरब पसरुन खदक खणून पानिपत पाठीसी घालून सड्या फौजा तोफाचे मागे उभ्या याप्रमाणे बंदोबस्ताने राहिले आहेत त्यापासीही चालीस पनास तोफ चांगली आहे' [खड १ ले २७२ टीप] एवच भाऊची भिस्त तोफाच्या गाडयावर होती.

(१९६) हे पत्र महत्वाचे असून पानिपतचा परिणाम काय लागणार होता हे भविष्य '८ नवबर' रोजीच यात वर्तविले होते. हा लेखक साधारण खर्डेघाशा नसून १७४५ पासून अनेक राजकारणात वावरणारा होता [लि ३३४ भाग १ ले २५, ८१, १९१] 'सविस्तर श्रीमताच्या पत्रावरुन कळेल दुबारा ल्याहावेसे नाही मागाहून फते जालियावर लेहू' [लि. ३९०] याचा ध्वनितार्थही वरीलप्रमाणेच निघतो ही दोन्ही पत्रें एकाच तारखेची असून कुंजपुऱ्याहून परत आल्यानतरची होत. अर्थात कुंजपुऱ्यावर जाणे हीच चूक झाली. त्यात तिकडे लावणे तर घोडचूक होती. यामुळेच अब्दालीस यमुनापार होता आले आणि ही चाल भाऊच्या आगलट येऊन युद्धाचे पारडेंच फिरले असा बखरीचा जो सिद्धात आहे तो या पत्राने अटल ठरतो.

विशेष. भाद्रपद आमावाश्येचे स्वामींनी पत्र पाठविले ते पावले. हुंडी वरातेचा तपसील वर्तमान सविस्तर श्रीमंताच्या पत्री लिहिले. तसेच राजश्री पाटिलबाबाच्या पत्री लिहिले होते. ते सावंत अवघे वाचून श्रवण करविले त्याजवरून श्रीमंतासही च्यार गो[ष्टी] पाटीलबाबानी सागायाच्या त्या सागितल्या. त्यावरून पत्र लिहिले आहे त्यावरून कळो येईल. आणिक पेशजी खंडणीच्या कारामदाराबदल आखेराम आला होता तेव्हा पांच हजार आखेराम यासी बोलला. ते तुमच्या तीर्थरूपानी कबूल केले. जे आधी वसूल येईल त्यातील पाच हजार तुमचे देउन वरकड सरकारात दाखल करून. पांच हजार आपल्याकडे आले येसे बोलिले येसे सांगतात. हे त्यावरी आम्ही लाहोरास गेलो ते तैसेच राहिले. तेथू[न] आलियावर तुम्हास कागद लिहिले. त्या वरून तुम्ही दोनच्यारदा सबब लिहिली. निदाने अडीच हजार पोहचाविले. राहिले अडीच हजार ते देतात न देतात किंवा कैसे हे दोनतीन तुमची पत्रे आली त्यात तपसील काहीच वर्तमान लिहिले नाही. त्याजवरुन पाटील तुम्हावर श्रमी आहेत. यैसियासि हातास येत तो यत्न करावाच. नाही तर पत्र लिहिता त्यात परिहार तरी लिहित जावा परंतु विस्मरण न करावे. कल्युगी प्रपंची इस्टत्व मित्रत्व सर्व स्वार्थाचे आहे. परमार्थ कोण पाहातो. याकरिता तुम्हास लिहिले आहे. वरकड यथील वर्तमान सर्व सेना कुली दिलीवर होती. त्यास बातमी आली जे सरहद्देकडे अवदुलसमदखान व कुतुब-शाह व मोमिनखान गिलज्याकडील फौज दाहापंधरा हजार अमल करीत होते ते आवघे मिळोन अंतरवेदीत जावया गिलज्याकडे आले. ते कुंजपुऱ्याजवळ आहेत आण कुंजपुरेवाला निजाबतखान रोहिला याचाही आसरा होता. याबदल वर्तमान येकतच तथून दिलीस आलीगोराचा पुत्र स्छापून प्रतिनिधित्व त्याकडे आण पातशाह गजसिका अलीगोराच्या नावे ठहराउन तो बाहिर बंगालास आहे या करिता यैसे करून कूच केले. ते पंनास कोस पांचवे दिवसी कुंजपुऱ्यास पोहचलो. तेच क्षणी भोवती फौज राहिली होती ते तुडउन कुंजपुराही घेतला. तिथे सरदार गिलज्याकडील धरून मारिले. निजावतखान कुंजपुरेवाला त्याला कबिलासुधा धरिला. जखीम लागल्या. द्रव्यही काही त्याणे दाविले. सुखी प्राणी आणि जखमाही लागिल्या होत्या त्यामुळे तो मेला. वरकड बंदीस आहे. आम्ही कुंजपुऱ्यावरी लावलो[१९७]

(१९७) हे पत्र अत्यंत महत्वाचे होय बखरीतील कुंजपुऱ्याचा वृत्तांत किती वास्तविक व विश्वसनीय आहे याची तुलना करण्याचे हे उत्कृष्ट साधन होय. 'लडाई तर पाण्यावर मोकूफ आहे'

मागा गिलज्या व नजीबखान रोहिला व सुजातदौला यैसे यमुनेआलीकडे सोन-पथाच्या सुमारे उतरले. हे वर्तमान कुंजपुऱ्यावरी असता यैकिले. मग तेथून कूच केले ते पाणिपथावरी माघारे दोन मजली येउन मुकाम केला. गांव पाठीसी देउ[न] तोफखाना

---

[खंड १ ले २२४] 'कुंजपुऱ्याकडे जाणार आहो आम्ही तिकडे गेल्यानंतर तेही इकडे राहत नाहीत त्या रोखे सहजात येतील. तेव्हा दिलीकडील शह चुकला. आपला मुलुक पाठीस पडोन लढाई पडली तरी तिकडेच पडेल असाही प्रकार योजिला आहे' हा बेत २ सितंबरचा होय [खंड १ ले २३७] 'लढाई न होता सर्व प्रयत्न आवरु राहून होतील ते करु सेवटी नेटाने सर्व येकत्र जमहून लढाई करु'. [पुरंदरे १ ले. ३८९] 'यमुनेचे पाणी हलके होताच अवदालीचे पारपत्य यथास्थित करावे असा डौल आहे. प्रस्तुत दिलीहून कूच करुन ऱ्लेऱ्यास कुंजपुऱ्याचे सुमारे आलो पुढे जाउ महिना भर फौजा उतरावयाजोगे पाणी होत नाही कुंजपुरियास समदखान आहे त्याचे पारपत्य करितो. अवदाली तिकडे आला तर उत्तम. न आलिया फिरोन येउ' हे पत्र ११ अक्टुबरचे होय. [खंड १ ले. २५९] याच तारखेचे पत्र बलवतराव मेहदले याचे असून ते मननीय आहे. 'कुंजपुऱ्यास जाण्यास पाणपतपावेतो येउन पोचले नदीस पाणी आठचार दिवस उतरावयास पाहिजेत गिलचा पलीकडे आहे कूच करुन पलीकडे तिराने येणार होते [ऐटि १ क्र १४१] 'यमुनेचे पाणी फार याकरिता दिलीवरी बसोन उपयोग नाही यास्तव कुंजपुऱ्यास जाउन अवदुलसमदखान याचे पारपत्य करावे या अर्थे दरकूच जात आहो आम्ही कुंजपुऱ्याकडे गेलो इकडे अवदालीचे कूच होउन आलियावर उत्तम जाले. दिलीकडील मुलुक मागे मोकला राहिला. इकडेच लढाई पडेल कदाचित ते इकडे न येता तिकडे तुमचे रोखे जाहले तरी बरेच आहे. आम्ही पाठीवर यमुना उतरुन अतरवेदीतोन पारपत्य करु. अवदाली आम्हाकडे येईल तिकडे आला तरी पाणी आहे तो आहे चार रोजात कुंजपुरियाचे पारपत्य करुन सारंगपुराकडे उतरुन नजीबखानाचे किल्हे लाउन पुढे अवदालीचे पाठीवर येउ' हा संकेत वाट चालत असता १४ अक्टुबरचा होता. [खंड १ ले २५८] '७ रावली हला केला कुंजपुरा लुटून फस्त केला. पुढे गिलज्याचे पारपत्य करावयासी समेदवार जाहाले आहेत तोही लुटून घेतील'. [पेद २१ ले १९२] 'येथे कुंजपुऱ्यावर चार रोज जाले समदखान याचे सिर कापून भाल्यावर लाउन लस्करात फिरविले व कुतुबशाहा त्याप्रमाणे मारिला' [पेद २१ ले. १९३] अवदाली यमुनेपलीकडे आला आपल्या फौजा आल्याड आहेत यमुनेस उतार जाहल्यावरी काय होणे ते होउन येईल कुरुक्षेत्र १६ कोस आहे येकादोहो रोजी येथून कूच करुन कुरुक्षेत्रास जाउन तीर्थविध करुन पुनरपि दिलीस जाणार. [पेद २१ ले १९४] ही सर्व पत्रे २० अक्टुबरची होत 'दिलीचा बदोबस्त करुन श्रीमंत कुंजपुऱ्यास आले. हला करुन मोडले. गोट लुटला तसेच करुन गाव घेतला लोकास लूट पुरी मिळाली'. हे आश्विन शुा चतोर्दसी गुरुवार मुकाम कुंजपुरा यमुनादक्षिणतीरचे पत्र पुरदऱ्याचे होय [खंड ६ ले ४०५] 'कुंजपुरा व पाचसात हजार फौज पाचसा प्यादा लुटला यामुळे अवदालीचे लस्करात दहशत पडली. अवदाली कूच करुन वागपतेवर ४ कोस काही फौजा उतरु लागला लौकरच त्याचे पारपत्य होईल अवदाली अलीकडे आला तुम्ही पुढे येउन वाटा त्याच्या माराव्या' हे पत्र भाऊसाहेबाचे २५ अक्टुबरचे होय [खंड १ ले. २६०] 'श्रीमंताची व मोगलाची दोती कोसाची तफावत येकदोन रोजात युध तुबल होउन श्रीस करणे ते होईल सफेजंगीस काही बाकी नाही वाट यमुनेचा आगऱ्या

व गारदी वगैरे पुढा रचून झुंझाची तरतूद येथेच केली. तो गिलज्या यथून सोनपत दक्षणेस वीस कोस तिथे होता. तो चौ रोजी यथे दीडा कोसावर येउन राहिला आहे. रोजबरोज आपली फौज तयार पुढा होती. त्याची फौज तयार होउन पुढां होती.

---

पासून कुंजपुऱ्यापावेतो श्रीमताचे हाती लागले' असे नारो शकर सागतो [खड १ ले २४३] 'उभय पक्ष भारी आहेत. निकड होईल ते दिवसी श्री करील ते होईल गोष्टी सकटाच्या आहेत चिरजीवास लिहिलेवरुन कळेल. जागा जतन करुन कालहरण करावे'. हा लेख नारो विठलाचा असून ८ नववरचा आहे [ले ३९१] 'बातमी आली जे सरहदेकडे अबदुलसमद कुतुबशाह व मोमिनखान गिलज्याकडील फौज दहापधरा हजार अमल करीत होते ते अवघे मिलून अतरवेदीत जावया गिलज्याकडे आले ते कुजपुऱ्याजवल आहेत. याबदल वर्तमान यैकताच कुजपुऱ्यास पोहचलो कुजपुरा घेतला आम्ही कुजपुऱ्यास लावलो मागो गिलज्या यमुनेआलीकडे सोनपथाच्या सुमारे उतरले हें वर्तमान कुजपुऱ्यावरी यैकले. मग तेथून पानिपतावरी आलो' [ले. ३९२] हे पत्र ९ नववरचे होय 'आमची फौज उत्तरेकडे रोख दक्षणेकडे. अबदालीची फौज दक्षणेकडे रोख उत्तरेकडे आम्हावर येणेप्रमाणे फौजा आहेत शाह भारीच आहे अबदालीचा गडबडीमुले वाटा बद आहल्या (पेद २७ ले २५९) हें पत्र १४ नववरचे होय 'तेथून पुढे कुरुक्षेत्रावरुन सरहिंदकडे जाउन तो प्रात काबिज करुन तिकडील जमिदार सिख जाट सामिल करुन फौज तवाना करावी हा मनसबा करुन पुढे येक मजल चालिलो तो अबदाली बागपतास उतरावयास लागले हे वर्तमान येताच श्रीमत माघारे फिरले मुकामास आले. तो तेही सारे उतरुन ५ कोस आले १३ रोजी सरदाराकडे उजवी बाजूस चालून आले जुज मातबर जाले. त्यास मोडून गोटात घातले सध्याकाल जाला नाहीतर तेच दिवसी पारपत्य उत्तम होते. [पेद २१ ले १९७] हे पत्र २७ नववरचे होय

अबदालीस गाठून तोफखान्याच्या बलावर त्याचा समाचार घ्यावा असा मुख्य मनोदय भाऊसाहेबाचा असून त्यासाठी अगदी उतावले झाले होते पण पावसाचे दिवस व यमुनेस अपार पाणी ही अडचण नडली [पुरवरे १ ले ३८७] सेनापती या नात्याने भाऊसाहेबाची तुलना करू जाता पानिपतचा निवाडा करणाऱ्या त्याच्या शेवटच्या चालीची चिकित्सा करण्यासारखी आहे 'लढाई पाण्यावर मोकूफ' होती अर्थात पाणी केव्हा उतरेल हा प्रश्न अत्यत महत्वाचा होता. त्याविषयी 'महिनाभर उतरावयाजोगे पाणी होत नाही' असा भाऊचा तर्क होता. मौज अशी की याच तारखेला सेनापतीचा मुख्य मत्री मेंहदळे सागतो की 'नदीस पाणी आठचार दिवस उतरावयास पाहिजेत'. ही गोष्ट त्याने भाऊस सांगितली नाही किंवा निवेदिली असता भाऊने अनादर केला असें म्हटले पाहिजे या दोन व्यक्तीच्या मतभेदाची निवाडा करणारे साधन पेशवेदप्तरात उपलब्ध झालें असून ते भानु व फडके याचीच पत्रे होत. [पेद २ ले १३०, १३१] वरील पत्रांची तारीख १५ सितबर १७६० अशी आहे. 'दिलीचा किला घेतला अबदाली अनूपशहराकडे होता तो दिलीजवल पलीकडे येउन राहिला त्यास पाणी यमुनेस फार उपाय नाही नावा सर्व आपल्या हाती लागल्या. तेथेच मुकाम करुन राहिला आहे सर्व फौज दिसते सुजा नजीव सर्व रोहिले मिलाले आहेत महिनाभरा पाणी उतरेल. लढाई मातबर व्हावी असा विचार दिसतो' दोघाचे मत मेहदळ्याशी जुळते यास प्रत्यक्ष प्रत्यतर हे की अबदाली २३ अक्टुबरला यमुनापार झाला अर्थात

इकडील तिकडील गोळे सुटतात. साईकाळी माघारे सरोन स्वस्त राहतात. यैसे दाहा अकरा रोज दीपवली प्रतिपदा साईकाळपर्यंत यैसेच होत आले आहे. पुढा जे होणे ते श्री इच्छा प्रमाण.[१९८] बहुत काय लिहिणे कृपा निरंतर असो दीजे हे विनंती.

राजश्री नारोबाबा स्वामीस सा। नमस्कार विनंती. वरी लिहिले त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणे कृपा निरंतर असो दीजे हे विनंती.

राजश्री भवानी शंकरजी ता। राजश्री राघोबा स्वामीस सा। नमस्कार विनंती. कृपा करोन बहुता दिवसी पत्री स्मरण लिहिले. पावोन बहुत संतोस जाला. यैसेच सर्वकाल कृपाइक्षणास विस्मरण न कीजे. विशेष काय लिहिणे हे विनंती.

---

भाऊची कल्पना फोल ठरली आणि त्याच्या दुराग्रहामुळेच बिकट परिस्थिति उत्पन्न होऊन पानिपतचे अरिष्ट ओढवले हा पुरावा पेशव्याच्या पक्षाचाच होय 'श्रीमताच्या बुधीस महानबुधी परतु भावी अर्थ तेणेकरून विपर्यास पडला आप्त होते ते अनाप्त जाले. जे अनाप्त होते ते आप्त जाले. त्याचे वाक्याचे ठायी विश्वास आपली रीत सोडून यवनाची रीत धरली श्रीमत अति बुधिवान. गर्व मात्र विशिष्ट' याचा जो अर्थ शास्त्रीयरीत्या होत असेल तो करून भाऊसाहेबाविषयी जो सिद्धात राजवाड्याने प्रतिपादन केला आहे तो शास्त्रोक्त आहे किंवा पक्षपाताचा होय हे वाचकच ठरवितील. सोबत्याकडील पुरावा अद्याप अनुकूल होत नाही बखर व कैफियत ही दोनच प्रमाणे आहेत ती त्याज्य नसून 'भाऊगर्दी' हे नाव जें निर्माण झाले ते निराधार ठरणार नाही असे सशोधनाती प्रत्ययास येईल. बखर मागाहून लिहिली गेली असली तरी कुजपुऱ्यावर लाववल्याचा आक्षेप मात्र तत्कालीन आहे इतकेच नव्हे तर पुढील भविष्य स्पष्ट दर्शविले आहे

(१९८) 'श्रीकृपेने होणे ते होईल' असे पेशव्याचे उदगार असून [ले. १६, २५] 'त्याचे काम होणे जाणे ईश्वराधीन आहे' असे सखारामबापू वोकिलाने म्हटले आहे [पेद २१ ले. ६२] 'गिलज्या भारीच आहे यश देता ईश्वर समर्थ परतु यदाचा समय परम कठिण आहे' [पेद २७ ले २५८] किंवा 'शह भारीच आहे ईश्वर निवारण करील तेव्हा खरे' [पेद २७ ले २५९] अथवा 'परम सकटाचे दिवस आले ईश्वर काय करील ते न कळे यमुनेस उतार जाहल्यावरी होणे ते होउन येईल' [पेद २१ ले १९४] असले लेख अनेकाचे वाचावयास मिळतात तद्वतच हे वरील वाक्य होय त्याचे सार इतकेच की लाभ हानी जीवण मरण यश अपयश विधी हात या सिद्धाताची ती प्राय भाषातरे होत भाषा प्रत्येकाची भिन्न असावयाचीच तस्मात 'ईश्वर ज्यास यश देईल त्यास सुखे देव' अशी बुदेल्याची उक्ती आहे. [खड १ ले. १४७] त्याचा कीस काढून राजवाड्याने विलक्षण अर्थ केला आहे होळकराच्या भिडेमुळे नजीबखानास वाचविल्याचा दोष मुख्यत. बखरीचा आहे तो साधार सिद्ध करण्याची ही क्लृप्ती अचाट होय गोविंदपतासबधी बखरीचा आक्षेप निरर्थक नसेल परतु तसा चिटोरात्मक पुरावा अजून प्राप्त होत नाही पेशव्याविरुद्ध बखरीचे आक्षेप तिखटमिठाचे भासून इतराविषयी साखरेचे वाटावेत ही चिकित्सेची गोडी चमत्कारिक वाटून नामूल लिख्यते किंचित या ब्रीदावद्दल आचार्याविषयी पदोपदी शका येते

लेखांक [१९३] श्री * संवत १८१७ कार्तिक वद्य १२

[५ दिसंबर १७६०]

श्रियासह चिरंजीव राज ी लालाजीस व राजश्री नारोबास प्रति नारो विठल अशिर्वाद उपरी. ता छ * २६ रावर मुा पाणपत जाणून स्वकीय लिा विशेष. तुमची दोनतीन पत्रे आली. त्याचे उतरे पाठविली ती पावलीच असतील. आलीकडे वर्तमान तर ड्या ता छ मजकूरपावेतो दीड मास मोगलाचे आमचे युद्ध होत आहे. हाली छ २२ रोजी जवळ कोशावर डेरे होते तेथून माघारे यमुनेकड कूच करुन पांच सहा कोशावर गेले. तथून स्वारी यती. इतका प्रकार आहे. तुम्हास कळावे म्हणून लिा आसे. त्याचा जोरा आम्हावर नाही. माघारा सरला. बहुत काय लिहिणे. चिरंजीव बाबुरावजीची आसामी आपण चाल्वीतच आहात परंतु रा दाजी गेलियावर येकादी मागेपुढे दिकत पडेल याकरिता सरकारची सनद करून पाठविली असे. सर्वविसी आपण त्याचे चालविणे. सर्व आमावर आहे तो चालिलाल तर आम्हावर दृष्टी देउन चाळविले पाहिजे. कुटुंब तथे आणिले आहे. बाळोबासही रा दाजीनी काही करून दिल्हे होते. सर्व आपण चालवितात. पूर्वीही वडिलानी चालविलेत. सर्व आम्हावर आहे. यात उचित ते कीजे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती.

---

लेखांक [१९४] श्रीमोरया * संवत १८१७ माघ वद्य ४

[२३ फरवरी १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजी स्वामी गोसावी यांसि.

शेवक गंगाधर येशवंत [चद्रचूड] नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्रे माघ वा चतुर्थीची पाठविली ते पावोन लेखनार्थ अवगत जाला. माधोसिंगाचे वर्तणूकेचा प्रकार यजेमानाचे पत्री लिा त्या वरून सर्व कलले. इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री पंतप्रधान सुरजेसमीप आहेत. पुढे राजश्री बाबुजी नाा व त्रिंबकराव सिवदेव व राजश्री गोपाळराव गोविंद [बर्वे] वीसपंचवीस हजार फौजनसी आलेत. मागाहून दरमजल श्रीमंत येतात. ते येउन त्यांच्या आमच्या भेटी जाल्यानंतर आज्ञा घेउन ते प्रांतास येत असो. वरकड येजमानाच्या पत्रा वरून कळेल. सर्वदा पत्र पाठउन वर्तमान लिहित जाणे. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [३९५] श्री * संवत १८१८ चैत्र शुद्ध ८

[१२ अप्रेल १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजी स्वामी गोसावी यांसि.

सेवक त्रिंबक दत्ताजी सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ * ६ माहे रमजान जाणून स्वकीयं कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. आपंण पत्र पाठविलें तें प्रविष्ठ जालें. लेखनार्थ कळो आला. तीस हजार रुपयेच्या हुंड्याबाबत कबजाचा मजकूर आपंण लिहिला की सात मास होत आले अद्यापि × × म्हणून कितेक तपसिले करून लिहिले. तरी आम्हांकडून अंतर न पडलें. आपणच कबजाबदल कधीही लिहिलेंच नव्हतें. हालीं पत्र पाठविले त्यावरून कबज पाठविले आहे. हे प्रा। होईल. वरकड दिलीकडील वगैरे सर्वही वृतांत लिहिला. त्याप्रा। कळले. याउपरीही विशेष आढळेल त्याप्रा। वरचेवरी लिहित असावें. श्रीमंत राजश्री बावासाहेबांचेही संतोषाचे वर्तमान ग्वालेरीहून लि॥ आलें असें. त्यासी आज्ञांतवासांत असतांच त्या जागांत माणसें आपलीं आणावयासि व रा। सूरजमल जाटाकडील माणसे यैसी ग्वालेरीहून गेलीं आहेंत. लौकरीच धणीसाहेब आपले सैन्यांत येतील यैसे पत्रात लिहिले आले असे. हर्षाचे वृत कलावे यास्तव लि॥ आहे. जे जे मवास लबाड्या करितात त्यांस तंबी करावयाबदल राजश्री साबाजी पाटील शिंदे यासी फौजसुधा ग्वालेरीहून पाठविले आहेत. ते हाली मकुंदबरीचे सुमारे वडोबावरून तिकडे चालले आसेत. तुम्हांस कळावे सबब लि॥ आहे. ।' वरात लेहून नेयास आळस करून आम्हास निषेध होउन लिहिता तर आम्ही घेउन येत जायाची आज्ञा कराल तर तैसेच करेल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [३९६] श्रीगणराज * संवत १८१८ चैत्र वद्य ४

[२ अप्रेल १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीपंत व गणेशपंत स्वामी गोसावी यांसि.

सेवक गोपाळराव गोविंद [बर्वे] नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ * १७ रमजान मुकाम नगर नजीक सुरोंज जाणून स्वकीये लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लि॥ मजकूर अवगत जाहला. राजा माधोसिंग फौजसुधा

या प्रांती आले. तमाम महालचा अमल उठविला आहे. त्यास आपण खेचीचे पारपत्यास फौजसुधा राहिले. हे वर्तमान आइकोन आपले जागा दबले आहेत. सा पांचसात हजार फौजसुधा आलेनतंर सहजात जातात. अमल वसतो म्हणोन लि॥ ते कळले. दिली कडील वर्तमान सर्व कळले. येशास आम्हास हिंकडे छावनी राहावयाची श्रीमंताची आज्ञा नाही. खेचीचे पारपत्य करून अक्षत्रितियेस देशास जावयास निघोन जावे. त्यास खेचीचा तह जाहला. अहीराची दोनचार स्थळे घेतली. र्हाली येथे मुकाम करून राहिलो आहो. अक्षत्रितिया करून आम्ही देशास जाणार. तुम्ही तिकडील सविस्तर वृत लिहित जावे. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.

पैवस्ता छ २४ माहे मजकूर.

[३० अप्रेल १७६१]

---

लेखांक [३९७] श्रीकृष्ण * संवत १८१८ चैत्र वद्य ४

[३ मे १७६१]

राजश्रियाविराजित राजश्री

हरीपंतदादा स्वामीचे सेवेसी.

सो जिवाजी नाईक येवलेकर[१९९] यांणी आवंतिकाहून सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। चैत्र * वदी १४ पावेतो आपले आसिर्वादे करुन सुखरुप असो विशेष. स्वामीकडील बहुत दिवस आसिर्वादपत्र काही आले नाहीं तेणेकरुन समाधान नाहीं. तर ऐसे नसावे. सर्व वर्तमान लिहिणे विशेष श्रीमंत रा। रामाजीपंतभाउचे वर्तमान तर आम्हीं कासदजोडी पाठविली होती. त्यात लिहिले होते कीं रा। घणेस्वर व हसराज जयेनगरकर याणी माधो सेठ उजेनकर याजला पत्र पाठविले की भाउ कुरुक्षेत्रा आसपास आहेत आसे अम्हीं लेहून पाठविले होते. त्यास आता दुसरे वर्तमान रा। रामाजीपंतभाउचे आले कीं आजमेरीस येक खजमतगार भाउचा व येक कुरुक्षेत्रीचा ब्राम्हण आसे दोघे जण भाउची हातची चिठी घेउन दोघेजन आलेत. रा। गोविं[द] राव अजमेरकर याजला चिठी लिहिली कीं सो। रामाजी अनंत विनती उपरी. आम्हीं खिजमतगार व येक ब्राम्हण आपणाकडे पाठविले आहेत. हे वर्तमान मुखजबाणी सागती ते कळो येईल. इतकीच चिठी हातची स्वदस्तूर अजमेरीमधे रा। गोविंदरावजीपासी

---

(१९९) याचे पूर्ण नाव जिवाजी कासी येवलेकर. पानिपतसबधी याचे दुसरे पत्र महत्वाचे आहे. [ऐटि १ क्र १४ ले २] खड १३ ले. ४३ हे पत्र याचेच होय

आले. हे वर्तमान सागितले रा गोविंदराव आजमेरकर त्याजकडील येक म्हस्त वकिलीस श्रीमंत नानासाहेबाकडे [पेशवे] ग्रा उन्हेलीवरुन आला. तेथे आमचे चिरजीव आंतोबाचे घरी आले. अंतोबाणे पुसले की कोठून येणे जाले. त्याणी सागितले की आम्ही अजमेरीहून गोविदपताकडोन आलो. मग त्याचे नाव रा राजाराम भवाजी आकोलेकर त्याणी सर्व भाउचे वर्तमान सागितले की मज देखता भाउचा पुरजा स्वदस्तूर आला रा गोविदपताणी दोनशा रुपयाची हुंडी करुन त्या दोघापासी देउन व आणिक येक जोडी बरोबर देउन पाठविले की दुसरा पुरजा घेउन येणे. त्यास भाउस जखमा तीन आहेत. आता बरे जाले. येक जखम गोळी निघाली. दुसरी जखम तरवारेची. वार दोन खाद्यावर आहेत. आता जखमा बऱ्या जाल्या. मग ब्राम्हण व खिजमतगार दोघे आजमेरीस आले असे ग्रा उन्हेलीस अंतोबापासी सांगितले. मग चिरजीवानी उन्हेलीहून आपले स्वार देउन त्या म्हस्तास अम्हाकडे पाठविले. मग आही फिरोन वर्तमान भाउचे पुसले. मग त्याचे हातचे पत्र येक लिहून गोविंदपंतास घेतले व अम्हीं लिहिले की भाउचा हातचा पुरजा आहे तो अम्हाकडे पाठउन दीजे. तोच मी आपणाकडे पाठउ. ऐसी पत्रे लिहून कासदाची जोडी आजुरदार करुन बारावे रोजी उजेनीमधे अजमरीहून स्वदस्तूर भाउचे आहे ते घेउन यावे. मग आपणाकडे पाठउ. ऐसी जोडी करुन पाठविली. मग संध्याकाळी रा महादाजी बाजी चिटनीस सरकारचे त्याजला खबर हे कळली. मग ते आम्हापासी आले. त्यानी सागितले की तुम्हीं पुरजा भाउचा आणविला परतु रा गोविंदपंत काही पुरजा देन्हार नाहींत. त्या पुरजावर त्याणी रुपये दिल्हे असतील तो दस्तावेज काही देन्हार नाहींत. मग अम्हीं दुसरी जोडी कासदाची करुन दुसरी पत्रे रा गोविंदरावजीस लिहिली की भाउचा पुरजा स्वदस्तूर आहे तो पाठविने. तुम्हीं जे हुंडी करुन पाठविली असल ते रुपये आम्हीं देउ. पुरजा पाठउन देणे. घरी मनुशे फार हराण होत आहेत असे फिरोन पत्रे लिहिली. दुसरी कासदाची जोडी अजुरा करुन पाठविली. बोली बारा रोजाची केली. ते स्वदस्तूर आलिया आपणाकडे पाठउन देतो. त्यास इकडोन जोडया कासदाच्या दहाबारा पाठविल्या परतु त्याचे स्वदस्तूर येईना. कोन्ही जोडया आल्या कोण्ही आठदहा आल्या नाहींत. त्यास हे वर्तमान खरेखुरे आहे. त्यास रा सताजी वाबले अजमेरीस तेही याच प्रकारे तेथे गेलेत. त्याजलाही पत्र आम्हीं लेहून पाठविले की पुरजा भाउचा स्वदस्तूर आहे तो पाठविने. आपणांस कळावे. त्यास वडिलानी अम्हांवर विशाद केला असल की उजेनीमधे असोन वरतमान पाठवीत नाहींत. येथ कासदाचे जोडया उदड पाठविल्या. त्यास हे वर्तमाणास जीव पडला त्यास

भाउ कुरुक्षेत्री येका ब्रामणाचे घरी आहेत. सुखरुप आहेत. चिंता न कीजे. पहले पत्रात लिहिले ते खरचे आहे आणि हे वर्तमान दुणावले. चिंता तिळप्राये न करणे. बारावे रोजी स्वदस्तूर उजेनीत आणविले आहे. येथे आलियावर येथून साता रोजा आपणापासी पाठवितो. चिंता तिळप्राये न करणे. घरी सर्वास मणुषास सागावे की खुशाल आहेत. येथे आम्हीं काही गिम्रुर बसलो नाहीं. येक घडी चईन पडत नाहीं. जे रोजी स्वदस्तूरे येई ते रोजी अम्हास अन्य गोड लागेल. येथे जे मडली आहे त्यास बी आन्य गोड लागत नाहीं. त्यास सर्व मडलीवर व अम्हावर आपला रागच आहे सबब की वर्तमान लेहून पाठवीत नाही. तर स्वदस्तूर आलिया आपणाकडे रवाना करितो. वडील राग भरले तर आमचा उपाये नाहीं. लेकरावर कृपा असो दावी. अम्हास नित्य खबर भाउची घेणे मग पुढे दुसरे कार्य करणे. भाउवाचून आम्हास कोण आहे त्यास श्रीमत जनकोजी सिंदे यास बी आणावयास गेले आहेत. तेही थोडक्या रोजात लस्करात येउन दाखल होतील. त्यास रा मल्हारराव होळकर खेचिवाड्यात आले ते दरमजल उदेपुरास रामपुरियावरोन जातात. त्यास रामपुरा माधोसिंगाच्या प्रहस्तानी घेतला होता तो रामपुरा फिरोन मिर्जा अदलबेग रा जनकोजी सिंदे याजकडील आहेत याणी घतला. रा साबाजी पाटिलानी जे ठाणी उठविली होती ते माघारा बसविली असे वर्तमान आले. उदेपुरचा राणाजी शात[२००] जाला कोण्ही जहर घातले आणि मारले म्हणोन मल्हारराउ जातात. टीका कोन्हास देउन काही नजर घेउन मग जयेनगराकडे जावे असे आहे. त्यास या प्रा वर्तमान आहे. सारोष हेच की भाउ कुरुक्षेत्री आहेत चिंता काडीची न करणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

सौभागवती वर्जचुडेमडित उभयेता बाईस व सौभाग्यवती वर्जचू[डे]मडित जाणकीबाईस आमचा सा। नमस्कार प्रविष्ट करणे. मातोश्रीसमान सकुबाईस नमस्कार सागणे. वडिलाचा आसिर्वाद आला पाहिजे तेणेकरुन समाधान आहे हे विनंती.

रा महादाजीपंतास रा लक्ष्मणपंतदाजीस [वैद्य] सा। नमस्कार सांगणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

(२००) उदेपुराकडे जाऊन पंचावीस लाख मिळविण्याचा होळकराचा मनोदय होता. [पेद २७ ले २६९] परंतु उज्जनीकडे पेशव्याने वखेडा केल्यामुळें निरुत्साह होऊन तिकडील कसावसा निकाल काढून ते इंदुरासच आले. [पेद २ ले १४३]

लेखांक [३९८] श्रीशंकर * संवत १८१८ चैत्र वद्य १४
[३ मे १७६१]

आशिर्वाद उपरी. ता * चैत्र वद्य १४ रविवार जाणोन स्वकीय लखन करणे विशेष. तुमचे पत्र आजीचे आले औरंगाबादेच्या हुंडयाचा मजकूर लिहिला तो कळला. जर तुमच्या विच्यारे येईल ते करणे. येथे चिठी पाठवाल तरी लिहिल्याप्रा। देउन देसास माणूस आजी माध्यान्हीउपरी रवाना करून. घोडी सारालीयास न पाठवणे. येथे पाठवणे. त्याजवरून तुम्हाकडे पाठविली आहे. देशी जे लिहावयाचे ते लिहिल आहे. होउन येईल ते खरे. दरबारी काही ताल राहिला नाही. बरे ऋणानुबंद प्रमाण आहे. हे अशिर्वाद.

---

लेखांक [३९९] श्रीलक्ष्मीकांत * संवत १८१८ वैशाख शुद्ध ४
१८८] [८ मे १७६१]




राजश्री बाळाजी पंडितप्रधान गोसांवी यांसि.

सकलगुणालंकरण अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो जानोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन करीत आसिले पाहिजे विशेष. गोसांवियानी पत्र पाठविले ते प्रविष्ट होउन लिहिला मजकूर आवगत जाहाला. माघारे जाता मुल्काची पायमाली न करावी. वराड प्राती गेल्यानंतर मोगलाई आमलाची जप्ती करावी म्हणोन लिहिले एशियास गोसावियानी आम्हास व राजश्री गोपाळराव यासी खेचिवाडियाचे पारपत्यावदल ठेविले होते. त्यास तेथील गुंता उरकून दरकूच सुरंजेस आलो. तेथून मंडले प्राताचे बदोबस्तावदल सागराचे सुमारे आलो. तो राजश्री त्रिंसाजी गोविंद कमाविसदा। दिमत राजश्री बाळाजी गोविंद [बुंदेले] हे भेटीस येउन निवेदन केले की बुंदेलखंडात बुंदेल्यानी जमाव करून तमाम ठाणी घेतली. येक सागर व ह्राटे राहिले त्याजमध्ये ह्राटयास मोर्चे लाविले आहेत. त घेतल्यानंतर सागरास लागतील म्हणजे बुंदेलखंडचा आमलच उटतो. याची साहित्य केलिया मुलूक राहतो नाही तर नाही यास्तव या प्रांती येउन हटयाचे मोर्चे कापून काढिले. वरकाड

ठाणी घेउन मारनिलेचे स्वाधीन केलियाचा मजकूर सविस्तर पेशजी लिहिलाच आहे. सांप्रत राजश्री हिंदुपत राजे याचा ॐ वकील सौरख्यानिमित्य आला आहे. त्यास कमाविसदार मशारनिलेचा व त्याचा तहरह करून देउन सत्वरच आपले प्रांतास जावयाचे होईल. जातेसमई उतम प्रकारे फौजेत ताकीद करून गोसांवियाचे मुलकात पायेमाली सर्वथैव होउन येणार नाही. वरकड वराड प्रांतीचे जप्तीचा मजकूर तर प्रस्तुत ईस्तमाल्तीचे दिवस आहेत. या दिवसात जप्ती जाहालिया ईस्तमाल्तीत आराखना होती यास्तव हे दिवस जाहालियानंतर गोसावियाचे आज्ञेप्रमाणेच वर्तणूक होउन येईल. रा छ ॰ २ माहे शवाल. बहुत काय लिहिणे कृपालोभ असू दिला पाहिजे हे विनंती.



छ १७ जिल्काद. इसने सितैन.

[२१ जून १७६१]

---

लेखांक [४००] श्रीमोरया

*[१३ मे १७६१]

राजश्रियाविराजित राजश्री

लालाजीबावा स्वामी गोसावी यांसि.

पो गंगाधर येशवंत [चंद्रचूड] सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशेष तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ आवगत जाला. राजसिंग [घोडचढा] उमेदसिंगाचा सल्ख करून उन्हेरियावर जाणार. सुरतराम सुमराम पोता रामपुरियासि गेला. ससोधाचे ठाणे घेतले. श्रीमत [पेशवे] उजनीहून कूच करून देसास गेले म्हणून लिहिले. येसियासि राजसिंग वगैरे कछव्यानी बहुत बदफैली केली. त्याचे पारपत्य श्रीइछेने थोड्याच दिवसात होईल. सुरतराम चद्रावत रामपुरियासि येक होणार. चिंता काये. तिकडे राजश्री सुभेदारसाहेब आले आसेत त्याचे पारपत्य येथास्थित होईल. श्रीमंत गेल्याची पत्र परभारे इकडेही आली त्यामुळे कितेक कामात कचाई[२०१] जाली. खावदाचे विचारास आले ते खरे. तुम्ही पत्र पाठउन

---

(२०१) 'सिंदेहोळकर या उभयताची फूट कदापि करु नये पहिले या गोष्टी समजूनच जोडफलाचा साधा साधून टाकला आहे. उभयतात कोणाचा भाव कोणाकडून चालतो कितिक कलवळा पहिले माणीच परिहार केल्या आहेत आणि आताही जितके हे अर्थप्राण वेचतील तितके अन्यआच्याने होणार नाहीं'. [मदवा १ ले ३२] ही अहिल्याबाई होलकराची मुक्ताफले असून सरळ

वर्तमान लिहित जाणे. आमचा मुक्काम सांप्रत श्रीमथुरेस जाला. आंतरवेद वगैरे

भावेस बोलावयाचे म्हणजे मराठेशाहीच्या मीमांसेचे सार होय. वरील पत्र अत्यंत महत्वाचे असून ह्या विषय विवेचनीय असला तरी तूर्त विचार केवल पानिपतीय कालापुरताच कर्तव्य आहे संक्षेपांत सांगावयाचे म्हणजे सोवत्याच्या चुरशीस कारण मुख्यत मराठ्याची 'मुतालकी' झाली प्रथम ती पवाराकडे होती [घावड पान १०, १४] नंतर होळकराकडे गेली [पेद ३० ले ३१७] शेवटी शिंदे श्रेष्ट ठरुन ती त्याच्या पदरी पडली [पेद ३० ले ३१८] 'राणोजी सिंदे सोवती मातवर होते परस्परे मर्जी रखून स्वामीकार्यास तत्पर होते त्यामुळे कामेही उमदी होउन आली मधे विपर्यास आला ते केवल आपलीच बोळ सेवटास न्यावी या विचारे वर्तनूक करु लागले. आम्ही दुसरी गोष्ट दिसू न दिल्ही गत वर्षी सबलगडचे अनुसंधान आम्हाकडे आले त्याचा निश्चय सर्वांनी मिलोन केला सेवटी ममता निर्माण होउन ते दुसरीकडे गेले. अवघा तेच करार केले आमचा मात्र अपमान केला. तेच वेळेस सोवतीची पूर्ती जाली देवगतीने राणबास देवाज्ञा जाली मग तर बोलता नयेसे जाले लोकविरोध दिसोन येतो. बावानी आमची हेकडता दर्शवावी या पश्चात्तापेकरुनही तिकडे गेले. स्वामीनी शब्द लाउन लिहिले जयापाची ममता वरुन जैतपुरास सामिल आलो'. [पेद २१ ले. १५] कलुषतेस आरंभ असा झाला मल्हारबाचा स्वभाव मानी. शिंदे स्नेही पण जेथे त्याचे वर्चस्व खपत नव्हते तेथे सुखठणकराचे कसे निभावयाचे अर्थात 'बाबाचा कारभार येकवोढी मूल तर अज्ञान' [पेद २७ ले. १८] 'आजीपावेतो सोसिले आपला लौकिक दाखवावा तेथे येकविचारे होउन कार्य कसे होउन येईल आम्ही राजकारण आणावे ते लटके करुन दाखवावे येसा अभिमान त्यासी बाबा-चाच आग्रह सेवटास न्यावा आण आमचा अपमान करावा येसे उत्तमात गोष्टी नाहीं'. [पेद २ ले. २५] ही भाषा चालू झाली सबलगडसंबंधी पत्रें उपलब्ध नसल्यामुळें वरील आक्षेपाचे आकलन होत नाही. पत्रान्वयेच बोलावयाचे तर मूल म्हणजे जयाजी शिंदे अज्ञान होते ह्या आरोप अनुचित होय कारण की ते १७३०पासूनच काम करु लागले होते [पेद २२ ले ४९] सुखठणकर सेवक खरा पण तोही जन्माचा सोवती असून उमदी कामे घडवून आणण्यात त्याचाही वाटा होता त्याला येकवोढी म्हणावे तर मुतालकी चालविणारा कोणीही असला तरी त्याच्या माथी ह्या दोष नेहमीच यावयाचा राज-कारणे लटकी करुन दाखविण्यासारखी स्पर्धा परस्परें वाढलेली नव्हती तेव्हा ह्या आक्षेप पोकळ असून खरा अर्थ असा निघतो की वयमाने वडील असल्यामुळे राणोजीनंतर मुतालकी आपल्याकडे यावी अशी इच्छा बळावली आणि त्या दुराग्रहापायी शिंद्यास सोडून होळकर डोंगरपुराकडे गेले ही गोष्ट अनुचित होती या वियोगाचे दु:ख वाटून शिंद्यानी होळकरास पाचारिले परंतु परत आल्यानंतरही त्याची मनोवृत्ति पालटली नाही किंबहुना हेकडता वाढत जाऊन अनिवार होत गेली समाधान एवढेच की 'राजश्रीच्या कर्जपरिहारार्थ' ती पेशव्याच्या पथ्यावर मात्र पडली स्नेहात तेढ येऊन होळकर मागे राहिले शिंदे देशी आले. त्यानी आपले 'सैन्य दुपटीने वाढविले' [ले. १९७] याच वेळी उत्तरेस भवदाली 'अटक उतरोन लाहोरास आला श्रीमंतास पत्रे आली की सत्वर येणे त्यावरुन हेही जातात परंतु पथ दूर'. [पुरंदरे १ ले. १६३] 'दिलीकडील प्रसंग अवघड रामचंद्रबाबा मल्हारबा येके जागा नाहीत'. [पुरंदरे १ ले. २१३] अर्थात पेशवे 'जाउन पोहचले नाहीत'. [पेद २७ ले. २९] ही नेबाईची स्वारी यात्रेदाखल होउन 'परचक्र वारुन महत्कार्ये सपादू पहाणाऱ्या साधकाचे कर्म' अभिप्रेत होते ते सधी आली असता साधले नाही [पेद २१ ले २०] वृद्धकपि निजाम वारला म्हणून पेशवे देशी परतले.

आमल इकडील कामये केला. थोड्याच रोजात राहिल्या कामाचा निर्गत करून येउ. ।" बहुत काये लिहिणे हे विनंती.

पंवस्ता छ * ८ माहे सवाल,
वैशाख सुध १० बुधवार.
[१३ मे १७६१]

---

होलकर जयपुराकडे वळले शिंद्यास छावणीस ठेविले तात्पर्य हे की सुभेदारावरी लोभ करून कामे माचे हाते घ्यावी याची सलावत दिली आदिकरून रजवाड याजवरी आहे स्नेही येसे की याचे पन जाईल ते समई अवघे फौजेनसी येतील हा सरदार कायम आहे निसरडा होत नाही' [पुरंदरे १ ले १५७] 'मल्हारराउ याचा आशय पाहिला की खावंदाचे भेटीस जावें आणि साफ विनती करावी की याउपरी आमचे त्याचे [सुखठणकराचे] बनत नाही मजला चाकरी सागाल ते करीन बहुत यत्न केला की येकदिल व्हावे परतु यानी ते गोष्टी मनास आणिली नाही अशी परिस्थिति प्राप्त झाली तेव्हा साताऱ्याच्या मुकामी कडाक्याचा वाद वाढून त्यात शिंद्याचा 'उत्कर्ष' राहिला असे समजते [लि. २००] सविस्तर वृत्तात समजण्यास साधन नाही एवढें खरें की यानतर गोडीने उभयता उत्तरेस निघाले. 'अपसात चितशुद्ध नाही याजमुले मनसवा सिधीस जाणार नाही श्रीमत अगर भाउस्वामीनी दिलीस जावें पातशहात वजिरात येकता करून आपले कार्य मातबर द्रव्य मुलूख घ्यावें असा समय येणार नाही. स्वामीखेरीज सरकारीकार्य होणार नाही जाले तरी बदोबस्त होणार नाही असे पेंच आहेत'. [खंड ३ ले १४९, १५१, १५८, १५९] असले लेख येतात परतु अशा परिस्थितितच 'अवघड मनसवे सिद्धीस जाऊन इराणतुराणपर्यंत लौकिक होण्यासारखी लोकोत्तर कृत्ये घडून ज्या गोष्टी कल्पनेत नव्हत्या त्या कर्तव्यास आल्या' [ले १०, १२] 'पैका व यश आजतागाईत जाली नाहीत ती करून दाखविली'. [ले १३] 'आगरा अजमेर मुलतान इत्यादि सुभ्यासह हिंदुस्थानची चौथाई सपादून' स्वराज्याचे रुपातर साम्राज्यात झाले [लि २०३, २०४] ही अपूर्व सधी स्नेहाचा साधा जुळविण्याची आली असता तिचा सदुपयोग व्हावा असा मात्र योग नव्हता त्याचे कारण मुख्य पेशव्याची इर्षा ही होय 'ग्रहकलह लागण्यास कारण दादासाहेब प्रथम स्वारी हिंदुस्थानाचे मोहिमेस पाठविले' असे जें बखर सागते त्याचा अर्थ हाच होय यानतर उभयताची सागड कधीच जुळाली नाही आणि पानिपत-सबधी बखरीची मीमासा या वरील गोष्टीला धरून आहे त्यात तारतम्य किती आहे हे या भागातील पत्रें सागतील. अखिल भरतखडाचे स्वामित्वाचे सौभाग्य लाभले असता भरारीच्या हस्ते 'दिली काबिज जाली' म्हणून कृतज्ञता वाटणे हे द्वैतनीतीचे चिन्ह असून 'उगेच गपाचे आशेस गुतू नये [लि ९०, ९२] 'मल्हारबा गपा मारतील त्या आयकाव्या' [पुरदरे १ ले ४०५] ही वाक्ये त्याचीच द्योतक होत. या नीतीचे प्राबल्य असता राजकीय क्षेत्रात बालाजीपत भानु जन्म पावला अर्थात 'सर्व हिंदुस्थानचा यखतियार मल्हारबावर आहे [पुरदरे १ ले ४१८] परतु जे करणे ते सुभेदाराचे अनुमते करतात यास्तव कठिण दिसते' [खड ६ ले ४१०, ४१५] या उदगाराचे आश्चर्य नाही. या नीतीचेच पालन पुढील आयुष्यात नानाने केले. त्याला अनुलक्षून वरील शब्द अहिल्याबाईचे आहेत अस्तु. पेशवे माघारे फिरले हा आक्षेप केवल होलकराचाच होता असे नव्हे तर 'श्रीमत माघारे फिरले ही

लेखांक [४०१] श्री

[१ जून १७६१]

श्रीमंत माहाराज राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक धोंडोराम कृतानेक साां नमस्कार विज्ञापना. ताा छ * २६ माहे शवाल मुाा मोजे तिंजली पाो कलबुरगे स्वामीचे कृपावलोकने करुन शेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ २३ रोजीं कलबुरग्याहून सलाबतजंगाचे व निजामअलीखानाचे कूच जालें ते चार कोस आले. छ २४ रोजी पांच कोसाचें कूच जालें. छ २५ रोजी मलीखेडानजीक जातील. हे प्रस्तुत कोयेल्कोंड्याचे शुमारे जातात. तिकडे आठचार रोज फिरुन कांही पैका मेलउन फिरतफिरत बेदरावर छावणीत यावे हा मनसबा आहे. करनूलकर व कडपेकर व सावनूरकर पठाण व मुरारजी घोरपडे यांसी यांची पत्रें वरचेवर जातात की भेटीस सत्वर येणे व इंग्रजांस मुलुक सिकाकोल व राजबंदरी वगैरे बावीसी करुन त्यांसही बोलाविलें आहें. नवे मराठे ठेविले आहेत. त्यांचा तपसील तरी सेवेसी वारंवार लिहित गेलों. सारांश यांचा जमाव भारी दिवसेंदिवस होत चालिला. उभयेतां निंबालकरांस वरचेवर पत्रें जातात कीं सत्वर येणे. प्रस्तुत तरी प्रजन्यकाल आला. आता यांच्याने काही होतां दिसत नाही. छावनीत जमाव करुन मजबूत व्हावें पुढे महाराजांकडून त्रिघाडीचा मार जाला तऱ्हीं सिध आहेत. नाहीं तरी हरयेक गोष्टीवरुन हेच कुरकुर काढतील. ऐसा शुमार दिसतो याजकरितां विनंती लिहिलीच लिहितो. येथील मजकूर कचापका माहाराजांस कलावा म्हणून सदैव विस्तारें लिहित जातो. पुढील कर्तव्याचा मजकूर सर्व महाराजाचें ध्यानांत आसेल. कितेक तपसीलवार वर्तमान राश्री कृष्णरावजी मुंनसी यासी लिहिलें आहे त्याजवरुन ते विनती करितील. तें ध्यानास येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. छ २५ शवाली तिंगलीस आले. येथून मलीखेड दोन कोस आहे व सेडंबा सहा कोस आहे. दरकूच कायेल्कोंड्याकडे जातात. पुढे होईल वर्तमान ते सेवेसी लिहिल्यांत येईल. राजश्री राजे विठलदास याणी

---

गोष्ट फार वाईट जाली वरे आपल्यास चाकरी करणे नाही मग मनसबा कशास पाहिजे'. असा भानूचाही अभिप्राय होता [पुरदरे १ ले ४१७] 'जमाव ४० हजार जाला होता. गिलजावर नजीबखानावर सलावत पडली होती वकील येत होते परतु लोकास रोजमरा न कळला. श्रीमतानी यैवज न पटविला येणे करुन दुडी जाली'. [खड ६ ले. ४१३] असे जावब सागतो हे लक्षांत असावें 'स्वारी गेली फार जलदीनें जाणेच होते तर हलक्या मजली करुन जावे. थोडी फौज ठेवावयाची होती म्हणजे दोहीकडील वदोवस्त होता' हाच कटाक्ष होलकराचा होता [पेद २१ ले. २०५]

स्वामीचें पत्राचें उत्तर पाठविलें आहे त्यात फार मायेममतेने लिहिलें आहे. त्यास त्याचे उत्तरही त्यास फार गोड ममतेने लिहिलें पाहिजे. हे विज्ञापना.

छ ९ जिल्काद.
[१३ जून १७६१]

---

लेखांक [४०२] श्री संवत १८१८ ज्येष्ठ शुद्ध ७
[९ जून १७६१]

राजश्री रघुनाथपंडित [भट] यांसी.

श्रीमंत माहाराज मातुश्री जीजाबाईसाहिब यांणी आज्ञा केली येसीजे. तुम्ही विंनंतीपत्र पाठविले ते प्रा होउन लेखनार्थ कलला. तेथे लिहिलें जे चिरंजीव कुसाबाईच्या प्रसूतकालसमई सेवकाचे निस्वतीच्या बाईका संनिध आसाव्या. ल्टका[२०२] मार जाहाल्याने सेवकासी मानणार नाहीं. कंन्यचा पुत्र न व्हावा म्हणोन लिहिलें ते उचितच लिहिलें. यामार्गें जाहाले तव्हीं आंमच्या घरांत कन्यचा पुत्र जाहाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं व सांप्रतही खोटा मार नाहीं. आपल्या प्रत्यासही येईल. पुण्यंसील आनुबाईसही बोलाउं पाठविलेच होते. आपणं बुधिमत आहा. साहेबाचा लोभ न टाकणे. मवेस्त आपण आहेत. राजश्री प्रधानपंताकड पत्रे गेलींच आहेत. मागाहून राजश्री शषो नारायेंण यांची रवांनगी करुन पाठवीत आहों. कलले पाहिजे. जाणिजे छ * ५ जिल्काद ॥ बहुत काये लिहिणे.

(लेखन सीमा.)

मोर. छ ११ जिल्काद. सन इसने.
[१५ जून १७६१]

---

(२०२) 'शाहुमहाराजानंतर दोही राज्यावर सत्ता स्वामीची आणि आम्ही सेवक स्वामीचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करु' असी शपथ वाहून [कास ले. २४६] 'राजारामास कैदखाल प्रतिष्टेने पोटास देउन पुर्ते ठिकाण लागेल तसे करावें असा करार' [पुरदरे १ ले ३६९] करणारा पेशवा साताऱ्ची 'नवी मुद्रा' म्हणजे नवा राजा करणार होता [खरे १ ले ३३] ही वासना कोल्हापुरचे समाजी जिवत असेपर्यंत फलद्रुप झाली नाही. 'सभाजी समाप्त जाहल्याचे वर्तमान आल्यावर भोसले मुगीकर याचा धाकटा भाउ उमाजी हा राजा करावा जिजाबाईने कारभार करावा. ताराबाईप्रमाणे खर्च नेमून द्यावा खाउन स्वस्थ राहावे याप्रमाणे कबूल केल्यास उत्तम नाहीतर जप्ती करावी' असे ठरविले. [ऐटि २ क्र १६] आणि प्रसुती होऊन कन्या की पुत्र होतो याची वाट न पाहता मुगीकरास राजा करण्याचे धोरण पेशव्यास शोभेसे नव्हते पण याविषयी विधिनिषेध असा उरलाच नव्हता असे पत्र सांगते.

लेखांक [४०३] श्री * संवत १८१८ ज्येष्ठ शुद्ध ७
[१९१] [ ९ जून १७६१ ]

राजश्री बाळाजी पंडितप्रधान यांसी.

श्रीमंत माहाराज मातुश्री जिजाबाईसाहेब उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लेखन केले पाहिजे. यानंतर आंपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होउन लेखनार्थ कळला. तेथें लिहिलें जे साहेबाचा पडदा सेवकांसी नव्हतां ह्मणोन लिहिलें ते खरें. आपल्यासी पडदा स्वप्नीही नाही. कैलासवासीं माहाराज स्वामीची आक्रत्रम ममता असतां साहेबी वियोग केला उचित नाही म्हणोन लिहिले ते प्रमाणच आहे. आंपण बंधूच आहेत परंतु राजश्रीच्या आज्ञेनरूप च्यारी गोष्टी तुम्हां प्रती बोलावेसें होते आंपण दूर राहिलां. समेटी साहेबापासून घडेल न घडेल हे आपण जांणतात प्रत्यासही येईल. येथींल अर्थ आपल्यासिवाये नसल्यास आपण इतका सदेह घेउन ल्याहावे. सर्व प्रकारे करून आपल्या ममतेची आन्हों. राजश्री शेषो नारायण यांसही मागाहून पाठउन देत आहों. पुंण्यसील आनुबाईसही येणेविसीं पत्रे गेलीच होतीं. कळले पाहिजे जाणिजे रवाना छ ५ माहे जिल्काद. बहुत लिहिणे तरी सूज्ञ असा.

(लेखन सीमा)

पो छ ११ जिल्काद.
बार. सन इसने सितेन. जेष्टमास
[१५ जून १७६१]

---

लेखांक [४०४] श्री
[ १७६१ ]?

यादी माहाल प्रांत अंतरवेद.

| निा सरकार. | निा सिंदे. |
| --- | --- |
| १ पो ईटावे. | १ पो फफुंद |
| १ पो मुयेगाव | १ पो विलासपुर सिकदरा |
| १ पो हरेवापुर | १ पो विरोण |
| १ पो मगलपुर | १ पो सकतपुर |
| १ पो शाहापुर आकबरपुर | १ पो सोरला |

'छत्रपती याजला प्रधानानी १२ वर्षे अमर्याद होउन सेवेची रीत टाकून नजरबद ठेविले श्रीकृपेने त्याचा फलादेगही त्यास जाहला' असे प्रतिनिधी सागतो [ऐटि १ क ३२] त्याचा मतितार्थ हाच की पानिपतमुळे ही दोन्ही राज्ये वाचली.

१ पो रासमाहला
१ पो आकबरपुर बीरबलाचे
१ पो कासगंज
७॥ पो चकले कडा
१ कडा
१ करोली
१ आयर्वण
१ रारी येकडला
१ हंतगाव
१ कुटरा
१ येंझड गाजीपुर
१ कोंडा मुतोर
१५॥

गोपालराव गणेश याजकडे माहाल सरकार व उभयेता सरदार मिळोन होते.

१ कुरा
१ जाजमउ
१ मोसमपुर
१ कुटिया गुजेर कुवरपुरा
१ बुंदकी
१ कोडा मुतोर
१ हसवा
१ फतेपुर
१ अयासा.
९॥

१ पो बालबोर नानामउ
१ पो तालगांव
१ पो मोर रासमाहला
१ नबीगज सिकदरा
१ पो-खेवरा बारा
१ पो घाटपुर
१ पो मस्वावण
१ पो सिवली
१४

नि॥ होलकर
१ पो सकुराबाद
१ पो देवकली ओरया
१ पो समीय [ट]
१ पो कनोज
१ पो तालगाव निमे
१ पो मोर रासमाहला
५

पो बिठुर समाईक उभयेता दिवाणाकडे [दामोलकर व चंद्रचूड]

सवगजपुर नगद[रया] दोन माहालच्या सनदा रघुनाथ हरी[२०३] यासी

---

(२०३) ही यादी पूर्वपानिपतीय दिसते शंका इतकीच की हा रघुनाथराव हरी कोण. टकले नेवालकर किंवा आठवले? याचा उमज पडल्यासिवाय कालनिर्णय होत नाही.



# पानिपतोत्तर पत्रव्यवहार

१८१८–१८२८ विक्रमी.

लेखांक [४०५]  श्री

[१७६१] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

नारोपंत नाना स्वामीचे सेवेसी.

पोष्य माहादाजी[२०४] बलाळ [गुरुजी] कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपरीं. नारो गोपाळ काही कार्याबद्दल कोट्यास जात आहेत. तरी येथून स्वारप्यादे यासमागमे दिल्हे आहेत. तरी तुम्ही तेथून नर्मदेपर्यंत स्वारप्यादे दहून पोहचाउन रसीद आणून पाठउन द्यावी. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [४०६]  श्री

[७ नवबर १७६१]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजी बल्लाळ स्वामी गोसावी यांसि.

सेवक नारो[२०५] शंकर [विंचुरकर] कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले. तिकडील सविस्तर अर्थ लिहिले

---

(२०४) महादाजीपंत गुरुजी पेशव्याबरोबर १७६१च्या आरंभी उत्तरेस आला होता [कास ले १९२] त्या सुमाराचे हे पत्र असावें एरवी ते १७७४त घालावे लागेल कारण त्यात्र वर्षी तो शिंद्याकडे उत्तरेस आला होता [पेद २९ ले २४७] हे पत्र याच गुरुजीचे होय पण संपादकाची तारीख मात्र चुकली आहे खरी तारीख २६ अगष्ट १७७४ अशी पाहिजे

(२०५) भाग १ ले. २६८ अन्वये या पत्राची तारीख ठरविली आहे.

ते कळो आले. ऐसियासि प्रस्तुत देशी यवनाचा [निजामाचा] विघाड आहे. त्यास येथील बदोबस्त लौकरच होईल. तदनंतर फौजेसह त्या प्रांते आलियाउपरी सर्व बंदोबस्त होउन येतील. तुम्ही तिकडील वरचेवर वर्तमान लिहोन पाठवीत जाणे. ॥° बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [४०७] श्री * संवत १८१९ चैत्र वद्य १०

[१८ अप्रेल १७६२]

राजेश्री खानाजी जाधवराव सेनापतजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो॥ त्रिंबकराव नारायेण [विंचुरकर] कृतानेक विनती. येथील कुशल ता॥ छ * २२ माह रमजान जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. पत्र पाठविले ते पावले. तेथे लिहिले वर्तमान कळो आले. दर्शनातुल्येच लाभ जाहला. येणेप्रो सदैव परामर्ष करीत असावे. वरकड साचंत अर्थ येजमानानी लिहिला आहे त्यावरून कळेल. आपण च्यार रोज धीरेधीरे गनिमी काव्याने असावे तो या पत्रामागेच सडीफौज पावेल. माहून येजमानही दरकूच येतील. कळले पाहिजे. ॥° बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [४०८] श्रीशंकर

[१७६२]

विंनंती उपरी. बहुत दिवस आपणाकडील कुशलवृत कळत नाही या करिता चित्त सापेक्ष आहे. तरी सविस्तर लेखन केले पाहिजे विशेष. मागा येकदोन पत्रे पाठविली. कबिला सुटावा हा अर्थ लिहिला. त्याचा जाबसाल आला नाही. साहुकाराचे देणे किती राहिले. त्यास पांच हजार रुपये देउन कबिला सर्व सुटत असिला तरी येथून कर्जवाम करून पाठउन. कबिला सुटत असला तरी यथून साहिता करुनकबिला सुटत नाही तरी काये कामाचे. पा॥ पाटण इजारा केला अभिमानास्तव तो अभिमान कार्यास आला. यामुळे वोढग्रस्त जाहलो परंतु यजमानसाहेबी आब्र रक्षिला. येरवी दोन अधिकही होते. त्यास तयील बंदोबस्त यथार्थ असे[ल] तरी त्याहाने म्हणजे कार्य करु. नाही तर को घेहून बलमामली करितील तरी काये कामाची. सर्व कबिला आम्हापासी ये कबिला आणावयास साहित्य यथून पाठउन. यथेच राहील. तुम्ही जो विचार करणे

दरबारी जाणे अथवा विचार करणे तो करावा. कबिलेसी काय प्रयोजन आहे. दरम्यान मातबर आदमी घेउन काम करणे. नारो शंकर याचा कारभार बदअमली. त्याचा सांप्रदाये तसाच. राजश्री लक्ष्मण नारायण आमचा स्नेही. त्यास लिहावे तर या कर्तव्यास तो तोच अधिकारी याकरिता त्यास कसे लिहावे या कार [ता] पुरता बंदोबस्त हे शर्त कबिला सुटून शाहबादेस पोहचलेनतरी शा सावकाराने द्यावे असे करुन लिहून पाठवणे उपरी सा चिरंजीव आनुबाई लग्न जाहालिया सातवे वर्ष. हमेशा आम्ही लिहितो की पाठवणे त्यास आपण न पाठविली. आता मूल थोर जाहाली. कार्तिकाने चावदावे वर्ष प्राप्त जाहले. आता किती दिवस ठेवावे. अनुकूल प्रतिकूल हे तो ईश्वरइच्छा. आज सात वर्षे होउन गेली. आम्ही वारंवार लिहितच गेलो. येताजाताचे साहित्य यथून पाठउन देतो अथवा तुम्हासही अनकूल होते परंतु आपल्या चितास न आले. ऋणानबध. त्यास तुम्ही काये कराल. गुदस्ता सरंजाम पाठविला. तुम्ही अपु[र]ता पाठविला. काये करावे. याउपरी तेथे ठेवावे हे उचित की काये. आम्ही काय करावे. तरी याउपरी कृपा करावी. सरंजाम पाठवितो रावाना करून द्यावी. अनकुलता होउन येईल ते समई पाठउन. तरी काये चिंता आहे. आपणास कर्तव्य असेल ते अनकुल जाल्यास करावे परंतु मुलीस येकदर न ठेवावी. याउपरी तुमचा जाबसाल येईल त्याप्रा करून. आमचा ऋणानुबंधास असेच आले. तुम्हास काये बोल लावावा. याजकरिता वडील बोलत गेले की जे करणे ते त्वरेनेच करावे कालचा दिवस कलत नाही परंतु तुम्ही सर्वही अमान्य केले बरे जाहले ते जाहले. याउपरी यकंदर न ठेवणे [अपूर्ण]

---

लेखांक [४०९] श्री

[अक्टूबर १७६२] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबाबा स्वामीचे सेवेसी

सेवक त्रिंबकराव[२०६] सिवदेव [ओढेकर] सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. प्रगणे पाटण येथील सरकारचा

(२०६) ओढेकराचे कर्ज पेशव्याकडे बाकी होते त्याची 'सोय' म्हणजे फेड केली तेव्हा परगने पाटण येथील तिसरा हिसा राघोबाने ओढेकरास लावून दिला [वाड ९ ले १९३] या पत्रात तो 'सरजाम' होता असे म्हटले आहे अर्थात ती योजना शिंद्यास नडणारी असल्यामुळे पार पडली नाही [भाग १ ले २७६] ओढेकरास शिंद्याची 'दिवाणगिरी सांगितली' होती त्या मानाने पत्राचा काल दिला आहे. [ले ४१३ वाड ७ ले ६८१]

हिसा आम्हाकडे सरजामात दिल्हा आहे. त्यास तेथील कमाविस रा। केसो आनत यासि सांगितली आहे. तरी प्रगणे मजकुरी आमलाची सुरुवात जाल्या दिवसापासून मारनिले यासि रुजुवात हिसबकितेबची करुन समजाउन द्यावी. समाईक खर्चवेच वगैरे याचे रुजुवातीने करून, हे व आपण येकविचारे राहून कामाचा बंदोबस्त होउन उतम प्रकारे चाल ते करीत जावे. आमल जाल्या दिवसापासून नख्ताचा व गल्याचा वसूल जाला आसेल तो रुजु करून देणे. ॥ बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [४१०] श्री * संवत १८१९ माघ वद्य १३

[१० फरवरी १७६३]

राजश्री लालाजी बलाळ कमाविसदार पो पाटण गो.

अखडितलक्षुमीअलकृत राजमान्ये श्रो' संताजी वाबले[२०७] व गणोजी कदम दंडवत विनती उपर. आम्ही राजश्री सिदोजी ईदलकर याचे समजाविसी दिल्या कोटयास आलो होतो ते समयी सिलेदाराच्या खर्चाबा घेतले रुपये.

| | | | |
|---|---|---|---|
| १५ | संताजी वाबले. | १५ | सिलेदार निा येमाजी गुजर. |
| ४२ | निा गणोजी कदम.[२०८] | ४३ | सिलेदार निा आपाजी पवार |
| | | ११५ | |

येकुन येकसे पनरा रुपये पाा मजकूरचे येवजी गुजरुन मुजरा घेणे. छ * २६ रजेब सुाा सलास सितेन मया अलफ. बहुत काये. लिहिणे हे विनंती

---

(२०७) मोजे पिंपरी तालुके श्रीगोंदे येथे हे घराणे विद्यमान असून तेथे गेल्यावर शिवाजीराव रामराव वावळे यानी आपल्याजवळील कागदपत्र मोठ्या संतोषाने दाखविले ते मालेत पुढें क्रमश येतील या घराण्याची बखर पत्राधारे कोणी १८९८ साली रचिली आहे त्यावरून बरेच कागद असले पाहिजेत पण ते सर्व सापडले नाहीत असु या घराण्याचा मूळपुरुष पमाजी वावळे असून त्याचे नाव पेशवेदप्तरात पथकदार म्हणून येते [पेद ३० ले २५] त्याच्या पाच मुलापैकी वडील मुलगा संताजी हा शिंद्याकडे असून दुसरा जानराव होळकराकडे होता या उभयताची प्रतिष्ठा दोहीकडे असून बखरकाराशी गाढ परिचय होता मात्र याची पानिपतीय पत्रे सापडत नाहीत मार्गशीर्ष वद्य ९ शके १६८६ म्हणजे १७ दिसबर १७६४ पर्यंत संताजीचे नाव येते अर्थात तो यानतर वारला हे उघड होय

(२०८) या कदमाचे मूळ नाव कोणते हे कळत नाही परंतु शिरसगावकर म्हणून हे विख्यात आहेत याची एक शाखा शिरसगावकाटयास असून दुसरी ग्वाल्हेरीस वास करते श्रीयुत वामनराव कदम शिरसगावकराशी परिचय असून त्याच्याकडे काही कागद असल्याचे समजले पण ते प्रत्यक्ष

लेखांक [४११] श्रीशंकर * संवत १८१९ फाल्गुन शुद्ध ५
[१८ फरवरी १७६३]

तीर्थस्वरुप राजश्री भावोजी स्वामी वडिलाचे सेवेसी.

अपत्ये लालाजीने कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। फाल्गुण* शुद्ध पंचमी मुकाम नजीक सोपर जाणोन स्वानंद लेखन केले पाहिजे विशेष. हरीसिंग गारदी याचे लोक जखमी जाहले त्यास खर्चास रूपये तीनसेची वरात आम्हावर परगणे मजकूरचे यैवजी केली त्यावर आम्ही श्रीमंतास परगणेची नादारी वगैरे जी आर्ज करावयाची ती केली परंतु त्याची आज्ञा रूपये द्यावे त्यावरून पांच गारदी व वरात आपणाकडे पाठविली आहे तर वरात घेउन रुपये तीनसे जैसा जाणाल तैसे करून याचे पदरी घालणे आण कबज घ्यावी. पांच गारदी[२०९] पाठविले म्हणोन लिहिले त्यास गारदी तर महकूफ राहिले. दोघे स्वार पाठविले ते त्याचे पदरी रुपये घालणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [४१२] श्रीशंकर * संवत १८२० चैत्र वद्य ६
[३ अप्रेल १७६३]

आशिर्वाद उपरी. ता। चैत्र * वद्य ६ रविवार जाणोन स्वकीय लेखन करणे काली छाप पाठविली ते पावली. वर्तमान लिहिले ते कळले. रा। सदासिवपंताचे पत्र पाठविले ते पावले. पा। पाटण यथील साल मजकुरचे यैवजी पंनास हजार रुपये पाठवावे लागतात. त्यास साल मजकुरचा यैवज काये जमा जाला ते वर्तमान लिहिणे. रा। राघो जनार्दन देसीहून आले. येथे तीन रोज होते. हरामजादा. वरे काय चिंता

---

पहावयाचा सुयोग आला नाही अस्तु 'कदम तर केवळ गुरुस्थानापन्न आहे' या वाक्यावरून हा गणो जी कारस्थानी असून त्याचे वजन शिंद्याजवळ होते असे दिसते या भागात त्याचे नाव अनेक वेळा आले असून एक पत्रही उपलब्ध होते ते पुढे पहावयास मिळेल

(२०९) पहा भाग १ ले २३७ पानिपतापूर्वीच गारदी व फिरंगी यांचा प्रवेश पेशवे व होलकर याजकडे झाल्याचे समजले [पेद २२ ले ७८ पेद २१ ले ४९, ५४] तसेच शिंद्याकडेही गारदी होते ही गोष्ट या पत्रामुळे नि सकोचपणे कळते १७७० साली कुंभेरीकर जाटाच्या पदरी बरेच कवायती सैन्य होते त्याचप्रमाणे १७७३त शिंद्यानी वाढविले असावे असे अनुमान निघते कारण की खर्च घेऊन मुसा भपत यास पलटणीसह कोटेकराकडे पाठविल्याची अनेक पत्रे महादजी शिंद्याचीच आहेत ती पुढे पहावयास मिळतील

आहे. त्याचे काही चालिले नाही. रा कुसाजीराम सर्व वर्तमान निवेदन करतील. तूर्त येथील टीपाटापा वसूल जाला नाही. याजकरिता गोविंद मनाजी म्हणून ब्राम्हण आले आहेत. दरबारी काही ताळ राहिला नाही. साल्ही बोलास आले. याजकरिता मुकाती व बाकी जल्दीने वसूल करणे. रुपये पंनास हजार पाठवावे लागतात. कल्ले पो हे आशिर्वाद.

---

लेखांक [४१३] श्री * संवत १८२० अधिक ज्येष्ठ शुद्ध ३

[१६ मे १७६३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

सेवक केशव अनंत कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. प्रो पाटणचा सरकारी हिसा जहागीर श्रीमंत राजश्री त्रिंबकराव नानाकडे होती त्यास श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीनी श्रीमत राजश्री महादाजी सिंदे यासि आज्ञा केली की सरकारी हिसा जप्ती करणे त्याजवरून जप्ती राजश्री सिंदे याणी तुम्हाकडे सांगितली त्याउपरी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीची पत्रे राजश्री सिंदे याची आणिली की जप्ती हिसा सरकारी करावयासि सांगितला होता तो त्याजकडे महाल करार केला असे. त्यास त्याजकडे सुदामतप्रमाणे आमल देणे आणि जप्तीपुले वसूल घेतला असेल.तो माघारे देणे. त्या उपरी राजश्री सिंदे याचे पत्र तुम्हा आणिले त्यास प्रो मजकुरी तिसरे हिसे याचा आमल सुदामतप्रमाणे तुम्ही आम्हास दिल्हा जप्तीचा आमल तिसरे हिशाचा ता। छ १८ जोवल ता। छ १ जिल्काद सुमा सलास सितेन संवत १८१९ येकुण माहे पांज रोज चवदापावेतो तुम्हाकडे होता त्यास समाईक वसूल नगदी व गला खरीफ रबी जमा जाहला पैकी तिसरा हिसा नगदी व गला बरहुकुम कचा हिसेब कुल आहून तुम्हाकडून आम्ही भरुन पावलो. जप्तीच्या हिसेबाचा कझ्या तुम्हाकडे राहिला नाही. तिसेरे हिसेचा हिसेब भरुन पावलो. पुढे आमल छ २ माहे जिल्काद सुमास सलास सितेन जेष्ट सुध ४ पासून तिसरे हिसेचा आम्हाकडे करार जाहला असे. बहुत काये लिहिणे हे विनती.

साक्षे त्रिंबक बाबुराव नि॥

चिमणाजी गोविंद कादार.

---

लेखांक [४१४] श्री * संवत १८२० ज्येष्ठ शुद्ध ७
[१९ मे १७६३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लाळाजीबाबा स्वामीचे शेवेसी

सेवक सदासिव[२१०] बापुजी [फडणीस] साष्टांग नमस्कार विनंती उपर. येथील कुशल ता। * छ ५ माहे जिल्काद मु॥ प्रांत नरवर जाणून स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. स्वामीकडे दोनतीन पत्रे पाठविली ती पावलीच असतील परंतु उतर पाठविले नाही. स्वामीनी करार केला त्याजला बहुत दिवस जाले म्हणून कासिद आतुरदार येथून पाठविला असे तर करारप्रमाणे आकारनाम्याकडील यैवज व जालम-सिंग याजबाबद यैसे येकंदर हुंडी उजनची करुन कासिदाबरोबर पाठविली पाहिजे. येविसी दिवसगत न लावावी. खर्चाची तारांबळ आहे यास्तव लिहिले असे. याउपर कासिद रिकामा वाटे न लावावा. लिहिल्याप्रमाणे ऐवजाची हुंडी करुन पाठविली पाहिजे. कासिदास गुंता न होय तो अर्थ करावा. फौजचे वर्तमान तर इकडे छावणी होता दिसत नाहीं. कळावे बहुत काये लिहिणे सूचना लिहिली असे कृपा कीजे हे विनंती

हेच पत्री राजश्री नारबा नाना स्वामीचे सेवेसी नमस्कार. कृपा कीजे हे विनंती.

या पत्रावरुन हुंडी पाठविली.
मि॥ जेष्ट[२११] वद्य ५ दक्षणी समत १८२०
[३१ मे १७६३]

---

(२१०) शिंदेशाहीतील फडणीस घराण्याचा हा मूळपुरुष असून त्याचा वंश येथे ग्वालेरीस विद्यमान आहे. तलेगाव ढमढेरे येथील हे रहाणारे असल्यामुळें तलेगावकर असे आडनाव पडले. मात्र कागदोपत्री फडणीस या नावानेच प्रख्यात झाले. महादजी शिंद्याच्या विश्वासाची जी अनेक माणसे होती त्यापैकी ही एक व्यक्ती असून तिच्या स्वामीभक्तीचे उज्वल चित्र पुढें मालेत पहावयास मिळेल. याची जी थोडी पत्रें सापडली ती जमाखर्ची असून राजकारणी नव्हत

(२११) या वर्षी जंत्रीत अधिक ज्येष्ठमास मोडकाने दिला आहे तो तसा नसून अधिक आषाढ पाहिजे असे जे मानूने दर्शविले आहे [चंद्रचूड १ प्रस्तावना ९] ते या पत्राने खरें ठरते. या विषयी अधिक प्रकाश टाकणारे पत्र पुढें महादजी शिंद्याचे येणार आहे त्यावरुन ही गोष्ट अगदी निर्विवाद वाटेल

लेखांक [४१५] श्रीमार्तंडभैरव. * संवत १८२० कार्तिक शुद्ध १
[६ नववर १७६३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लाळाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पोष्ये राघो शंकर कृतानेक सा। नमस्कार विनती. येथील कुशल ता। छ * २९ रबिलाखर मु।। पुणे जाणोन स्वकीये कुशल लिहित गेले पाहिजे विशेष. कृपा करुन पत्र पाठविले ते उतमसमई पावोन दर्शणातुल्य आनंद जाला. पत्री कितेक मजकूर लिहिला त्यास उज्यनीस कोटेकरांस पांचा लक्षाची ताकीदपत्रे लिहिलें होते परंतु राजेश्री त्रिंबकरावजीच्या जिदीमुळे श्रीमत पाटीलसाहेबी ते कागद फाडून टाकले. तर तूर्त त्या तगाद्याचें प्रयोजन नाही. स्वकीय वर्तमांन खर्चाचे वगैरे लिहिलें तें सर्व कळले परंतु प्रां। पाढण येथील मामलत साल मजकुरी दुसऱ्यास सांगितली आहे. सरकारांत येवजाची निकड लागली म्हणोन रसदेच्या ऐवजी रुपये घेतले आणि मार्गी नर्मदेतीरी सदा करून दिल्ह्या तेव्हां आम्ही श्रीमंतास बहुता प्रकारें सांगितले. त्यानी उतर दिल्हें की तुम्हास सूचना न करता आम्ही गफलतीने केले तर काये चिंता आहे. चौ महिन्या सालही गेल्यातच आहे. पुढें त्याची मामलत त्यांजकडे सांगू. येसे वचन घेतलें आहे व तुमची फडनिसी सनद करून पाठविली आहे. हिसेबाचा मजकूर लिहिला कीं यावे तेव्हा आपणच यावे त्यांस मार्गी खर्च बहुत पाहिजे तर येविसी श्रीमतास निवेदन करून उतर पाठवणे त्यावरून सरकारचे पत्र पाठविले आहे. स्वारी तें प्राती जाल्यावर हिसेब घेउन येणे येविसीं सांगणे ते सांगितलेच आहे.

दुसरे पाटीलसाहेब उजेनीहून दरकूच टोक्यापर्यंत आले तो इकडील वर्तमांन श्रीमंत राजेश्री पंतप्रधान यानी कर्नाटकची स्वारी करून गंगातिरी राक्षसभुवनावर मोगलाची फौज बुडविली. विठल सुंदर याचा सिरच्छेद केला. मोगल पळून औरंगाबादेत गेला. त्यामागे सैन्यसहवर्तमान गंगा उतरून शहराभोवता शह देउन पेशजीचा मुलुक व नवी जहागीर घेउन खाशी स्वारी टोक्यास आली. तेथे श्रीमताच्या व सर्व सरदारांच्या भेटी जाहल्या. समागमेच पुण्यास आले. तों राघोजी थोरात हिंदुस्तानातून राजेश्री जनकोजी सिंदे याचे नाव आपणास ठेउन तोतया करून पुण्यात आला होता. समागमे तीन हजार फौज होती. त्यास श्रीमंत पुणियात दाखल होताच त्यास हाजूर बोलाउन कैद केला. त्याची फौज पळाली. राहिली फौज व डेरेदांडे लुटून सरकारात नेले. तो

कैदेत आहे. श्रीमंत पाटीलबावास सत्वरच सिरपाव देउन बिदा करणार आहेत. श्रीमंत मल्हारराव [होळकर] व नारो शंकर वरास गेले आहेत. त्याची रवानगी हिंदुस्थां[ना]त जाली आहे. त्याही फौजा सत्वरच त्या प्रांतास येतील. त्या प्रांतीचे राजकी माधोसिंगाची फौज रणथंभ्रोराकडे आली होती ते अलीकडे साद्यांत वृत लेखन करणे.

।' तुम्हाविसी महाराजजीस अखेरामजीस पत्रे लिा [कीं] समक्ष सांगितले आसता आद्यापवर लालाजीचा गौर न केला म्हणोन पत्रे पा आहेत पाटणाविशी श्रीमंतास बहुत संकोचविले परंतु रुये पंचवीस हजार रुद्राजी खडेरायाने दिल्हे. याजला निकड म्हणोन हे कर्म आम्हास न कळत जाले. सनदा नर्मदातिरी जाहल्या यास्तव आम्हास कळले नाही. आम्ही त्यासमई लस्करात नव्हतो यामुळे गफलत जाली. आता श्रीमंताचे वचन दृढतर घेतले आहे की पुढील वर्षापासून मामलत त्याजकडे सांगू. वर्त श्रीमंत पाटीलबावा पुणियात आहेत. याजला आठापंधरा दिवसानी आज्ञा जालियावर श्रीगोंधास जाणार. तदनंतर त्या प्रांती येणार. आपण तेथे रा महारावजीस अखेरामजीस पत्रे पा ते देउन काही बंदोबस्त जाला तर करून घेणे. हे येथून निघाले म्हणजी तुम्ही उजनीस येउन याजला भेटणे म्हणजी सर्व बंदोबस्त घडोन येईल. गुलराजाची [वकील अबदाली] वरात तुम्हावर आहे पाटणचे येवजी त्यास मामलत निघाली याजवर येवज कुठून घाल. जिकडे मामलत तिकडे वरात लागेल. येथील मर्जी कीं हेही रुपये त्यानी द्यावे. गणोजीबाबाची कारस्तानी परंतु तुम्ही न देणे. इकडेही प्रजन्य नाही. खरीफ गेले. रबीची आशा नाही. श्रीमंताची तुम्हावर पूर्ण दया परंतु कारभारियानी आपल्या स्वार्थास घालविले. अस्तु. तूर्त उपाये नाही. ही मजलस तूर्त येसीच आहे. लिहावे येसे नाही. श्रीकृपेने तुम्ही उजनीस आलिया मनोदयानरूप सर्व कार्य होतील. चिंता न करणे. कळले पा. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [४१६] श्रीगजानन * संवत १८२० कार्तिक वद्य ४

[२४ नवबर १७६३]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजी बलाल गोसावी यांसि.

सेवक विश्वासराव लक्ष्मण [विंचुरकर] सा नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ता छ * १८ जमादिलावलपावेतो मुा किले करेरा कुशळ जाणून स्वकीय लिहिणे. बहुता दिवसा स्मरणपूर्वक पत्र पाठविले ते पावोन समाधान जाले. श्रीमंत राजश्री

भाउसाहेबाचे[२१२] आगमन जाले याचे लिहिले ते प्रमाणच आहे. आश्विन वद्य २ रविवारी किले मजकुरास रा चिमणाजीपंतास पाठउन आणिले. समारंभ खुशालीचा जितका करावयाचा तो केला आणि करीतच असो. रा गोविंद सामराज [शिरवलकर] यानी हाती येक व घोडे नजर केले. धोंडो पदमाजी दिा सटवाजी जाधवराव आले. रा नारो रघुनाथ शहापूरकर वगैरे ल्हानमोठे ज्यानी येकिले ते आले. भेटी जाहल्या. पागा वगैरे सरंजाम जयत चालिला. फौजाही जमा करितात. तीनचार सहश्र जमा जाले. आणीक येतात त्यास ठेवितात. रा गणेश संभाजी [खांडेकर] व रा काशी नरसिंव्ह वगैरे दोचौ दिवशी येणार. सारांश फौजेचा थाट यथेच्छ होत जातो. तुम्हास कलावे. जरकरिता तुमचे राजे यास व आमात्यास श्नेह संपादून अगा बांधणे तरी खर्चास व नजर हतीघोडे व सेवेसी अखैरामजी सारखा मातबर माणूस येउन प्रसंग राखावा. कृपा संपादावी [हें] योग्य असे. यावर राजे कारभारी शहाणे माणूस दूरंदेश आहेत उतम जाणतील ते करतील. विस्तार कशास लिहावा. बहुत काये लिहिणे हे विनंती.

सो पो चिमणाजी वामन सा नमस्कार विनंती उपरी. लिा परिसोन श्रीमंताचे भेटीस संस्थानिकास समारंभे आणून सन्मान केलिया कृपेस पात्र आनायासे होतील. बहुत काये लिहिणे प्रतापसूर्य उदयास पावला. येसे समयी सेवा केली वाया जाणार नाही. तुम्ही कृपा करिता म्हणून लिा असे हे विनंती. श्रीमंतानी कार्तिक वद्य ४ गुरुवारी पोषाक केला. स्वारी हतीची केली. नजरा सर्वानी केल्या. तुम्हास कलावे म्हणोन लिा. तुमच्या हरकारेयानी चरित्र पाहिले [तें] सांगतील.

---

लेखांक [४१७] श्रीराम * १८२० कार्तिक वद्य १३

[२ दिसबर १७६३]

राजश्री लालजी वास्तव्य कोटे गोसावी यांसी

अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो गणोजी कदम रामराम विनंती उपरी. येथील क्षेम ता कार्तिक * वद्य १३ त्रयोदसीपर्यंत यथास्थित असो विशेष. तुम्ही पत्रे पाठविली ते पावली. साकल्य आर्थ ध्यानास आला. पाटणची मामलतीचा प्रकार

---

(२१२) हा लक्ष्मण शंकर विंचूरकराचा पुत्र असून नारो शंकराचा पुतण्या होय १७६१ च्या अती तो राजेबहादराच्या वतीने उत्तरेकडे आला [पेद २९ ले ३०, ३३] पानिपतावर भाउसाहेब कामास आले तेव्हा हा तोतया निर्माण झाला हे खूळ काय आहे याचा ठाव लावण्यासाठी 'भाउसाहेबा बरोबर विंचुरकराचे दिवाण चिमणाजी वामन व विठलपंत बकसी त्यास ओळखावयासी पाठविले असता' त्या दोघास परिक्षा होऊं नये आणि विश्वासरावही त्याला कसा भाळला याचे नवल वाटते

लिा तो कळला. यैसियांस तुम्हाकडून मामलत तगीर करावी असा प्रकार नव्हता परंतु तो प्रसंग तैसाच होता. रा रुद्राजी खंडेराव सनदेप्रो वर्ततील. तुम्ही चार महिने निश्चित असावे. चहू महिनेयानी स्वारी हिंदुस्थानात होईल त्या प्रो ते आल्यावरी तुमचा बंदोबस्त करावयाचे रीतीने करून दिल्हा जाईल. ताकीदपत्राविसी लिा तरी राजश्री महादजी शिंदे बीडास गेले. त्यासि पंधरा रोज लागतील याजकरिता ताकिदी न आल्या. वरकड मजकूर येजमान पुणियास गेले. श्रीमंत पशवे याणी बहुमान उतम रीतीने दिल्हा. तोतया निर्माण जाला तो खोटा. आखेरसालपर्यंत व फौजा त्या प्रांती येतील. सर्व मनोदयानरूप घडोन येईल. वरचेवरी पत्र पाठवीत जावे. उतरच लिहिणे हे विनंती.

आपले रुये ९०० नवसे तुम्हाकडे [येणे] डागिणे करविले ते फडनीस संभाजी काळे [याज]पासी पावते करणे व महाराव याजलाही रामराम सांगणे व अखेरामजीस रामराम सांगणे. हिंदुस्थानाकडील वर्तमान वरचेवरी लिहित जाणे.

---

लेखांक [४१८] श्री

[दिसबर १७६३]

राजश्री लालाजीपंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री मंताजी बाबले दंडवत विनंती उपरी. यथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत अमिले पाहिजे. यानंतरी तुम्ही पत्र पाठविले ते पावले. येजमानानी मामला दूर करून राजेश्री रुद्राजीपंत यासि सांगतली कमाविसी पाटणचा मार्गाची दस्तके सरकारची पाठवा आम्ही भेटीस येतो म्हणोन लिा त्याजवरून कळले. यैसियास तुमचा रुये सरकारात पेसजीपासून गुतला आसेल तोही खराच आहे. त्यास तुम्ही यावयाचा मजकूर लिा तर सांप्रत तुम्ही वाटखर्च वगैरे करुन देशास यावे नाहक खर्चाखाली यावे हे आमच्या ध्यानास येत नाही याजकरिता तुम्ही त्या प्रातीच तकूब राहाणे. इकडून देशीहून फौजाही त्या प्रातास सत्वरीच येणार आमची तुमची भेटी जालियाउपरी सर्व गोष्टीचा बंदोबस्त करून दिल्हा जाईल. तुमचेविसी साहित्यास आतर होणार नाही. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

[पेद १९ ले १६] हे पत्र महत्वाचे असून तोतयाचे कारस्थानात याचे अग पूर्ण होते याची ही कबुलीच समजली पाहिजे भूमगड मुकामी होळकरापुढे तोतयाने आपली जबानी दिली आहे ती वाचणीय होय [पेद १९ ले १९]

लेखांक [४१९]

श्री

[दिसबर १७६३]

राजश्रियांविराजित राजमांन्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी

पोष्य राघो शकर कृतानेक सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। मार्गेश्वर * शुध मुकाम श्रीगोंदे जाणून स्वकीये कुशल लखन किरीत असिले पाहिजे विशेष. अपले पत्र अन्ते त सुसमई पावोन लखनान्वये दरषनवत अनद जाला. तर येसेच सदोदित पत्र प्रेषून मोदवीत असिले पाहिजे. पत्री पाटण रुद्राजीपंतास दिल्ही त्यानी कितेका प्रकारचे तुम्हास उपद्रव दिल्हे फडनिसीविषई व हिषोबाकितोबाविषई व गिल्ल्याची बरात होती त्याजविषई दिल्हे म्हणोन तपसीलवार वर्तमान लिहिले ते कळाले. येजमान गुरुदरषणास[२१३] बीडास गेले होते ते त्रिती[ये]स येथ दाखल जालेउपर तुमचे कागद येजमानास नेऊन दिल्हे. वर्तमान सर्व तपसीलवार निवेदन केले व पत्रींही लिहिले होते ते समई रावोबा पोतनीस व रावोबा बक्षी व चितोपंततात्या [वळे] येसी सर्व मंडळी होती. यजमानाची पत्रे रुद्राजीबावास की याची फडनिसीची असामी पहिलेपासून आहे व दप्तरही लिहितात यांचे काम याचे हातेच घेणे व यानी का। साल मजकुरी काये वसूल केला आहे तो रजुवात घेऊन नेमणुकेप्रमाणे खर्च मुजरा देणे. याची वस्तभाव तेथे अहे त्याजला उपद्रव न देणें याचप्रमाणे निक्षूण ताकीद लिहिली अहे. तुम्ही लिहिले होते की येक वाटेच दस्तक पाठवणे व माहाराव [व] अखेरामजीस यजमानाचे पत्र याजप्रमाणे पाठवणे की मशारनिलें अम्हाकडे येत आहेत तर यांजला कोणी साहुकार अडवितील त्याजला ताकीद करुन मशारनिलेस अंम्हाकडे पाठवणे म्हणजे आम्ही तेथ येऊ. त्यास हेही वर्तमान निवेदन केले त्याजवर अज्ञा केली जे अम्हीच दोती महिन्या उजनीस येउ तेव्हा येतील. अल्यावर त्यांच्या मनोदयानरुप जे होणे ते होईल. याजप्रमाणे अज्ञा केली तर येजमानही उजनीस लवकरच येतील तोवर तुम्ही तेथच राहणे. येक पत्र माहारावजीस व

(२१३) 'पूर्वपानिपतीय शिंदेशाही' हा स्वतत्र लेख मालेत दुसऱ्या भागात आला आहे त्यात महादजी शिंदे व मनसूरशाह याचा परस्पर सबध दाखविणारे अनेक उतारे दिले आहेत त्यापैकी पहिला उतारा या पत्रातील होय हें वाचकाच्या सहज ध्यानी येईल आणि आजवर सदिग्ध असलेले गुरुशिष्यत्वाचे हे नाते आता स्पष्ट होईल वरील लेख कित्येकास आवडला नाही तो शाहाजीच्या वशजास किंवा शिष्यास नव्हे पण मुसलमानी गादीचा डका वाजविणाऱ्या भक्तास लागला त्यात ओवण्या सारखे काहीच नसता अनेक निनावी पत्रें येऊन अन्य स्थानेही बरेच प्रसाद वडले तेही खोळण्यास अयात कारण झाले ही गोष्ट वाचकास विदित असावी म्हणून केवळ उल्लेख केला आहे

अखेरामजीस याजप्रमाणे श्रीमंत यजमानसाहेबाची पत्रे लिहिविल्यात की लालाजी बल्लाळ तुम्हापासी अहेत त्याच्या खर्चावेचाविषई कितेकदा तुम्हास लेखन केले व रुबरुही सांगितले होत तर त्याचा राजीनामा करून पाठवणे. तुमचा अमचा स्नेह आहे तर ज्या गोष्टीने स्नेहात अंतर न पडे ते करणे. येसे लिहिवले अहे ती पत्रे पावतील.

राजकी वर्तमान तर श्रीमंत दादासाहेब [भट] तर अद्यापि पुण्यातच अहेत अविंध औरंगाबादेसच अहे. त्याचे डेरे विजापुराकडे जावयासी जाले अहेत. श्रीमंत पंतप्रधान माधवरावजी करनाट प्राती जाणार म्हणोन वदंता आहे. पुढें राजश्री गोपाळ गोविंद याजला बिदा केले आहे सबब जे हैदरनाईकाने करनाटक प्रातीची ठाणी उठविली कृष्णातीरपर्यंत याजकरता व श्रीमंत मल्हारराउ सुभेदार याजला व नारो शंकर व विठल सिवदेव याजला हिंदुस्थान प्रांती बिदा केले अहे. सत्वरच दोती महिन्यात तिकडे येतील. आपले येजमानास हाल दोन दिवसाची ढील फौज ठेवायासी वगैरे बंदोबस्तास लागतील. यांजलाही ते प्रांती यावयाची जलदी अहे. फौज ठेविल्याउपर येतील. ॥ दुर्त पैसा संग्रही नाही. फौजा तर ठेविले पाहिजेत वास्तव गुता असे. श्रीमंत प्रधानपंताची कृपा आपले येजमानावर आहे परंतु ज[पै]सेखाली सरदारी याजमुळे आद्याप सरदारी बंदोबस्त नाही. चिंतोबा तात्या [वळे] दुर्त येथेच आहेत. याचा भारआभार त्याजवर आहे. त्यानी जाखुमचे कर्म आपल्यावर केले नाही. पुढे हिंमतही पडत नाही. पाहावे. निवडल तै मागून लिहू. आपणाविषई मंडळीस श्रीमंतास निषेध कर्तव्यात कमी न केली. आमलात येईल ते खरे. आम्ही सर्व प्रकारे आपले कुटुंबी सेवक असो दुसरा अर्थ न जाणावा. सर्वदा पत्र प्रेशनी आनंदवीत असावे. सरकारची उत्तरे आपले लिाप्राो पाा आहेत. हे विनंती.

॥ हे पाा राजश्री नाना स्वामीस साा नमस्कार विनंती. लिखितार्थ परिसोन कृपा निरंतर करावी. आम्ही सर्व प्रकारे सेवक घरचे आहेत. दुसरा अर्थ किमपि न जाणावा. श्रीमंताची कृपा आहे. आम्हीही समयोचित विनंती वरचेवर करीतच आहोत. जे सर्व प्रकारे ते प्रहस्त बुडाले आहेत. रा बाजीराव व राघोबा पोतनीस याजलाही फजित केले जे तुम्ही लालाजीसी वचेन बरेच पाळले. हा कृतोपकार त्याजवर उतम केला. त्यासि ते म्हणाले आमचा उपाये नाही. जेव्हा उजेनीहून निघतेसमई केवळच नाइलाज जाला आणि काम न सरकता देखिले तेव्हा *मुकेल्यास वळचन पेढिली* यैसे जाले. यैसी भाषण जाली कळावे. आताही तुमची मामलत तुम्हाकडेच ईस्वरसतेकरून होईल आणि यैसेकरिता त्या प्रहस्ताची हमीही राहिली तरी तुम्हाकडून वसूल करून देवितील.

तुम्हावर श्रीमंताची पूर्ण ममता आहे यांचीविषई संशये किमपि न जाणावा. कळल पाहिजे. बहुत काय लिहिणे कृपालोभ कीजे हे विनंती.

राजश्री राघोबादादास सा। नमस्कार. राजश्री गदाराम साहाजीस सा। रामराम.

स्वामीचे सेवेसी केशव सामराज कृतानेक सा। नमस्कार विनंती. लिखितार्थ परिसोन कृपा निरंतर करावी. हल्कारियासि सरकारकार्याकरिता विलंब लागला यासि रागास न यावे. हे विनंती. बापुचे पत्र सोगारास अगत्यरूप पाठउन हल्कारे येतील जातील त्यासमागमे उत्तर पाठवावे

---

लेखांक [४२०] श्री * संवत १८२० पौष शुद्ध १
[४ जनवरी १७६४]

श्रीमंत राजश्री रामाजी अनंत दाभुलकर स्वामीचे सेवेसी.

सेवक सुखराम मोदी निा। सिंदे रामराम विनती उपरी. त्याहावया कारन येसिजे. तुम्हाकडे आमची उचापत होती. राजश्री दत्ताजीपाटील [शिंदे] दिलीवर पडले त्यासमईच्या हिसेबाची बाकी राहिली होती व कोटपुतलीपासून बुनग रवान जनीस आल त्या हिसेबाची बाकी हिसेबाची रजुवात राजश्री लक्षुमणपंत दाजी [वैद्य] रु॥ तुम्हाकडे बेवीसे पच्यानव २२९५ रु॥ बाकी राहिले होते ते रु॥ आम्ही पुन्याचे मुकामी भरुन पावलो हास्ते राजेश्री आपाजीराव राम दाभुलकर. या हिसेबामधे तुमचे कलम आम्हाकडे जा[स्त] लागले तर आम्ही व्याजसुधा भरुन देउ. बहुत काय लिहिने हे विज्ञापना मिती सके १६८५ सुभानु नाम सवछरे पैस सुध १ प्रतिपदा. सुमा आरबा सितईन मया व आलफ. छ * २९ जमादिलाखर. हास्ताक्षर मलार गोविंद गुनमरित कसबे पेन.

¶ लीषतंगं सुषराम मोदी वूपर लीषो सही. [हिंदीत आहे]

---

लेखांक [४२१] श्री [जनवरी १७६४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पोष्य राघो शंकर कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। पौष* शुध पर्यंत मुकाम श्रीगोंदे जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. आपली पत्रे कार्तिक वद्य १०चे मितीचे व येक सप्तमीचे मितीचे आले ते सुखसमई पाउन लखनार्थ

सर्व वि[दित जा]ला. पत्री लखन केले की फडनिसीची सनद न पावली हलकारियानी मात्र मुखजबानी सा[गि]तले की धर्मरावजीचे [गलगलेकर] कागदात घातले परंतु [अ]द्यापि सनद पावली नाहीं म्हणोन लिहिले × × पावल्याचे प्रत्योतर पाठवणे व पुर्वील × × रुदाजीपंताचा मजकूर लिहिला होता त्यास मशारनिलेस सरकारचे ताकीदपत्र व महारावजीस व अखेरामास सरकारची पत्रे की राजश्री लालाजी बलाळ तेथ आहेत याच्या खर्चाची वहुत तंगचाई जाहिर जाली आहे तर हमेशा पावत होते परंतु या तीचौ वर्षात तुमच्या आमच्या स्नेहाचे सबब व मुलूक पाइ[माली]के सबब न पोहच्या सो अब पत्र पावताच मशारनिलेची खातरजमा करुन राजीनामा लहून पाठवणे याजप्रमाणे पत्रे पाठविली आहेत. ती पावतील. आपण देसी यावयाविषई दोनतीनदा लेखन केले. हे वर्तमान सर्व अम्ही येजमान स्वामीचे कानावर घातले व तुमचे पत्रीही लखन केले होते उपर येजमानास या गोष्टीचा संकाच बहुत आहे. म्हणाले जे आम्ही बिग्हाअपराध त्याची मामलत काढली आणि त्याजला येथे बोलावावे हे उचित नाहीं. म्हणाले जे तुम्हीही त्याजला लखन करणे की आम्ही ते प्रांती लौकरच येउ. आल्याउपर तुमचे मनोदयानरुप जे होणे ते होईल व या संकोचाकरिता दस्तकाची परवानगी न दिल्ही. तर यजमान स्वामीची मर्जी याजप्रमाणे आहे की अम्ही उजनीत येउं तोपर्यंत तेथचा राहाणे. तेथ आल्याउपर तुम्हीहीं येणे. याजप्रमाणे प्रकार आहे तुम्हास कळावे. तर तुम्ही येजमान ते प्रां[तें] येयत तोपर्यंत तेथ राहावे. जरकरिता यावयाचाच प्रकार उतम दिसोन येत असेल तर तेथील बंदोबस्त करून मग देशास येणे. स्थल मोकले सोडून न येणे व राजश्री गणोजी कदम म्हणत होते की लालाजीकडे नानत्यात्रा हवाल्याचे रुपये नवसे आहेत ते आम्हास पावले नाहींत तर याचा प्रकार काये तो लेहून पाठवणे.

येथील राजकी वर्तमान तर सरदारीची दिवाणीगिरी नारो शंकराचे तर्फने अबचितरावजी[स] जाली. त्रिंबकरावजी तगीर जाले. सरकारात द्रव्याची बहुत जास्ती आहे तो तपसील कोठवर लेहावा. हाल नवी फौज ठेवणे व श्रीमंत पंतप्रधान स्वामीस चार लक्ष रुपये देण व कैलासवासी पाटीलसाहेबाचे लेकीचे लग्न करणे इतका खर्च आहे आणि तरतूद तर किमपिही अद्यापि दिसत नाहीं. अबचितरावजी नवे दिवाणजी जाले आहेत त्याणी याजप्रमाणे भारुड घातले आहे की तुमचे जुने फडणीस पोतनीस वक्षी व पागे यानी सरदारीचे ढौल चालवावे नाहीं तर फडनीस पोतनीस पागे वक्षी मुजुमदार नवे मी करितो. ते ढौल चालवितील. मुजमुवर व फडनिसीवर विष्णु महादेव [गद्रे]

पांच लक्ष रुपये कर्ज देतात व बक्षीगिरीवर दोन लक्ष रुपये गंगोबातात्याचा पुतण्या देत आहे व रावजी म्हणतात की आम्ही पांचपर्यंत कर्ज मिळउन देऊ याप्रमाणे भारुड दाखवितात. ये[ज]मानाचे चितास गोष्ट पुरती येत नाही की जरकरता याज प्रमाणे जाले तर सर्व कारभार अवचितरावजीकडे पडेल अम्ही सरदार मात्र नावाचे राहू. यानी फडनीस व पोतनीस याजला म्हणतात की तुम्ही सरदारीचे डौल चालवणे. याजउपर त्याणी प्रत्योतर याजप्रमाणे दिल्हे की आम्ही पूर्वीपासून ज्याजप्रमाणे करीत अलो अहोत त्याजप्रमाणे अज्ञा कराल तर चाकरीस हाजर आहोत. यजमानाचे मानस की याजला काही टकवावे येसे आहे. पुढे ज्याजप्रमाणे होईल ते लेहून पाठउ. राजश्री बाजी नरसी यानी येक साहुकार विष्णुपंत राणीचा दिवाण आहे त्याने जानोजी भासल्यास तीस लक्ष रुपये दिल्हे होते त्याजला आणनार आहेत. आल्यावर कोण्या प्रकारे तरतूद होईल ते लेहून पाठउं. श्रीमंत राजश्री पंतप्रधान माधवराउजीचे डेरे बाहेर आज महिना होत आला आहे कर्नाटक प्रांतो जाणार म्हणून अफवा बहुत आहे व यैसे येकिल्यात आले की हेदरनाईक माघारा फिरोन गेला म्हणोन यैकिले आहे व श्रीमंत राजश्री दादासाहेब तुळापुरास आले होते नासिकास जावयासि ते माघारे पुण्यास गेले म्हणोन यैकतो. श्रीमत सुभेदाराची व नारो शकर व विठल शिवदेव [विंचुरकर] याची रवानगी हिंदुस्तानात जावयाची जाली होती परंतु सुभेदाराचेथें त्याचे नातीचे लग्न आहे याजकरिता गुंता जाला आहे. जाल्याउपरी तेही लौकरच हिंदुस्तान प्रातात येतील. मागून आपलेही येजमान येतील. कळल पाहिजे. हमेशा तिकडील जेपुर प्रांतीचे वगैरे जे वर्तमान वर्तेल ते लहून पाठवीत जावे.

॥ रा जालमसिंगाचा गांव ना[न]ताबा ताकीद रुद्राजीपतास पाो गुदस्ताप्रमाणे जालमसिंगाचा आमल चालवणे दिकत न करणे म्हणोन पत्र पा [तें] पावेल. त्याजकडे गणोजी कदम याचे रुपये आहेत म्हणोन म्हणत होते. त्यास ताकीद करून वसूल घेणे अगर कैसे आहे हे उतर पा. वरकड साधांत वर्त[मान] व ताकीदी रुद्राजीपंतास पा आहेत. श्रीमंतास पूर्वी सूचना केली की ते लटकीलाडी लिहितील यास्तव संकोच लालाजीस फार आहे. त्याजवर म्हणाले लालाजी[ची] गैरवाजबी वर्तणूक नाही. आम्ही जाणतो तो लिहिल तर लबाड पडल. तुम्हावर कृपा तर विशष दिसती परंतु वारवार आम्ही श्रीमंतासच संकोचवितो की फार अयुक्त केले [कीं] पाटण त्याचे काढले. त्याजवर कारभारियास म्हणतात अयुक्त केले. कारभारी म्हणतात आमची आब्रु लोक घेत होते म्हणोन

धुकल्यान वलचण वसली यैसा प्रकार. सारांश उजनीस आलिया आपण खामखा यावे. श्रीकृपेने मनोदयानरुप सर्व घडोन येईल. कितेक उपरोध लिहिले तर लालाजीसाहेब आम्ही सर्व प्रकारे तुमच्या कुटुंबांतर्गत आसो. कैलासवासी रा [बालाजी]बाबास जैसे तुम्ही तैसे आम्ही होतो. त्यानी कृपा केली तदनरुप आपण दया करुन सेवकाच जाणता येतदविषई म्या उपरोध लिहावा यैसा नाही. मनोमन साक्ष आसे. दुसरा विचार न जाणावा. इतका प्रकार न होता परतु मी समयासि नहोतो म्हणोन जाला जालि[या]स उपाय नाही. कळले पा. जरकरिता येणेच उचित जाणाल तर श्रीमंत तर परवानगी देत नाहीत. आपणास सला उतम हाच की भ्रम दूर करावा तर तेथील बंदोबस्त करुन देवदर्शनाच्या निमित्ये सर्वांची आज्ञा मागून प्रसंगास यावे म्हणजी याजवर बोझ उतम प्रकारे पडून कायल आहेत पुढे विशेष होतील. प्रसंगी आसलिया धघियाची सोयसाय दृष्टिस पडल ते कली जाईल. कळल पा. राजकीस्वकीये वर्त[मान] सर्वदा लखनी तोषवीत आसावे. बहुत काय लिा कृपालोभ असो दीजे हे विनंती.

हे रा नाना स्वामीस सा नमस्कार. लिाप्रो कृपालोभ वर्धमान कीजे. सेवक कुटुंबांतर्गत जाणावे. द्विइत किमपि न जाणावे. कृपालोभ असो दीजे हे विनंती.

हो राजश्री रात्रोबादादास सा नमस्कार. लिाप्रो लोभ कीजे.

हो साहाजी श्री सदारामजी हे असिर्वाद वंचना. कृपा स्नेह राखो छो तीसे जादा राखोगा. म्हाके साहाजी उप्रात क्यौं मीने छै. आठा लाईक संदेव कृपा कर कागद पत्र कामकाज लिषोगा.

---

लेखांक [४२२] श्री

[ फरवरी १७६४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

पोष्ये राघो शंकर कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता माघ * वद्य मुकाम श्रीगोंदे जाणूण स्वकीये कुशल लखन करीत गेले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले लिहिला अर्थ सर्व ध्यानास आला. पत्री लिहिले होते की सरकारचे पत्र रा रुद्राजी खंडेराउ याजला होते ते त्याजला दाखविलेउपर मल्हारनिलेनी अताळपाताळ येक केले. बोलिले जे पत्र मघूनच आणिले यैसे कितेक प्रकारे

बोलो लागले त्याजवर आबाजीपंत वगैरे दोघी ग्रहस्तांची पत्रेही ही पाठविली परंतु पंत मजकुराचे मर्जीस न आले तेव्हा त्यारप्यादे पाठउन पाणी बंद केले तेव्हा ते खानाजगीवर आले. तेथ धर्मरावजी [गलगलेकर] होते त्यानी मध्यस्ती पडोन कजिया चुकविला. ते समई सिबंदी मात्र मुजरा दिल्ही व कमाविसीचा मुशाहिरा मुजरा न दिल्हा ऐसे तपसीले वर्तमान लखन केले ते कळले व राजकी वगैरे वर्तमान लिहिले तेही विदित जाले. राजश्री रुद्राजीपंताचे वर्तमान सर्व येजमान स्वामीस निवेदिले व आपले पत्रीही लखन होते ते अक्षरशाह श्रवण करविले व राजश्री रुद्राजी खंडेराउ याजला सरकारचे ताकीदपत्र तेथून याजप्रमाणे पाठविले आहे की राजश्री लालाजी बलाळ याजविशई पूर्वी तुम्हास ताकीद लिहिली होती की प्रो पाटण येथील सिबंदीखर्च वगैरे तुमचा अमल जाहला त्यासारखे पूर्वील जो हिशेबाचे रुजुने होईल तो त्याजला मुजरा देणे म्हणो[न] लिहिले होत तर तुम्ही सिबंदीखर्च मात्र दिल्हा कमाविसीची वेतन मुजरा न दिल्ही म्हणोन विदित जाले तर तुमचा अमल जाला त्या तारखेचे पूर्वी त्याचे वतनाचे जे होईल ते मुजरा देणे व त्याचे फडनिसीची आसामी पूर्वीपासून तेथील आहे तर फड-निसी काम याचे हाते घेणे. याजप्रमाणे निक्षून ताकीदपत्रे पाठविली आहेत ती पावतील.

येथील प्रकार तर पूर्वील पत्री आपणास लिहिला त्याजवरून कळलाच असेल. त्याजवर अद्यापि फौज ठेवावयाची तरतूद काही दिसोन येत नाही. राजश्री नारो शंकर राजे बहादर श्रीमंत पंतप्रधान माधवरावजीकडे जावयासि येच मार्गे गेले. येथे दोनतीन मुकाम केले. आपले येजमान सामोरे जाउन घेउन आले. नानानीही येथील बंदोबस्तात मन घातले. प्रथमतः आपले येजमानानी फडनीस पोतनीस वगैरे सर्व मुत्सदी याजला विचारिले जे तुमच्याने डौल चालवत असल तर अम्ही नारो शंकर याजला काही म्हणत नाही. जर न चालत असल तर तसे असल मग आम्हाकडे काही शब्द नाही. अम्ही तो नाविलाज जालो आहोच. हाली पेशव्यास चार लक्ष रुपये देणे ते तरी कर्ज काढून वारा. मग फौज ठेवायाचा प्रकार तर ज्या प्रकारे बनेल त्या प्रकारे करुन घेउ. हाली हे × तट मोठी भारी आहे. पेशव्याचे रुपये दिल्ह्याखेरीज सरदारी येथास्थित राहणे कठिण आहे. याज प्रकारे आपले मनात मनसबा केला तेव्हा येथील पूर्वील मुतसदीयाच्यानी तर हा प्रकार बनोन आला नाही. तेव्हा दुसरे दिवशी नारो शंकराचा व येजमान स्वामीचा येकांत जाहला. येजमान बोलले जे नाना सर्व प्रकारे वडील आपण आम्हास आहेत. आमचे सरदारीचा तर हा प्रकार आणि हली पेशव्या[स] चार लक्ष

रुपये देणे व नालबंदी देउन फौज ठेवणे त्याजलाही दहा लक्ष रुपये पाहिजेत. पेशव्याचे रुपये दिल्हावाचून व फोज ठेविल्यावाचून सरदारीचा बंदोबस्त कोणे प्रकारे राहातो तर तुम्ही आम्हास पंधरा लक्ष रुपये कर्ज घेउन दवणे. अम्ही विजयादशमीपर्यंत तुमचे रुपये फेडू. नाही तर कमाविसदारावर वरात म्हणाल तर वराता देउ. यात आपले ध्यानास येईल त्याजप्रमाणे करावे. यैसे संभाषण जाहले. याचे प्रत्योतर राजश्री गणोजी कदम वगैरे तथ गेले त्याजवळ याजप्रमाणे केले की पूर्वी अम्ही सरदारी उमी केली ते रुपये आद्यापि थोडवहु[त] बाकीच आहेत यैसे बोलले. तेंव्हा नानानी मुद्दे याजप्रमाणे घातले की फडनिसी पोतनीसी आज सता बक्षी याच्या समध वगैरे सर्व हुद्दे आहेत यद विषई तुम्ही किमपि न बोलावे. आमच्या ध्यानास येईल तैसा सरदारीचा बंदोबस्त करु. महादजीबावानी आमच्या म्हटल्याप्रमाणे आसावे. यसे मुद्दे घातले तेंव्हा येजमान स्वामीनी तो कबूल केले परंतु नानाचे अंतःकाणात यैसे आले की हली तो याच प्रमाणे कबूल करतील परंतु पुढे याचप्रमाणे चालणार नाही. सबब जे नानाचे राहाणे काहीयेक होत नाही आणि अच्युतरायाच्याने येथील कारभारी दबतात यैसा प्रकार नाही येसे जाणोन नानाही स्तिमीत राहिले. मग नानानी त्रिंबक मल्हार याची रदबदली खा[च]रोदविषई. केली. चालीस हजार रुपये नजराणा व दोन लाख रुपये रसद घेउन खाचरोद त्याजला सांगितली अणि आपण कूच करोन पंतप्रधान स्वामीकडे गेले. नतर येजमानसाहेबानी येक लक्ष रुपये बाजी नरसिंह व पनास हजार नरहर लक्ष्मण रा यैसे चार लक्ष रुपये पंतप्रधान स्वामीचे वारले. पुढे फौज ठेवणे आहे त्याची तजवीज याप्रमाणे दिसती की ज्याचे पथकाची त्याने संचणी करुन उजनी पर्यंत चालावे मग तेथे सर्वत्रास नालबंदी द्यावी. त्यास या प्रकारास राजश्री बाजीबा व राघोबा पोतनीस व गणोजी कदम तान्हाजी खराडे व रघोजी गाढवे व राघोबा घायेगुडे इतक्याचे संमत आहे परंतु पेशाविन्हा फौज जमा होणे कठिण दिसते. इतकियावर येजमानाचे दैव सबल दिसते. राजश्री राघोबा पागे याजपासून दीड लक्ष रुपये कर्ज घेतले. वरकडही मुतसद्यापासून घ्यावयाचे मानस. ते पुढे जे होईल ते लहून पाठवीत जाउ. 1* वरकड सार्यांत वर्त[मा]न होत जाईल तैसाविसी लिहित जाउ. सांप्रत रा खानाजी जाधव येथे आले आहेत. त्याची समजाइश जाहली. पूर्वंवतप्रो सरनौबती त्याची त्यानी करावी. त्याचे पथकपागा त्याजकडे सांगावी. तूर्त रा कारभार दिवाण अच्युतरावजी करतात गणोजी कदम तर केवळ गुरुस्थानापन्न आहे. पत्रे अच्युतरावजीसही लि[हि]त जाणे.

अच्युतरावजी पाशीं तुमचे मेहुणे रा गोपाळराउ आहेत. अच्युतरावजीस त्याचे आगत्यही विशेष दिसते. तुमची पत्रे त्याजला होती ती देउन उतरे पा आहेत. रुद्राजी-पतानी तुमची नालस विशेष लिहिली होती ती पत्रे अच्युतरावजीनी आम्हास दाखविली की तुम्ही ताकिदी द्यावी करिता आणि तेथील वर्तमान साधांत हे आहे त्याजवर त्याजला उतम प्रकारे त्याच्या ग्रहस्तपणाची रीत उमजविली. रा गोपाळरावभाउस सांगोन त्याजच्या उतर यथास्थित लिहिवली आहेत. येक आम्ही होतो दुसरे गोपाळराव भाउ आगेमागे प्रसुगी आहेत. आपण चिंता न करावी येजमानाची. वरकड मजलसची तुम्हावर दयाच आहे. अम्ही तर केवल तुमचे सेवकच कुटुंबांतर्गत असो. येदर्थी सिष्टाचार किमपि नसे. तुमच्या देशास यावयाविषई आम्ही बहुता प्रकारे म्हटले परतु गुरुच्या [कदम]व यजमानाच्या चित्तास प्रशस्त नाही की त्यानी न यावे. आम्ही अन्याये गोष्टी केली लाला-जीसी त्याचा धधा विनापराध काढला म्हणोन सकोचतात. तर तुमची मर्जी खामखा याव-याची आहे तर लाका येणे. हे श्रीगोंदात कुत वास्तव्य येक मास आहेत. तदनंतर लौकर त्या प्राति येणार यास्तव लिहिले आसे. तुमची याची गाठ मार्गात पडली तर मग देशास येणे होणार नाहीं यास्तव लिहिले आसे. चिरंजीव बापुचे पत्र पा पावल पुन्हा त्याजला पत्र लिा आहे [तें] पावते करावे.

श्रीमंत प्रधान मिरजवर आहेत. फोज सातआठपर्यंत आहेत श्रीमंत दादा-[साहेब] नाशक त्रिंबकी आहेत. मोगल औरंगाबादेस आहेत. श्रीमत सुभेदार फौज-सुधा कूच करुन मजलदरमजल हिंदुस्थाना[त] येणार. तुम्ही आपले साकल्य वर्त[मान] सर्वदा पत्रोपत्री तोषवीत असावे. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो बावा हे विनंती

ह्यो राजश्री नाना स्वामीस सा नमस्कार. लिाप्राो कृपा वर्धमान कीजे. सेवक पदरचे आसो. यदर्थी किमपि दुसरा प्रकार न जाणावा. आम्ही केवळ तुमचे आसो. हे विनंती. रा रावोबादादास सा नमस्कार. रा सदारामजीस असिर्वाद सागावा.

---

लेखांक [४२३] श्रीशंकर * संवत १८२० माघ वद ९ [२५ फरवरी १७६४]

श्रियासह चिरंजीव विजयीभव राजमान्य राजश्री लालजीबाबा यासि प्रति गोपाल त्रिंबक कृतानेक आसिर्वाद उपरी. यथील क्षेम ता माग * बहुल नवमी मुा श्रीगोंदे जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. बहुता दिवसी स्मरणपूर्वक पत्र पाठविले ते प्रविष्ट होउन भेटीतुल्य हर्ष जाहला. येसेच निरंतर पत्रद्वारी

तोषवीत जाणे. यानंतर ईकडील दरबार वर्तमान तरी श्रीमंत राजश्री पंतप्रधान कर्नाटकचे स्वारीस गेले. मिरजेपुढे दोन मजली गेले आहेत. हेदरनाईकाचा वकील आला आहे. बोली ठरेल ती काये पाहावे. श्रीमंत राजश्री दादासाहेब नाशिकास स्नानसंध्या करावयाचे उद्देशे गेले आहेत. राजश्री मल्हारजी होळकर याणी फौज ठेउन हिंदुस्थानात जातात. मालजी होल्कर यास फौज देउन खानदेशच्या घाटाखाले रवाना करून आपण जेजुरीस आले होते तेथून कुरकुबास आले. राजश्री पाटीलबावाही येथून कुरकुबास गेले. उभयेताची भेटीभाषण होउन चांदवडास सुभेदार गेले. तेथून श्रीमंताची भेटी नासिकी घेउन मजलदरमजल त्या प्रांती येतील. राजश्री पाटीलबावा फाल्गुण शुध व्दितीयेस डेरे बाहेर यावे यैसा करार आहे. पाहावे परंतु फौजेस अद्यापि नालबंदी दिली नाही. द्रव्याचे अनुष्टुप आहे. स्वदेसचे मामलेदार कडून व त्रिंबक मल्हार यासी खाचरोद सांगोन व विष्णु महादेव [गदरे] यांस उ[न्हे]ल सांगो[न] व कारकूनमंडळी फडनीस पोतनीस याजकडून यैसे द्रव्य काही जमा केले. त्यातून सरकारचेच लाख देउन बाकीतून फौज ठेउन त्या प्रांती येणार. आठपंधरा रोज अधिकउणे लागतील परंतु हिंदुस्थानात जातात हा निश्चय आहे. सविस्तर कळावे करिता लिहिले असे. देसी येणार म्हणून तुम्ही लिहिले ते उतम आहे. भेटी होईल. येणे न जाहले तरी त्या प्रांती आम्ही आलेवर भेटी होईल. वरकड सविस्तर लिहिल्याप्रमाणे अवगत जाहले. आमचे वर्तमान तरी हा कालपर्यंत येथे आहो. सरदाराची व दिवाणजीची कृपा मात्र आहे. पुढे ईश्वरइच्छेने घडेल ते खरे. आपण पाटणचा मजकूर लिहिला तो कळला. यैसियासि यजमानाची व तुमची भेटी होईल तेसमई पाटणच्या सनदा सिध आहेत. आपण क्षित न करावे. तुम्हावर यजमानाची कृपा आहे. वरकड नवलविशेष ल्याहावेसे नाही. मागा ममत करीत होता त्याहीपेक्षा दिवसेदिवस विशेष करीत जावी. दूर पडलो म्हणून विस्मरण न करावे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [४२४] श्री

[१ मार्च १७६४] ?

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री

नारोबा नाना स्वामीचे सवसी.

सेवक त्रिंबक नारायेण [विंचुरकर] सा। नमस्कार विनंती. येथील कुशल माघ व वद्य १४ चतुर्दसी जाणून स्वानंद लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. सांप्रत पत्र येउन

क्षमवृत कळत नव्हते यांकरिता चि[त] सापेक्ष होतें त्यास हाली कासिदासमागमे स्मरणपूर्वक पत्र पाठउन परामर्ष केला त्यावरून दर्शनातुल्य संतोष जाहाला. येसेच निरंतर पत्री सांभाळ करीत असिले पांहिजे यानतर इकडील वृत सर्व यथास्थित असे. अधिकोत्तर ल्याहावेसे नाही. राजकी वृत श्रीमंत पुणेस आहेत. काही फौज कोकणांत सावतावर[२१४] रवाना केली आहे त्यामुळे कोकणांत कुडळ प्रांते धामधूम आहे धारण चार रुपये जोनजले व पांच रुपये गहू हरमरे माप[ व] आहेत. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर असो द्यावी सर्व मंडली कुशलरूप आहेत हे विनंती.

सेवक घनशाम त्रिंबक सा। नमस्कार विनंती. सदैव पत्री सांभाळ करीत असावे तेणेकरून चित संतोष पावेल. कृपा करीत जावे हे विनंती.

---

लेखांक [४२५] श्रीशंकर * संवत १८२१ चैत्र वद्य ११

[२६ अप्रेल १७६४]

श्रियासह चिरंजीव राजश्री नारोबास आशिर्वाद उपरी. ता। च्यै[त्र] * वद्य दशमी सांम्यवार जाणून स्वकीय लखन करणे विशेष. आजीचे पत्र तुमचे आले औरंगाबादेच्या हुडया चैनरामजीच्या दुकानची साडेअठराचा करार केला त्यास वीस हजार रुपयेची करणे. बाकी सामान आहे साडेतरा अडीच हजार येथून उजनची करवितो. यकून वीस हजार उजनची वीस हजार औरंगाबादेची यकून चालिस हजार तुर्त पाठवावे. औरंगाबादेयाच्या हुडीपैकी दोनतीनची चिठी सदारामजीवरी करणे. मुदती दस रोज उजनीच्या वाढवार लिहिणे म्हणजे रूपये उजनीस घेउन जाव हजूर पोहचेल. सत्वर रवानगी करावी लागते तरी सितावी पाठवणे. बहुत काय लिहिणे हे आशिर्वाद.

---

लेखांक [४२६] श्रीमार्तंडभैरव * संवत १८२१ चैत्र वद्य ११

[२६ अप्रेल १७६४] ?

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबाबा स्वामीचे सेवेसी.

सेवक भगवंतराउ शंकर. कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. यथील कुशल ता। चैत्र * वद्य ११ पर्यंत मु॥ श्रीगोंदे जाणोन स्वकीय कुशल लेखनआज्ञा करीत

---

(२१४) सावतवाडीकर भोसले याजवर स्वारी केल्याचा हा पहिला लेख होय लेखकाने देशाहून पत्र पाठविले असे मानलें तर वर्ष १७६२ किंवा १७६४ धरावे लागेल आम्ही शेवटचे घेतले आहे ते शंकास्पद समजावें

असिले पाहिजे विशेष. येथील वर्तमान तरी मागाहून तपसीलवार लखन करू. तेथे आमल रा नारो बाळाजी याचे तर्फेचा आला आहे त्यासि आमल तुम्ही देणे खटखट न करणे. तुम्ही प्रसंगास आलियावर येथे जैसी चौघाची वाट होईल तैसी तुमची होईल. कलल पा. आम्ही तुमच्या कार्येस कमी करणार नाही परंतु हे रुपये पुणियात मौन चुकले. आता उपाये कोणाचाही नाही. पुढे साल आहे यावर तुम्ही प्रसंगास आलियावर ज होणे त होईल. कलल पा. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो देणे हे विनंती.

ॕ स्वामीचे सा केशव सामराज सा नमस्कार विनंती. लिाप्रो[२१५] [*आता सिवंदी ठेवाल ती आगावर पडल. कोणी यांणी मामलत जाईल. खराब करतील यार*]त[*व अमल सोडून देण*] तुमची पाटणची फडनिसीची सनद घेउन ठेविली आहे. ही मागाहून पाठउन देउ [*व तुम्ही त्या गह*]स्ता[*स लिा होते त्यासी ते काम होता दिसत नाहीं आणि*] द्र[*व्य पा आहे हे फसल आणि तुम्ही खु*]शाल येसे आहे. अद्यापि तरी ते [*गृह*]स्त श्रीमंत पाटीलसाहेबसमागमे [*गेले आहेत*] तोपर्यंत तुमचे उतर आले तरी तुमची पत्रें जैसीतैसी तुम्हाकडे पाठउ. तुमची पत्रें येउन न पोहचली आणि ते येउन पोहचले तर कसे करावे. अम्ही तरी ते माणूस ठेउन घेतले आहे. तुमची सला येईल तर पत्रे त्याची देउ न आली तर न देउ. याचे उतर सत्वर पा. कलल पो. हे विनती. उतर लौकर लौकर पाठवणे. ढील न करणे. तोवर आम्ही कागज त्याजपासी देत नाही. जर दिल्हे तर रुये घेउन होमकुंडी घालतील. हे विनंती.

तुम्ही चिठ्या पाठविल्या आहेत याच्या पेठा तुम्हापासीं आसो देणे. सावकारास सांगावे जे आम्हीं सांगू तेव्हा हुंड्या पटवणे. [*फडणिसीचे सनदेसही*] बहुत [*वेल*] लागेल व तुम्ही कजिया त्यासी न करणे. अमल देणे. कलल पो. बहुत काये लिहिणे हे विनती.

---

लेखांक [४२७] श्रीमार्तंडभैरव * संवत १८२१ वैशाख शुद्ध ७

[८ मे १७६४]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबाबा व रा नाना स्वामीचे सेवेसी.

सेवक भगवंतराउ शंकर कृतानेक सा नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता वैशाख * शुध ७ पर्यंत मुा श्रीगोंदे जाणोन स्वकीय कुशल लेखनआज्ञा करीत

(२१५) या व पुढील पत्रात कित्येक जागी सांकेतिक लिपी असून ती अगदी नवीन आहे. चार वर्षे सतत मनन केल्यानंतर तिचा बोध झाला तो कसांत वाकड्या अक्षरात दाखविला आहे.

असिले पाहिजे विशेष. कृपा करून पत्र प्रेशिले ते उतमसमई प्रविष्ठ होउन लखनान्वय दर्शनवत आनंद जाला. तरी यैसेच निरंतर प्रेशित पत्री तोषवीत जावे. येथील वर्तमान तरी श्रीमंत पाटीलसाहेब जोतिलिंगाहून आले. उपरांतिक येथून त्वरा हिंदुस्तानात जावयाची भारी आहे. बाहेरच राहिले गांवापासून दो कोसावर. दरमजल जातील. श्रीमंताची आज्ञा आहे जे श्रीमंत दादासाहेबास भेटू[न] जाउ नये[२१६] येदविशी कारकून वगैरे समागमे आहेत. त्यासी हे सत्वरच या प्रांतास येतील आणि आपणही अवंतीस दर्शनास येतील. येथील प्रसंग [येसा देखिला मुसाहेबत बाळारायानी मागली] पाहिली तेव्हां [हुडया परमारे तुम]च्या जासू[दाकडून देविल्या त्यासी त्याणी माहाद] जीबावाचेही वचनकथन घेतले जे [यानी याची मामलत यास]च [सागावी] ऐसा सिधांत केला आहे. त्यासी सर्व सविस्तर वर्तमान येदविसीच सेवेसी आणी लखन केले आहे त्यावरुन श्रुत होईल. आमच वर्तमान तरी श्रीमंत सखुबाईची [शिंदे] दिवाणगिरी रा बाजीराउबावानी केली त्याचे तर्फेने आम्हास सांगितली. त्यासि आमचे राहाणे येथे जालेमुळे तिकडे येतील. चिरंजीव राजारामभाउ पयकासमागमे लस्करात येईल व चिरंजीव गोविंदराउ सीतामहूस पाठउ. बापु सोपारात आहेच. त्यासि आपणही प्रसंगी आहेत हरयेकविसी साहित्य करतीलच. लिहावे यैसे नाही व आपल्याविसी राजश्री बाजीराउबावासही बहुता प्रकारे विनंती केली त्यानीही सर्व मान्य केले आपल्या कार्यास गै करणार नाहीत. श्रीमंत पाटीलसाहेबासही विनंती केली. त्यानीही मान्य केले. राजश्री बाळारावजीही [गळगलेकर] तुमच्या साहित्यावर आहेत. त्याच्या तीर्थरुपजीनीही [धर्मराव तमाजी] त्यास तुमच्याविषई फार लिहिल आहे. सारांश दरबारी अष्टो प्रहर बाळारावजी सावधान आहेत. ते तुमच्या कामास चुकणार नाहीत. त्याच वचन घेतले जे कार्य जाहले तर ऐवज देणे न कार्य जाल तर ऐवज न देणे यैसे वचन घेतल आहे कळावे. आम्ही तुम्हासिवाय नाही. सर्वस्वे पदरच आसो. कळल पा. बहुत काय लिहिणे कृपालोभ असो देणे हे विनंती.

स्वामीचे सेवेसी आज्ञाधारक केशव सामराज सा नमस्कार विनंती. लिा पो

हे विज्ञापना.

---

(२१६) हे व ले ४१९ ही दोन पत्रे अत्यंत महत्वाची असून माधवराव पेशवे व महादजी शिंदे याचा संबंध दाखविणारी आहेत इतकेच नव्हे तर विदुरत्वाचा जो कलंक महादजी शिंद्या-च्या माथी कित्येकानी लादला आहे त्याचे कोडे या पत्रानी चागलेच उलगडू पहाते पेशव्याशी ऐक्य बाळगाच, सखुबाईचा कैवार घेऊन दास्यत्वाचा आरोप ठेवून महादजी शिंद्याचे उच्चाटण करून सर-दारी राघोबाने मानाजीस दिली अशा प्रकारें रचलेले विदुरत्वाचे कुभांड चिकित्सेस किती उतरते याचा विचार भालेराईत केला आहे

लेखांक [४२८] श्रीशंकर * संवत १८२१ वैशाख शुध ८
[८ मे १७६४]

आशिर्वाद उपरी. ता। वैशाख * शुध ८ मंगळवार जाणोन स्वकीय लेखन करणे. काली पत्र पाठविलें ते पावलें. विजयध्वजीची पोथी असल व लिहून पा। ते पावली. वाो कृष्णाचार्य यांचा पुत्र शेरगडास गेला आहे. आजी उदईक येईल त्याजकडे प्रत स्कंध आणखी आहेत ते घेउन पा। तेही लिहिले पाहिजेत. कागद कोरे येथून पाठविले ते जाहले की बाकी किती आहेत ते लिहिणें. नारो बाळाजी आले. वरात पनास हजार रुपये श्रीमंत पाटीलसाहेबी श्रीमंत पेशवेचे यैवजी दिल्ही म्हणू[न] तरी बरे. त्यांचा यैवजच पनास हजार होतो. हर साल घेईल त्याने वरात दिली नाही. बरे जेव्हा देईल तेव्हा घेउन. दरबारी ताल राहिला नाही. बरे ईश्वरसता जें होतां होईल ते खरे. देशी हलकरा पा। त्यास आजी दोन मास जाहले. पाव दुखत होता म्हणावी पडिला तेथून चिरंजीवाने दुसरा हरकारा कागद देउन श्रीगोदेस रवाना केला होता. चिरंजीव राघोबा येणार आहेत त्याजबा। जाब येईल. बहुत काये लि। हे अशिर्वाद.

---

लेखांक [४२९] श्रीशंकर * संवत १८२१ जेष्ठ शुद्ध ८
[७ जून १७६४]

आशिर्वाद उपरी. ता। जेष्ठ * शुध ८ गु[रु]वार जाणोन स्वकीय लेखन करणे विशेष. श्रीमंत यजमानाकडे कासिद हुंडिया देउन रवाना केला होता तो काल बुधवारी आला. यजमानाची पत्रे व चिरंजीवाची पत्रे आली ती पाठविली आहेत. तेथे तुमच्या कार्याचे कागद असतील ते ठेउन घेणे. वरकड कागद पाठउन देणे. जाणिजे हे आशिर्वाद.

---

लेखांक [४३०] श्री * संवत १८२२ चैत्र शुद्ध १
[२२ मार्च १७६५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
लालजीबाबा स्वामी गोस.

सेवक अच्युतराव[२१७] गणेश नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करीत जावें विशेष. तुम्ही सरकारात पत्र पा। तेथे लि। की अखेराम व

---

(२१७) याचे आडनाव कळत नाही. नारो शंकराचा तो आप्त असला पाहिजे कारण की 'चिरंजीव' असे त्याने याला संबोधिले आहे. प्रतिनिधीची जप्ती करून मुतालकी नारो शंकरास सांगितली तेव्हा ते काम हाच त्याच्या वतीने करीत असे. पुढे २५ नवंबर १७६३ रोजी तो शिंद्याकडे आला.

जालमसिंग याणी इकडील वर्तमान ऐकोन डेरे बाहेर दिल्हे आहेत म्हणोन लि॥. ऐसियासी समयास यावे ते न आले. आता यावयाचे प्रयोजन नाही. ईश्वरसतेने सर्व गोष्टी येथास्थित जाहल्या. वर्षप्रतिपदेच्या मुहूर्त कोटयाचे रोखे ढाळा दिल्हा आहेत. देशीहून मातुश्री [सखुबाई]बा॥ दहा हजार फौज आली व पहिली येकूण फौजेचा भरणा मातबर जाहला. येकादो रोजात फौजेचा गवगवा वारुन येथून कूच करून मजलदरमजल कोटयाचे रानात येतो. अखेराम याणी यावयासि मांघेपुढे पाहून अनमान केला हें गोष्ट उतमच केली. रांगड्याचे सरवसियावरीच आजतागा कामेकाजे केली असा प्रकार नाही. ते न आले हे उपयोगीच पडले. याउपरी तुम्ही त्यास सांगोन ऐवजाची तरतूद करुन ठेवणे. पेशजी [दताजी] पाटीलबावानी महाराव छत्रसालजीस टीका देउन घेतले त्याप्राणेच आताचा प्रकार आहे. तरी तुम्ही साफ ताकीद करुन ठेवणे. पेशजीप्रा॥ होईल तेव्हाच टीक्याचा प्रकार होईल. कळले पा. रा। छ * ३० रमजान. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [४२१] श्री * संवत १८२२ वैशाख वद्य २

[७ मे १७६५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबावा स्वामीचे सेवेसी.

पो बाजी[२१८] नरसिंव्ह कृतानेक सा॥ नमस्कार विनंती उपर. येथील कुशल तागाईत वैशाख * वद्य २ मु॥ अवंती जाणून स्वकुशल लेखन करुन आनंदवीत गेले पाहिजे

---

[वाड ९ ले. १२२, १६०] 'कुल डौलाची दिवाणगिरी अच्युतराव गणेश दिमत नारो शकर यास सांगितली असे तरी पेशजी रामचद्र मल्हार याजपासून कारभार घेत होते त्याप्रमाणे घेउन येकविचारे बंदोबस्त करणे' असे मारुद्ध घातले. सुखठणकराची सर नारो शकरास येत नसली तथापि त्याची उपमा व अधिकार देणे निदान राघोबाच्या स्वाधीन होते इतकेच नव्हे तर उत्तरेकडे आण्यायेण्याची याता-यात पडू न देतां त्याच्या या शागिर्दाकडून ते काम घेउन सवाईसुखठणकर करणे अगाध नव्हते याच नीलेविषयी ले ४२१, ४२२ ही दोन पत्रें मननीय आहेत अस्तु बोडपच्या लढाईपर्यंत हा शिद्याकडे होता. केदारजी शिंद्यास मुरळ पाडून मरारीच्या पक्षास वळविल्याबद्दल तो नगरच्या किल्यावर अटकेत होता. [पिद १९ ले. ९२] 'म्याही कोणाचे सांगितल्यावर हा खेळ केला' असे तो वदणार होता परंतु याचे पुढें काय झाले हे कळत नाही

(२१८) पहा ले २३९ टीप १४१. 'मानाजी शिंद्यास सरदारी देउन माहादाजी गोविंद याकडे कारभारी दिल्हे तेव्हा चौ हजाराची सरदारी देत होते ते अमान्य करुन महादजी उठोन उत्तरेस गेले. [पिद २९ ले. ४८] 'आनदराव फालके, राघोजी धायगुडे, सानाजी जाधव, बाबाजी व जयाजी

विशेष. स्वामीनी राजश्री नथोपंतासमागमे पत्र पाठविले. ते पावले. त्यात लिहिले की तीन पत्रे पाठविली येकही पत्राचे उतर न आले. त्यास आम्हासी पत्रे पावली नाहीत. पावलियावर उतरे कां न पाठवावी. स्वामीसिवाय आम्हासी दुसरा हितु कोण आहे की इतके लिहावे. त्यास आमचा काही दुसरा विचार तुम्हासी पूर्वीपासून नाही. येविषई दुसरा आर्थ चित्तात सहसा न आणावा. यानंतर कोटेकर वसवस करिता[त] म्हणून लिहिले. त्यास खातरजमेची पत्रे पाठविली आहेत ती द्यावी. स्वामीनी त्याची खातरजमा उतम प्रकारे करावी. समागमे घेउन यावे. आमचे व तुमचे विचारे सरकार उपयोगी पडत आसल्यास मामलतीचा जाबसाल केला जाईल. मध्यस्थानी यावयाची चित्तात संशय किमपि न आणावा. जाबसाल न बनला तर त्याजला पावते करुन देउ हा जिमा तुम्ही आपला करोन घेउन यावे. दुसरे रुद्राजीपंताकडील येजव येणे त्यापैकी हुंड्या तूर्त तीन हजाराच्या पाठविल्या त्या पावल्या. येसियासि त्याचा जाबसालाचा फडशा तुम्ही याल तेव्हांच केला जाईल येविषई काही चिंता न करावी. याचा प्रकार कितेक भारनिलेस सांगितला आहे त्यावरून कलेल. इकडील वर्तमान तर येकादो रोजात कूच होउन हडोती प्रांती येतील तेव्हां भेटीही होईल. परस्परे सर्व आर्थ कलतील. बहुत काये लिहिणे हे विनंती

---

लेखांक [४२२] श्री * संवत १८२२ वैशाख वद्य १०

[१४ मे १७६५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबाबा स्वामी गोसावी यांसि.

सेवक अच्युतराव गणेश नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पा॥ ते पावोन लिहिला अर्थ सविस्तर कळला. यैशास येथील जुने लोक खानाजी जाधव वगैरे व नवी मंडली याची समजुती करणे होती यास्तव आठचार दिवस अधिक लागले. हली दरोबस्त फौजेची समजोती पडली. उदईक येथून कूच करून दरमजल कोट्यासच येत असेत. रांगडे आज दोन महिने येतात

---

भोइटे, राघो केशव' इत्यादि मंडळी जी महादजीच्या पक्षास होती त्यात हा 'बाजीराव, राघो पोतनीस व राघोराम पागे' हे तिघेही होते. या सर्वांवर कोपून भरारीने त्याच्या घरादारावर नागर फिरविले. [वाड ७ ले. ५८० वाड ९ ले. ३५१]

परंतु अद्यापि कोण्ही वकील येउन मामलतीचा गुंता उरकावा ते गोष्ट त्याजपासून न घडली. आता फौजच त्या प्रांते आलियावर काही गुंता पडत नाही कळावे. पेशजी तुम्ही गंगाजल्या दोन पाठविल्यात त्या पावल्या परंतु पातळ फार आहेत यामुळे पाणी थंड राहात नाही कळावे. वरकड सविस्तर सरकारच्या पत्रावरून कळेल. रा छ * २२ जिल्काद. बहुत काय लिहिणे.

---

लेखांक [४३३] श्री * संवत १८२२ वैशाख वद्य ११

[१५ मे १७६५]

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

लालाजीबाबा स्वामीचे सेवेसी

सेवक बाजी नरसिंह कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागाईत वैशाख * वद्य ११ मुकाम काल्यादेह [समीप अवंती] जाणोन स्वकुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. स्वामीकडील पत्र येउन सर्व तिकडील अर्थ कळला. यैसियासि राजश्री खानाजी जाधव वगैरे देशीहून आले त्यांची समजाविश व्हावी होती यास्तव गुंता जाहला. आता आजच कूच होउन हाडोती प्रांती येत असो. गुंता राहिला नाही. तिकडील जे येतील त्याजला समागमे घेउन यावे. त्याजकडे गुंता मामलतीचा आहे तो निर्गम त्यानी करावा. या गोष्टीत स्नेह राहील तेच त्यानी करावे. वरकड कितेक आर्थ स्वामीचे व आमचे भेटी अंती सर्वही परस्परे कळेल. उंटाचे ताकीदीकरिता पूर्वी ताकीदपत्रे पाठविली [तीं] पावली आसतील. त्याजला द्यावी. अत:पर ते तुम्हासी उपसर्ग करणार नाहीत. वरकड इकडील आर्थ राजश्री नथो मोरेश्वर यानी लिहिला आहे त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणे कृपा असो दीजे हे विनंती.

---

लेखांक [४३४] श्रीशंकर * संवत १८२२ वैशाख वद्य १४

[१८ मे १७६५]

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री लालाजीबाबा यांसि नारो गोपाल कृतानेक अशिर्वाद. यथील कुशल ता। वैशाख * वद्य १४ मंदवार च्यार घटिका प्रथम दिवसपावेतो यथास्थित असो विशेष. काळ मयाराम बामणाबरोबर व काल्याबरोबर पत्र पाठविले ते दोनी पावोन सविस्त' वर्तमान कळो आले. चालवयाचा निश्चये

ठरला. जालमसिंगजीनी बागात प्रस्थान केले. आम्हास मुहूर्त नाही याकरिता दोन दिवस राहू .मंगलवारी मुहूर्त चांगला आहे तोपावेतो स्थिरता असली तरी उत्तम. नाहीतर इंदुवारी चालणे होईल. तुम्ही इंदुवारी येथे येणे म्हणून लिहिले तरी उतम आहे. सोमवारी आपणाजवळ येतो. मुगरधज घोडा कान्याबरावर पाठविला आहे तो पावेल. सोमी घोडी आम्ही येतेसमई घेउन येउ. चेनराम मिश्र तट्टू घेउन गेला तो आला नाही. यथील वर्तमान आजी साहीकाळपावेतो भयाचा कटा होईल. मोजे अरनिटा व वलकवासा कस्बा तीन गाव कटे करावयाचे राहिले व अठसे व दाहाबारा गांवचे होणे आठदहा दिवसाचे काम आहे. हे उरकिलेवर उनालुचाही उमज नजरेस पडेल. जमितीचे दिवस बाज खादले. त्यास जमितीचा येदा काही ठिकाणा नाही. लोक बहुत नादार त्यामुळे बहुतसे कट आहेत परंतु सच्या उनालुचा हंगाम याचे निर्गमाची मुस्किल. आपणा समागमे गेलियावर माग येथे सांभाळी ऐसे कोणी नाही याकरिता आपणास लिहिले आहे. त्यास आमचे चालावयाची कसी काये सला ती लिहावी त्यासारिखे यथून तयारी करुन येउ. फौजेचे उजनीहून कूच जालियाचे वर्तमान आले की नाही हे लिहून पाठवावे. आमचाही चालावयाचा विचार. आजीच लिहून पाठवावा. त्यासारिखे तयारी कागदपत्रा करून ठेउ. कळले पाहिजे. खुशाल बामणास कागद देउन काल आपणाकडे पाठविला. तो पाउन कागद लिहून आजी त्यास पुढे रवाना केलाच आसेल. राजश्री आबाजीपंतास [निगडीकर] विडे देउन रवाना केले. त्यास अहिल्याबाई[२१९] तो इदुरास गेली. हे कोणी कडे जातात. अडीच सहस्त्र रुपये त्यास दिल्हेच असतील. बहुत काय लिहिणे कृ पालो असो दीजे हे आशिर्वाद.

---

लेखांक [४३५] श्री

[जून १७६५]

राजश्रियाविराजित राजश्री

लालजीबाबा स्वामीचे शेवेसी.

शेवक माणको[२२०] बलाळ कृतानेक सा। नमस्कार विनंती उपरी. राजश्री

---

(२१९) १७६४त मल्हारजी होलकर उत्तरेस आले त्या स्वारीत अहिल्याबाई समागमें होती. अवदालीची अवाई एकताच होलकराने तिला ग्वालेरीकडे पाठविले असता वाटेत दोन दिवस मथुरेंत थावली म्हणून ते रागे भरले तेव्हा तोफखाना घेऊन ती ग्वालेरीस आली गोहदकर जाटास जरब देऊन तेथून ती सिरोंजेस पावली [HRC vol xui pages 135 to 139] ती या वेळी इदुरास आली असावी.

(२२०) पेद २३ ले. १०७चा लेखक हाच असावा असे वाटते. वरील पत्र रामाजीभाऊ दाभोलकराच्या नावें असून त्याची तारीख १७ दिसंबर १७५७ अशी पाहिजे. या वेळी तो कर्डेरांजण-

आनंदराव[२२१] फाळके याजला रुपये ८५०० साडेआठ हजार देणे. गेई न करावी. हईगई कराल तर तुम्हास आपली आन आसे. बहुत काये लिहा हे विनंती. रोकडे देणे.

---

गाची असू शकतो. पुढें तो बाजी नरसिंहाचे निस्वतीस गेला १७७०च्या स्वारीतही तो विद्यमान होता [ले ४३६, ४६०] कोणत्याही पत्रात त्याने आपले उपनाम दिले नाही 'गोपाळराव रघुनाथ लिा फाळके याचे आजे माणकोपत नाना व योगिराज आपा आरणगावकर नगराजवळील अथवा इंदापुर नरसोबाचें' असे एक टाचण आमच्या संग्रही असून 'रघुनाथ माणकेश्वर यास मोजे बिल्हेठी पो नवलाई हा गाव छ १ जिल्हेज इसने सितैनपासून' होता असा शोधही लागतो या घराण्याचा शोध अद्याप लागत नाही

(२२१) संपादकाचे हे खापरपणजे होत. याचे बंधू सटवाजी पानिपतावर राहिले आणि हे वाचले पेद ३९ ले. ४०तील आनंदराव फाळके ते हेच वरील पत्राची तारीख १८ नवबर १७६१ अशी हवी आहे भाऊसर्वीत शिंदेशाहीची विपन्नावस्था झाली त्या वेळचे हे तुकडणकराचे पत्र असावे अस्तु महादजी शिंद्यानी पदरात घेऊन परामर्श केला म्हणूनच या पत्रात त्याचे नाव येते. पुढें १७८३ साली ग्वालेरचा किल्ला आटापासून सर करीत ते रणात पडले. त्याची छत्री ग्वाल्हेरीस आहे त्याचे वडील निंबाजी यानी राणोजी शिंद्याच्या पदरी राहून देवरी नजीक राहतगड-च्या युद्धात सरदारी संपादन केली त्याचे नाव ब्रह्मेंद्रस्वामीच्या चरित्रात येते [ब्रच ले २००, २०७, २१०] 'येजितखत छ १३ रमजान सुमा खमस अशरीन मया आलफ बमवालसी श्रीनिवास परशराम प्रतिनिधी' इत्यादि कागदात 'फाळके मूळचे तोवर रजपूत दिलीहून आले' असे म्हटले असून आमचे पणजे लक्ष्मणराव हे कविही होऊन गेले 'कविप्रिया, भक्तसिंधू सुधावल्लरी' इत्यादि काव्यमय ग्रंथाची रचना त्यानी हिंदीत केली आहे त्यात ही वंशावली दिली तिचा उतारा येणेंप्रमाणें

॥ दोहा ॥

प्रथमहि निजकुल के पुरुष बरनो बस विशेष । पीछे फिर रचना करो ग्रंथ अर्थ अविशेष ॥
'आद सुधाधर वंस मे पाडव कुल सुख्यात । भये नरिंदु अनेक है भारत कहि विख्यात ॥
श्री राजा जनमेजते साथ त्रानवे जान । अनगपाल भूपाल ने दिल्ली दीनि थान ॥
तिहुनपाल तिनि के भये बसे चडव्वा ग्राम । तिन के सुत भूपाल सुत सोनपाल तिह नाम ॥
गाम सोहनीया मे बसे पुत्र अंबिका मात । तिन ते तेरा साथ मे मान भये विख्यात ॥
मान बसायो गुवालियर जग में तिनको नाव । धौलसाह नो साथ में बसे धौलपुर गाव ॥
असलहै तिन के भये बसे करारे आय । पिहले हे वैसा हुमे सुख आनद सरमाय ॥
हृटेंसिग तिन के भये तिन के देवीचद । तिन के पुत्र जुझार हुवे सब आनदकद ॥
सवन बडे है जेतसिंग तिन के दो सुत जान । सहारूप महारूप सो दखिन गये निदान ॥
तन के छोटे भ्रात जो बसे आय आरोन । अेक बसे फिर मोहने तिन बखाने कोन ॥
सहारूप महारूप दोऊ दखिन पहूचे जाय । उद भयो जब मान को हयगज सपत पाय ॥
पंतसहाने मान को दखिन दीन मुहीम । तिन के सग गये तहा रहे सतारे भुम ॥

॥ सोरठा ॥

दखिन भुम सुगम वाई देस प्रसिद्ध हे । तहो पाडली ग्राम सुखद वास कीनो तहा ।

